# बृहत्कथासागर.

## प्राचीन ऐतिहासिक मराठी कादंबरी.

---

## भाग तिसरा.

---

हें पुस्तक

संस्कृत ग्रंथाच्या आधारानें महाराष्ट्रभाषेंत

**वामन शास्त्री इसलामपूरकर**

यांणीं तयार करून,

---

योगस्थः कुरु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते ॥

(भगवान्)

---

मुंबईंत
"देव्हारे प्रिंटिंग" छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

---

सन १८९१

---

किंमत २। रुपये

श्रीमंत

रावसाहेब माधवराव विनायक किबे

यांस

त्यांच्या विद्याप्रियता इत्यादि सद्गुणांवरून

हा भाग कर्त्यानें नजर

केला आहे.

॥ ओं नमः परमात्मने ॥

# बृहत्कथासागर.

## भाग तिसरा.

—∽*∽—

**मदघूर्णितवक्त्रोत्थैः सिन्दूरैश्छुरयन्महीम् ।**
**हेरम्बः पातु वो विघ्नान् स्वतेजोभिर्दहन्निव ॥ १ ॥**

याप्रमाणें राणी **वासवदत्तेसहवर्तमान वत्सराज**, प्रियपुत्र **नरवाहनदत्त** याचें उत्तमप्रकारें रक्षण करितहोत्साता **कौशांबींत** राहत होता. एकुलताएक मुलगा असणें हें एकप्रकारें मोठ्या चिंतेचेंच साधन आहे. जिला एकच मुलगा होतो ती वंध्यापणापासून मुक्त झाली असें होत नाहीं. तिला काक[1]वंध्या असें ह्मणतात. पुत्र मुळींच नसण्यापेक्षां एकतरी असणें हें चांगलें खरें; तथापि एकाअर्थी तें फार वाईट असेंच ह्मटलें पाहिजे. कारण त्याच्या रक्षणाविषयीं आईबापांला फारच काळजी वहावी लागते. जरा कोठें तो रडला कीं त्यांचा जीव झाला घाबरा. अंमळ त्याचें डोकें दुखूं लागलें कीं आईबापांचें चित्त झालें अस्वस्थ. अशी स्थिती असल्यामुळें एकच मुलगा होणें हें विशेष दुःखाला कारण होतें.

**वत्सराजा**चीही अशीच स्थिती झाली होती. प्रथम मुलगा नव्हता

---

१ 'काक' ह्मणजे कावळा. त्याला एकच डोळा असतो. डोळ्याचे आकार जरी दोहींकडे असतात तरी बुबूळ एकच असतें. तो त्याचा एक डोळा फुटला कि तो आंधळा झाला. दुसऱ्या सर्व प्राण्यांला दोन डोळे असतात यामुळें कदाचित् एक डोळा गेला तरी दुसऱ्या डोळ्यानें त्यांचा कार्यभाग होतो; पण बिचाऱ्या कावळ्याचा एकच असल्यामुळें तो फुटला कीं त्याला आंधळे व्हावें लागतें. त्याप्रमाणें जिला एकच मुलगा असतो, तिचा तो दुर्दैवानें नाहींसा झाला, तर तिला वंध्यापण भोगावें लागतें या सादृश्या वरू-

ह्मणून त्याला—आपण कधीं पुत्रमुख पाहीन! असें झालें होतें. पुढें ईश्वरकृपेनें मुलगा झाला व तो सद्गुणी होईल अशीही खात्री झाली, तरी तो लहानाचा थोर होऊन चिरायु होईल व त्याच्यापासून इच्छित सर्व गोष्टी कशा घडतील, याची त्याला मोठी काळजी लागली होती. तो पुत्राला इतका जपत होता कीं त्यापुढें त्याला इतर कोणतीच गोष्ट सुचत नव्हती. एकेदिवशीं त्याचा एकुलता एक तो लाडका पुत्र **नरवाहनदत्त** याच्या पायाच्या बोटाला ठेंच लागली. पोरस्वभावाप्रमाणें तो उड्या मारीत असतां सहज तशी गोष्ट झाली; पण तिच्यायोगानें **वत्सराजा**च्या काळजाला घरे पडल्यासारखें झालें. तो अतिशय घाबरा होऊन आतां याचा पाय कधीं बरा होतो असें त्याला झालें. ती त्याची अस्वस्थ स्थिती पाहून मुख्य प्रधान **यौगंधरायण** एकांतीं त्याला ह्मणाला, "महाराज, ह्या राजपुत्राविषयीं आपण विशेष काळजी करायला नको. हा **नरवाहनदत्त** भगवान् **शंकरानें** सर्व विद्याधरांचा सार्वभौम आपल्या घरीं उत्पन्न केला आहे. ही गोष्ट आपल्या विद्येच्या प्रभावानें विद्याधरांला समजल्यावरून—हा आपल्या पेक्षां वरिष्ठ होणार, हें चांगलें नाहीं तर कोणत्याही रितीनें याचा नाश करावा, अशी दुष्ट बुद्धी धारणकरून त्यांणीं ह्या राजपुत्राचा घात करण्याविषयीं प्रयत्न केला; तेव्हां तो त्यांचा हेतू जाणून भगवान् **चंद्रशेखरानें** त्याचा प्रियभक्त **स्तंभक** नांवाचा एक गण राजपुत्राच्या जवळ गुप्त रूपानें स्थापन केला आहे. तो कोणाच्या दृष्टीं न पडतां आपल्या पुत्राचें रात्रंदिवस रक्षण करीत आहे. आतां हें वर्तमान मला कसें समजलें ह्मणाल, तर काल **नारद** ऋषींनीं कृपाकरून मला दर्शन दिलें, व त्यानींच ही गोष्ट मला सांगितली ह्मणून मी आपल्याला असें ह्मणतों कीं, पुत्राच्या रक्षणाविषयीं आपण अगदीं बेफिकीर असावें. आतां त्याला ठेंच लागली आहे ही गोष्ट अगदीं सामान्य आहे. पोरस्वभावाप्रमाणें खेळतांना ठेंच लागली व ती फार झाली तर एकदोन दिवसांत बरी हो-

ईल. त्याबद्दल एवढी काळजी करण्याचें कांहीं कारण नाहीं. ज्याच्या रक्षणाविषयीं स्वतः भगवान् **शंकर** तत्पर आहे त्याच्याविषयीं आपण काळजी करण्यांत काय अर्थ आहे ?"

याप्रमाणें **यौगंधरायण** राजाला गोष्ट सांगत आहे तों, कानांत रत्न खचित कुंडलें धारण केलेला व ज्याच्या मस्तकावर मुकुट शोभत आहे, हातांत तरवार आहे, असा एक दिव्य पुरुष अकस्मात् आकाशांतून तेथें उतरला. त्यानें मोठ्या नम्रतेनें राजाला नमस्कार केला. **वत्सराजा**-ला त्याचें तें दिव्य तेज व अकस्मात् प्रकट होणें हें पाहून मोठें आश्चर्य वाटलें. त्याणें त्याचा योग्य आदर सत्कार करून बसायला आसन दिलें आणि ह्मटलें, "अहो महाराज, आपण कोण अहां? आपलें येथें येण्याचें कार्य कोणतें आहे? तें ऐकण्याविषयीं मला मोठें कौतुक वाटतें."

**राजा**चा प्रश्न ऐकून आकाशांतून उतरलेला तो पुरुष ह्मणाला, "मी पूर्वी मनुष्यच होतों. ईश्वराच्या आराधनानें दिव्य प्रभाव प्राप्त होऊन सांप्रत विद्याधरांत मी प्रमुख झालों आहें. माझें नाव **शक्तिवेग.** मला पुष्कळ शत्रु आहेत. तेजस्वी पुरुषांच्या विरुद्ध असणारे लोक फार असतातच. मला आपल्या विद्येच्या प्रभावानें तुमच्या घरीं आमचा भावि सार्वभौम जन्मास आला आहे असें समजलें ह्मणून कौतुकानें मी तुमच्या पुत्राचें दर्शन घेण्याकरितां येथें प्राप्त झालों आहें. तर महाराज, कृपाकरून हा माझा मनोरथ आपण पूर्ण करावा."

हें त्याचें भाषण ऐकून व पुढें विद्याधरांचा सार्वभौम होणाऱ्या आपल्या पुत्राला पाहण्याकरितां, तो आला आहे असें समजून **वत्सराजाला** फार आनंद झाला. **यौगंधरायणानें** नुकेंच त्याला सांगितलें होतें कीं सर्व विद्याधर **नरवाहनदत्ता**चा द्वेष करतात, व ते त्याचा घात करण्याविषयीं तत्पर झाले आहेत, असें असून हा विद्याधर प्रीतीनें त्याचें दर्शन घेण्याविषयीं आला, या गोष्टीचें **वत्सराजाला** मोठें आश्चर्य

वाटलें. तो पुनः **शक्तिवेगा**ला ह्मणाला, "आपण माझ्या पुत्राला पाहण्यास आलां आहां हें ऐकून मला फार समाधान वाटतें. तो आपला हेतू पूर्ण होण्याविषयीं कांहीं विशेष अडचण आहे असें नाहीं. तें होईलच ह्मणा, पण मला आपल्याजवळ प्रथम एक गोष्ट विचारून घ्यायची आहे ती कृपा करून सांगा. विद्याधर असें ज्यांला ह्मणतात त्यांच्याविषयीं मला विशेषशी माहिती नाहीं. विद्याधरत्व ह्मणजे काय आहे? व तें कशारितीनें प्राप्त होतें? स्वतः तुह्मांला विद्याधरत्व कोणत्या गोष्टीनें प्राप्त झालें? तें मला सविस्तर निवेदन करा. आपल्याशीं माझा विशेष परिचय नाहीं. तरी सत्पुरुषाच्या कृपेला पात्र होण्याविषयीं विशेष परिचयाची मुळींच अपेक्षा नसते. मीं आपल्याला मित्र असें समजून हा प्रश्न केला आहे, त्याचें आपण यथार्थ उत्तर द्यावें."

याप्रमाणें **वत्सराजा**चें भाषण ऐकून विनयानें नम्रहोत्साता तो विद्याधर **शक्तिवेग** राजाला ह्मणाला, "महाराज, ह्याच जन्मांत अथवा पूर्वजन्मांत भक्तिपूर्वक भगवान् **शंकारा**चें आराधन करून धैर्यशालि पुरुष त्याच्या कृपेनें विद्याधर ह्या पदवीप्रत प्राप्त करून घेतात. सर्व विद्याधर एकसारखेच नाहींत, मुख्यत्वें ते विद्या धारण करितात ह्मणून त्यांचें नांव विद्याधर असें पडलें आहे. त्या विद्या अनेकप्रकारच्या आहेत. मंत्रसामर्थ्याच्या योगानें कोणी तरवार, ढाल, विमान इत्यादि अनेक वस्तु साधन करून घेतात. तीव्र आराधनाचा व एकनिष्ठ सेवेचा हा सर्व प्रभाव आहे. आतां हें विद्याधरत्व स्वतः मला कसें प्राप्त झालें तें आपल्याला सांगतों श्रवण करा."

असें बोलून तो **शक्तिवेग** विद्याधर—राणी **वासवदत्ता** व **यौगंधरायण** इत्यादि मंडळीसहवर्तमान राजा, श्रवण करण्याविषयीं तत्पर झाला असतां आपल्या संबंधाची सविस्तर कथा निवेदन करिता झाला. **शक्तिवेग** ह्मणाला, "महाराज, या विस्तीर्ण भूतलाला शोभविणारें असें **वर्धमान** नांवाचें एक मोठें नगर आहे. तेथें **परोपकारी** ह्या नांवानें

प्रसिद्ध असा ; शत्रूंना संताप देणारा एक मोठा राजा होता. भुजबळाच्या प्रभावानें त्यानें मोठें ऐश्वर्य संपादन केलें होतें. असा सर्वप्रकारें उत्कर्षाला पावलेला जो राजा **परोपकारी** याची **कनकप्रभा** नांवाची पट्टराणी होती. जशी मेघाची विद्युल्लता असावी ; त्या प्रमाणें ती राजाची स्त्री शोभत होती. दोघींत अंतर इतकेंच होतें कीं विद्युल्लता फार चंचल असते, व **कनकप्रभा** स्थिर होती. त्या पट्टराणीसहवर्तमान राजा **परोपकारी** विषयोपभोग करीत असतां त्याच्यापासून एक मुलगी झाली. जणूं काय लक्ष्मीचा रूपगर्व उतरून टाकावा ह्मणूनच विधात्यानें तिला अप्रतिम सौंदर्य दिलें होतें. लोकांच्या नेत्रांला चंद्रिकेप्रमाणें आनंद देणारी ती कन्या आईबापांच्या येथें क्रमानें वाढत गेली. तिच्या या सौंदर्यावरून व सोन्यासारख्या दिव्य कांतीवरून राजा **परोपकारी** याणें तिला **कनकरेखा** असें नांव ठेविलें. कारण तिच्या आईचें नांव **कनकप्रभा** तेव्हां तिला **कनकरेखा** हें नांव ठेवणें योग्यच होतें. अनुक्रमेंकरून ती बालदशेंतून तारुण्यावस्थेंत प्राप्त झाली. राजाला या मुलीजोगता जांवयी मिळावा अशी मोठी इच्छा होती. तसा योग्य जांवयी मिळून मुलीचा विवाह कसा होतो, याविषयीं त्याला काळजी लागली होती. उघडच आहे, कन्या ही बापाचें हृदय विदारण करणारी आहे. ती एकदां सुस्थळीं पडली व नवराबायकोचें जमून ते संसार करूं लागले ह्मणजे बापाचा जीव बिनघोर होतो.

एकेदिवशीं राणी **कनकप्रभा** आणि राजा **परोपकारी** दोघेंच एकांतीं बसलीं होतीं. त्यावेळीं राजा राणीला ह्मणाला, "प्रिये, ही आपली मुलगी जशी दिवसेंदिवस वाढत आहे तशीच तिच्या बरोबर माझ्या हृदयांत तिच्या लग्नाची काळजीही वाढत आहे. तुला काय सांगूं ! ही **कनकरेखा** माझ्या दृष्टीला जशी आनंददायक होते तशीच सांप्रत हृदयाला दुःखदायकही झाली आहे. जसा गाण्याचा स्वर त्या त्या स्थानीं प्राप्त होऊन प्रकट झाला तर तो सुश्राव्य होतो. नाहींतर तो

ऐकणाऱ्या अनभिज्ञ मनुष्याच्यादेखील कानांला पीडा देतो. त्या प्रमाणेंच सत्कुलांत उत्पन्न झालेली मुलगी सुस्थानीं अर्थात् वयोवस्थेप्रमाणें आपल्या पतिच्या घरीं विराजमान न झाली तर, आपल्या आप्तांच्या नेत्रांला ती अप्रिय होईल यांत काय आश्चर्य? पण परक्यांच्या नेत्रांलाही असह्य होते. जशी विद्या अज्ञानानें कुपात्रीं दान केलीं असतां तिच्यापासून कीर्ति, अथवा धर्म प्राप्त होत नाहींत, तशीच कन्या अयोग्य वराला दिली असतां त्यापासून न धड यशाची प्राप्ति, न धर्माची प्राप्ती, केवळ पश्चात्तापाला मात्र कारण होतें. मला ही आपली मुलगी कोणत्या राजपुत्राला द्यावी याचा मोठा विचार पडला आहे. रूपगुणादिकांनीं हिला साजेल अशाप्रकारचा कोण वर मिळेल, याची मोठी चिंता लागली आहे."

राजाला मुलीच्या लग्नाची काळजी होती; पण त्या कनकरेखेच्या मनांत मुळींच लग्न करून घ्यायचें नव्हतें, व तो तिचा हेतू राणी कनकप्रभा हिला माहित होता. पतीचें भाषण ऐकून कनकप्रभा हंसत हंसत ह्मणाली, "आपण तिच्या लग्नाविषयीं इतकी काळजी वाहतां, आणि ती तर लग्न मुळींच करून घेणार नाहीं ह्मणते, तेव्हां आपल्या काळजीचा काय उपयोग? आजच मी तिला खेळायला ह्मणून एक बाहुली व एक बाहुला असें जोडपें दिलें होतें. तिच्या बरोबरच्या दुसऱ्या मुलींनी प्रीतिपूर्वक त्या जोडप्याचें लग्न लावलें. तो समारंभ पाहून मी सहज तिला ह्मटलें,—बाळे कनकरेखे, असाच एकदां तुझ्या लग्नाचा समारंभ दृष्टीं पडून माझे डोळे कधीं निवतील कोणास ठावूक! हें माझें बोलणें ऐकून ती खाडकन् माझा अधिक्षेप करून ह्मणाली, "आई, पुरे कर आतां. आजपासून मला पुन्हां असें कधींही ह्मणूं नकोस. मला लग्नाची गोष्ट मुळींच ऐकाविशी वाटत नाहीं. तुह्मीं मला कोणत्याही एखाद्या पुरुषाला कदाचित् द्याल; पण मला मात्र तें अगदीं मान्य नाहीं. तुह्मांला माझा वियोग व्हावा असें वाटतें आहे का? माझें लग्न झालें ह्मणजे अर्थात् मला

ज्याच्याशीं तो सोहळा करून घ्यायचा त्याच्या घरीं गेलें पाहिजे. पण माझ्या दैवीं तुमचा वियोग मुळींच व्हावयाचा नाहीं असें आहे. मी आपली अविवाहितच राहणार, व हीच गोष्ट मला फार चांगली वाटते. याउप्पर कदाचित् तुह्मी बलात्कारानें माझें लग्न लावाल तर लावा; पण त्याचा परिणाम मात्र चांगला व्हायचा नाहीं. मग मी मेलेंच असें समजा. आतां, मीं असें कां ह्मणतें याचें तुह्माला कदाचित् आश्चर्य वाटेल; पण तसें करण्याचें कांहीं योग्य कारण आहे. ह्मणूनच मी असा विचार केला आहे." **कनकप्रभा** ह्मणाली, त्या पोरीनें तर मला असें सांगितलें, त्यावेळचा तो तिचा बोलण्याचा कडकपणा पाहिल्यावरून लग्न करून घ्यायचें नाहीं असा तिचा अगदीं पक्का निश्चय झाला आहे, यांत कांहीं संशय नाहीं. मला तर तें तिचें बोलणें ऐकून मोठा चमत्कार वाटला, ह्मणूनच मीं ती गोष्ट आपल्याला सांगण्याकरितां आलें. ती जर लग्न करून घ्यायचें नाहीं ह्मणून हट्ट घेऊन बसली आहे तर आपण वराची चिंता करून तरी काय उपयोग ? मुळालाच ठिकाण नाहीं तेव्हां फळाची चिंता हवी कशास? याकरितां आधीं तिचा हेतू काय आहे तें समजल्याशिवाय उगीच आपण कशाला काळजी करतां?"

राणी **कनकप्रभा** हिणें सांगितलेली ही हकीकत ऐकून राजा **परोपकारी** अगदीं भांबावल्यासारखा झाला. मुलगी लग्न करून घेणार नाहीं ह्मणते व कदाचित् तसें केलें तर जीव देण्याची दहशत घालते; या गोष्टी त्याला फारच चमत्कारीक वाटल्या. तो तत्काल ती मुलगी ज्या महालांत होती तेथें गेला, आणि तिला ह्मणाला, "माझे शहाणे मुली, आज मला तुझी एक गोष्ट ऐकून मोठें आश्चर्य वाटलें आहे. ह्मणून तुझा तसा हेतू कां आहे? तें समजून घेण्याकरितां मीं असा घाईनें आलों. देव, दैत्य, इत्यादिकांच्या मुलीदेखील नवस, उपासतापास करून, ईश्वराचें आराधन करून, चांगला नवरा मिळावा ह्मणून प्रयत्न करतात, असें असून माझे लाडके, तूं लग्न करून घेणार नाहीं

ह्मणतेस, यांतला हेतू काय? खरें काय असेल तें सांग. मला या गोष्टीचा मोठाच अचंबा वाटला आहे."

**शक्तिवेग** ह्मणाला, "**राजा**, याप्रमाणें अस्वस्थ झालेल्या बापानें विचारलें तें ऐकून ती चतुर कन्या **कनकरेखा** अंमळ लज्जित झाली. जमिनीकडे दृष्टी लावून मोठ्या शांतपणानें ती आपला पिता **परोपकारी** याला ह्मणाली, "बाबा, माझा कांहीं वाईट साईट हेतू नाहीं. मला इतक्यांतच लग्न करून ध्यावें असें वाटत नाहीं, येवढेंच कायतें. यावेळीं मला लग्न करून ध्यायचें नाहीं, ह्मणून मी कधींच घेणार नाहीं असें कांहीं ह्मणत नाहीं. असें असून तुह्मीं याच वेळीं विशेष आग्रह करितां याचें कारण काय तें मला समजत नाहीं. लग्नाविषयीं तुमचा इतका आग्रह तो कां?"

याप्रमाणें त्या आपल्या प्रियकन्येनें भाषण केलें, तें ऐकून मोठा दूरदर्शी राजा **परोपकारी** पुन्हां तिला म्हणाला, "मुली, या गोष्टीचें कारण तुला काय सांगावें. अग, अनेकप्रकारचे दान धर्म शास्त्रांत सांगितले आहेत; पण सर्व पापांची निवृत्ति होण्याविषयीं कन्येच्या दानासारखें दुसरें कोणतेंही पुण्यकारक नाहीं, आतां तूं ह्मणशील कीं विवाह हा मुलीच्या इच्छेवर किंवा एकंदरींत तो करून घेणारांच्या इच्छेवर अवलंबून असावा, तर ती गोष्ट एकाअर्थी योग्य वाटते खरी; तथापि मुलींची जात स्वतंत्र असावी हेंही योग्य नाहीं. अविवाहित मुलीनें आपल्या आप्तांच्या तंत्रांत असावें, तिनें स्वतंत्रपणानें वागूं नये. मुलगी जन्मतःच दुसऱ्याच्या घरीं जाण्याकरितां ह्मणून उत्पन्न झालेली असते, व पुढें जो तिचा वर होईल त्याची ती एक आपल्याजवळ ठेवणी आहे, असें समजूनच मातापितर तिचें रक्षण करतात. मुलीनें आईबापांच्या घरीं राहणें हें कांहीं वावगें आहे असें नाहीं; तरी तें बालपणांतच शोभतें. प्रौढपणीं नवऱ्यावांचून आईबापांच्या येथें मुलीनें दिवस काढणें, यांत काय अर्थ आहे बरें? विवाह होण्या-

पूर्वी मुलीला जर रजोदर्शन झालें, तर त्यापासून तिच्या बांधवांला— ह्मणजे ज्यांच्याकडे तिच्या पालनपोषणाचा अधिकार असेल त्यांला— विवाह न केल्याबद्दल मोठा दोष प्राप्त होतो, व ते अधोगतीला जातात. जी अविवाहित स्थितींत असून रजस्वला होते, ती शूद्री समजली जाते. व नंतर तिच्याशीं जो पुरूष विवाह करील त्यालाही वृषलीपति अर्थात् शूद्रीचा नवरा असें ह्मणतात. तेव्हां तूं आतां प्रौढ झाली आहेस. रजोदर्शनाचा समय जवळ प्राप्त झाला आहे, असें असून लग्न न करून घेशील तर तुला लोक दोष देतील, व तुझ्या बरोबरच आह्मांलाही तो घ्यावा लागेल, याकरितां भलताच हेका धरून असें करणें तुला योग्य वाटतें काय?"

**कनकरेखा** सुशील व विचारी होती. बापानें मोठ्या काकुळतीनें जें तिला सांगितलें, तें तिणें शांतपणें ऐकून घेतलें, व थोडावेळ विचार करून आपल्या मनांत काय होतें, तें तिणें उघड करून दाखविलें. ती म्हणाली, "बाबा, आपण असें सांगतां तेव्हां त्यापुढें माझें कांहीं ह्मणणें नाहीं. मी लग्न मुळींच करून घेणार नाहीं, असें कधींच ह्मटलें नाहीं. मला जसा पाहिजे तसा वर मिळेपर्यंत दम धरावा अशी माझी इच्छा आहे; तथापि तुमची आज्ञा मोडावी, हें मला योग्य वाटत नाहीं. तुमच्या मनांत आतांच माझें लग्न करायचें असेल तर खुशाल करा. पण असें तरी करा कीं, ब्राह्मण अथवा क्षत्रिय यांपैकीं ज्या तरुण व चतुर पुरुषानें **कनकपुरी** नावांची नगरी पाहिली असेल, त्याला माझें दान करा, ह्मणजे मला फार संतोष होईल. ज्यानें **कनकपुरी** पाहिली असेल तोच माझा भर्ता व्हावा, दुसऱ्या कोणाचाही स्वीकार करूंनये, असें माझ्या मनांत आहे. माझ्यावर तुमचा सर्वस्वीं पूर्ण अधिकार आहे. त्याप्रमाणें माझ्या मताविरुद्ध तुह्मी कोणाही मनुष्याशीं माझा विवाह केला, तरी मला त्याच्या घरीं जावें लागेल; पण त्याचा परिणाम मात्र चांगला होणार नाहीं. शेवटीं माझें

इतकेंच मागणें आहे कीं, कोणत्याही प्रकारें माझ्या सांगण्याची तुह्मी पायमल्ली करूं नका."

कन्येचें हें भाषण ऐकून राजाला एकप्रकारें थोडासा आनंदच झाला. **कनकप्रभेनें** जें तिचें मत सांगितलें होतें, त्यावरून ती मुळींच लग्न करून घेण्याला तयार नाहीं, असें तो समजला होता. **कनकरेखेनें**—'**कनकपुरी** ज्यानें पाहिली असेल, अशा ब्राह्मण अथवा क्षत्रिय जातीच्या मनुष्याशीं आपण विवाह करून घेण्याला तयार आहें' असें सांगितलें, त्यावरून तो मनांत ह्मणाला, एकंदरींत कोणत्यातरी रितीनें लग्न करून घेण्याचें हिनें अंगिकारलें, हें मोठें नशीबच समजायचें. हिनें **कनकपुरी** पाहिल्याची जी एक शर्त घातली आहे ती मोठी चमत्कारीक वाटते. मला इतकीं वर्षें झालीं, देशदेशांतरांत संचार करणाऱ्या पुष्कळ लोकांचा मला सहवास घडला आहे, मला पुष्कळ देशांतराची माहितीही आहे, तरी **कनकपुरी** यानांवाची नगरी कोठें असल्याचें ह्यावेळपर्यंत माझ्या ऐकण्यांत आलें नाहीं. या पोरीनें हें कोठलें निराळेंच नांव काढलें आहे. मला तर असें वाटतें कीं कांहीं विशेष कारणाचा उद्देश धरून ही कोणीतरी देवता माझ्याघरीं अवतरली असावी. हिचें वय पाहूं गेलें तर अगदीं थोडें; पण बुद्धि मोठी पोक्त. हिचे विचार अनुभवि मनुष्याप्रमाणें अवश्य ग्रहण करण्याला योग्य असेच दिसतात. जर ही देवता नाहीं ह्मणावें, तर हिला इतकें ज्ञान कोठून प्राप्त झालें. तेव्हां एकंदरींत ही जें सांगते त्याप्रमाणेंच करावें, उगीच बळजबरी करून हिच्या इच्छेविरुद्ध विवाह करण्यापासून कदाचित् भलताच परिणाम होईल.

असा विचार करून राजा **परोपकारी** याणें **कनकरेखेला**—तूं ह्मणतेस त्याप्रमाणेंच करतों, असें सांगून सायंकाळची वेळ झाली होती, ह्मणून तो संध्यावंदनादि नित्यकर्म करण्यास गेला. दुसऱ्यादिवशीं सभेंत सर्व मंडळी जमल्यावर, त्यांतल्या प्रमुख प्रमुख लोकांला उद्देशून राजा

ह्मणाला, " अहो, तुमच्यांत देशदेशांतराच्या मोठ्या सफरी करून आलेले, व अनेक देशांची ज्यांस विशेष माहिती आहे, असे लोक पुष्कळ असतील. तुमच्यापैकीं कोणीतरी **कनकपुरी**नांवाची नगरी पाहिली आहे का ? ब्राह्मण अथवा क्षात्रिय या दोन वर्णांपैकीं कोणीही ती **कनकपुरी** पाहिली असेल; तर माझी प्रिय कन्या **कनकरेखा** त्याला द्यायची असा मी निश्चय केला आहे. प्रथम आपला जांवई करून घेउन नंतर त्या मनुष्याला यौवराज्य ही देणार, तर तुमच्यापैकीं कोणी ती नगरी पाहिली असल्यास सांगा."

राजाचें हें भाषण ऐकून मंत्री, पुरोहित, व इतर सरदार वगैरे लोक ह्मणाले, "महाराज, आपण जें नांव घेतलें त्यानांवाची नगरी कोठें आहे, तें आह्मी हावेळपर्यंत ऐकलेंदेखील नाहीं, मग पाहण्याची गोष्ट एकीकडेच राहिली. आह्मांस पृथ्वीवरील बहुतेक प्रसिद्ध प्रसिद्ध अशा सर्व नगरांची नांवें माहित आहेत; पण त्यांत **कनकपुरी** यानांवाची नगरी खरोखर यापूर्वी आह्मी कधीं ऐकली नव्हती."

सभेंतील सर्व मंडळी एकमेकांच्या तोंडाकडे पहात बसली. **राजानें कनकपुरी** हे नांव नवीनच कोठून शोधून काढिलें, याचें सर्वांला मोठें आश्चर्य वाटलें. जमलेल्या सर्व मंडळींतून **कनकपुरी** पाहिली आहे असें कोणीही सांगेना. तेव्हां **राजानें** चोपदाराला आज्ञा केली, आणि म्हणाला, "अरे, तूं जाऊन कोतवालाला असें सांग कीं, आपल्या शहरांत व आसपासच्या प्रदेशांतही **कनकपुरी** नावांची नगरी कोणी पाहिली आहे किंवा नाहीं ? याविषयीं दंवडी पिटवून शोध करण्यास सांग. या रितीनें कदाचित् ती नगरी कोणी पाहिली असल्यास त्याचा शोध लागेल."

याप्रमाणें राजाची आज्ञा होतांच चोपदार देवडीवर गेला, व तेथें कोतवाल बसला होता त्याला त्याणें राजाचा हुकूम कळविला. तेव्हां कोतवालानें तत्काल दंवडी पिटणाऱ्या लोकांना बोलावून—ऐकणाऱ्या

लोकांला विशेष आश्चर्य उत्पन्न करणारी दंवडी पिटविली. ते शिपाई चव्हाट्यावर जाऊन खूप जोरानें हलग्या वाजवूं लागले, तेव्हां आसपासचे पुष्कळ लोक तेथें जमा झाले. नंतर ते राजपुरुष ह्मणाले, "ब्राह्मण असो किंवा क्षत्रिय असो, जो तरुण मनुष्य **कनकपुरी**नांवाच्या नगरीला पाहून आला असेल, त्याणें खरी गोष्ट सांगावी, ह्मणजे आपले महाराज त्याला मुलगी देऊन जांवई करून येथील यौवराज्याचा अधिकार ही देतील."

याप्रमाणें दवंडी पिटली. ती ऐकून लोकांना मोठें आश्चर्य वाटलें. त्याठिकाणीं **कनकपुरी** पाहिली असें कोणीही ह्मटलें नाहीं. ती थाळी ऐकून नगरवासी लोक ह्मणूं लागले, "हा काय चमत्कार आहे, कोठल्या **कनकपुरी**च्या नांवानें आज थाळी पिटित आहेत कोणास ठाऊक! ह्मातान्या ह्मातान्या लोकांनींदेखिल कधीं पाहिली नाहीं, किंवा कधीं ऐकलीदेखील नाहीं, अशी कुठली नवीच एक नगरी काढून तिच्याकरतां राजा मुलगी आणि यौवराज्य देण्यास तयार झाला आहे हा काय चमत्कार!"

ती दंवडी ऐकून लोक ह्या व दुसऱ्या अनेक प्रकारांनीं बोलूं लागले. कित्येकांनीं तर—हें सर्व थोतांड आहे, राजा गांवांतल्या लोकांचा मुद्दाम उपमर्द करितआहे, असें ह्मटलें. कांहीं लोक ह्मणाले, "राजाला वेड लागलें आहे, भलतीच कांहींतरी गोष्ट त्याला खरी वाटते. कोणी तरी ढोंगी मनुष्यानें त्याला हीं खोटी समज दिली असेल दुसरें काय?" याप्रमाणें ज्याला जसें वाटलें तसें तो बोलूं लागला; पण ती **कनकपुरी** मी पाहिली असें कोणीही सांगितलें नाहीं. याप्रमाणें शहरांत जिकडे तिकडे दंवडी पिटण्याचें काम चाललें आहे; तों उत्तरेकडच्या चव्हाट्यावर शिपायांनीं दवंडी पिटली, तेव्हां तेथें **बलदेव**नांवाच्या ब्राह्मणाचा मुलगा **शक्तिदेव** हा उभा होता त्याणें ती ऐकली.

**शक्तिदेव** हा तरुण होता, त्याला विद्यावगैरे फारशी येत नव्हती; तरी

जुगार खेळण्याचें त्याला मोठें व्यसन लागलें होतें. नुकतेंच जुगारांत त्याचें सर्वस्व हरलें होतें. ज्यानें **कनकपुरी** पाहिली असेल त्याला, राजाची मुलगी व यौवराज्य मिळणार, हें ऐकून त्याच्या मनांत उमेद आली. तो मनांत ह्मणाला, जुगारांत माझें द्रव्य तर सर्व गेलें आहे. आतां खाण्याची पंचाईत, येथपर्यंत मी निर्धन झालों आहें. बाप सधन आहे, तरी मी असा व्यसनी असल्यामुळें, व त्याणें दिलेलें सर्व द्रव्य जुगारांत घालविल्यामुळें, तो मला आतां दरवाज्यावर उभादेखील करणार नाहीं. माझी ती **मोहिनी**नांवाची आवडती वेश्या आहे, तिच्यावर माझें पुष्कळ प्रेम आहे, तरी तिचें माझ्यावर प्रेम असण्याचा संभव नाहीं. ती माझी थुंकी झेलीत होती ती, केवळ माझ्यापासून लाभ होईल ह्मणूनच; मी असा निर्धन झालों आहें, हें पाहून ती मला आतां आपल्या दरवाज्यावर थाप मारूं देईल, ही गोष्ट कधींही व्हायची नाहीं. तेव्हां एकंदरींत मला आतां कोठें गतीच नाहींशी झाली आहे. ज्यापेक्षां मी असा अगतिक झालों आहें, त्यापेक्षां खोटें बोललों तरी कांहीं हरकत नाहीं. ती **कनकपुरी** मी पाहिली आहे, असें ह्या थाळी पिटणाऱ्या लोकांला खोटेंच सांगावें. माझ्याजवळ—ती नगरी कोठें आहे, कशी आहे, तूं केव्हां पाहिलिस ? इत्यादिप्रकारची विशेष चौकशी कोण करणार आहे. पाहिली ह्मणून सांगितलें ह्मणजे झालें; व कदाचित् कोणी विशेष हकिकत विचारलीच तर कांहींतरी बनावट सांगतां येईल. ह्या साऱ्या शहरांत ती नगरी कोणीच पाहिलेली नाहीं, हें तर आतां अगदीं सिद्ध झालें आहे. पाहून आलेला दुसरा कोणी असेल तर, माझी लबाडी कदाचित् उघडकीस येण्याचें भय होतें; पण त्याचा मुळींच संभव नाहीं. तेव्हां मी त्या नगरीचें हवें तसें वर्णन केलें तरी तें खोटें पाडणारा कोणी नसल्यामुळें, आपलें सांगणें सर्वांला खरें मानावेंच लागेल. यारितीनें आपलें कपट सिद्ध होऊन कदाचित् त्या राजकन्येशीं आपला समागम होईल. पुढें कांहीं कां होईना; पण आज मला जेवणाची भ्रांति-

पडली आहे, व उभें राहण्यास जागा नाहींशीं झाली आहे, ही अडचण तर दूर होइलना ? बाकीचें पुढच्या पुढें पाहून घेतां येईल.

असा विचार करून तो साहसी **शक्तिदेव** त्या गर्दीत घुसून थाळी पिटणाऱ्या शिपायांजवळ येऊन त्यांना ह्मणाला, "अहो, काय ह्मणतां ? ती **कनकपुरी** का ? ती नगरी मी पाहिली आहे. मला तिची पूर्ण माहिती आहे."

**शक्तिदेवानें** हें खोटेंच सांगितलें, तरी शिपायांनां त्याचा निर्णय करण्याचा अधिकार नव्हता. व त्याच्याविषयीं शंका घेण्याचेंही कांहीं कारण नव्हतें. त्यानें **कनकपुरी** पाहिली असें सांगितलें, तें ऐकून शिपायी ह्मणाले, "वाहवा, असें असेल तर फार चांगलें झालें. सुदैवानेंच तुह्मीं येथें प्राप्त झालां. आतां कृपा करून असेच, आमचे वरिष्ठ कोतवाल-साहेब यांच्याकडे चला, ह्मणजे ते पुढची कायती व्यवस्था करतील."

हें त्यांचें सांगणें ऐकून **शक्तिदेवाला** थोडासा आनंद झाला. कदाचित् हे रांडलेक शिपाई, आपल्या सांगण्यावर विश्वास ठेवतील कीं नाहीं, याची त्याला शंका होती. शिपायांनीं कोतवालाकडे येण्यास सांगितल्यावरून एकंदरींत आपली मसलत सफल होईल, असें वाटून तो त्यांच्या बरोबर कोतवालाकडे गेला. कोतवालानें पुन्हा त्याला प्रश्न केला, व त्याणें—**कनकपुरी** आपण पाहिली असें सांगतलें. तेव्हां कोतवाल त्याला घेऊन चोपदाराकडे गेला. चोपदारानेंही—तुह्मीं कोण ? कोठले, काय? तुमची जात कोण, वगैरे प्रश्न करून **कनकपुरी** पाहिली का ह्मणून विचारलें. तेव्हां **शक्तिदेवानें** आपलें कुळ गोत्र वगैरे सांगून आपण **कनकपुरी** पाहिली आहे ; असें खात्रिपूर्वक त्याला सांगितलें. नंतर त्याचा सत्कार करून चोपदारानें त्याला राजाजवळ नेऊन हजर केलें.

**राजानें** सन्मानपूर्वक त्याला आसनावर बसवून हकीकत विचारली. तेव्हां पूर्वी जसें त्याणें खोटें सांगितलें होतें तसेंच निःशंकपणें राजा-

जवळही सर्व सांगितलें. खरोखर त्या ब्राह्मणाच्या मुलाचें हें धारिष्ट फारच विलक्षण ! धडधडीत खोटें वर्त्तमान राजाजवळ खात्रीपूर्वक सांगण्यास त्याला कांहींच शंका वाटली नाहीं. उघडच आहे, जुगारी लोकांच्या सहवासानें व वेश्यांच्या संगतीनें ज्यांना अनेकप्रकारचीं कपटें व लबाड्या करण्याची संवय झाली आहे; तशा मनुष्यांला कोणती गोष्ट अशक्य आहे. तशा प्रकारचे लोक खरें किंवा खोटें पाहिजे त्याच्या जवळ धीटपणानें बोलण्यास मागें सरावयाचे नाहींत. खऱ्याचें खोटें आणि खोट्याचें खरें करून दाखविणें, ही गोष्ट त्यांच्या आंगवळणी पडलेली असते.

राजा **परोपकारी** याला **शक्तिदेवाचें** बोलणें कांहीं खरें वाटलें. त्याचें वय व इतर गोष्टी मनांत आणून, त्याला त्याच्याविषयीं संशय आला होता. तरी—न जाणों, कोणत्या मनुष्याचा कसा प्रभाव असतो याचा कांहीं निश्चय नाहीं, असें समजून त्याणें त्याच्या बोलण्यावर भरंवसा ठेवला. विशेषतः मनांत कांहीं शंका व संकोच न ठेवतां त्याणें जी हकिकत सांगितली, तीवरून राजाला त्याचा बराच विश्वास पटला. याप्रमाणें राजाच्या मनाची खात्री झाली, तरी या गोष्टीची छान करणारी निराळीच होती. **कनकरेखेला** जेव्हां तें खरें वाटेल तेव्हां कोणतीही गोष्ट व्हावयाची. असें असल्यावरून राजानें हा ब्राह्मण सांगतो, हें खरें आहे किंवा खोटें आहे, याचा निर्णय करण्याकरितां बरोबर चोपदाराला देऊन **शक्तिदेवाला कनकरेखेच्या** महालांत पाठविलें.

चोपदार **शक्तिदेवाला** खालीं दरवज्यांत उभा करून वर गेला आणि—**शक्तिदेव** नांवाचा ब्राह्मण **कनकपुरी** आपण पाहिली असें सांगत असून, सरकारच्या आज्ञेनें मी त्याला घेऊन आलों आहें, त्याचें सांगणें खरें किंवा खोटें याचा कायतो विचार करावा, असें महाराजांनीं सांगितलें आहे, असें ह्मणाला. तेव्हां **कनकरेखेनें शक्तिदेवाला** वर

आणण्याविषयीं आज्ञा केल्यावरून, दासी त्याला राजकन्येजवळ घेऊन गेल्या. चोपदार जवळ बसलाच होता, त्याच्या देखत **कनकरेखेनें शक्तिदेवा**चा सत्कार करून, "काय महाराज, आपण **कनकपुरी** खरोखरच पाहिली आहे का?" असें विचारलें.

**शक्तिदेव** खरोखरच मोठा लफंगा मनुष्य होता. राजकन्येनें विचारलें, त्यावेळीं तरी तो बिलकुल कचरला नाहीं. तो ह्मणाला "होहो, यांत काय संशय? मी विद्यार्थी होतों त्यावेळीं खरोखर ती नगरी पाहिली. विद्याभ्यासाकरितां, मी पुष्कळ देशदेशांतरांत संचार करित होतों; फिरतां फिरतां मला सहज ती नगरी आढळली.

हें त्याचें भाषण ऐकून राजकन्या **कनकरेखा** ह्मणाली, "बरें, आपण कदाचित् तेथें गेलां असाल; पण आपण कोणत्या वाटेनें तेथें गेलां, व ती नगरी कशी आहे, तिच्याविषयींचें विशेष वर्णन आपणांला करतां येईल कीं नाहीं?"

याप्रमाणें तिनें प्रश्न केला, तरी तो धूर्त ब्राह्मण डगमगला नाहीं. तो ह्मणाला, "मी ती प्रत्यक्ष पाहिलीच आहे, मग तिचें वर्णन कां करितां येणार नाहीं? मी सविस्तर माहिती सांगतों ती ऐका. प्रथम मी कोणत्या वाटेनें गेलों तें सांगतों. येथें जेव्हां विद्याभ्यासाकरितां कोठें तरी उत्तम ठिकाणीं जावें असा माझा पक्का निश्चय झाला, तेव्हां मी येथून निघून प्रथम **हरपुरी** नावांच्या शहरांत गेलों. तेथून **वाराणसी** नगरींत जाऊन पोचलों. तेथें गेल्यावर माझी अध्ययनाची चांगली सोय लागेल अशी प्रथम मला उमेद होती; पण तसा योग जमून आला नाहीं ह्मणून मी तेथून निघालों. पुढें कितीएक दिवस चालतां चालतां **पौंड्रवर्धन** नावांच्या शहरांत मी प्राप्त झालों. तेथेंही मनाप्रमाणें सोय झाली नाहीं. ह्मणून मी दोन दिवस तेथें विश्रांति घेऊन तसाच पुढें निघालों, तों अनेक नद्या व पर्वत ओलांडून **कनकपुरी** नांवाच्या नगरींत जाऊन मी पोंहोंचलों. आतां ती नगरी कशी आहे ह्मणाल तर इकडच्या प्रदेशांत

तिला उपमा देण्यासारखी दुसरी कोणतीच नगरी नाहीं. ज्यांनीं पुष्कळ पुण्य केलें असेल, त्यांला त्याचें फळ उपभोगण्याची ती भूमि आहे. देवांनीं जिच्यांतील सुखाचा आस्वाद घेतला आहे अशा **अमरावती**-सारखीच ती नगरी दिव्य आहे. तेथें गेल्यावर माझी अध्ययनाची फारच उत्तम प्रकारची सोय लागली. विद्याभ्यास करीत मी त्या नगरींत बहुत दिवस राहिलों होतों. अभ्यास पुरा झाल्यावर विद्वान् होऊन मी बहुत दिवसांनीं परत येथें आलों."

याप्रमाणें त्याणें सगळी हकीकत बनावट रचून मोठ्या साळसूदपणानें, आपण कसा गेलों व ती नगरी कशी आहे हें सर्व धीटपणानें राजकन्येला निवेदन केलें. त्याणें दवंडी पिटणारे शिपाई, कोतवाल, चोपदार व राजा **परोपकारी** इतक्यांची प्रतारणा केली, व ती त्याची कपटविद्या त्यांच्या जवळ मोठ्या सफाईनें पारही पडली; पण राजकन्येजवळ तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. त्या धूर्तानें जें वर्तमान खोटेंच रचून सांगितलें तें तिच्याजवळ कसें टिकेल ! राजा वगैरे मंडळीला त्या नगरीची माहिती नव्हती ह्मणून त्यांणीं विशेष शंका घेतली नाहीं; पण **कनकरेखे**ला त्या नगरीची पूर्ण माहिती होती. **शक्तिदेवानें** जें बनावट वर्णन केलें तें ऐकून तिला फार हंसूं आलें. ती हंसत हंसत त्याला ह्मणाली, "अहो भटजीमहाराज, आपण खरोखरच ती नगरी पाहिली का? खरीखरी काय हकीकत असेल ती सांगा. कोणत्या वाटेनें तुह्मी तेथें गेलां तें पुनः खात्रीपूर्वक सांगा पाहुं"

**कनकरेखे**च्या मनांत हा ब्राह्मण इतक्यावर समजून आपला अपराध कबूल करील तर त्याणें जी हकीकत खोटी रचून सांगितली तिच्याबद्दल आपण त्याला क्षमा करावी असें होतें. व ह्मणूनच तो धडधडित खोटें सांगत आहे अशी तिची खात्री झाली होती तरी तिणें खरें काय असेल तें पुनः सांगण्याविषयीं त्याला सवड दिली; पण **शक्तिदेव** तेवढ्यावरून नीट समजला नाहीं. तो पहिल्याप्रमाणेंच पुन्हांही खोटी हकीकत

सांगूं लागला तेव्हां **कनकरेखेला** त्याचा फार राग आला. त्या ब्राह्मणाचा विनाकारण अपमान करावा हें तिच्या सालसपणाला योग्य वाटलें नाहीं तरी पुनरपि खोटें बोलूं लागला तेव्हां रागानें तिणें त्याचा धिःकार केला व विशेष कांहीं न बोलतां कुळंबिणीला हाक मारून— ह्या असत्यवादी ब्राह्मणाला येथून काढून द्या, असें सांगितलें. बिचारा चोपदार हिरमुसल्यासारखा झाला. दासीनीं **शक्तिदेवाला** हाकून लावला तेव्हां तो कांहीं चकारशब्द न बोलतां मुकाट्यानें निघून गेला.

**शक्तिदेवानें** अगदीं खोटें सांगण्याचें जें साहस केलें त्याबद्दल राजकन्येनें त्याला खरोखरच शिक्षा करणें योग्य होतें तरी तिणें त्याच्यावर विशेष राग केला नाहीं. धडधडित असत्य भाषण करीत आहे असें समजलें तरी त्याचा अपमान करणें अथवा त्याला काढून लावून देणें एवढीच शिक्षा पुरे आहे असें समजून ती तत्काल तेथून उठून आपल्या बापाकडे गेली. राजा **परोपकारी** तिची वाटच पाहत बसला होता. एकदाचें त्या ब्राह्मणाचें सांगणें खरें ठरो, आणि मुलीचें लग्न होवो अशी तो देवाची प्रार्थना करीत होता. **कनकरेखा** एकाएकीं त्याच्याकडे आली तेव्हां त्याला असें वाटलें कीं—कदाचित् त्या ब्राह्मणाचें सांगणें हिच्या खात्रीला उतरलें असेल ह्मणून ही आपल्याकडे आली आहे. असे समजून तो तिला ह्मणाला, "कसें काय, तुझ्याकडे जो ब्राह्मण गेला होता त्याणें **कनकपुरी** आपण पाहिली असें सांगितलें तें खरें ना?"

बापाचा हा प्रश्न ऐकून **कनकरेखा** त्याला ह्मणाली, "बाबा, मी अंमळ स्पष्टपणानें बोलतें याची क्षमा असूंद्या. खऱ्याखोट्याचा निर्णय करणारे व न्याय अन्याय पाहणारे असे आपण प्रत्यक्ष राजे असूनही असा अविचार करतां याला काय म्हणावें? तो ब्राह्मण धडधडीत खोटें बोलणारा; त्याणें ती नगरी पाहिली नाहीं आणि कांहीं नाहीं. तुह्माला फसवून आपला हेतू कसातरी साधून घ्यावा अशी त्याची मसलत होती. बरें झालें, तुह्मी त्याला माझ्याकडे पाठविला. नाहीं तर त्याच्या

सांगण्यावर विश्वास ठेवून तुह्मीं लग्नाचा ठरावबिराव केला असता तर सर्वस्वीं घात झाला असता. धूर्त लोक अनेक रीतींनीं लोकांना फसवित असतात व ती त्यांची कपटविद्या पुष्कळ वेळां सफलही होते. याविषयीं मला एक गोष्ट माहित आहे ती आपल्याला सांगतें.

**शिव** आणि **माधव** या नांवाच्या दोघां मनुष्यांचा हा वृत्तांत आहे. या पृथ्वीवर सर्व नगरांत उत्तम असें **रत्नपूर** नावाचें एक प्रख्यात शहर आहे. तेथें **शिव** आणि **माधव** नांवाचे मोठे वस्ताद असे दोघे धूर्त रहात होते. त्यांच्या आश्रयाला लहानमोठे आणखी पुष्कळ लबाड लोक होते व ते त्या सर्व लबाडांचे मुख्य अधिपति झाले होते. लोकांला फसविण्याचा त्यांचा उद्योग पुष्कळ दिवस सारखा चालला होता. मोठमोठ्या श्रीमान्, सरदार, शेटसावकार वगैरे लोकांला त्यांणीं आपल्या कपटविद्येनें फसवून सफई बुडविलें. त्यांच्या जाळ्यांत सांपडलेले कैक लोक धुळीस मिळाले. जरी तें नगर मोठें धनाढ्य होतें तरी त्या दोघां धूर्तांनीं अनेक प्रकारच्या युक्ति लढवून तें अगदीं उजाड करून टाकलें.

एकेदिवशीं त्या दोघां बुडव्यांनीं आपआपसांत मसलत केली ती अशी कीं, आपण हें **रत्नपूर** तर लुटून फस्त केलें आहे येथें कोणी धनाढ्य मनुष्य नांवाला देखील राहिला नाहीं व असें झाल्यामुळें दिवसेंदिवस आपली विद्या चालविण्यास आतां जागा नाहींशी झाली. पूर्वीं जशीं आपल्याला एकावर एक सावजें मिळत असत तशीं आतां मिळेनातशीं झालीं तेव्हां आतां दुसरें कोणतेंतरी धनाढ्य शहर पाहिलें पाहिजे. **उज्जयिनी** नांवाची नगरी **मालव** देशांत असून तेथें मोठमोठे सावकारलोक असल्याची फार आख्या आहे. तेथें गेलें तर आपला उद्योग चांगला चालेल. तेथल्या राजाचा पुरोहित **शंकरस्वामी** नामक असून, असें सांगतात कीं त्याच्याजवळ अपरंपार संपत्ति भरली आहे. तेव्हां आतां आपण येथून प्रस्थान ठेवून **उज्जयिनीमध्यें**

डेरा द्यावा व त्या **शंकरस्वामी**ला घेरून युक्तिप्रयुक्तीनें हळूहळू त्याचें द्रव्य अपहार करून चैन उडवावी. **मालव**देशीय मोठ्या रसिक व सुंदर अशा स्त्रियांच्या विलासांचे आपण रसज्ञ व्हावें. त्या **शंकरस्वामी**नें दानदक्षिणा घेऊन पुष्कळ द्रव्य सांठवून ठेविलें आहे. तिकडून आलेल्या पांथस्थ ब्राह्मणांनीं जें त्याचें वर्णन केलें त्यावरून तो मोठा चिक्कू आहे, केवळ द्रव्याचा रक्षक असून त्याचा उपभोग तो मुळींच घेत नाहीं असें समजतें. याशिवाय त्या ब्राम्हणाचें एक कन्यारत्न आहे. त्या मुलीची तर लोकांनीं फारच तारीफ केली आहे. तेव्हां आपण त्याच्यावर एकदां जाळें पसरलें आणि त्यांत त्याला गोंवला म्हणजे त्याचें द्रव्य हरण करून त्याबरोबर त्याची ती सुंदर कन्याही मिळविण्याचा प्रयत्न करतां येईल. तेव्हां एकंदरींत **उज्जयिनीस** जाऊन अशी मसलत करावी हें चांगलें.

वर सांगितल्याप्रमाणें त्या दोघांनीं पुढें काय करावयाचें त्याबद्दल आपआपसांत निश्चय ठरविला व ते धूर्त **शिव** आणि **माधव** आपला गाशा गुंडाळून **रत्नपुरां**तून निघाले. **उज्जयिनीं**त जाण्याची त्यांना फार त्वरा होती. तरी वाटेंत एखादें साळेंभोळें कूळ त्यांच्या हातीं लागलें तर त्याचा समाचार घेण्याला ते कांहीं कमी करीत नव्हते. त्यांच्या तालमींतले आणखी पुष्कळ धूर्त त्यांच्या बरोबर होतेच. गाड्याघोडीं, नोकरचाकर इत्यादि प्रकारच्या मोठ्या परिवारासह एखाद्या राजाच्या स्वारीप्रमाणें त्यांची स्वारी चालली होती. हळुहळु ते **उज्जयिनीं**त येऊन पोंचले. त्या दोघां धूर्तांपैकीं **माधव** नांवाच्या धूर्तानें राजपुत्राचें सोंग घेतलें. थाटमाट वगैरे सर्व बरोबर होतेंच. त्याची नीट व्यवस्था लावून तो राजपुत्र बनला, आणि **उज्जयिनी** शहराच्या बाहेर जवळच एक खेडें होतें तेथें त्यानें तळ दिला. त्याचा दुसरा साथीदार **शिव** याणें वस्त्रपात्र वगैरे सर्व टाकून देऊन सन्याशाचा वेष घेतला. तोंडानें नारायण नारायण ह्मणत व मोठ्या शांत आणि

समाधान वृत्तीनें त्या शिवस्वामिची स्वारी एकटीच पुढें उज्जयिनी शहरांत प्रविष्ट झाली.

खऱ्या वस्तूपेक्षां नकली वस्तूला विशेष तेज असतें. तें फारवेळ टिकत नाहीं ह्मणूनच लोक त्याला नकली ह्मणतात व त्याविषयीं त्यांचा अनादर असतो. एखादा सन्याशी खरोखरच शांत, दांत, जितेंद्रिय असला तरी त्याचें असें मुळींच तेज पडावयाचें नाहीं; त्याप्रकारचें तो कपटपटु स्वामी शिव याचें तेज पडलें. त्याला अनेक माया, इंद्रजाल वगैरे ठाऊक होतीं. त्यानें एकवेळ शहरांत चोहोंकडे संचार करून तेथील व्यवस्था कशी काय आहे तें नीट पाहून घेतलें व नंतर शिप्रा नदीच्या काठीं आपलें आसन ठेविलें. तेथें एक लहानशी पर्णकुटिका करून हे स्वामीमहाराज राहूं लागले. नगरांतील सर्व लोक स्नानाच्या, वस्त्रें धुण्याच्या किंवा पाणी नेण्याच्या निमित्तानें नदीवर येण्या जाण्याची वाट कायती तीच होती. व त्याच रस्त्यावर या धूर्त स्वामीमहाराजांनीं डेरा दिला होता. वाटेनें येणाऱ्या जाणाऱ्या लोकांच्या सहज नजरे पडतील अशा रितीनें माती, दर्भ, भिक्षापात्र, कृष्णाजिन ह्या वस्तु त्याणें मांडून ठेविल्या होत्या.

त्या ठक स्वामीनें लोकांला फसविण्याकरितां अनेकप्रकारचीं ढोंगें आरंभिलीं होतीं. मोठ्या पहाटेस उठून तो आपल्या सर्वांगाला दाट चिखलाचा लेप—जणूंकाय पुढें प्राप्त होणाऱ्या यमराजाच्या नगरींतील अवीचि[1] नांवाच्या नरकांतील कर्दमाचाच उपभोग करतो आहे असा दिसणारा---करून बसत होता. नंतर त्या शिप्रा नदीच्या उदकांत मान खालीं घालून तो प्राणायाम करीत बसत असे. जणूं काय या आपल्या दुष्कर्मावरून पुढें प्राप्त होणाऱ्या अधोगतीचा आतांच अनु-

---

१ दक्षिण दिशेला, पृथ्वीपेक्षां दहा हजार योजनें उंच प्रदेशांत यमराजाची संयमिनी नांवाची नगरी आहे. तेथें मोठेमोठे २८ नरक आहेत, असें भागवताच्या पांचव्या स्कंधाच्या २६ व्या अध्यायांत सांगितलें आहे. 'अवीची' हा त्यां पैकींच एक नरक होय. यांत जो पडतो त्याला कर्दमांत लोळावें लागतें.

भव करीत आहे. याप्रमाणें पुष्कळ वेळ स्नान करून वर आला म्हणजे सूर्याच्या सन्मुख वर तोंड करून फार वेळ उभा रहात असे; जणूं काय याच रितीनें—मी ह्या अपराधास्तव सुळावर चढविण्यास योग्य आहें असें लोकांना दर्शवितो आहे. याप्रमाणें सूर्याचें उपस्थान झालें म्हणजे तो एका देवळांत जाऊन देवाच्या समोर, दर्भाचा कूर्च हातांत धरून जप करीत बसत असे. त्यावेळीं पद्मासन घालून तो दांभीक सन्याशी असा बसत असे कीं प्रेक्षकांला, पद्मावर बसलेला जणूं काय ब्रह्मदेवच आहे असें वाटावें !

याप्रमाणें पुष्कळ वेळ जपजाप्य झालें म्हणजे तो ढोंगी सन्याशी शिप्रानदीच्या कांठचीं—जणूं काय सत्पुरुषांचीं हृदयेंच म्हणून स्वच्छ, अशीं—सुंदर कमलें आणून कपटानें भगवान् शंकराची लांबलचक पूजा करीत असे. त्याचा तो पूजाविधि झाला म्हणजे पुनः कांहीं वेळ तो ढोंगी जप करीत बसत असे. त्यावेळची त्याची मुद्रा पाहून त्याच्या सोंगाचें खरें स्वरूप जाणणाऱ्या मनुष्याला हा जपजाप्याच्या मिषानें कोणाकोणाच्या डोक्यावरून हात फिरवावा याचा विचार करीत बसला आहे, असें वाटल्यावांचून कधींही रहावयाचें नाहीं. याप्रमाणें त्याचा

---

१—कांहीं दर्भ घेऊन त्याला दुसऱ्या दर्भांनीं वेढून शेवटीं एक गांठ दिली म्हणजे त्याला कूर्च असें म्हणतात. श्राद्धांत तिलोदक आणि यवोदक तयार करितात त्यांत अशाप्रकारचे कूर्च असतात. व ब्राम्हणांला पाणी द्यावयाचें तें त्या कूर्चानेंच देतात. दर्भ हे पवित्र मानलेले असून धर्मसंबंधी कृत्यांत त्यांचा विशेष उपयोग आहे. वस्तुतः जप करित बसणाऱ्याला कूर्चाचा विशेष उपयोग नसून त्यानें हातांत माळ धारण करणें उचित होतें तरी सन्याश्यानें माळ धारण करूं नये असा नियम आहे. शिव हा सन्यासी झाला होता म्हणून त्यानें माळ घेतली नाहीं व कांहींतरी पवित्र वस्तू आपल्या हातांत असावी म्हणून दर्भाचा कूर्च धारण केला असावा असें वाटतें.

२—योगमार्गात निरनिराळ्या प्रकारचीं आसनें सांगितलीं आहेत. जपतप वगैरे करणाऱ्याला प्रथम आसनविधि करावा लागतो. त्या निरनिराळ्या आसनांचीं—पद्मासन, स्वस्तिकासन इत्यादि पुष्कळ नांवें आहेत. सामान्यतः उजव्या मांडीवर डावा पाय व डाव्या मांडीवर उजवा पाय ठेवून बसणें याला पद्मासन असें म्हणतात.

तो खोटा नित्यनेम सरासरी तिसराप्रहरपर्यंत एकसारखा चालत असे. तिसराप्रहर झाला ह्मणजे तोंडानें नारायण नारायण करीत पाठीवर कृष्णाजिन व हातांत भिक्षापात्र घेऊन–जणूं काय लोकांला फसविणाऱ्या मायेचा कटाक्षच असा, तो कपटी शहरांत भिक्षा मागायला फिरत असे. ब्राह्मण, क्षत्रिय, आणि वैश्य या तिनच वर्णांत भिक्षा घ्यावी असा नियम असल्यावरून तो ढोंगी द्विजगृहांतून भिक्षा घेऊन ती सर्व नदीच्या कांठीं आपल्या पर्णकुटिकेंत घेऊन येई. तेथें आल्यावर–जणूं काय सत्याचेच तीन तुकडे करावे त्याप्रमाणें–तो भिक्षेनें आणलेल्या अन्नाचे तीन विभाग करी. त्यांतला एक विभाग कावळे वगैरे प्राण्यांला देई. दुसरा भाग कोणी अतीत अभ्यागत आला तर त्याला वाटून देई आणि राहिलेला तिसरा भाग हा–जणूं काय त्याच्या दंभाचें मूळ बीजच, त्याच्या योगानें तो आपल्या पोटाची खळी भरीत असे. याप्रमाणें त्याचा आहार झाला म्हणजे तो पुनरपि–जणूं काय आपल्या पापांचीच गणना करीत बसला आहे असा—डोळे झांकून रुद्राक्षमाला फिरवीत जप करीत बसत असे.

याप्रमाणें त्या ढोंगी सन्याशयाचा नित्य क्रम चालला होता. नदीच्या किनारीं अगदीं वाटेवर त्याची पर्णकुटी असल्यामुळें वाटेनें जाणारे-येणारे लोक पुष्कळ तेथें येऊं जाऊं लागले. सारा दिवसभर तेथें कोणी राहिलें तर त्याला तो मनाई करीत नसे; पण रात्रीं मात्र कोणालाही आपल्या मठींत राहूं देत नव्हता. कपटजाल पसरलेल्या त्या झोंपड्यांत तो एकटाच राहत असे. येणाऱ्या जाणाऱ्या सर्व लोकांकडे फार सूक्ष्म रितीनें त्याची नजर होती. तो जप करीत बसला आहे असें दिसत होतें तरी त्याचा मानसिक व्यापार फार निराळ्याप्रकारचा चालला होता. लोक आपल्याविषयीं काय म्हणतात व त्यांचा ग्रह कसा होतो हें तो मोठ्या बारीक नजरेनें पहात असे. भोळे भाविक कोण, व लबाड कोण, कोणाजवळ आपलें गारुड चालेल व कोणा-

जवळ चालणार नाहीं हें तो तेव्हांच समजत असे. ह्वेशींदेखील त्याचा संवाद चालला असावा असें वाटे. कारण त्याची दृष्टी एकीकडे लागलेली असली तरी कान दुसरीकडेच असत. व तो आसपास काय चाललें आहे, तें आपली दृष्टी न चळूंदेतां पहात असे!

याप्रमाणें प्रतिदिवशीं, केवळ कपटानें भरलेलें, तथापी मोठें कष्टकारक असें तप त्याणें आरंभिलें. ती त्याची वृत्ति पाहून नगरवासी लोकांचें मन त्याच्याविषयीं दिवसेंदिवस अधिकाधिक प्रसन्न होऊं लागलें. उघडच आहे; साधारणतः प्रत्येक मनुष्य बाह्य स्थितीकडे पाहत असतो. त्याला आंतील स्थिती कशी काय आहे तें समजून घेण्यास फार प्रयत्न करावा लागतो व ती सहसा कळतही नाहीं. यामुळें बहुतकरून सर्व लोक बाह्यरंगावर दृष्टी ठेवून पूज्य अपूज्य, चांगला वाईट, यांचा निर्णय करितात. ढोंगीलोकाचें बाह्य स्वरूप मोठें मनोहर असतें. यामुळें लोक सहज त्यांच्या नादीं लागतात. उज्जयिनींतल्या लोकांचीही अशीच स्थिती झाली. त्या शिवाविषयीं लोक "असें ह्मणूं लागले कीं, अरे बापरे,! खरोखर हा स्वामी मोठा तपस्वी आहे! याची वृत्ति तर फारच शांत आहे. याच्या सारखा सत्पुरुष आपल्या दृष्टी पडतो हें मोठें भाग्य आहे." अशी त्या ढोंग्याची तारीफ सर्वतोमुखीं होऊं लागली. सर्व लोक त्याच्या भजनीं लागले. कोणी द्रव्य मिळण्याच्या आशेनें त्याची सेवा करूं लागला. कोणी पुत्राच्या आशेनें, कोणी विद्येच्या आशेनें, कोणी बायकोच्या आशेनें, याप्रमाणें मंडळी त्याच्या सेवेंत तत्पर झाली. प्रथम प्रथम कोणी बायको मनुष्य आलें तर—शिव शिव! आमच्या सारख्या सन्याशाच्या आश्रमांत बायकांचें काय काम आहे! कोणीही स्त्रीनें आमच्या येथें येऊं नये, असें बोलून तो त्यांला धिसपटावून लावी. तेव्हां कोणी जवळचे लोक— "महाराज, अशी आपण अवकृपा कां करतां? ही बिचारी आज किती वर्षे उपासतापास करून थकली आहे. हिच्या घरांत सर्व कांहीं अनुकूल आहे; पण

लेकरूं नाहीं यामुळें हिचा संसार दुःखमय झाला आहे. आपल्यासारख्या दीनदयाळांनीं जर हिच्यावर अनुग्रह केला नाहीं तर हिच्या दुःखाची निवृत्ति कशी होणार?" इत्यादिप्रकारें मध्यस्थी केली ह्मणजे—हांहां, परमेश्वर तिचे मनोरथ पूर्ण करील. तिणें अमक्या देवाची सेवा करावी, अमुक ब्राह्मणांला भोजन द्यावें, फलाणें दान करावें, असें कांहीं तरी तो सांगत असे. स्वतः तो सर्व **उज्जयिनी** लुटून नेण्याकरितांच आला होता; तरी भक्तिपूर्वक कोणी कांहीं वस्तु आणून दिली असतां तिचा मुळींच स्वीकार करीत नसे. उघडच आहे; ज्याला हत्तीसारख्या मोठ्या प्राण्यांची शिकार करावयाची इच्छा, त्या सिंहास एकादा उंदीर मिळाला तर तो त्याचा कशाला स्वीकार करील? असो.

यामप्रमाणें त्या ढोंग्यानें आपलें कपटजाल पसरून लौकरच **उज्जयिनींतील** सर्व लोकांला आपल्या नादीं लाविलें. इतकी त्याची तयारी होईपर्यंत त्याचा साथीदार **माधव** राजपुत्र बनून ज्या खेड्यांत उतरला होता तेथेंच राहत होता. वरचेवर एकमेकांचें वर्तमान गुप्त रितीनें ते परस्परांला कळवीत असत. नंतर लोक आपल्या भजनीं पुरतेपणीं लागले आहेत असें **शिवानें** दूतमुखानें सांगून पाठविलें, तेव्हां पुढची बतावणी करण्याकरितां **माधव** आपल्या लवाजम्यासह **उज्जयिनी** नगरींत प्रविष्ट झाला. तेथें त्याणें एका मोठ्या मंदिरांत डेरा दिला. नोकर चाकर, गाड्या घोडीं, वगैरे सर्व त्याचा राजकीय थाट होताच. तो पाहून शहरांतील लोकांला—हा कोणी तरी मोठा राजपुत्र कांहीं निमित्तानें येथें आला असेल, असें वाटलें. त्याच्या बरोबरचे चाकर शिकवून तयार केलेले व एकापेक्षां एक मोठे लबाड असल्यामुळें **माधवाच्या** सोंगाची बतावणी फारच उत्तमप्रकारें झाली. एकेदिवशीं हे राजपुत्र बनलेले **माधव**, यांची स्वारी **शिप्रा**नदीच्या काठीं स्नानाकरितां ह्मणून प्राप्त झाली. त्यांणीं मोठ्या थाटामाटानें स्नान केलें. कोणी मोठा राजपुत्र आज नदीवर स्नानास जाणार आहे हें वर्तमान समजल्याव-

रून भिक्षुकांच्या झुंडीच्या झुंडी आधींच तेथें लोटल्या. **माधवानेंही** आपल्या सोंगाची पुरती बतावणी करण्याकरितां बराच दानधर्म केला. उघडच आहे, आंवळा घातल्याशिवाय कोहाळा कसा काढतां येईल? भिक्षुकांला रगड दक्षिणा दिल्यावरून गावांत जिकडेतिकडे त्याची फार तारीफ होऊं लागली.

**माधव** अथवा बनावट राजपुत्र नदींत स्नान करून तिचे काठीं जवळच एक मोठें मंदिर होतें; तेथें देवदर्शनाला ह्मणून प्राप्त झाला. प्रथम देवापुढें एक मोहोर ठेवून त्या ढोंग्यानें भक्तिपूर्वक देवाची प्रार्थना केली. प्रदक्षिणा वगैरे घालून देवाच्या सभामंडपांत क्षणभर इकडे तिकडे पहात राहिला; तों संन्याशी बनलेला त्याचा साथीदार **शिव** तेथें बसला होता; तो दृष्टीस पडला. त्याला पाहतांच **माधवानें** घाबऱ्याघाबऱ्यां मोठ्या भक्तीनें त्याच्या पायांवर मस्तक ठेविला, व पुष्कळवेळ पाय घट्ट धरून तसाच राहिला. तेव्हां त्या ढोंगी स्वामीनें त्याला उठविलें. नंतर **माधव** हात जोडून मोठ्या नम्रतेनें त्याच्या पुढें उभा राहिला. हें पाहून तेथें जमलेल्या सर्व लोकांना मोठें आश्चर्य वाटलें. येवढा मोठा राजपुत्र हा या स्वामीच्या चरणीं इतका लीन झाला याचें कारण काय? या गोष्टीची सर्वांला जिज्ञासा झाली. **माधव** बराच वेळ हात जोडून स्वामीच्या पुढें उभा राहिला, तेव्हां स्वामीनें—आपला तुजवर अनुग्रह आहे असें दर्शविल्यासारख्या कृपादृष्टीनें त्याच्याकडे अवलोकन केलें, आणि पुनः स्वारी जप करूं लागली.

जमलेले लोक चकित होऊन आपल्याकडे पाहताहेत असें जाणून **माधव** लोकांला उद्देशून ह्मणाला, "अहो, काय सांगावें! ह्या सत्पुरुषाचें दर्शन मोठें पुण्यकारक आहे. मी पुष्कळ तीर्थें आणि क्षेत्रें फिरत फिरत येत आहें. मोठमोठ्या अनेक क्षेत्रांत ह्या स्वामीमहाराजांला मी पाहिलें आहे. यांचें वैराग्य, इंद्रियनिग्रह, आणि तीव्र तप ह्या गोष्टी मोठ्या अलौकिक आहेत. हे बहुतकरून कोठें फार दि-

**वस** राहायचे नाहींत. न जाणो तुह्मां **उज्जयिनी**वासी लोकांचें पूर्व-सुकृत उदयास आलें ह्मणूनच यांचें इतकेदिवस येथें वास्तव्य झालें आहे. नाहीं तर अशा महात्म्याचें दर्शन तरी कोठलें व्हायला!" असें बोलून आपला साथीदार **शिव** याच्या योगाची तारीफ करून **माधव** तेथून निघून आपल्या बिऱ्हाडीं जाता झाला.

वर सांगितलेला उभयतांचा प्रसंग अगदीं साधारण आहे; पण त्याचा परिणाम फार मोठा झाला. अशाप्रकारचीं जीं ढोंगें लोकांला फसविण्याकरितां फिरत असतात त्यांचें प्रस्थ माजविणारे दुसरे साथीदार असावे लागतात. स्वतः आपलें माहात्म्य आपणच सांगितलें तर तें लोकांना खरें वाटत नाहीं. व मोठमोठे लोक ज्याची तारीफ करतील त्याच्या नादीं सामान्य लोक लागत असतात, हा तर परिपाठच आहे. **शिव** हा स्वामी होऊन त्याणें आपलें ढोंग अशा सफाईनें चालविलें होतें कीं, लोकांना त्याचें खरें स्वरूप कोणत्याही रितीनें समजायाला कांहीं मार्ग नव्हता. त्यामुळें लोकांची त्याच्यावर भक्ति बसली होती; तरी राजपुत्र बनलेल्या **माधवानें** त्याचें याप्रमाणें गौरव केल्यावरून लोक त्या ढोंगी संन्याश्याला अधिकच मान देऊं लागले. मोठमोठे शेट सावकार व सरदार वगैरे त्याच्या पादरजाची अपेक्षा करूं लागले!

याप्रमाणें त्या दोघांही धूर्तांच्या कृत्यांची बरीच बतावणी झाली. ज्या दिवशीं **माधव शिवाला** येऊन भेटला त्याच दिवशीं रात्रीं दोघेही गुप्त रितीनें एके ठिकाणीं जमले. व तेथें खाऊन पिऊन यथेच्छ चैन उडवून नंतर, आतां पुढें कसें कार्य करायचें त्याविषयींची त्यांणीं मसलत केली, व अमुक रितीनें करावें असा ठराव केला. पहाटेची प्रहररात्र होईपर्यंत ते दोघेही एकठिकाणीं होते; पहाट होतांच **शिव** कोणाला नकळत पुन्हां आपल्या मठींत येऊन बसला. इकडे उभयतांनीं रात्रीं संकेत केल्याप्रमाणें **माधवानें** आपल्या बरोबरच्या मंडळी-

पैकीं एका हुषार ठगाजवळ मौल्यवान् शालजोडी व एक फारच मोठ्या किमतीचा धोतरजोडा अशीं दोन वस्त्रें दिलीं, आणि त्या धूर्ताला ह्मणाला, "हीं दोन्हीं घेऊन तूं **शंकरस्वामी**–(तेथील राजाचा पुरोहित) जवळ जा आणि हीं वस्त्रें त्यांना नजर कर. आणि मोठ्या नम्रतेनें त्या पुरोहितबुवांला विनंती कर. त्यांला ह्मणावें, आपल्या दायादांनीं ज्याला बलात्कारानें हांकून लाविला आहे, असा एक राजपुत्र येथें प्राप्त झाला आहे. बापानें संपादन केलेलें पुष्कळ द्रव्य बरोबर घेऊन तो दक्षिण देशांतून इकडे आला आहे. त्याच्या सोबतीचे कित्येक राजपुत्रही त्याच्या बरोबर आले आहेत. त्याला परत आपल्या राजधानींत जाण्याची तर आतां फारशी कांहीं उमेद नाहीं. ईश्वरकृपेनें तसा जेव्हां दिवस येईल तेव्हांच तो योग घडून येणार आहे. तोंपर्यंत उगीच इकडे तिकडे भटकत फिरावें हें त्याला योग्य वाटत नाहीं. जरी तो एका मोठ्या राज्याचा अधिकारी आहे, तरी काल, देश, वर्तमानाप्रमाणें प्रत्येक मनुष्यानें वागलें पाहिजे. त्याला कोणाची सेवाचाकरी करणें ही गोष्ट मोठी लज्जास्पद आहे; तरी तसा प्रसंग आला तेव्हां न करून गत्यंतर नाहीं. त्यानें कोणी योग्य राजा पाहून त्याच्या जवळ चाकरीस रहावें असा यत्न करण्याकरितांच इतक्या दूर पल्ला मारला आहे. आपल्या **राजाची** मोठी कीर्ति ऐकून तो येथें प्राप्त झाला आहे. एकंदरींत तुमच्या राजाजवळ रहावें असा त्याचा निश्चयच झाला आहे. तेव्हां आपण कृपा करून त्याला राजेसाहेबांची भेट करून द्याल तर मोठा अनुग्रह होईल. ही विनंती करण्याकरितांच महाराज, त्याणें मला आपल्याकडे पाठविलें आहे, असें तूं त्या पुरोहिताला मोठ्या नम्रतेनें कळीव आणि कोणत्याही रितीनें त्याचें मन माझ्याविषयीं प्रसन्न होईल असें कर."

यापमाणें त्या ठगाला नीट शिकवून **माधवानें** त्याला राजाचा पुरोहित **शंकरस्वामी** यांच्याकडे पाठविलें. तो धूर्त तीं बहुमोल वस्त्रें

मोठ्या बेताबातानें दुसऱ्या एका मनुष्याच्या हातीं देऊन थाटानें पुरोहित-बुवांच्या दरवाज्यांत येऊन पोंचला. त्याणें त्याच्या देवडीवरच्या मनुष्याकरवीं **शंकरस्वामी**ला आधीं खबर दिली. नंतर त्याच्या परवानगीनें तो आंत गेला आणि मोठ्या नम्रतेनें ती शालजोडी व धोतरजोडा पुरोहित-बुवांच्या पुढें ठेवून त्याणें त्यांला साष्टांग नमस्कार घातला. त्यांणीं— आपण कोठले? येथें कशा करतां आलां? हीं वस्त्रें आह्माला कां देतां? वगैरे जें कांहीं विचारलें त्याचें मोठ्या झोकानें उत्तर देऊन ठगानें पुरोहितबुवांला अनुकूळ करून घेतलें, व आपल्याशीं कांहीं एकांतीं बोलायचें आहे अशी विनंती केली.

भिक्षुक ब्राह्मण केवढाही मोठा पैसेवाला असला, तरी लोकांनीं दिलेल्या वस्तूंविषयीं त्याचा लोभ कमी होत नाहीं. कोणी कांहीं दक्षिणा दिली कीं पुरे, ते तेव्हांच त्याला अनुकूळ होतात. त्या ठगानें एकांतीं कांहीं बोलायचें आहे असें सांगतांच **शंकरस्वामी**नें जवळच्या मनुष्यांला बाहेर घालविलें. व नंतर जणूं काय आपला सर्वस्वी नाश करून घेण्याकरितांच, तो भोळा ब्राह्मण त्या ठगाशीं एकांतीं बोलत बसला!

त्या धूर्तानें, **माधवानें** सांगितल्याप्रमाणें सर्व हकीकत मोठ्या खुबीनें पुरोहितबुवांला निवेदन करून राजाची भेट करून देण्याविषयीं विनंती केली. **शंकरस्वामी** लोभीच होता. त्याच्या जिभेला तेव्हांच पाणी सुटलें. ज्यानें केवळ पहिल्याच विनंतीला अशीं बहुमोल वस्त्रें दिलीं त्याचें जर आपण काम करून दिलें, तर तो काय देईल आणि काय न देईल असें त्याला वाटलें. उघडच आहे. लोभी मनुष्याला, नजराणा हें त्याला आकर्षण करून घेण्याचें एक मोठें रामबाण औषधच आहे. त्याच्या नजराण्याला लुब्ध झालेल्या **शंकरस्वामी**नें त्या ठगानें विनंती केल्याप्रमाणें राजाची भेट करवून देण्याचें कबूल केलें. तेव्हां तो ठग पुन्हां त्याच्या पायां पडून—उदईक स्वतः राजपुत्र आपल्या दर्शनाला येतील, असें सांगून त्याणें त्याचा निरोप घेतला.

याप्रमाणें त्या ठगानें आपला धनी जो महाठग **माधव** त्याची कामगिरी मोठ्या शहाणपणानें बजाविली. अर्थात् तीबद्दल खुष होत्साता परत **माधवा**जवळ आला, व झालेली सर्व हकीकत सांगून पुरोहितबुवांचा स्वभाव, त्यांची चालचलन वगैरे अवांतर माहितीही सांगितली. नंतर आपलें काम बरेंच रंगास आलें असें समजून **माधव** खुष होत्साता दुसऱ्या दिवशीं नियमित वेळीं स्वतः मोठ्या थाटानें पुरोहितबुवांच्या दर्शनाला निघाला. हा अमक्या देशच्या राजाचा मुलगा अशीं ज्यांला निरनिराळ्या राजपुत्रांचीं नांवें ठेविलीं आहेत, अशा दुसऱ्या धूर्तांसहवर्तमान **माधवा**ची स्वारी निघाली. वरून चकचकीत दिसणाऱ्या म्यानांत घातलेल्या, चांगल्या चांगल्या मुठी लावलेल्या लांकडाच्या तरवारी व ढाला वगैरे धारण केलेले शिपाई त्याच्या मागें पुढें चालले होते. बरोबर राजपुत्र बनलेले ठग चालले होते. त्यांतल्या कित्येकांशीं मोठ्या खुषीनें गालांतल्या गालांत हंसत हंसत कांहीं विनोदाच्या गोष्टी करीत **माधवा**ची स्वारी पुरोहितबुवांच्या घराजवळ येऊन पोंचली.

काल जो ठग **माधवा**चा निरोप घेऊन आला होता त्याणें अमुकवेळीं यावें असा नियम सांगितला होता; त्याप्रमाणें नेमक्या वेळीं **माधव** तेथें पोंचला. त्याणें आपल्या बरोबरच्या शिपायांकरवीं पुरोहितबुवांच्या देवडीवरच्या लोकांना सांगून त्यांला आपण आल्याचें कळविलें, तेव्हां पुरोहितबुवांचा आनंद पोटांत मावेनासा झाला. हें भलें मोठें घबाड ईश्वरानें आपल्याला दिलें, ह्या आनंदांतच स्वारी होती! राजपुत्र आला हें ऐकतांच धांवत धांवत स्वतः **शंकरस्वामी** दरवाजांत येऊन **माधवा**ला हातीं धरून आपल्या दिवाणखान्यांत घेऊन गेला. त्याणें त्याचें फारच उत्तमप्रकारें स्वागत केलें. परस्परांचे कुशलप्रश्न होऊन थोडावेळ आनंदांत इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या. स्वतः **माधवा**नें बराच वेळ पुरोहितबुवांशीं गोष्टी केल्या; पण त्यांत

काल त्याच्या बरोबरच्या ठगानें जी त्याला विनंती केली होती तिच्या- संबंधानें चकारशब्द देखील काढला नाहीं. उघडच आहे; ज्याला दुसऱ्याला आपल्या नादीं लावायचें असेल त्याणें निस्पृहपणाचा पुरता आव घातला पाहिजे! त्यावांचून मसलत सिद्ध होत नाहीं. कांहीं- वेळ गोष्टी करून माधवानें त्यांची माफी मागून मोठ्या नम्रतेनें नि- रोप घेतला, व तो परत आपल्या मुक्कामावर येऊन पोंचला.

वर सांगितलेल्या भेटीवरून पुरोहितबुवांनीं त्या राजपुत्राची चा- लचलन व त्याची बोलण्याची वगैरे ढब पाहून आपल्या मनांत खुपच मांडे खाल्ले. त्यांचा माधवाविषयीं फार चांगला ग्रह झाला. माधवा- ला शंकरस्वामी पुरता आपल्या जाळ्यांत सांपडण्याविषयीं प्रयत्न करावयाचा होता. भेट झाली त्याच्या दुसऱ्या दिवशीं पुनः देशांतरांतल्या कांहीं चांगल्या चांगल्या वस्तू व एक उंची दुपेटा व एक मंदील देऊन, प्रथम ज्या ठगाला पुरोहितबुवांकडे पाठविलें होतें त्यालाच फुन्हां त्याच्या दर्शनाला त्याणें पाठविलें. त्याणें यावेळींही पूर्ववत् मोठ्या डौलाचें भाषण करून पुरोहितबुवांला खुष केलें. पुरोहितबुवा, मनांतून मिळेल तितका नजराणा घेण्यास इच्छीत होते; तरी बाह्यात्कारें—"तुह्मी परदेशांत आलां आहां; अद्याप रोजगार धंद्याची कांहीं सोय लागलेली नाहीं; असें असून विनाकारण रोजरोज असा खर्च कां करतां? एकवेळ नजराणा दिला तेवढा पुरे. वरचेवर रोजरोज तुह्मांकडून नजराणे घ्यावे अशी माझी इच्छा नाहीं," असें ह्मणाले.

हें ऐकून माधवाचा चाकर बनून गेलेला ठग पुरोहितबुवांला म्हणा- ला, "आपण ह्मणतां तें खरें आहे; अमच्या यजमानांजवळ द्रव्याला कांहीं कमी गेलें आहे असें नाहीं. ते येथें रोजगार करणार ह्मणतात; तो केवळ बरोबरच्या मंडळीच्या आग्रहास्तवच. नाहींतर त्यांला रो- जगार करून काय करायचें आहे. मित्रांच्या आग्रहावरून त्यांणीं ती गोष्ट मनांत आणिली आहे, व ती आपल्या द्वारें सिद्ध होईल ह्मणून त्यांणीं

आपल्या पायांचा आश्रय केला आहे. तेव्हां पुढची व्यवस्था काय ती आपण करालच. आतां हा नजराणा जो आहे तो ह्मणजे आपल्याकडून कांहीं काम करून घेण्याकरितांच दिला आहे असें नाहीं. कामाचें काय? साधलें तर साधलें, न साधलें तर न साधलें. पण आपल्यासारख्या विद्वान् व शिष्ट मूर्तीचें दर्शन तरी कोठें होतें आहे? विद्वानांचा सत्कार करण्याविषयीं आमच्या यजमानांला किती हौस वाटते तें कांहीं सांगतां येत नाहीं.. आपल्याला जें त्यांणीं आतां पाठविलें आहे, तें कांहींच नव्हे. सांप्रत काळ अनुकूळ नसल्यामुळें त्यांनीं आपला हात पुष्कळ आवरला आहे. नाहींतर त्यांच्या सारखा देणारा खरोखर दुसरा कोणीही मिळायचा नाहीं."

हें त्याचें बोलणें ऐकून पुरोहितबुवांला मोठें समाधान वाटलें. लोभी मनुष्याला आशा दाखविणारें असें त्या लबाड चाकराचें बोलणें त्या ब्राह्मणाला किती प्रिय वाटलें असेल याचें अनुमानही करतां येत नाहीं. वरचेवर आपल्याला यांच्याकडून पुष्कळ लाभ होईल असें समजून त्याणें **माधवाच्या** हेतूप्रमाणें राजाजवळ त्याला चाकरी लावून देण्याचें उघडपणें कबूल केलें. त्याच्याकडून आलेल्या मनुष्याची— आपण तुझ्या यजमानाविषयीं मनापासून खटपट करणार, अशी खात्री करून देऊन **शंकरस्वामीनें** त्याला निरोप दिला. तेव्हां तो परत **माधवा**जवळ येऊन त्याणें आपण कसें कसें भाषण केलें व त्यावरून पुरोहितबुवा कसे प्रसन्न झाले ती सर्व हकीकत यथास्थित रितीनें त्याला निवेदन केली.

ब्राह्मणलोक दुसऱ्याची स्तुति करण्याच्या कामांत मोठे कुशल असतात. त्यांतूनही ज्यांच्याकडून त्यांना लाभ असेल; किंवा तो होण्याची बळकट आशा असेल, त्यांची तर ते अशी स्तुती करतात कीं ती ऐकून मोठ्या चौकस मनुष्यालादेखील भुरळ पडते. **शंकरस्वामी**ला **माधवा**पासून विशेष लाभ होण्याची पक्की आशा होती. तो,

उत्तम समय पाहून त्याचें कार्य सिद्ध करून देण्याचा प्रयत्न करीत होता. एकेदिवशीं राजवाड्यांत कांहीं हव्यकव्य होतें, व त्यावेळीं राजाची मर्जी फार प्रसन्न होती. ही संधि पाहून **शंकरस्वामीनें माधवा**विषयीं राजाजवळ गोष्ट काढली. त्याच्याबरोबरच्या लोकांनीं जो त्याचा बडेजाव सांगितला होता त्याहीपेक्षां **शंकरस्वामीनें** राजाजवळ अधिकच त्याचें महत्व वर्णन केलें. **शंकरस्वामी**विषयीं राजाच्या मनांत विशेष पूज्यबुद्धी होती. तेव्हां त्याणें **माधवा**चें जें वर्णन केलें तें खरें असेल किंवा नाहीं याविषयीं राजाला शंकादेखील आली नाहीं. अशा योग्य मनुष्याला आपण आपत्कालीं आश्रय द्यावा हें आपल्या थोरपणाला मोठें भूषण आहे, असें समजून राजानें—**माधवा**ला आपल्याजवळ घेऊन या, असें **शंकरस्वामी**ला सांगितलें.

राजा आपलें सांगणें मान्य करील किंवा नाहीं, याविषयीं—मागच्या अनुभवावरून—**शंकरस्वामी**च्या मनांत बिलकूल शंका नव्हती. ह्मणूनच त्याणें—खात्रीपूर्वक आपण तुमचें काम करतों, असें **माधवा**ला सांगितलें होतें. राजानें त्याला आणण्याविषयीं परवानगी देतांच **शंकरस्वामी**ला मोठा आनंद झाला. दुसऱ्या दिवशीं अमुक वेळीं त्याला आपण घेऊन येतों, असें राजाला सांगून पुरोहितबुवांची स्वारी तेथील कृत्य आटपतांच परत आपल्या घरीं आली. तेथें येतांच त्यांणीं आपल्या घरच्या कारकुनाला **माधवा**च्या बिऱ्हाडीं पाठवून—"उद्यां तिसऱ्या प्रहरीं तुह्मी आपल्या थाटामाटानिशीं आमच्या इकडे या, व नंतर आपण तुह्मांला राजवाड्यांत घेऊन जाईन; राजानें तुमची मुलाकत घेण्याचें कबूल केलें आहे," असें सांगून पाठविलें. तें ऐकून **माधवा**ला आपल्या कपटविद्येचें बीज चांगलेंच रुजलें याचा मोठा हर्ष झाला. परमेश्वरानें प्रत्येक मनुष्याच्या मनोवृत्ती निरनिराळ्याप्रकारच्या निर्माण करून त्यांचा परस्परांशीं कांहीं संबंध ठेविला नाहीं, यांत किती मोठें चातुर्य केलें आहे, त्याचें वर्णन करतां येत नाहीं. त्याच्या या सृष्टींत ज्या अनेक

बडामोडी चालल्या आहेत; त्यांचें मुख्य कारण वर सांगितलें तेंच होय. सांप्रतच्या प्रसंगीं कशी मौज झाली आहे पहा! **माधव** हा केवळ पुरोहितालाच नव्हे, तर साऱ्या **उज्जयिनी**ला ठकवून बुडविण्याचा हेतू धरून आला आहे, व त्याचा त्याविषयीं प्रयत्न चालला आहे. धनलोभी पुरोहितबुवा अशा मनुष्याकडून लाभ होईल अशी इच्छा करीत आहे! व राजा तशा मनुष्याला मोठा उत्तम समजून आपल्या तैनातींत ठेवण्याचा विचार करीत आहे! एकंदरींत एकाचा दुसऱ्याशीं मेळ नाहीं, अशा प्रकारचे परस्परविरोधि व्यापार एकाच काळीं चालले आहेत, हा केवढा मोठा चमत्कार! असो.

पुरोहितबुवांनीं सांगून पाठविल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं **माधव** खूप उंची पोषाख वगैरे करून मोठ्या थाटानें राजाच्या भेटीस जाण्याच्या इराद्यानें, नेमल्या वेळीं पुरोहितबुवांच्या घरीं प्राप्त झाला. पुरोहितबुवा वाट पाहतच बसले होते; तो येतांच उभयतां राजवाड्यांत गेले. राजाला चोपदारानें वर्तमान कळविलें; तेव्हां नियमित ठिकाणीं त्याणें राजपुत्र बनलेल्या **माधवा**ची सन्मानपूर्वक भेट घेतली; व त्याचें मोठें गौरव केलें. पुरोहितबुवांनीं त्याच्याबद्दलची सर्व हकीकत पूर्वीं सांगितलीच होती, व यावेळींही मधूनमधून ते त्याची तारीफ करीतच होते. राजानें **माधवा**ला त्याच्या संबंधाची थोडीशी हकीकत विचारून— 'तुमची काय इच्छा आहे?' असा प्रश्न केला. तेव्हां पुरोहितबुवा ह्मणाले, "इच्छा कसली? सरकारच्या पायांचा आश्रय करून रहावें एवढेंच त्यांच्या मनांत आहे, दुसरें कांहीं नाहीं."

**माधव** हा पक्का वस्ताद ठग होता. त्याणें राजपुत्राचें केवळ सोंग घेतलें होतें; तरी त्याची हुबेहुब बतावणी केली होती यामुळें राजाला कांहींच शंका आली नाहीं. हा खरोखरीचाच राजपुत्र आहे असें समजून साधारण कामावर याची योजना करणें योग्य नाहीं. ह्मणून त्याणें त्याला आपल्या सरदारीचा अधिकार दिला. नोकरचाकर, स्वार-

**शिबंदी** वगैरे परिवाराची नेमणूक करून त्याच्या थाटाला शोभेल अशा-प्रकारची मोठी रक्कम खर्चाकरितां ह्मणून त्याला नियमित करून दिली, व 'आपण खुशाल आमच्या आश्रयाला रहावें' असें सांगितलें. तेव्हां **माधवानें** समयास उचित असें भाषण करून मोठे आभार प्रदर्शित केले व तत्काळ तो राजाचा सरदार झाला!

याप्रमाणें भोळ्या **शंकरस्वामीनें**—जणूं काय आपल्याच नाशा करितां त्या ठगाला राजाकडून आश्रय देवविला; तेव्हां अर्थात् पुरोहितबुवांचा मानसन्मान फारच मोठा झाला. **माधवानें** त्याच दिवशीं पुष्कळ मौल्यवान् वस्तू, वस्त्रें पात्रें इत्यादि पुरोहितबुवांला नजर केलीं. राजानें करून दिलेली नेमणूकदेखील पुरोहितबुवांनींच घ्यावी असा त्याचा आग्रह होता; पण **शंकरस्वामीनें** मोठ्या भिडेनें तो विचार रहित करविला. एकदरींत **शंकरस्वामीचें** आणि **माधवाचें** 'जीवश्च कंठश्च' सख्य जमलें. वरून ही अशी तयारी झाली तरी आंतून गुप्तरितीनें **शिव** आणि **माधव** या उभयतांच्या मसलती चालल्याच होत्या. उभयतांनीं असा निश्चय ठरविला कीं; कोणत्याही रितीनें खुद्द **शंकरस्वामीच्या** घरांतच आपला प्रवेश होण्याविषयीं प्रयत्न करावा. ही त्यांची मसलत—ईश्वरकृपेनें ह्मणा, किंवा त्यांच्या अनुकूळ झालेल्या दैवानें ह्मणा—आपोआप उत्तमप्रकारें सिद्ध करून दिली.

**माधव** राजाचा सरदार बनला होता हें वर सांगितलेंच आहे. नेमणूक झाली त्या दिवसापासून तो दरबारांत जाऊन राजा सांगेल तें काम करूं लागला; तरी त्याचें बिऱ्हाड पूर्वीं ज्या देवळांत ठेविलें होतें तेथेंच होतें. एकेदिवशीं—आपल्याला राहण्यास योग्य अशी जागा कोठें मिळेल? असें त्याणें **शंकरस्वामीला** मुद्दाम विचारिलें. मनांतून त्याच्याच घरांत तळ द्यायचा होता; पण त्याविषयीं त्याणें आग्रह करावा, आणि मग आपण तसें करावें असा त्याचा हेतू होता. **शंकरस्वामीनें**—दुसरीकडे कशाला जागा पाहतां? माझ्याच येथें रहा, असें सांगि-

तलें तरी त्याणें तें मान्य केलें नाहीं. आपणास फार उपद्रव द्यावा हें योग्य नाहीं, असें सांगून त्याणें राजाजवळ ती गोष्ट काढली. तेव्हां राजानें त्याला—ज्या सरकारी जागा आहेत त्यांतून तुह्मांला पसंत असेल ती खुशाल घ्या, असा हुकुम दिला. त्याप्रमाणें माधवानें त्या जागा पाहून कांहींतरी गैरसोय दाखवून मुद्दाम नापसंत केल्या. नंतर एके-दिवशीं शंकरस्वामीला ह्मणाला, "काय करावें? बाकीची सर्व व्यवस्था लागली; पण अद्याप जाग्याची सोय लागली नाहीं. आह्मी मुशाफर होतों तोंपर्यंत देवळांत राहिलों हें ठीकच झालें; पण आतां येथें स्थाईक झालों आहों, तेव्हां तशा ठिकाणीं रहावें हें योग्य नाहीं. त्यांतून आमच्या तेथें राहण्यानें बिचाऱ्या गोरगरीब येणाराजाणारांला मोठी अडचण होते. तेव्हां जाग्याची कांहींतरी व्यवस्था केलीच पाहिजे."

त्या धूर्तानें ज्या हेतूनें वरील भाषण केलें तो हेतू उघडच आहे. लोभी शंकरस्वामी तें त्याचें मोहक भाषण ऐकून ह्मणाला, "तुह्मी तर बुवा विलक्षण आग्रही अहां. मी तुह्माला मूळपासून सांगतों आहें कीं, कांहीं योगायोगानें तुमच्या आमच्या गांठी पडल्या आहेत, तर आतां आपण एकेच ठिकाणीं रहावें. तुह्माला दुसरीच जागा घेऊन काय करायचें आहे? आमचें घर आहे, हें तुमचेंच आहे. खुशाल बिनदिक्कत येऊन रहा. तुमची सर्व सोय लावून देतों. हा वाडा केवढा मोठा आहे हें तुह्मीं पाहिलेंतना? तुमच्यासारखीं आणखीं चार बिऱ्हाडें राहिलीं तरी जाग्याचा संकोच मुळींच व्हावयचा नाहीं. आतां दुसरेतिसरे कांहीं विचार करीत बसूं नका. मुकाट्यानें आपलें बिऱ्हाड घेऊन या कसे."

शंकरस्वामीनें—हा आपल्या घरीं राहिला ह्मणजे याच्यापासून वरचेवर पुष्कळ लाभ होईल, असें समजून त्याला आपल्या घरीं राहण्याविषयीं आग्रह केला, व माधवानेंही—त्याच्या घरीं राहिल्यावांचून त्याला बुडविण्याचें काम यथास्थित रितीनें साधायचें नाहीं; ह्मणून तेथें राहण्याचें कबूल केलें. याप्रमाणें परस्परांचे हेतू परस्परांला न कळवितां

**माधव** आपल्या परिवारासह **शंकरस्वामी**च्या घरीं येऊन राहिला. जणूं काय झाडाच्या ढोलींत राहणाऱ्या उंदरानें आपलें तळपट करणाऱ्या सर्पालाच मुद्दाम तेथें बोलवून आणावें; त्याप्रमाणें त्या लोभी पुरोहितानें **माधवा**ला आपल्या घरीं नेऊन ठेविलें!

**शंकरस्वामी**च्या घरीं **माधव** राहायला आला त्याचवेळीं—तुमचें कांहीं जडजोखम असेल तर तें नीट बंदोबस्तानें ठेवा. असें त्याणें **माधवा**ला सांगितलें. त्याच्या जवळ जें कांहीं डबोलें असेल तें त्याणें आपल्याजवळ ठेवायला द्यावें; असा **शंकरस्वामी**चा हेतू होता; व तो **माधवा**नेंही पूर्ण केला. पुढें काय काय करायचें व तसें करण्याला कोणकोणतीं साधनें पाहिजेत याची आधींपासून त्यांणीं तयारी केलीच होती. खोट्या हिऱ्यामाणकांचे मोठमोठे दागिने, तसेंच खोट्या मोत्यांचीं पेंडीं वगैरे बनावट जवाहिर पुष्कळसें त्यांणी जमविलें होतें. तें एका मोठ्या डब्यांत घालून त्याच्यावर पुष्कळ वेष्टणें बांधून तो डबा माधवानें **शंकरस्वामी**च्या हवालीं केला. तो ह्मणाला, "बरोबर सर्व नोकर चाकर आहेत, माझा तर सारा वेळ राजवाड्यांत जातो, तेव्हां कोठें कांहीं गेलें आलें तर उगीच पंचाईत करीत बसायचें त्यापेक्षां हें सर्व आपल्याच अधीन असूं द्या ह्मणजे माझा जीव बिनघोर झाला," असें सांगून **माधवा**नें तो आपला जवाहिरांचा डबा **शंकरस्वामी**च्या हवालीं केला व त्या अविचारी पुरोहितानें मोठ्या आनंदानें तो आपल्या ठेवणीच्या खोलींत नेऊन ठेविला! चार आठ दिवसांनीं मोठ्या आर्जवानें तो डबा बाहेर आणवून त्यांतले ते खोटे दागिने बाहेर काढावेत, क्षणभर अं।वर घालावेत, पुन्हां ठेवावेत, अमका हा दागिना मला चांगला शोभतो असें पुरोहित बुवांला ह्मणावें; असें तो वरचेवर करीत असे. जशा एखाद्या बैलाचें मन हिरव्याचार गवतानें हरण करावें; त्याप्रमाणें त्या **माधवानें** खोटे दागिने दाखवून दाखवून पशुबुद्धी अशा त्या **शंकरस्वामी**ला वेड लाविलें.

याप्रमाणें अनेक युक्ति करून पुरोहितबुवांचा आपल्यावर त्या धूर्तानें पुरता विश्वास बसवून घेतला. त्या दोघांचें इतकें कांहीं रहस्य-जमलें कीं; त्याला दुसरें उदाहरणच देतां येत नाहीं. नंतर आतां पुरो-हितबुवांला गंडा बांधावा, असा विचार करून त्या ठगराजानें आ-पली प्रकृति बिघडल्याचें ढोंग केलें. तो मुद्दाम थोडेंथोडें अन्न खाऊं लागला. कधींकधीं ओकाऱ्या काढून वांती करित असे. पोटांत अन्न कमी जाऊं लागल्यामुळें अर्थात् त्याचें शरीरही कृश होत चा-ललें. दिवसेंदिवस तो अगदीं अशक्त होऊन लौकरच बिछान्याचा सोबती झाला. त्याच्या तोंडांत पाणीदेखील जाईनासें झालें. वर-चेवर तो औदासीन्याचे उद्गार काढीत असे. शेवटीं एकेदिवशीं बिछा-न्याच्या जवळ सचिंत बसलेल्या पुरोहितबुवांला **माधव** ह्मणाला, "ऐकलें, बुवासाहेब, मी या दुखण्यांतून बरा होण्याची कांहीं आशा नाहीं. माझी ग्रहदशा प्रतिकूळ आली आहे. तेव्हां सर्वस्वदान करून तरी पहावें. त्याच्या योगानें कदाचित् आराम पडला तर पडला. आपण कोणीतरी चांगला विद्वान् व सुपात्र अशा ब्राह्मणाला बोलावून आणा. मी सर्वस्वदान केल्यानें कदाचित् बरा झालों तर ठीकच आहे; नाहींपेक्षां परलोकीं तरी त्याचा मला फायदा मिळेल. सुपात्रीं दान करणें हें इहपरलोकीं मोठें सुखदायकच आहे. हें आयुष्य अस्थिर आहे. विचारी मनुष्य द्रव्याविषयीं मुळींच आस्था बाळगीत नाहींत. तेव्हां आपण कृपा करून कोणा सुपात्र ब्राह्मणाला आणाल तर मी हा माझा हेतू पूर्ण करून घेईन."

प्रिय वाचकहो, हे शब्द त्या लोभी व भिक्षुक ब्राम्हणाला किती गोड वाटले असतील बरें? पुरोहितबुवा जे येवढे मोठे भाग्यवान् झाले होते; ते दानदक्षिणेच्या मिळकतीवरच. **माधवानें** ते खोटे दागिने दाखवून त्यांचें मन आकर्षण केलेंच होतें. आणि तोहीऊन आपल्या खुषीनें सर्वस्व दान करायला तयार झाला आहे; तेव्हां त्याला किती

आनंद होईल हें कांहीं सांगावयास नको. माधवाच्या मनांत तें मोठें दान पुरोहितबुवांलाच द्यावयाचें होतें; पण आपण होऊन त्यांना घ्या ह्मणणें योग्य नाहीं; ह्मणून त्याणें ही युक्ति केली होती. असो.

तें त्याचें बोलणें ऐकून पुरोहितबुवा मनांत ह्मणाले, काय बेटा वेडा आहे कोणास ठाउक! अरे, माझ्यापेक्षां सुपात्र ब्राह्मण दुसरा कोण असणार? तथापि त्यांणीं हा आपला हेतू व्यक्त करून दाखविला नाहीं. माधवाला—तुमच्या हेतूप्रमाणें चांगला ब्राह्मण आपण लौकरच पाहतों, असें सांगितलें. तेव्हां तो ढोंगी रोगी त्याच्या पायांवर मस्तक ठेवून ह्मणाला, "आपले मजवर अनंत उपकार आहेत. तेव्हां आतां विशेष काय बोलायचें आहे. सर्वस्वीं मी आपला ऋणी आहें. ह्या जन्मांत तर माझ्या हातून हें ऋण फिटेलसें वाटत नाहीं!"

माधवाचें समाधान करून पुरोहितबुवांनीं ब्राह्मण आणण्याचा प्रयत्न चालविला. राजदरबारांत पुरोहित दानाध्यक्ष इत्यादि धर्मसंबंधी देणग्या देवविण्याच्या कामावर जे लोक अधिकारी असतात त्यांचे अनेक प्रकारचे कावे असतात. राजवाड्यांतून होणारा दानधर्म ते बहुतकरून दुसऱ्याला देववितात तरी त्यांत त्यांचा मतलब असतोच. मिळालेल्या दानांपैकीं कांहींतरी थोडेंबहुत त्या दान घेणाराला देऊन बाकी सर्व, ते अधिकारी लोक आपल्या तोंडांत टाकतात हें प्रसिद्धच आहे! लोभी शंकरस्वामीनें तीच युक्ति यावेळीं योजली. तो राजपुरोहित असल्यावरून पुष्कळ गरीब ब्राह्मण दानदक्षिणेच्या आशेनें दररोज त्याच्याकडे खेपा घालीतच असत. त्यांतल्याच एकेका ब्राह्मणाला—मी आपल्या इच्छेप्रमाणें कांहींतरी तुह्मांला देईन. जें दान मिळेल तें सर्व मुकाट्यानें माझ्या हवालीं करावें. असें त्यांच्याकडून कबूल करवून शंकरस्वामीनें जो जो ब्राह्मण आणावा; तो तो माधवानें कांहींतरी दोष काढून नापसंत करावा. यापेक्षांही मोठा विद्वान् व सुपात्र असा ब्राह्मण पाहिजे; असल्या भटजीला आपण कशाला आणलें? असें तो पुरोहितबुवांला ह्मणे.

**माधवा**बरोबरची मंडळी सर्व शिकवून सवरून तयार केलेलीच होती. **शंकरस्वामी** वरचेवर नवे नवे ब्राह्मण आणित होता, व **माधव** त्यांना नापसंत करीत होता. हें पाहून **माधवा**बरोबरचा एक धूर्त पुरोहितबुवांला ह्मणाला, "महाराज, हे आमचे यजमान मोठे चाणक्ष आहेत. यांना सुपात्र कोण आणि कुपात्र कोण याची चांगली परिक्षा आहे. असा तसा ब्राह्मण यांनां मुळींच पसंत व्हायचा नाहीं. तसाच कोणी योग्य असेल; तेव्हां यांच्या खात्रीला उतरेल. आह्मांला कांहीं येथील चांगलीशी माहिती नाहीं; पण शिप्रानदीच्या काठीं **शिव** नांवाचा एक मोठा तपस्वी बसलेला आह्मीं केव्हां जातां येतां पाहिलेला आहे. खरोखर तो मोटा विरक्त आहे. विद्वान् तर पहिल्या प्रतीचा. त्याचें तप फारच उग्र आहे. तेव्हां तो कदाचित् यांनां (**माधवाला**) पसंत पडेल तर पहा. नाहींतर दुसरा तिसरा ब्राह्मण यांना मुळींच मान्य व्हायचा नाहीं."

रोग्याचें सोंग घेतलेल्या **माधवा**च्या बिछान्याजवळच हें बोलणें चाललें होतें. तें ऐकून **माधव** गळवझां येऊन पुरोहितबुवांला ह्मणाला; "महाराज, मजवर कृपा करा. तशा सत्पात्राला घेऊन या; दुसरा कोणीही ब्राह्मण मला पसंत पडायचा नाहीं. तो तपस्वी **शिव** फारच मोठ्या योग्यतेचा आहे असें लोक सांगतात. तर कसेंही करून त्याल घेऊन या."

आंतून सर्व मसलत तयार झालेलीच होती. **माधवा**चा साथीदार **शिव** इषारा करतांच आपोआप आला असता; पण तसें झाल्यानें पुरोहितबुवा गोत्यांत पडले नसते. त्या लोभी ब्राह्मणाला सफई बुडविण्याकरितां त्याच्या पाठीस लागलेल्या **माधवानें** काकुळती येऊन प्रार्थना केल्यावरून पुरोहितबुवांनीं **शिवा**कडे बोलावणें पाठविलें पण तो त्याला कसचा दाद देतो. त्याणें—"आह्मांला कोणाचें दान नको आणि दक्षिणाही नको," असा चोख जबाबदेऊन बोलवायला गेलेल्य

मनुष्याला परत लावला तेव्हां स्वतः पुरोहितबुवा गेले. बिचारा करतो काय? लोभाला गुंतल्यामुळें तसें करावें लागलें. याशिवाय—"स्वतः आपण गेल्यावांचून ते स्वामिमहाराज कधींही यायचे नाहींत. तर कृपाकरून माझ्याकरितां आपण एवढी तसदी घ्या," असें **माधवानें** काकुळती येऊन सांगितलें. तेव्हां **शंकरस्वामी** न जाऊन करील काय? असो. स्वतः पुरोहित त्या धूर्त **शिवाच्या** मठींत येऊन पोंचला. पुरोहितबुवा येणार हें **शिवाला** आधींच समजलें होतें. तो यावेळीं अगदीं निश्चल ध्यान धरून बसला होता. भोळ्या पुरोहिताला तें ढोंग्याचें ध्यान पाहून त्याच्यावर विशेष श्रद्धा उत्पन्न झाली. त्याणें प्रत्यक्ष **शंकराप्रमाणें** त्या ढोंग्याला प्रदक्षिणा घालून साष्टांग नमस्कार केला! आणि मोठ्या नम्रतेनें हात जोडून त्याच्या ध्यानाचें विसर्जन होण्याची वाट पहात पुरोहितबुवा त्याच्या जवळ बसले. बराच वेळ तें खोटें ध्यान लावून **शिवानें** बिचाऱ्या पुरोहितबुवाला तेथें तिष्ठत बसविलें व नंतर ध्यानाचें विसर्जन करून डोळे उघडले. पुरोहितबुवा टपून बसलेच होते. **शिवानें** डोळे उघडतांच त्यांणीं पुनः नमस्कार केला. आणि मोठ्या नम्रतेनें पुरोहितबुवा ह्मणाले, "महाराज, आपल्याजवळ कांहीं विनंती करण्याकरितां मी आलों आहें. ती करावी किंवा नाहीं याविषयीं फारच संकोच वाटतो. जर आपल्याला राग न येईल तर माझ्या मनांत प्रार्थना करावयाची आहे."

पुरोहितबुवांची ही विनंती ऐकून त्या धूर्तानें त्याला तोंडानें तर उत्तर दिलें नाहींच; पण ओंठ हालवून व हातानें—काय तुमच्या मनांत आहे तें सांगा, अशी आज्ञा केली. तेव्हां पुरोहितबुवा ह्मणाले, "येथें दक्षिणदिशेकडून **माधव** नांवाचा एक राजपुत्र आला आहे. त्याच्याजवळ पुष्कळ द्रव्य आहे. सांप्रत त्याची प्रकृति फारच अस्वस्थ झाली आहे. यामुळें त्याच्या मनांत सर्वस्व दान करावें असें आहे. जर आपण कृपा करून तो त्याचा हेतू मान्य कराल तर, ज्यांत अमोलिक असे अनेक

हिऱ्यामाणकांचे व मोत्यांचे अलंकार आहेत असें आपलें सर्व द्रव्य तो तुमच्या चरणकमलीं अर्पण करीन असें ह्मणत आहे. यावर मर्जी असेल त्याप्रमाणें आज्ञा व्हावी."

**शिव** हा बोलून चालून साधू बनलाच होता, तेव्हां त्याला आपल्या सोंगाची बतावणी पुरतेपणीं केलीच पाहिजे. कुठलें जवाहीर, कोण-देणार, आणि कशाकरतां देणार, हें सर्व त्याला माहितच होतें. तो मौन सोडून पुरोहितबुवांला हळुच ह्मणाला, "महाराज, आमच्यासारख्या भिक्षा मागून खाणाऱ्या ब्रह्मचाऱ्याला तें द्रव्य घेऊन काय करायचें आहे? न घर, ना दार; आमच्या या पर्णकुटिकेंत तें बहुमोल जवाहीर ठेवावें हें आपल्याला योग्य वाटतें काय? क्षुधेची शांती होण्याकरितां परमेश्वर भिक्षा देतच आहे. राहायला ही झोंपडी आहे. असें असून दान घेऊन द्रव्य संपादन करायचें तें कशाकरितां? याचा आपणच विचार करा."

हें ऐकून पुरोहितबुवा ह्मणाले, "अहो महाराज, असें काय ह्मणतां? ब्राह्मणांनीं जे चार आश्रम घ्यायचे त्यांचा क्रम कसा आहे हें आपल्याला ठाऊक नसेल असें नाहीं. आपण सर्वज्ञच आहां. असें असून आपण अद्याप ब्रह्मचर्यांत अहां. पुढें गृहस्थाश्रम घेतला पाहिजे. विवाह करून गृहस्थाश्रमांत राहून देव, पितर, अतिथि यांचें पूजन केलें पाहिजे हें आपणास ठाऊक नाहीं का? आपणच, आपण ब्रह्मचारी आहें असें सांगितलें. आपलें वयही बरेंच झालें आहे. तेव्हां शास्त्राच्या आज्ञे-प्रमाणें, व शिष्टांच्या संप्रदायाप्रमाणें आतां आपल्याला गृहस्थाश्रमा-चा स्वीकार केलाच पाहिजे. आणि त्या आश्रमांत तर द्रव्याची फारच अपेक्षा असते. द्रव्यानें धर्म, अर्थ आणि काम हे त्रिवर्ग सिद्ध होतात. गृहस्थाश्रम हा सर्वांत श्रेष्ठ आहे. कारण इतर आश्रमांत राहणाऱ्या-ला—त्याच्या मनांत असलें तरी—परोपकार करण्याला कांहीं साधन नसतें. गृहस्थाश्रमी मनुष्य इतर आश्रम्यांला केवळ आधारभूत असतो.

हें ऐकून **शिव** ह्मणाला, "छे छे छे!! संसाराचें नांवदेखील घेऊं नका. मला गोसाव्याला ती कशाला यातायात पाहिजे. आणि कदाचित् मी लग्न करायचें मनांत आणिलें तरी मनाजोगती कुलीन मुलगी कोठें मिळणार आहे. ? तेव्हां त्या गोष्टी राहूं द्या. आह्माला आतां त्याची आशाच नाहीं. परमेश्वरानें, आहों याच स्थितींत आमचा शेवट लावला ह्मणजे झालें. ब्रह्मचाऱ्याला ब्रह्मलोकाची प्राप्ति होते, असें शास्त्रकारांनीं वर्णन केलें आहे. तेव्हां परलोकीं आमच्या तपाचें फल आह्माला प्राप्त होईलच. येऊन जाऊन कायतो ऐहिक सुखाचा लाभ होणार नाहीं एवढेंच ना ? तर त्याची आपल्याला मुळीं इच्छादेखील नाहीं."

**शिव** आणि **माधव** या दोघां ठगांनीं **शंकरस्वामीचें** केवळ द्रव्यच हरण करायचा विचार केला नव्हता; तर त्याची जी अविवाहित कन्या होती तीही उपटायचा त्यांचा बेत होता. **माधवानें शंकरस्वामी**जवळ जो आपला जवाहिराचा डबा ठेवायला दिला होता, तो त्याच्या घरांतलें द्रव्य भरून नेण्याकरितांच ठेवला होता; पण मुलगीवर अद्याप कांहीं प्रयोग झाला नव्हता. तो आतां होण्याचा समय प्राप्त झाला! **शिवाचें** विरक्ततेचें भाषण ऐकून तो लोभी **शंकरस्वामी** मनांत ह्मणाला, हा द्रव्य नको ह्मणतो आहे तरी, तें केवळ बायको नसल्यामुळेंच याला नकोसें वाटतें आहे. हा बिचारा मुशाफर एकुलता एक येथें आला आहे. याचा आगा ना पिच्छा. लग्न करून घ्यायचें नाहीं असें यानें ह्मटलें तरी चांगलीशी मुलगी मिळाली तर लग्न करून घ्यावें असाही आपला हेतू याणें व्यक्त केला आहे. आतां तो राजपुत्र दान देणार आहे त्यांतला अमुक भाग आपल्याला द्यावा असा याच्याशीं उघड रितीनें ठराव करतां येत नाहीं व हा निःस्पृह असल्यामुळें कदाचित् मुळीं दान घेण्याला तयार होईल किंवा नाहीं याचाही संशयच आहे. पण एकंदरींत तें जवाहीर आपल्या हाताबाहेर जाऊं देतां उपयोगी नाहीं! कसेंही करून तें हाताखालीं घातलेंच पाहिजे. तेव्हां याविषयीं उपाय काय

करावा? आपली मुलगी विवाहाला योग्य झाली आहे. व ती कोणाला तरी द्यावयाचीच आहे. ती यालाच दिली तर आयतेंच काम होईल. तें सारें डबोलें आपल्या हातीं लागेल! तेव्हां याला मुलगी देऊन आपला हेतू साधावा हें बरें, असा विचार करून पुरोहितबुवांनीं पुनरपि लग्नाविषयीं त्याच्याजवळ गोष्ट काढली.

**शंकरस्वामी** ह्मणाला, "आपल्या बोलण्यावरून एकंदरींत असें वाटतें कीं आपल्या मनाजोगती मुलगी मिळाली तर आपण लग्न करून घेणार. तेव्हां या संबंधानें माझी एक विनंती आहे. **विनयस्वामिनी** नांवाची माझी उपवर झालेली कन्या आहे. आमच्या कुळाविषयीं स्वतः मीच आपल्या तोंडानें काय सांगू? तिचें रूप ह्मणाल तर अप्रतिम आहे; आणि तिचे गुणही तसेच आहेत. ती सर्वप्रकारें आपल्याला पसंत होईल असें मला वाटतें. आपली मर्जी असेल तर माझ्या मनांत ती आपल्याला द्यावी असें आहे. नीट विचार करून पहा. असें कडकडीत ब्रह्मचर्यव्रत धारण करून आपण किती दिवस जिवाला त्रास देणार? तप केलेंत तितकें पुरे आहे. आतां कांहीं दिवस गृहस्थाश्रमसुखाचा अनुभव घ्या. माझ्या ह्मणण्याचा पुरता विचार करून पहा. ईश्वरकृपेनें सर्व सोयी उत्तमप्रकारें जमून आल्या आहेत. गृहस्थाश्रम करायचा त्याला मी आपणांस आपली मुलगी देण्यास तयार झालों आहें, व ती सर्वगुणसंपन्नही आहे. संसारांत द्रव्याची विशेष गरज असते; तेंही आयतेंच मिळतें आहे. तेव्हां आपण माझें सांगणें मान्य करावें असें वाटतें. मग पहा बुवा तुमचे विचार कसे असतील ते."

त्या भोळ्या ब्राह्मणाचें हें भाषण ऐकून त्याचा हेतू काय आहे तें समजण्याला त्या धूर्ताला कांहींच वेळ लागला नाहीं. तो मनांत ह्मणाला, बरें आहे. कांहीं चिंता नाहीं, तूं काय हेतू धरला आहेस तें मला समजलें. व मी तुझी चांगलीच व्यवस्था करणार आहें; एकंदरींत सांपडलास आमच्या तावडींत पुरतेपणीं, असा विचार करून तो ढोंगी

पुरोहितबुवांला ह्मणाला, "आपलें सांगणें अमान्य करण्यासारखें नाहीं. योगायोग नीट जमून आले आहेत हें ठीक आहे; पण मी, तें दान घेतलें तर तें द्रव्य घेऊन करायचें काय? मीतर लहानपणापासून असा जोगी होऊन बसलों आहें. त्या एवढ्या मोठ्या भांडवलाची व्यवस्था लावील कोण? आणि संसार तरी चालवील कोण? छे बुवा! आपल्याला नको ती दगदग. आज अमकें नाहीं; उद्यां तमकें नाहीं. आज कोठें घर शाकारलें पाहिजे; उद्यां अमुक केलें पाहिजे, परवां तमूक केलें पाहिजे. कोण ती यातायात करीत बसतो? आणि पुढें खंडीभर पोरें होतील त्यांची नड कोणी काढावी? पुरोहितबुवा मी आपल्याला खरेंच सांगतों, मला नका तुह्मी या यातायातींत घालूं!"

हें बोलणें किती सफाईचें व किती मतलबाचें होतें हें उघडच आहे. तें ऐकून लोभवश झालेले पुरोहितबुवा ह्मणाले, "वाहवा! ह्या तुमच्या भित्रेपणाला ह्मणावें तरी काय? संसार संसार तो काय? फारसा कठीण आहे का? कदाचित् तुह्मांला त्याची दगदग वाटत असेल तर त्याची व्यवस्था माझ्याकडे लागली. मी तुमच्या त्या द्रव्याची नीट व्यवस्था करून सारें यथास्थित चालवितों. तुह्मी आपले जेऊन खाऊन खुशाल चैन करीत बसा ह्मणजे झालें."

याप्रमाणें त्या ढोंग्यानें ज्या ज्या हरकती घेतल्या त्यांचा त्याचा परिहार करून पुरोहितबुवांनीं लग्न करून घेण्याविषयीं फारच आग्रह केल्यावरून **शिव** ह्मणाला, "महाराज, जर तुमचा असा आग्रहच असेल; तर तुमचें सांगणें माझ्यानें मोडवत नाहीं; पण पहा, याचा नीट विचार कराहो. तुह्मी कबूल केल्याप्रमाणें पुढची सर्व व्यवस्था ठेविली पाहिजे. नाहींतर माझ्या पायांत बेडी घालून आपण आंग काढून घ्याल, तर मग मात्र माझ्या फजीतीला पारावार नाहींसा होईल. मला सोन्याची आणि रुप्याची परीक्षा नाहीं, मग रत्नांची परीक्षा कोठून असेल? मी आपला एखाद्या झाडासारख्या सोटभैरी वाढलों आहें मात्र. मला

संसाराची काडीइतकीदेखील माहिती नाहीं. केवळ तुमच्या सांगण्यावर मी ह्या गोष्टीला प्रवृत्त झालों आहें. तर आतां जसें योग्य वाटेल तसें करा. तुह्मी सांगाल तसें वागणें एवढेंच काय तें माझें काम आहे."

त्या धूर्तानें जसें जसें संसाराच्या कामांत आपलें अज्ञान असल्याचें व्यक्त करून दाखविलें; तसें तसें त्या लोभी ब्राह्मणाचें मन फारच संतुष्ट झालें. तो जें जें ह्मणेल तें तें कबूल करून त्या मूर्ख पुरोहितानें त्या ठगाला आपल्या घरीं नेलें! त्याला आपल्या स्नानसंध्या करण्याच्या पवित्र जाग्यांत नेऊन बसवून **शंकरस्वामीनें** त्याचा मोठा सत्कार केला. त्या लबाडाचें नांव मात्र **शिव** होतें; पण खरोखर तो अशिव अर्थात् अभद्र होता. अशा त्या मूर्तिमंत अभद्राला घरांत बसवून **शंकरस्वामी** लौकर लौकर, त्याचा साथीदार **माधव**—जो बळेंच मरणोन्मुख होऊन पडला होता—तेथें गेला. आणि आपण कसकशा प्रयत्नांनीं **शिवाला** घेऊन आलों तें सर्व त्याणें त्याला सांगितलें. पुरोहितबुवांनीं केलेला प्रयत्न **माधवाला** इष्टच होता. त्याला, **शिवाला** पुरोहितांनीं घरीं आणला, व त्याला मुलगी द्यायची केली, हें ऐकून फार संतोष झाला.

**शिवाचें** लग्न झाल्यावांचून तो **माधवाचें** सर्वस्वदान घेण्यास तयार नव्हता. व तें तर आपल्या हातीं कसें येईल? याविषयीं वेडा पुरोहित अतिशय घाबरा झाला होता! तेव्हां त्याणें प्रथम लग्नाची तयारी केली. ते दिवस लग्नाचेच होते, व दुसऱ्याच दिवशीं मुहूर्तही होता. तेव्हां सपाव्यासरसें आधीं लग्न लावून टाकावें, अशी तजवीज करून **शंकरस्वामीनें** सर्व तयारी केली. आणि बहुत दिवस क्लेश भोगून संपादन केलेली व केवळ आपल्या मूर्खत्वानें जिचा अपहार होत आहे, अशी स्वतःची संपत्तीच कीं काय, अशी ती मुलगी **विनयस्वामिनी** त्या मूर्तिमान् अशिवरूपी **शिवाला** त्याणें यथाविधि दिली! लग्नाचा विधि समाप्त होईपर्यंत दान घ्यायचें नाहीं, असें **शिवानें** सांगितलें होतें. ह्मणून

दोनच दिवसांत सर्व कृत्य आटपून पुरोहितबुवांनीं तिसऱ्या दिवशीं त्या जामातरूपी खरोखरीच्या दशम[1] ग्रहाला, मरणोन्मुख झालेला त्याचा साथी जो **माधव** त्याच्याजवळ नेलें.

**शिव** गेल्या दोन तीन दिवसांत **शंकरस्वामी**च्या येथेंच होता; तरी त्याणें **माधवा**ची वास्तपुस्त केली नाहीं. आंतून मात्र परस्परांचे बेत चालले होते. पुरोहितबुवांनीं **शिवा**ला **माधवा**च्या जवळ आणला; तेव्हां त्याच्यानें उठवत नव्हतें; तरी बळजबरीनें उठून—"महाराज तपोनिधे! मी आपल्या चरणकमलीं शरण प्राप्त झालों आहें," असें बोलून **माधवानें शिवा**च्या पायांवर लोटांगण घातलें. आणि पुरोहितबुवांजवळ ठेवायला दिलेला डबा त्यांच्याकडून आणवून, **शिवा**ची यथाविधि पूजा करून, **माधवा**नें तें सर्व वित्त त्याला दान केलें! त्यांत अनेक प्रकारचीं कृत्रिम रत्नें व रत्नांचे दागिने अगदीं गच्च भरले होते.

**शिवा**नें याप्रमाणें **माधवा**कडून दान घेतलें; तरी एकंदरींत त्याविषयीं निरच्छपणा दाखवून **माधवा**शीं आपला कांहींच स्नेह नाहीं, असें दाखवून त्याणें खूब बतावणी केली. दागिन्यांचा डबा पुढें उघडून ठेविला होता. त्याच्याकडे त्याणें डोळे उघडून पाहिलें देखील नाहीं; आणि तसाच तो हातानें पुरोहितबुवांकडे लोटून देऊन ह्मणाला, "हें घ्या आपलें कायतें, यांत मलाकांहीं समजत नाहीं. आणि मला याचा स्पर्श देखील नको!"

पुरोहितबुवांला हें हर्षप्रदच होतें. ते **शिवा**ला म्हणाले, "अहो जांवईबुवा, तुह्माला त्याची कां काळजी? त्याची व्यवस्था कशी काय करावयाची तें पूर्वीं मीं कबूल केलेंच आहे, तेव्हां आतां तुह्मी आपले स्वस्थ असा; मी पुढची सर्व तजवीज लावतों." असें सांगून लोभांध

---

१ चंद्र सूर्यादि ग्रह ९ असल्याचें प्रसिद्धच आहे. त्या ग्रहांप्रमाणेंच जांवईही पीडा देतो ह्मणून त्याला १० वा ग्रह ह्मणतात. "कन्याराशिस्थितो नित्यं जामाता दशमग्रहः" इत्यादि वाक्यें याच अर्थाचीं आहेत.

झालेल्या त्या **शंकरस्वामीनें** तो दागिन्यांचा डबा लौकर लौकर आपल्या जामदारखान्यांत नेऊन ठेवला. व इकडे तो धूर्त ब्रह्मचारी **शिव, माधवाला** आशीर्वाद देऊन सासऱ्यानें त्याला राहण्याकरितां आपल्या वाड्यांत जी जागा नेमून दिली होती, व जेथें नूतन विवाहित त्याची स्त्री होती; त्या ठिकाणीं तो निघून गेला.

**माधवानें** अजार बळेंच घेतला होता हें पूर्वी सांगितलेंच आहे. **शिवाला** ज्यावेळीं त्याणें सर्वस्व दान केलें त्या वेळेपासून हळुहळू आपल्याला उतार पडल्याचें तो दाखवूं लागला. व सत्पात्रीं मोठें दान दिल्यामुळें माझ्या रोगाचा परिहार होत आहे असेंही सांगूं लागला. पुरोहितबुवा पुनः त्याच्या समाचाराला गेले तेव्हां—"आपण माझे धर्मबंधू अहां. काय जाणे पूर्वजन्मांत आपलें आणि माझें विशेष नातें होतें असेल. आपल्या साह्यानेंच मी ह्या जिवावरच्या दुखण्यांतून पार पडलों. नाहींतर या परदेशांत माझें काय झालें असतें कोणास ठाऊक? आपले उपकार जन्मजन्मांतरीं माझ्या हातून फिटायचे नाहींत. काय हो, दानाचा प्रभाव तरी मोठा विलक्षण आहे! काल मी अगदीं मरतों कीं वांचतों, असा झालों होतों; पण दान दिल्या घटकेपासून मला हुषारी वाटूं लागली. सत्पात्रीं दान करणें हें रोगरूपी समुद्रांतून पार पडण्याचें, बळकट नावेसारखें, एक उत्तम साधनच आहे, असें ह्मणतात तें कांहीं खोटें नाहीं. आपण इतकी खटपट केली ह्मणूनच तो तपोनिधी (**शिव**) येथें आला व त्याणें दानही घेतलें. नाहीं तर तशा लोकांना काय गरज पडली आहे- त्यानें दान घ्यावें, व माझा रोगपरिहार व्हावा, ह्मणून आपण प्रत्यक्ष आपली मुलगीदेखील त्याला देण्यास मार्गे पुढें पाहिलें नाहीं. यावरून आपलें दयालुत्व व औदार्य याचें वर्णन काय करायचें आहे. असो. एकंदरींत मला आपण जें साह्य केलें त्याचें कधींही विस्मरण होणार नाहीं." इत्यादि प्रकारें **माधवानें** त्या भोळ्या भटाला हरभऱ्याच्या झाडावर चढविण्याचा क्रम चालविला.

इकडे त्याचा साथीदार **शिव** याची तर सर्वप्रकारें चैनच उडाली. अप्रतिम रूपवती बायको मिळाली, प्रपंचाची मुळींच काळजी नाहीं, व पुढें मोठा द्रव्यलाभ होणार! यामुळें **शिवा**ला किती आनंद झाला असेल तें सांगितलें पाहिजे असें नाहीं. त्याणें बरेच दिवस सासऱ्याच्या घरीं राहून सूख भोगलें; तरी त्याचें मुख्य कर्तव्य अद्याप तसेंच राहिलें होतें. ह्मणजे त्याचा साथीदार **माधव** याच्याकडून जें त्यानें खोट्या जवाहिराचें दान घेतलें होतें, तें त्या दुर्दैवी सासऱ्याला देऊन, त्याचें द्रव्य उपटायचें होतें! हें कोणत्या रितीनें करावें; याविषयीं **माधव** आणि **शिव** या दोघांच्या गुप्तपणें मसलती होत असत. शेवटीं त्यांणीं अमूक रितीनें हें काम साधावें असा पक्का निश्चय केला.

**माधवा**ची प्रकृति अगदीं क्षीण झाली होती. तो खाऊनपिऊन ताजातवाना होईपर्यंत थोडे दिवस दम धरला पाहिजे होता. ह्मणून त्याचा साथीदार **शिव** हा खुशाल चैन उडवित राहिला होता. नंतर **माधव** हुषार झाला असें पाहून **शिव** एकेदिवशीं **शंकरस्वामी**ला ह्मणाला, "मामा, आपण सांगितल्याप्रमाणें मला सर्वस्वीं सुखांत आणून घातलें हे आपले मोठे उपकार आहेत. त्याविषयीं माझ्यानें कांहींच बोलवत नाहीं. आपल्या घरीं मला कोणत्याही गोष्टीची वाण नाहीं; तरी माझा हेतू काय आहे तें आपणास कळवितों. आपण कसे झालां तरी माझे सासरे. सासऱ्याच्या घरीं जांवयानें फार दिवस राहूं नये. ही गोष्ट आपण देखील अमान्य करणार नाहीं. मीं येथेंच राहतों; पण माझ्या मनांत दुसरें बिऱ्हाड करावें असें आलें आहे. स्वतः आपण माझ्याविषयीं जसें अगत्य बाळगतां तसेंच आपले चिरंजीव किंवा इतर मंडळी माझ्याविषयीं अगत्यवाद ठेवितील असें नाहीं. यासंबंधानें अधिक माझ्यानें कांहीं सांगवत नाहीं; पण एकंदरींत दुसरें बिऱ्हाड करावें हें बरें, असा माझा विचार झाला आहे. तर आपण जें कांहीं मला दान मिळालें आहे तें घ्या. आणि त्याबद्दल आपल्याला योग्य

वाटेल तें द्रव्य मला द्याल तर मी आपला दुसऱ्या ठिकाणीं संसार क-रून राहीन. संसार कसा करावा; हें मला आतां शिकायचें आहे, व तें स्वतंत्र राहिल्याशिवाय समजायचें नाहीं. प्रथम प्रथम दोन दिवस आपण विशेष काळजी घेऊन वेळोवेळ मला नीट समजूत करून द्यावी लागेल; पण पुढें मी आपोआप त्या कामांत वाकबगार होईन."

हें त्या लबाड जांवयाचें भाषण पुरोहितबुवांला योग्य व खरें वाटलें. त्याला कोणत्याहीरितीनें तें जवाहीर आपलेंसें करून घ्यायचें होतें. आपण आपल्या घरीं जांवयाची सर्व व्यवस्था कितीही दिवस ठेविली तरी शेवटीं त्यानें तें जवाहीर मागतांच सर्व दिलें पाहिजे. न दिलें तर लोक नांवें ठेवितील; जांवयाचा पैसा घेऊन खाल्ला असें ह्मणतील, व त्याच्याकरतां झालेला खर्च फुकट जाणार. तेव्हां इतक्यांतच पिडा टळते आहे; हें बरें, असें त्याला वाटलें. याशिवाय त्याचें तें बहुमोल जवाहीर आपल्याला मिळावें, अशी त्याची आशा होतीच. त्याची किंमत वगैरे त्याला कांहीं ठाऊक नाहीं. तेव्हां आपण देऊं तें तो घेईल, व यारितीनें थोडक्यांत तें सर्व जवाहिर—अथवा त्याचें दुर्दैवच ह्मटलें तरी चालेल—घेऊन आपण त्याच्यावर पुष्कळ द्रव्य मिळवूं, अशी त्याला आशा होती! व त्या गोष्टीचा लौकर निकाल लागावा; असें तो इच्छीत होता. ह्मणून जांवयानें दुसरें बिऱ्हाड करतों असें सां-गितलें याचा त्याला फार आनंद झाला. पुरोहितबुवांच्या घरांत बरीच मोठी रोकड होती; तथापि जांवयाचें जवाहीर तिच्याहून पुष्कळपटीनें अधिक किमतीचें आहे; असें समजून त्या मूर्खानें आपल्या घरांतला पैसानपैसा सर्व गोळा करून शिवाला दिला, व त्याच्याबद्दल त्याणें दान घेतलेलें खोटें तें जवाहिर आपण घेतलें!

येवढें करून पुरोहितबुवांची तृप्ति झाली असें नाहीं. या वेड्या जांवयाला जवाहिराची किंमत मुळींच ठाऊक नाहीं. व हें जवाहिर तर आपण दिलेल्या किंमतीहून फारच मोठ्या किंमतीचें आहे; आणि

आतां हा आपल्यापासून निराळा राहणार आहे. तेव्हां कदाचित् कोणा सोद्यालुच्च्याची संगति लागली आणि त्याणें याचे कान भरले; तर हा आपल्याला फसविल्याबद्दल गवगवा करील. व कदाचित् राजाजवळ फिर्यादही जाईल. आणि तसें झालें ह्मणजे आपल्याला ही मिळालेली लाट कदाचित् परत द्यावी लागेल. तेव्हां याचा पक्का बंदोबस्त केला पाहिजे; असें समजून त्या बैलानें दोन दस्तऐवज तयार केले व त्यांत—"**शिवा**नें राजीखुषीनें जवाहीर दिलें, व आपण त्याला त्याची योग्य किंमत दिली. यासंबंधानें पुढेंमागें कांहींच कोणाचा दावा नाहीं" अशा आशयाचा मजकूर लिहून, आपल्या सहीचा लेख त्याला दिला, व त्याच्या सहीचा लेख आपण घेतला. व यारितीनें तो मूर्ख आपल्याला मोठा लाभ झाला असें समजून आनंद मानिता झाला!

याप्रमाणें विशेष प्रयत्न न करतां लाखो रुपयांचें धन व सुंदर बायको मिळाल्यावरून, अतिशय खुष झालेला **शिव** आपल्या पत्नीसहवर्तमान त्याच नगरांत दुसरें एक घर घेऊन तेथें चैनींत राहूं लागला. इकडे **माधवा**ची प्रकृति चांगली हुषार झालीच होती. **शिवा**ला दान दिल्यामुळें आपल्याला आराम पडला. तेव्हां त्या सत्पुरुषाची थोडे दिवस तरी सेवा केली पाहिजे, असें सांगून **माधव शिवा**च्या घरीं जाण्याची इच्छा दर्शवूं लागला. लोभी पुरोहितबुवांलाही तो आतां पहिल्यासारखा प्रिय वाटत नव्हता. कारण द्रव्यलाभ होईल ह्मणूनच त्यांची त्याच्यावर प्रीती बसली होती. तें तर काम झालेंच; व आतां याच्याजवळ आपल्याला लाभ होण्यासारखें कांहीं द्रव्यही राहिलें नाहीं, तेव्हां रिकामा खर्च हवा कशास? आपल्या आपण जातों ह्मणतो आहे तें बरें, असें समजून पुरोहितबुवांनीं **माधवा**ला **शिवा**च्या घरीं जाण्याची परवानगी दिली, व ते दोघे ठग एकत्र झाले. वेड्या पुरोहिताला लुटून त्यांणीं जें मोठें द्रव्य संपादन केलें होतें त्यावर मजामारीत ते खुशाल थाटानें राहूं लागले.

इकडे पुरोहितबुवांनीं आपल्या घरांतला पैसानपैसा देऊन टाकला होता हें वर सांगितलेंच आहे. लौकरच त्यांना कांहीं रकमेची गरज लागली. तेव्हां आपल्या मतें मोठ्या युक्तीनें संपादन केलेल्या त्या जवाहिरांतून एक रत्नखचित कडें घेऊन पुरोहितबुवा तें विकण्याकरतां सराफाच्या येथें गेले. सराफ पुरोहितबुवांसारखा वेडा नव्हता. रत्नांची परीक्षा करणें हा त्याचा धंदाच होता. तें कडें त्याच्या हातांत देतांच त्यानें इकडेतिकडे निरखून पाहून तत्काल—"हें खोटें आहे" असें सांगितलें. जरी त्यावरचीं रत्नें खोटीं होतीं तरी कारागिरानें तें फारच उत्तम प्रकारें घडलें होतें. यामुळें चांगल्या परीक्षकावांचून तें खोटें आहे असें सहसा कळत नव्हतें. सराफ कारागिराच्या कौशल्याची तारीफ करून हंसत हंसत पुरोहितबुवांला ह्मणाला, "अहो महाराज, हें आपल्याला कोणीं दिलें? हें तर अगदीं खोटें आहे. कांचेच्या आणि स्फटिकाच्या तुकड्यांला नानाप्रकारचे रंग देऊन त्यांचें कोंदण केलें आहे. ह्या कड्यावरचे खडेच केवळ खोटे आहेत असें नाहीं; तर हें सोन्याचें दिसतें आहे हें देखील खोटें आहे. हें कडें पितळेचें असून वर मोठ्या सफाईनें मुलामा चढविला आहे. बरें; पण खरोखरच हें आपण विकत घेतलें का? तसें असेल तर कोणी लबाडानें आपल्याला अगदीं ठकविलें आहे यांत कांहीं संशय नाहीं!"

प्रियवाचकहो, हें त्या सराफाचें भाषण ऐकून त्या धनलोभी पुरोहिताची काय अवस्था झाली असेल याचें तुह्मींच अनुमान करा. सराफानें खोटें ह्मणून सांगतांच, पुरोहिताचा खरकन् एकदम चेहरा उतरून गेला. त्याच्या डोळ्यांपुढें अंधारी आली, व "सर्वस्वीं घात झाला!" असें ह्मणून तो तत्काल मूर्च्छित झाला. सराफानें त्याला सावध केल्यावर पुढें काय बोलायचें तें त्याला सुचेनासें झालें. तो ह्मणाला, "शेटजी, अंमळ कृपा करा. मी लौकर घराकडे जाऊन येतों." असें सांगून धांवत धांवत तो घरीं गेला; आणि तो सर्व जवाहिराचा डबा घेऊन आला. सराफानें—

कदाचित् आपली नजर चुकेल, ह्मणून आसपासच्या दुसऱ्या कित्येक सराफांला बोलावून आणलें. हां हां ह्मणतां, पुरोहितबुवांला कोणीं ठकविलें अशी बातमी तेथें पसरली, व बरेच सराफ आणि रत्नपारखे, सोनार वगैरे लोक जमा झाले. पुरोहितबुवांनीं जणूं काय आपला अंतरात्माच, असा तो डबा उघडून त्यांच्यापुढें ठेविला ! तेव्हां एक एक दागिना घेऊन ते लोक त्याची नीट परीक्षा करूं लागले.

त्यांत खरे काय असणार ? बोलूनचालून त्या भोळ्या ब्राह्मणाला फसविण्याकरतांच ते दागिने तयार केलेले. तेव्हां त्यांत खऱ्याचें नांव तरी कोठून असणार ? सराफ एक एक दागिना काढून पाहत होते तेव्हां बिचारा तो लोभी ब्राह्मण आशाभूत होऊन त्यांच्याकडे पाहूं लागला. हा एक खोटा ठरला, पण हा दुसरा तरी खरा ठरेल. तिसरा तरी ठरेल, या प्रमाणें दागिन्यांच्या संख्येप्रमाणें त्याची आशा एक सोडून दुसरा, दुसरा सोडून तिसरा, अशी मुक्काम करीत चालली होती ! शेवटीं सर्व दागिने निव्वळ खोटे आहेत असें ठरलें. नंतर एक चंद्रहार सराफानें फिरून हातांत घेतला. तेव्हां हा तरी खरा ठरेल, व सर्व रक्कम नाहीं तर नाहीं; पण थोडी तरी रक्कम भरून येईल. अशी आशा धरून पुरोहित तोंड पसरून बसला होता; पण तोही खोटा ठरल्यावरून त्याच्या आशेबरोबरच सराफानें तो खालीं ठेवला. तेव्हां लोभी पुरोहित धाय मोकलून रडूं लागला. द्रव्य गेलें तें गेलें, आणि लोक त्याला मूर्ख ह्मणून हसूं लागले तें निराळेंच. अशाप्रकारची स्थिती झाल्यामुळें जसा विजेच्या पतनानें मोठा वृक्ष धाडकन् खालीं पडतो, त्या प्रमाणें पुरोहितबुवा पतन पावले. कांहीं वेळानें सावध होऊन रागारागानें पुरोहितबुवा आपला जांवई **शिव** याच्या घरीं गेले. आणि "अरे दुष्टा, तूं मला सर्वस्वीं फसविलेंस. हें घे आपलें सर्व जवाहीर आणि तें माझ्यापासून घेतलेलें सर्व द्रव्य मला परत दे," असें ह्मणाले.

रागानें लाल झालेला, व ज्याचे ओंठ स्फुरण पावताहेत, सर्वांगांत

कांपरें सुटलें आहे, अशा त्या **शंकरस्वामीचें** भाषण ऐकून तो महा-धूर्त **शिव** पोट धरून हंसूं लागला. तो ह्मणाला, "अहो, काय ह्मणतां? तें तुमचें द्रव्य तुमच्यासारखें आह्मीं घरांत सांठवून ठेविलें आहे का? तुमच्यासारख्या कृपणाजवळ तें राहायचें! पण आह्मांला तें घेऊन; काय करायचें आहे. इतक्या दिवसांत तें पार खर्चून गेलें. आतां कोठलें मागतां?"

हें त्याचें उत्तर ऐकून **शंकरस्वामीला** फारच राग आला, आणि दोघांचें भांडण हमरीतुमरीवर आलें. पुरोहितबुवा वरचेवर—माझें द्रव्य दे, ह्मणत—व तो ठग—खर्च झालें, ह्मणे. याप्रमाणें दोघेही भांडतां भांडतां थकले. **माधव** जवळच खुशाल ही मौज पहात बसला होता. नंतर आपसांत हा वाद तुटेनासा झाला, तेव्हां दोघेही राजाजवळ फिर्यादीस गेले. **माधवही** बरोबर गेला. पुरोहितबुवा राजाला ह्मणाले, "या लबाडानें (**शिवानें**) काच आणि स्फटिक यांचे तुकडे चांगले रंग-वून पितळेंत त्यांचें कोंदण करून सर्व खोटें जवाहीर करून मला दिलें आणि माझें सर्व द्रव्य नेलें. मला त्याची कांहीं परीक्षा नाहीं, असें पाहून या दुष्टानें माझें सर्वस्व गिळंकृत केलें. तर आतां आपण चौकशीं करून तें माझें द्रव्य मला परत देववावें."

याप्रमाणें पुरोहितबुवांची हकिकत सांगून झाली. तेव्हां राजानें **शिवाला** विचारलें; तेव्हां तो ह्मणाला, "महाराज, मी काय सांगूं. या ब्राह्मणानें मला मोठ्या दुःखांत घातलें. मी अगदीं लहानपणापा-सून तापस अथवा गोसावी झालों होतों. ह्याच शहारांत मी आज कित्येक दिवसपर्यंत नदीकिनाऱ्यावर झोंपडींत राहत होतों, हें सर्व-लोकांना माहित आहे. एकेदिवशीं यानें माझ्याजवळ येऊन, जवा-हिराचें दान घेण्याविषयीं मला इतका आग्रह केला कीं, शेवटीं मी निरुपायास्तव, याच्या भिडेला गुंतून तें दान घेण्याचें कबूल केलें. दान घेण्यापूर्वी याला असें सांगितलें कीं, मला रत्नादिकांची कांहीं परीक्षा

नाहीं. तुह्मी येवढें मोठें दान मिळतें आहे ह्मणून सांगतां ; तर त्याचा काय तो नीट विचार करा. मी केवळ तुमच्या भरंवशावर दान घेण्यास तयार झालों आहें. यावर या गृहस्थानें सांगितलें कीं,—तुला काय त्याची काळजी ? मला सारें माहित आहे. मी लावायची तशी व्यवस्था लावतों. असें याणें सांगितल्यावरून मीं तें दान घेतलें. सरकार, मी शपथपूर्वक सांगतों कीं केवळ त्या दानाचें उदक मात्र मी हातावर घेतलें. आंतल्या वस्तूला बोट देखील लावलें नाहीं. व तें सर्व तेव्हांच्या तेव्हांच मी याच्या हवालीं केलें. याणें तें आपल्याजवळ बहुतदिवस ठेवलें. व शेवटीं मीं दुसरें बिऱ्हाड करूं लागलों तेव्हां त्याच्या किंमतीबद्दल ह्मणून मला कांहीं द्रव्य देऊन याणेंच तें सर्व जवाहीर विकत घेतलें. आतां यांत माझा कांहीं अपराध आहे किंवा काय याचा महाराजांनींच विचार करावा. बोलूनचालून मी अगदीं गैरमाहित; याणें दान घे ह्मटलें. ह्मणून मीं घेतलें. व याणें मला त्याची जी किंमत स्वसंतोषानें दिली ती घेतली. आणि आतां जर तें जवाहीर खोटें निघालें तर त्याला मीं काय करावें ? व त्यांत माझा काय अपराध ? याची आणि माझी जी देवघेव झाली तिच्या खरेपणाबद्दल उभयतांजवळही दस्तऐवज आहेत. तेव्हां आतां सरकारांनींच काय तो न्याय करावा. मी तर बोलून चालून परदेशी आहें. माझा कोणी साहाय्यकारी नाहीं. काय तो आपण कराल तरच माझा बचाव होणार आहे !" असें बोलून **शिवानें** पुरोहितबुवांनीं जो त्याला कागद लिहून दिला होता तो राजाच्या पुढें ठेवून तो हात जोडून पुढें उभा राहिला.

बिचाऱ्या पुरोहितानें सांगितलेली हकीकत अगदीं खरी होती, आणि त्या धूर्त **शिवानें** जी हकीकत सांगितली तींत कपट होतें ; तरी त्याचें ह्मणणें कायदेशीर होतें. राजानें व त्याच्या मंत्र्यांनीं दोघांच्याही बोलण्याचा नीट विचार केला. केवळ तोंडची हकीकत राजाला खरी वाटली नसती ; पण पुरोहिताच्या हातचा दस्तऐवज पाहून त्याला त्यावर

कांहीं शंका घेण्यास जागा राहिली नव्हती. तथापि राजानें हें दान कोणीं दिलें त्याला आणा असें सांगितलें.

दान देणारा **माधवच** होता. व तो राजाचा सरदार असून राजा त्याला चांगल्याप्रकारें मानीत होता. "दान देणाराला आणा" असें सांगतांच **माधव** हात जोडून पुढें येऊन उभा राहिला. तेव्हां **शिव** त्याला ह्मणाला, "भल्या गृहस्था, असें खोटें जवाहीर देऊन उगीच आह्मांला कां फसविलेंस ?"

हें ऐकून **माधव** ह्मणाला, "यांत माझाहो काय अपराध" ? पुरोहितबुवाला ह्मणाला, "तुमचें किंवा या **शिवाचें** मीं कांहीं घेतलें आहे का ? मी कांहीं तुमचें देणें लागत असलों तर सांगा. हें जवाहीर आमच्या वाडवडिलांनीं संपादन केलेलें असून तें फार दिवस दुसऱ्याजवळ ठेवणीस ठेवलेलें होतें. मी जेव्हां देशांतरीं निघालों तेव्हां तें त्यांच्याकडून मागून घेऊन, बरोबर आणलें. आमच्याजवळ दुसरें बरेंच द्रव्य होतें. त्यामुळें त्याचा खर्च करण्याचें कांहीं कारण पडलें नाहीं. अर्थात् तें तसेंच बरोबर होतें. मीं अगदीं मरणास टेंकलों होतों, तेव्हां आपल्या आरोग्याकरितां मीं तें ब्राह्मणाला दान केलें. जर ते माझे दागिने खऱ्या सोन्याचे नाहींत; व त्यांतलीं रत्नेंही खोटीं आहेत, तर खुशाल असेनात बापडीं. पितळ, स्फटिक, आणि कांच यांचेंच मीं दान केलें असें कां होईना ! त्यांत तुमचें काय गेलें ? त्या दानाच्या योगानें मला जें फल प्राप्त व्हायचें तें तर झालेंच. मी अगदीं निष्कपटपणानें तें दान केलें, व त्याप्रमाणें त्याचा मला प्रत्ययही आला. मला जो अत्यंत दुस्तर रोग झाला होता त्यांतून मी कसा पार पडलों हें तर उघडच आहे. तेव्हां दिलेलें जवाहीर खरें किंवा खोटें, याची आतां चौकशी कशाला पाहिजे? जें काय माझ्याजवळ होतें तें मी ईश्वरार्पण केलें. तुह्मांला खरें वाटलें तर तें खरें ह्मणा; नाहींतर खोटें ह्मणा. मला आतां त्याविषयीं पंचाईत कशाला पाहिजे ?"

यापमाणें मूळापासून सर्व हकीकत खोटी सांगत होता तरी तो महाठग **माधव**, याच्या चेहऱ्यांत कांहीं फरक पडला नाहीं ! त्याची जीभ मुळींच अडखळली नाहीं. जणूं काय, खरोखर झालेलीच हकीकत सांगावी त्याप्रमाणें उंसून राजासमक्ष त्याणें सर्व वर्तमान कळविलें ! तेव्हां तें ऐकून खरोखर तो बिचारा पुरोहित अगदीं मूर्ख ठरला. राजा व त्याचे प्रधान यांला पुरोहिताचें हंसूं आलें. त्यासभेंत बसलेल्यापैकीं, त्या उभयता ठगांनीं पुरोहिताला फसविलें नसेल असें कोणालाच वाटलें नाहीं; तरी त्यांणीं सांगितलेली हकीकत संगतवार व कायदेशीर असल्यावरून राजा व इतर कामदारलोक त्यांच्यावर खुष झाले.

राजा पुरोहिताला ह्मणाला, "तुह्मी सांगतां तें खरें असेल; पण या **माधवाचा** किंवा **शिवाचा** यांत कांहीं अन्याय आहे असें दिसत नाहीं. तेव्हां आमच्यानें त्याला कांहींच शिक्षा करवत नाहीं." राजानें असे सांगितलें तेव्हां पुरोहिताची त्यावेळीं एखाद्या पिशाचासारखी अवस्था झाली त्याची ती मुद्रा पाहून सर्व मंडळी गालांतल्या गालांत हंसू लागली. त्याच्या मूर्खपणाचें सर्वांला मोठें आश्चर्य वाटलें.

याप्रमाणें तो पुरोहित **शंकरस्वामी**—ज्याचें दुर्दैवानें सर्वस्व हरण केलें असून, लोकांच्या उपहासानें ज्याला अधिक संताप आला आहे; असा—मुकाट्यानें आपल्या घरीं निघून गेला. उघडच आहे; अतिशय लोभानें अंध होणें; हें कोणकोणत्या आपत्ति प्राप्त करून देण्याला हेतू होत नाहीं ! अर्थात् त्यापासून सर्व आपत्ति प्राप्त होतात.

याप्रमाणें त्या लोभी **शंकरस्वामीचें** सर्वस्व हरण करून व त्याची मुलगीही उपटून कृतार्थ झालेले, व, राजाजवळ केलेल्या फिर्यादींत ज्यांला जय मिळाला आहे, व त्यामुळेंच राजाची बहाल मर्जी होऊन त्याणें ज्यांला आश्रय दिला आहे, असे ते उभयता ठग बहुत दिवस मोठ्या आनंदानें तेथें राहते झाले."

अशी कथा सांगून **कनकरेखा** बापाला ह्मणाली, "बाबा, याप्रमाणें

लबाड लोक शेंकडो प्रकारचे असत्य शब्दरूपी तंतु आपल्या जिभेंतून बाहेर काढून, त्यांचें एक जाळें बनवितात. आणि जसें कोळीलोक जाळें तयार करून त्यांत गरीब माशांला धरून मारतात, त्याप्रमाणें धूर्त लोक आपल्या कपटजालांत दुसऱ्याला गुंतवून सफई बुडवितात. ज्या ब्राह्मणानें ( **शक्तिदेवानें** ) आपण **कनकपुरी** पाहिली असें तुमच्या जवळ सांगितलें त्याणें तें अगदीं खोटें सांगितलें. त्या **शिव माधवा**सारखाच तोही धूर्त खोटें सांगून तुह्मांला फसवून माझें हरण करावें, व यौवराज्य मिळवावें असा प्रयत्न करीत होता ; पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. पण बाबा, तुह्मीं माझ्या लग्नाची इतकी गडबड कशाला करतां ? **कनकपुरी** पाहून आलेला कोणी मिळेपर्यंत मी अशीच कन्याव्रत धारण करून राहतें. आतां पुढें पाहूंया तर खरें, **कनकपुरी** पाहिलेला कोणी मिळतो किंवा नाहीं तो."

मुलीचें हें भाषण ऐकून राजा **परोपकारी** तिला ह्मणाला ; "बाळे, तूं सांगतेस तें मलादेखील मान्य आहे ; पण लोकापवादाचें मला फार भय वाटतें. सांप्रत तूं तारुण्याच्या अगदीं बहरांत आहेस. अशा वयांत फार दिवस अविवाहित राहणें हें चांगलें नव्हे. माझी खात्री आहे कीं, तुझा वांकडा पाय पडायचा नाहीं; पण लोकांची तशी खात्री कोठून असेल ? सामान्यतः लोकांचा स्वभावच असा आहे कीं; ते गुणांचा मत्सर करितात. कितीही सज्जन असले तरी गुणांविषयीं ते दुर्जनच बनतात. तेव्हां तुझ्या संबंधानें लोक काय काय ह्मणतील हें माझ्यानें सांगवत नाहीं. एखाद्या कोनाकोपऱ्यांतल्या मनुष्याच्या वर्तनावर कोणी टीका करीत नाहीं ; पण जे मोठे व प्रतिष्ठित असतात त्यांच्या बारीक सारिक गोष्टीवर देखील लोक भलभलत्या प्रकारची टीका करतात. मोठ्या मनुष्याला कोणत्याही रितीनें कलंक लावावा हा लोकांचा साधारणतःस्वभावच झाला आहे. या संबंधानें मला एक कथा आठवली ती तुला सांगतों.

पूर्वी, **गंगे**च्या कांठीं **कुसुमपुर** नांवाचें जें प्रसिद्ध नगर आहे तेथें **हरस्वामी** नांवाचा एक तपस्वी ब्राह्मण राहत होता. त्यानें पुष्कळ तीर्थें व क्षेत्रें पाहिलीं होतीं. फिरतां फिरतां तो सहज **कुसुमपुरांत** प्राप्त झाला. तो **गंगा**किनारा असून स्थल रमणीय वाटल्यावरून **हरस्वामि**च्या मनांत कांहीं दिवस तेथें रहावें असें आलें. त्याच्यापासून कोणालाच कांहीं उपद्रव नव्हता. तो सारा दिवस तप करण्यांत घालवीत असे. दोनप्रहरची वेळ झाली; ह्मणजे मोजक्या पांचच ब्राह्मणांच्या घरांत भिक्षेला जाई, व तेथें जें मिळेल तेवढ्यावर तो आपला निर्वाह करीत असे. त्यानें **गंगे**च्या कांठीं एक पर्णकुटी केली होती. व तेथें ईश्वराचें आराधन करीत आनंदानें तो रहात होता. तो मोठा तपस्वी होता. त्या संबंधानें अर्थात् लोकांत त्याची मानमान्यता विशेष झाली. आपली प्रतिष्ठा वाढवून त्यापासून कांहीं लाभ करून घ्यावा किंवा दुसरें कांहीं करावें; असें त्याच्या मनांतदेखील नव्हतें. तो आपलें कर्तव्य करीत होता; व लोक त्याला मान देत होते. कोणी बरें ह्मटलें किंवा वाईट ह्मटलें तरी तो त्याच्याविषयीं हर्ष किंवा विषाद दोन्हीही बाळगीत नव्हता.

**हरस्वामी**ची वर जी स्थिती सांगितली तीवरून त्याच्याविषयीं कोणाला ईर्षा किंवा द्वेष उत्पन्न होण्याचें कांही तरी कारण होतें का? तथापि लोकांनीं त्याच्यावर भलताच आरोप आणला? ऐकेदिवशीं **गंगे**वर पुष्कळसे लोक स्नान करीत होते. त्यांत ब्राह्मणांच्या घाटावर ब्राह्मण; क्षत्रियांच्या घाटावर क्षत्रिय; असे आपापल्या नियमित ठिकाणीं लोकांचीं स्नानें चाललीं होतीं. त्यांत तो बिचारा **हरस्वामी**ही स्नानाला आला होता. कोणी आपल्याला नमस्कार केला किंवा न केला तरी त्या दोहोंकडेही लक्ष न देतां तो मुकाट्यानें स्नान करून जाऊं लागला. तें त्याचें वर्तन तेथल्या एका ब्राह्मणाला असह्य झालें. **हरस्वामी**च्या अंगीं लावण्यासारखा कांहींच दोष नव्हता; तरी त्या

कुभांड्या ब्राह्मणानें चमत्कारीक कांहीं गप्प उठविली. तो आपल्या जवळच्या दुसऱ्या ब्राह्मणांला ह्मणाला, "अहो **रामभटजी**, अहो **शामभटजी**, हें प्रकरण ( **हरस्वामी** ) कसें काय आहे तें तुह्मांला समजलें आहे का? बाहेरून हा साधुत्वाचा डौल आहे; पण गुप्तकृत्यें फार भयंकर आहेत. तीं तुम्हांला कदाचित् समजलीं नसतील. हे बुवा पक्के ढोंगी आहेत. अहो, हा जें क्रूर कर्म करतो; त्याचें वर्णन देखील करवत नाहीं. या चांडाळानें या नगरांतील आजपर्यंत शेंकडों मुलें मारून खाल्लीं असतील! हा मोठा चेटकी आहे. मुलें मारायचीं हा एक याचा नित्यनेमच आहे."

त्या दुष्ट ब्राम्हणानें हा जो केवळ खोटा आरोप **हरस्वामी**वर घेतला त्याबद्दल दुसऱ्या लोकांनीं मुळींच कांहीं विचार केला नाहीं. तो ज्यांच्या जवळ बोलला त्यांणीं ती गोष्ट दुसऱ्याला सांगितली. त्यांणीं तिसऱ्याला सांगितली. याप्रमाणें परंपरेनें ती गोष्ट सर्व शहरभर झाली. व **हरस्वामी** लोकांचीं मुलें मारून खातो, असा लोकांचा निश्चय झाला. ज्याच्या ज्याच्या कानावर ती गोष्ट येई तो तो—"हो हो, असें वाटतें खरें. ती स्वारी मोठी ढोंगी दिसते; आणि कांहीं मंत्रसाधन ही करीत असतो असें वाटतें. तेव्हां तसले जादुगीर लोक मुलांबाळांचा फन्ना उडवितात हें अगदीं उघडच आहे,"—असेंह्मणे!

वस्तुतः बिचाऱ्या **हरस्वामीनें** कोणाच्या मुलाला कधीं बोटदेखील लाविलें नसेल; पण ज्या दुष्टानें हा त्याच्यावर आरोप आणला त्याच्या दुष्कृत्याचा इतका परिणाम झाला कीं; **हरस्वामी** तें भयंकर कृत्य करतो अशी झाडून साऱ्या लोकांची पक्की खातरी झाली? सामान्यतः लोक प्रत्येक गोष्ट विचार करूनच बोलतात असें नाहीं. एखाद्या दुष्टानें जर आपला मुखरस पाघळला तर चांगले चांगले विचारी मनुष्य देखील—खऱ्याखोट्याचा शोध न करतां—तें खरें मानतात! **हरस्वामी**वर असा आरोप आल्यावरून गांवांतले सर्व लोक आपापल्या

पोरांविषयीं फार जपूं लागले. मुलाला घरांतून बाहेर जाऊं देणें हें त्या शहरांत अगदीं बंद झालें. बायका आणि पुरुष सर्वेही—हा चांडाळ लोकांची पोरें मारून खातो; असे त्याच्यावर अभिश्राप घालूं लागले.

याप्रमाणें सर्व मंडळी खोट्या समजुतीनें भयभीत झाल्यामुळें ज्याला त्याला आपल्या संततीचा क्षय होईल याची विलक्षण फिकर लागली. तेव्हां गांवांतले सर्व लोक एके ठिकाणीं जमून आतां याविषयीं काय उपाय करावा याचा विचार करूं लागले! शेवटीं **हरस्वामी**ला येथून काढून लावावा, असा त्यांचा निश्चय ठरला. तरी पण हें काम करावें कोणीं? व कसें करावें? याविषयीं मोठी शंका उत्पन्न झाली. कारण, **हरस्वामी** हा मोठा तपस्वी असून कदाचित् आपण त्याच्यावर हल्ला केला आणि त्याला राग आला तर तो आपल्याला जाळून भस्म करील, याची त्यांना भीती वाटली. तेव्हां सर्वांनीं असा ठराव केला कीं, कोणातरी एका मनुष्याला त्याच्याकडे पाठवून हा आपणां सर्वांचा ठराव त्याला कळवावा. तितक्यावर तो बहुतकरून गेल्याशिवाय राहणार नाहीं. तेवढ्यावरून नच गेला, तर मग दुसरा कांहीं तरी उपाय करतां येईल!

याप्रमाणें नगरवासी लोकांचा निश्चय ठरला. व त्याप्रमाणें त्यांणीं एका चतुर व शांत मनुष्याला तें काम सांगितलें. **हरस्वामी**ला लोकांच्या उठाठेवींची मुळींच जरूर नव्हती. यामुळें त्याचा कोणाशीं कांहींच संबंध नव्हता. अर्थात् गांवांतल्या लोकांची आपल्याविषयीं अशी विलक्षण समजूत झाली आहे ही गोष्ट त्याच्या ध्यानीं मनींदेखील नव्हती. उघडच आहे; ज्या गोष्टीचा आपल्या अंगीं कांहीं लवलेशदेखिल नाहीं, तिच्याबद्दल त्याच्या मनांत संशय तरी येणार कशास? असो. तो आपल्या पर्णकुटींत ईश्वरपूजन करीत असतां शहरांतील लोकांनीं पाठविलेला दूत तेथें येऊन पोंचला. त्याणें **हरस्वामी**ला साष्टांग नमस्कार घातला व प्रथम त्याच्याकडून अभय मागून घेतलें.

**हरस्वामीनें**—"खुशाल तुला जें कांहीं सांगायचें असेल तें सांग" अशी आज्ञा केल्यावरून तो गृहस्थ विनयपूर्वक ह्मणाला, "महाराज, दुर्दैवानें माझ्यावर अशी पाळी आली, याचें मला फार वाईट वाटतें. मी जें पुढें बोलणार त्याबद्दल मजवर आपण क्षमा करा. या गांवांतील सर्व लोकांची आपल्याविषयीं कांहीं निराळी समजूत झाली आहे. कांहीं विलक्षण कारणांमुळें लोकांचें मन आपल्याविषयीं फारच दूषित झालें आहे. त्यांच्या मनांत आपण येथें रहावें असें नाहीं. वस्तुतः आपल्यासारख्यांचें येथें लोकांना दर्शन होतें हा त्यांचा भाग्योदय आहे, तथापि —कांहीं विलक्षण समजूत झाल्यामुळें—दुर्दैवी लोकांला त्याचा लाभ नकोसा झाला आहे? आपल्यासारख्या निरपेक्षाला येथेंच राहून काय करायचें आहे? कोठेंही राहिलें तरी आपल्याला सारखेंच आहे. तेव्हां लोकांच्या इच्छेच्या आड आपण तरी कशाला याल!"

आपण येथून जावें असें नगरवासी जनांच्या मनांत आलें याबद्दल **हरस्वामी**ला मुळींच कांहीं विषाद वाटला नाहीं. तरी आपल्या पासून त्यांना कांहीं तरी उपसर्ग झाला असावा; ह्मणूनच त्यांणीं असा निरोप पाठविला. तेव्हां लोकांला उपद्रव होईल अशा प्रकरचा जर आपल्या अंगीं कांहीं वाईट गुण असला तर तो अवश्य काढून टाकला पाहिजे. ह्मणून **हरस्वामी** तो दोष समजून घेण्या करितां त्या गृहस्थाला ह्मणाला, "अहो, तुह्मीं सांगितल्याप्रमाणें जाण्याविषयीं माझी कांहीं हरकत नाहीं. लोकांला असंतुष्ट करून येथें राहण्यापासून मला तरी काय साधायचें आहे? तरी पण लोक मला कां जा ह्मणतात! तें समजून घेण्याची इच्छा आहे. माझ्यापासून त्यांना कोणता उपसर्ग वाटतो तें मला कळलें पाहिजे, ह्मणजे त्याचा बंदोबस्त करण्यास ठीक पडले."

त्या गृहस्थाला, लोकांनीं जो अपवाद त्याच्यावर ठेविला होता तो सांगण्याचें खरोखर मोठें संकट वाटलें. **हरस्वामी**विषयीं कोणाला वि-

शेष माहिती नसली तरी, त्या तपोधनाला पाहिला ह्मणजेच याच्या हातून तसें घोर कृत्य व्हायचें नाहीं, ही गोष्ट सहज लक्षांत येण्यासारखी होती. तो गृहस्थ म्हणाला, "दुर्दैवानें माझ्यावर जो प्रसंग आला आहे त्याप्रमाणें मला सांगितलेंच पाहिजे. तथापि खरोखर लोक मोठे अविचारी आहेत; व त्यांची भलतीच समजूत झाली आहे असें वाटतें. त्यांणीं असा ग्रह घेतला आहे कीं, आपण लोकांचीं मुलें मारून खात असतां! शिव शिव!! हे शब्द माझ्या तोंडातून मला उच्चारवतदेखील नाहींत. मग त्यांच्या खरेपणाविषयीं विचार कशाला करायला पाहिजे? तें कसेंही असो; पण एकंदरींत नगरवासी जनांची अशी विलक्षण समजूत झाली आहे; ह्मणून ते आपल्याला जा ह्मणतात."

हें ऐकून त्या सत्पुरुषाला फारच आश्चर्य वाटलें. लोकांचा इतका अडाणीपणा आहे, याचा त्याला मोठा अचंबा वाटला. त्याणें निरोप घेऊन आलेल्या मनुष्याला, "आपण निघून जातों. तुह्मीं कांहीं काळजी करूं नका," असें सर्वांना कळविण्यास सांगून त्याला निरोप दिला. इतरांप्रमाणें निरोप सांगायला गेलेल्या गृहस्थाची देखील, पूर्वीं विपरीत समजूत होती; पण त्याणें प्रथम जेव्हां त्याला पाहिलें तेव्हांच त्याचा भ्रम दूर झाला.

नगरवासी जन असंतुष्ट आहेत. तर आपल्याला तरी येथें राहून काय करायचें आहे! दुसरीकडे कोठेंतरी जावें. असा **हरस्वामी**नें निश्चय केला. तरी या अज्ञान लोकांची जी गैरसमजुत झाली आहे; ती घालवून मग जावें हें बरें; असें त्याला वाटलें. ह्मणून तो शहरांत ब्राह्मण लोकांची जेथें विशेष वस्ती होती तेथें गेला. लोक त्याला एक राक्षसच समजत होते! तरी त्याच्या उग्रतपाच्या तेजामुळें त्याच्या अंगावर चालून जाण्याचें कोणाचें धैर्य होत नव्हतें. **हरस्वामी** गांवांत आला; तेव्हां त्याला पाहून—"आला रे आला" ह्मणून लोक भयाभीत होऊन जिकडे तिकडे दडूं लागले. कोणी आपल्या गच्चीवर बसले;

कोणी दारें लावलीं, कोणी झाडावर चढले, अशी जिकडे तिकडे फाटाफूट झाली ! उघडच आहे; खोट्या बातमीनें मोहित झालेल्या मनुष्यांला विचार कोठून सुचणार ? आपल्याला पाहून लोक पळाले याचें **हरस्वामी**ला मोठें आश्चर्य वाटलें. तो खालीं रस्त्यांत उभा राहून घराच्या अगाशीवर चढलेल्या ब्राह्मणांला ह्मणाला,—"अहो **रामभटजी**, अहो **नारायण**भटजी, अहो **शाम**भटजी, असे दडूं नका. मी काय सांगतों तें ऐका. आतां मी येथें आलों तो इतक्यांतच कोणाला खाऊन टाकतों असें नाहीं. आणि तुह्मी तर हजारों लोक आहां. मी मोठा प्रबळ झालों तरी तुह्मां सर्वांला एकदम खाण्याचें माझें सामर्थ्य होणार नाहीं. तेव्हां उगीच असे भितां कां ?"

हें ऐकून ब्राह्मणांला अंमळ धीर आला. तेव्हां **हरस्वामी** पुन्हां ह्मणाला, "अहो, पण हें तुमचें कोण अज्ञान? आणि ही काय वेडी समजूत? मी पोरें खातों असें तुह्मांला समजलें, तर तुह्मीं त्याविषयीं विशेष शोध करायचा सोडून असें वेड्यासारखें खूळ काय पांघरलें आहे ! अहो, तुह्मीं असें करा कीं; येथें जेवढीं तुमचीं घरें आहेत त्या प्रत्येक घरांत मुलें होतीं किती; आणि त्यांतली नाहींशीं झालीं किती? याचा तपास करा, ह्मणजे तुह्माला आपोआप समजून येईल. मी एक आपला पोरें खाणारा राक्षस आहें, असें तुह्मी समजत असाल तर खुशाल समजा; पण कोणाच्या घरांतलीं किती पोरें, कधीं खाल्लीं, हें दाखवून द्या, ह्मणजे मी कबूल करतों. उगीच एकानें ह्मटलें ह्मणून दुसरा ह्मणतो; दुसऱ्यानें ह्मटलें ह्मणून तिसरा ह्मणतो अशा ऐकींव गोष्टींवर भरंवसा ठेवून भ्रमांत पडूं नका." ०

**हरस्वामि**चें हें शांत व पोक्त विचाराचें भाषण ऐकून त्या ब्राह्मणांपैकीं कांहीं लोकांला तें खरें वाटलें. त्यांणीं लगेच आपआपसांत चौकशी केली. आणि पाहिलें तों खरोखरच कोणाच्याही घरचीं पोरें नाहींशीं झालेलीं नाहींत ! सर्वांचीं मुलें जीवंत आहेत. याप्रमाणें

ब्राह्मणांच्या आळींत तर कोणाचें मूल नाहींसें झाल्याचें आढळलें नाहीं. तेव्हां अनुक्रमानें इतरलोकांच्या वस्तींत जाऊन त्यांणीं चौकशी केली. तों तेथेंही कोणाचें मूल कधीं नाहींसें झालें नाहीं; असें समजलें. तेव्हां **हरस्वामी**वर हा खोटा आरोप करण्याच्या कामांत प्रमुख कायते ब्राह्मणच होते, त्यांला मोठा पश्चाताप झाला. ते ह्मणाले, "अरेरे! आह्मी मुर्खांनीं या सत्पुरुषावर विनाकारण दोषारोप केला. सर्वांचीं मुलें जीवंत आहेत. ज्या कोणाचीं मुलें मेलीं तीं रोगादिकांनीं मृत्यु येऊन मेलीं. या महापुरुषाकडे त्याचा कांहींच दोष नाहीं. तेव्हां यानें पोरें खाल्लीं अशी जी बातमी उठली आहे; ती अगदी खोटी आहे. खाल्लीं असतीं तर कांहीं पोरें नाहींशीं झालीं पाहिजे होतीं कीं नाहीं; पण तसें मुळींच कांहीं आढळत नाहीं. तेव्हां एकंदरींत आह्मी लोकप्रवादावर भरंवसा ठेवून; विनाकारण या साधुपुरुषाला दूषणें दिलीं ही गोष्ट चांगली केली नाहीं."

याप्रमाणें सर्व ब्राह्मणांला आपल्या मूर्खपणाचा मोठा पश्चात्ताप झाला व ते **हरस्वामी**ला कसा प्रसन्न करून घ्यावा; याविषयीं विचार करूं लागले. इकडे **हरस्वामी**ला आपल्यावरचा आरोप खोटा आहे, एवढेंच सर्वांच्या प्रत्ययाला आणून दाखवायचें होतें. तें काम झालें, तेव्हां तो तेथून दुसरीकडे जाण्यास निघाला. त्याचें बिऱ्हाड तें कसलें; बसायचें कृष्णाजिन होतें, तें काखेस मारलें. तुंबा हातांत घेतला आणि स्वारी निघाली. जरी त्याच्यावरचा आरोप खोटा आहे असें उघड झालें होतें; तरी **हरस्वामी**चें मन, त्या दुर्जनांनीं जी वाईट अफवा उठविली ती ऐकून अगदीं उदास झालें होतें. तो अशा अविचारी लोकांचा जेथें समाज आहे तेथें क्षणभरदेखिल राहूं नये, असा विचार करून जाण्यास निघाला. उघडच आहे; ज्या ठिकाणीं अविवेकीलोकांचा बाजार पिकला असेल; त्या ठिकाणीं विचारी मनुष्याला रहावें असें कसें वाटेल!

**हरस्वामी** जाण्यास निघाला ही गोष्ट सर्वांला वाईट वाटली. तश

सत्पुर्षाचें दर्शनें तरी कोठून होणार ! कांहीं आपला भाग्योदय झाला ह्मणून या महात्म्याचें येथें वास्तव्य झालें. तेव्हां आज तो जातो व केवळ आपल्या अपराधानेंच त्याचें जाणें होत आहे, हें पाहून ब्राह्मणांला फारच वाईट वाटलें. पण ते अपराधी होते ; ह्मणून त्या तपोनिधीच्या पुढें जाऊन—आपण रहा, असें सांगण्याची त्यांला छाती झाली नाहीं. त्यांणीं शेटसावकार वाणी उदमी वगैरे लोकांना पुढें करून त्यांच्याकडून **हरस्वामी**ला आग्रह करायला लावला. व नंतर प्रमुख प्रमुख ब्राह्मणही पायांपडून त्याची क्षमा मागूं लागले. याप्रमाणें सर्व लोक विशेष प्रार्थना करूं लागल्यावरून **हरस्वामी**नें दुसरीकडे जाण्याचा विचार रहित केला."

अशी कथा सांगून राजा **परोपकारी कनकरेखे**ला ह्मणाला, "मुली, याप्रमाणें दुसऱ्याचें सद्वर्तन पाहून, विनाकारण त्याच्याविषयीं द्वेष धरून भलभलतें बडबडणारे लोक खोटेंच कांहीं तरी दूषण देतात. व बहुतकरून दुर्जनांनीं सत्पुरुषांला अशीं दूषणें द्यायचीं, ही एक जगाची वहिवाटच आहे. मुळींच कांहीं दोष नसतां जर लोक असें करतात; तर थोडेसें छिद्र त्यांना सांपडल्यावर ते काय करतील याचा काय नेम ? आधींच त्यांचा द्वेषाग्नी पेटलेला असतो, त्यांत निमित्तरूपी तूप पडलें ह्मणजे भडका उडायला कांहीं वेळ लागत नाहीं. याकरतां मी तुला असें ह्मणतों कीं, तुझ्या संबंधानें माझ्या हृदयांत हें काळजीचें एक शल्य आहे. तूं सद्वर्त्तनानें वागशील अशी माझी खात्री आहे; तरी दुर्जनांपुढें इलाज चालणार नाहीं. तशांतून न जाणों; मनुष्य आहे. कदाचित् वांकडें पाऊल पडलें ; तर खरोखर मोठा अनर्थ होईल. तेव्हां माझ्या हृदयांतलें हें शल्य काढून टाकावें, असें जर तुझ्या मनांत असेल तर अशा या भरतारुण्यांत स्वेच्छेनें फार दिवस अविवाहितस्थितींत राहूं नकोस. जेथें दुर्जनांचा वाईट प्रवाद सहज प्राप्त होण्यासारखा आहे ; असें हें तुझें कन्यात्व मला फार वाईट वाटतें."

राजा **परोपकारी** याणें याप्रमाणें मुलीला सांगितलें ; तरी तिचा निश्चय ढळला नाहीं. ती राजकन्या **कनकरेखा** पुनः बापाला ह्मणाली, "बाबा, मी माझा हेतू काय आहे तो सांगितलाच आहे. कोणी ब्राह्मणानें अथवा क्षत्रियानें **कनकपुरी** पाहिली असेल तर त्याला मार्में दान करा, असें मी पूर्वींच आपल्याला सांगितलें आहे. तेव्हां आतां तशा मनुष्याचा शोध करा. एरव्हीं मी दुसऱ्या कोणाला मुळींच वरणार नाहीं, हा माझा पक्का निश्चय आहे."

**कनकरेखे**ला पुष्कळ समजावून सांगितलें; तरी ती आपला निश्चय सोडीत नाहीं ; हें पाहून राजा **परोपकारी** याला असें वाटलें कीं, दुसऱ्या कोणत्याही रितीनें हिचा विवाह होण्याची कांहीं योजना होण्या सारखी नाहीं. **कनकपुरी** पाहून आलेल्या मनुष्यावांचून ही दुसऱ्याला वरणार नाहीं, हें आतां अगदीं पक्कें निश्चित ठरलें. मला इतकीं वर्षें झालीं; पण मी **कनकपुरी** हें नांवदेखिल कधीं ऐकलें नाहीं. आमच्या या नगरांतल्या ह्मातार्‍या ह्मातार्‍या लोकांनादेखिल त्या नगरीचें नांव मुळींच ठाऊक नाहीं. अशी हिणें ही नगरी कोठून शोधून काढिली आहे, व ती पाहून आलेल्या मनुष्यावांचून ही दुसऱ्या कोणाल वरण्यास तयार नाहीं. तेव्हां यावरून ही कदाचित् पूर्वजन्मींची कोणीतरी मोठी तपस्विनी असेल. व हिला आपल्या त्या जन्माचें स्मरण होत असेल. तेव्हां एकंदरींत हिच्यावर लग्नाची बळजबरी करण्यां कांहीं अर्थ नाहीं, असा विचार करून राजानें आपला आग्रह सोडला व तिच्या ह्मणण्याप्रमाणें **कनकपुरी** पाहून आलेल्या मनुष्याचा शो करण्याविषयीं त्याणें प्रयत्न चालविला. •

त्या दिवसापासून देवळांत, धर्मशाळांत, नदीच्या पाणवठ्याव जिकडे तिकडे; जो जो कोणी नवा मनुष्य दृष्टी पडेल त्याला—तु **कनकपुरी** पाहिली आहे का? असें विचारावें व जो होय ह्मणेल त्या आपल्या जवळ घेऊन यावें, असा राजानें एकसा सर्वांला हु

दिला. दररोज शहरांत जिकडे तिकडे—"ज्या, ब्राह्मणानें अथवा क्षात्रियानें **कनकपुरी** पाहिली असेल; त्याणें खात्रीपूर्वक तसें सांगावें. ह्मणजे आमचे महाराज त्याला आपली कन्या देऊन यौवराज्य देतील," असें राजानें थाळी पिटवून लोकांना कळविण्याचा क्रम चालू केला. प्रतिदिवशीं याप्रमाणें शिपायी थाळी पिटीत असत; पण एकाही मनुष्यानें—आपण ती नगरी पाहिली किंवा आपल्याला ती ठाऊक आहे असें; कधींच येऊन सांगितलें नाहीं! असो.

इकडे तो तरुण व साहसी ब्राह्मण **शक्तिदेव** राजकन्येनें घरांतून काढून दिल्यामुळें फार दुःखी झाला होता. जरी तो लफंगा होता तरी त्याला आपला अपमान सहन झाला नाहीं. शांत व निरुपद्रवी असून फार विचार करणारे लोक हे बहूतकरून मोठमोठीं अचाट कृत्यें करूं शकत नाहींत. तसलीं कामें करणारे लोक रंगेले, फक्कड, लफंगे, अशापैकींच असतात. कोणतेंही अचाट कृत्य करण्याला मुख्य साहसाची अपेक्षा असते. दूरवर विचार करित बसणाऱ्या मनुष्याच्यानें साहस करवत नाहीं. तो ज्या त्या कृत्याचा परिणाम काय होईल? याचा विचार करित असतो. यद्यपि विचार करणें हा उत्तम गुण आहे; तथापि अशा कामांत तो अगदीं निरुपयोगी आहे, इतकेंच नव्हे; तर केवळ घातक आहे, असें ह्मटलें तरी चालेल. कारण मनुष्याची परिणामावर दृष्टी गेली; ह्मणजे साहस करण्याचें त्याला धैर्य होत नाहीं. किंबहुना तो एखाद्या महत्वाच्या कामाला हात घालण्यास समर्थच होत नाहीं. परिणाम हे नेहमीं निश्चित असत नाहींत. कितीही बुद्धीवान् व परिणामदर्शी मनुष्य असला तरी, अमक्या कृत्याचें अमुकच फल प्राप्त होईल; असा त्याच्यानें निश्चय करवत नाहीं. व कदाचित् केला तर तो तशाच रितीनें पुढें अनुभवास येईल; याचा कांहीं नियम नसतो. तेव्हां एकंदरींत दीर्घ विचार करित बसणारा मनुष्य आपल्या मनाप्रमाणें—या कृत्याचा परिणाम अमुक होणार, असें ठरवितो, व अर्थात् तें आपल्या

हातून होणें शक्य नाहीं किंवा करणें इष्ट नाहीं असें समजून मागें हटतो; पण साहसी मनुष्य त्या गोष्टी मुळींच मनांत आणित नाहीं. साहस करणारा कांहींसा अविचारी व मोठा आवेशी असून दृढनिश्चयाचा मनुष्य असला पाहिजे; ह्मणजे त्याच्या हातून विलक्षण प्रकारचीं अचाट कृत्यें घडतात. तो परिणामावर बिलकूल लक्ष्य पोंहचावित नाहीं; मनांत आलें कीं; तें कृत्य करण्याविषयीं तत्काल प्रवृत्त होतो.

आमच्या या गोष्टीचा नायक **शक्तिदेव** हा वर सांगितल्याप्रकारचा होता. राजकन्या **कनकरेखा** हिणें जो अपमान केला तो त्याला फारच असह्य झाला. तो रागानें दांत ओंठ खावून सुस्कारे सोडून ह्मणाला, "छत, ही गोष्ट मीं कधींहीं सहन करणार नाहीं. **कनकपुरी** पाहिली असें मी खोटेंच सांगितलें; तरी त्या राजकन्येनें माझा असा अपमान करायचा नव्हता. मला ती तर मिळाली नाहींच; पण माझी अप्रतिष्ठा मात्र झाली. तरी काय चिंता आहे! शहाणपणाचा मोठा डौल मिरवणाऱ्या त्या **कनकरेखे**ला मी आपली बायको करून घेईन तरच घेईन. आपल्याला येथेंच राहून काय करायचें आहे? आतां आपण पृथ्वीपर्यटण करायला जावें. ती नगरी दृष्टी पडे पर्यंत एकसारखें देशाटण करीतफिरावें. करतां करतां कोठें ती नगरी आढळली; तर बरें झालें. मग मी त्या डौली **कनकरेखे**चा हटकून भर्ता होईनच; आणि कदाचित् न दृष्टी पडली तर अपमानरूप अग्नीनें होरपळलेले हे माझे प्राण तरी नाहींसे करून टाकीन! ह्या माझ्या अचाट प्रयत्नानें ती **कनकपुरी** दृष्टी पडून पण लावल्याप्रमाणें ती राजकन्या जर मला मिळाली नाहीं; तर वांचून तरी काय करायचें आहे! माझ्यासारख्या मनुष्यानें यःकश्चित् बायकोनें केलेला अपमान सहन करावा; आणि प्राणाची आशा धरून निस्तेज होऊन रहावें; त्यापेक्षां मेलेलें काय वाईट!"

याप्रमाणें त्या साहसी **शक्तिदेवानें कनकपुरी** पाहून राजकन्येला वरण्याची प्रतिज्ञा केली, व कोणाला न विचारतां तो तसाच **वर्ध-**

मान नगरींतून निघाला. त्यानें प्रथम दाक्षिण दिशेचा रस्ता धरला. वाटेंत त्याचे अनेक प्रकारें हाल झाले; तरी विलक्षण आवेश व दृढ निश्चय यांच्या जोरावर त्याणें त्यांचा मुळींच विचार केला नाहीं. मार्गक्रमण करतांकरतां कित्येक दिवसांनीं तो विंध्यपर्वताच्या मोठ्या अरण्यांत प्राप्त झाला. अत्यंत गहन असून मोठी विस्तीर्ण अशी ती झाडी हीच जणूं काय आपली आशा; अशा त्या झाडींत तो प्रवेश करता झाला. उन्हाच्या तापानें पोळलेल्या आपल्या अंगाला, वाऱ्यानें हालविलेल्या तेथील वृक्षांच्या कोंवळ्या पल्लवांच्या शितल हवेनें त्याणें शांत करून घेतलें. त्या जंगलांत असलेले जे भिल्ल, कोळी वगैरे अनेक चोर, त्यांपासून प्राप्त झालेल्या दुःखानें रात्रंदिवस जणूं काय आक्रोशच करीत आहे; अशा सिंह, वाघ, इत्यादि श्वापदांच्या गर्जनेनें नादावलेल्या त्या झाडींत शक्तिदेव परिभ्रमण करूं लागला. त्या जंगलांत जालशय फारच दुर्लभ असल्यामुळें; त्यांतून प्रवास करणाऱ्या शक्तिदेवाला वरचेवर आपत्ति भोगावी लागत होती. तो रात्रंदिवस एकसारखा मार्ग क्रमण करित होता; तरी जणुं, ती झाडी लांबचलांब होत होती. बहुत दिवस त्या अरण्यांतून मार्गक्रमण करित करित शक्तिदेव एकेदिवशीं एका मोठ्या उत्तम—काळेंभोर असून स्वच्छ ज्याचें उदक आहे, अशा—सरोवराच्या कांठीं येऊन पोंचला. प्रफुल्लीत झालेलीं कमलें हीं छत्राप्रमाणें ज्यांत शोभत आहेत; इकडून तिकडे उडणारे सफेत हंस हेच कोणी एक चंवऱ्या आहेत; व या राजचिन्हांनीं तें सरोवर—आपण इतर सर्व जलाशयांचें राजा आहे असेंच सुचवित आहें कीं काय, असें दिसत होतें.

शक्तिदेव बराच थकला होता व चांगला मनोरम जलाशय वाटेंत कोठें न मिळाल्यामुळें त्याला तें सरोवर पाहून फारच आनंद झाला. तेथें अंमळ विश्रांति घेऊन त्याणें स्नान संध्या इत्यादि कर्मे यथासांग आचरण केलीं. नंतर कांहीं तरी खायाला मिळावें अशी त्याची इच्छा होती; पण त्या जंगलांत तें कोठून प्राप्त होणार ?

साहसी पुरुषांला दैव केव्हां केव्हां अनुकूल होत असतें; व दैवानें हात दिला ह्मणजे त्यांच्या हातून मोठमोठीं कार्यें घडत असतात. शक्तिदेव आपल्या गांवांहून कनकपुरीचा शोध करायला निघाला; पण ती नगरी कोणत्या दिशेला आहे; व तिकडे जाण्याचा मार्ग कोणीकडून आहे? याची त्याला कांहींच माहिती नव्हती. उघडच आहे, कनकपुरी नांवाची नगरी जगांत आहे किंवा नाहीं; हेंच जर कोणाला ठाऊक नाहीं; तर ती कोणीकडे आहे; व तेथें जाण्याचा मार्ग कोणता हें कशावरून समजावें! अशा स्थितींत केवळ अविचारानें शक्तिदेव तिचा शोध लावण्यास निघाला होता; पण दैवानें त्याला उत्तम साह्य केलें. शक्तिदेवाला कांहीं तरी खायाला मिळावें अशी इच्छा उत्पन्न झाली; हें वर सांगितलेंच आहे. तो चहूंकडे पाहूं लागला; तों त्या सरोवराच्या उत्तरेकडच्या बाजूला एक मोठा अश्वत्थाचा वृक्ष असून त्याच्या खालीं कोणी तापसीलोक बसले आहेत असें त्याच्या दृष्टीस पडलें.

त्या विंध्यपर्वताच्या अरण्यांत शिरल्यापासून श्वापदें व भिल्ल वगैरे चोरटे लोक, यांवांचून त्याला दुसऱ्या कोणाचेंहीं दर्शन झालें नव्हतें. पिंपळाच्या झाडाखालीं कांहीं गोसावी लोक बसले आहेत; असें पाहून तो मोठ्या आनंदानें त्यांच्या जवळ गेला. तेथें बसलेल्या मंडळींत सूर्यतपा नांवाचा एक मुख्य तपस्वी अश्वत्थाच्या खोडाला टेंकून कृष्णाजिनावर बसला होता. तो तपोनिधी फारच वृद्ध होता. जणूं काय, आपल्या वयाच्या शंभर शंभर वर्षांची एक एक गांठ, अशी त्याणें हातांत रुद्राक्षांची स्मरणी[1] धारण केली होती. जरेनें ज्याचा केंसानकेस सफेत झाला आहे; अशा आपल्या कानावर त्याणें यावेळीं ती स्मरणी टेविली होती. व त्याच्या आसपास दुसरे कित्येक तपस्वी

---

१ नेम निष्ठेत राहणारे लोक आठ, दहा, अकरा, बारा किंवा तेरा मण्यांची एक लहानशी जी माळ हातांत ठेवित असतात, तिला स्मरणी ह्मणतात. त्यांना ज्या मं-

बसले होतें. त्यांच्या कांहीं परमार्थाच्या गोष्टी चालल्या होत्या. जवळ बसलेली मंडळी वरचेवर प्रश्न करीत होती; व तो **सूर्यतपा** त्यांचीं उत्तरें सांगत होता.

यात्रमाणें त्या तपोनिधींचा समुदाय पाहून, **शक्तिदेव** भक्तिपूर्वक मोठ्या नम्रतेनें पुढें गेला आणि त्याणें **सूर्यतप्या**ला साष्टांग नमस्कार घातला, व नंतर जवळ बसलेल्या इतर तापस्यांना यथायोग्य नमस्कार केला. तपस्वीलोक विशेष दयाळू असतात. येवढ्या मोठ्या गहन अरण्यांत **शक्तिदेव** एकटा आला असून, त्याची मुद्राही सचिंत दिसत होती; हें पाहून **सूर्यतप्यानें** त्याला आपल्या जवळ बसवून घेतलें. व तूं कोठून आलास? येथें येण्याचें कारण काय? वगैरे गोष्टी विचारून घेतल्या.

**शक्तिदेवानें** मुळापासून आपली सर्व हकीकत त्या दयाळू तपोनिधीला निवेदन केली. तेव्हां तो फार क्षुधित झालेला आहे; असें पाहून त्या तपस्व्यानें, त्याला आपल्या येथें असलेलीं फळें, मुळें वगैरे खायाला दिलीं. नंतर तो स्वस्थ होऊन परत त्या तपोनिधी जवळ आला तेव्हां त्याणें **शक्तिदेवाला**—"तूं आतां पुढें काय करणार?" ह्मणून विचारिलें.

**शक्तिदेव** त्याला नमस्कार करून ह्मणाला, "महाराज, माझा हेतू काय आहे; तो आपणांस मघां कळविलाच आहे. मी **वर्धमान** नांवाच्या नगराहून येथें आलों आहें; व प्रतिज्ञापूर्वक **कनकपुरी** नां-

---

त्राचा जप करावयाचा असतो त्याची, ती माळ हातांत असली ह्मणजे स्मृति होते. ह्मणून त्या माळेला स्मरणी असें नांव दिलें आहे. तींत मण्यांची संख्या जप करावयाच्या मंत्रातील अक्षरांप्रमाणें असते. कोणी अष्टाक्षरी; कोणी दशाक्षरी; किंवा जितक्या अक्षरांचा जप करावयाचा असतो तितक्या मण्यांची स्मरणी करतात. एकादवेळ जप करायचा नसून दुसरें कांहीं चालत असलें तर त्यावेळीं ती स्मरणी कानावर ठेवण्याची चाल आहे. सूर्यतपा यावेळीं शिष्यमंडळीला कांहीं व्याख्यान करीत होता. ह्मणून त्यानें ती आपल्या हातांतली स्मरणी कानावर ठेविली होती, असें दिसतें.

वाची नगरी पाहून यायचें, असा माझा निश्चय आहे. पण ती नगरी कोणीकडे आहे; हें मला मुळींच माहित नाहीं. जर आपल्याला ठाऊक असेल, आणि कृपा करून सांगाल, तर मजवर मोठा अनुग्रह होईल."

**शक्तिदेवानें** याप्रमाणें अत्यंत नम्रतापूर्वक **सूर्यतप्याला** विनंती केली. तेव्हां तो त्याला ह्मणाला, "बाबा, ह्या आश्रमांत राहूंलागून मला आठशें वर्षें होऊन गेलीं! अनेक तीर्थें, क्षेत्रें वगैरे पाहिलेले तपस्वी लोक पुष्कळ येथें येऊन गेले; पण हावेळपर्यंत मी त्या नगरीचें नांवदेखील कधीं ऐकलें नाहीं. तेव्हां ती कोणीकडे आहे, हें तुला मी काय सांगूं?"

**शक्तिदेवाला** तो तपस्वी आपल्याला कांहीं तरी मार्ग सांगेल, अशी मोठी आशा होती. त्यानें **कनकपुरी** मुळींच ऐकलींदेखील नाहीं, असें सांगितल्यावरून तो अगदीं निराश झाला. तो ह्मणाला, "महाराज, आपल्याला ऐकूनदेखील ठाऊक नाहीं; असें असेल तर मग माझें नशीब ह्मणावयाचें! मी या पृथ्वीवर फिरतां फिरतां विनाकारण मरून जाईन. प्रतिज्ञा पुरी केल्यावांचून जीव ठेवायचा नाहीं, असा तर माझा निश्चय झाला आहे. तेव्हां आतां काय करावें?"

**शक्तिदेवाचें** हें भाषण ऐकून, **सूर्यतप्याला** फारच दया आली. तो ह्मणाला, "बाबा, तुझा असा निश्चयच आहे; तर मी सांगतों तें कर. येथून, दक्षिणेकडे चारशें कोसांवर **कांपिल्य** नांवाचा देश आहे. तेथें तीन पर्वत आहेत. त्यांत **उत्तर** नांवाचा जो पर्वत आहे; त्यावर एक मोठा आश्रम आहे. त्या आश्रमांत माझा वडील बंधू **दीर्घतपा** हा राहत आहे. त्याच्या जवळ जा. तो माझ्यापेक्षां पुष्कळ वृद्ध आहे, त्याला कदाचित् ती नगरी माहित असेल तर तुझें कार्य होईल."

**शक्तिदेव** निराश झाला होता, असें पूर्वीं सांगितलें आहे, पण **सूर्यतप्यानें** वर सांगितल्याप्रमाणें उपाय सांगतांच त्याला पुनः नवी उमेद आली. **दीर्घतप्याजवळ** गेलों असतां खचित आपल्याला शोध लागेल,

अशी बळकट आशा उत्पन्न झाली. **सूर्यतप्यानें** आग्रह केल्यावरून त्याणें ती रात्र तेथेंच काढली, व पहांटे उठून त्या तपोनिधीच्या पायांवर डोकें ठेवून, तो त्याच्या भावाकडे जाण्यास निघाला. वाटेंत त्याला अनेक नद्या, डोंगर, दऱ्या, खोरीं, शहरें, गांवें वगैरे भिन्न प्रदेश लागले. पुष्कळ ठिकाणीं संकटें भोगावीं लागलीं; तरी तो दृढनिश्चयी **शक्तिदेव** एकसारखा मार्गक्रमण करीत सुटला. नंतर कांहीं दिवसांनीं **सूर्यतप्यानें** सांगितलेल्या **कांपिल्य** देशांत प्राप्त झाला. तेथें **उत्तरपर्वत** कोठें आहे, त्याचा शोध करून तो त्या पर्वतावर चढला.

**उत्तर**गिरीवर एकांतस्थलीं रम्य प्रदेशांत त्या **दीर्घतपा** मुनीचें आश्रमस्थान होतें. तें शोधून काढून **शक्तिदेव** आश्रमांत गेला. तेथेंही पुष्कळ तापस लोक राहत होते. **शक्तिदेव** इतर लक्षणांवरून हाच **दीर्घतपा** असावा असें समजला. त्याणें त्या मुनीच्या पायांवर मस्तक ठेवला. त्या दयाळु तपोनिधीनें **शक्तिदेवा**ला आशीर्वाद देऊन त्याचें आदरातिथ्य केलें. मग त्याचा बंधु **सूर्यतपा** याचा **शक्तिदेवानें** क्षेमसमाचार सांगितला. नंतर 'येण्याचा उद्देश काय?' म्हणून विचारलें तेव्हां राजकन्या **कनकरेखा** हिणें सांगितलेल्या **कनकपुरीचें** अवलोकन करावें, अशी आपली प्रतिज्ञा असल्याचें **दीर्घतप्याला** निवेदन केलें. तो ह्मणाला, "महाराज, ती नगरी कोठें आहे, हें मला मुळींच ठाऊक नसून मी ती पाहण्याविषयीं प्रयत्न करीत आहें. मला तर तेथें अवश्य गेलेंच पाहिजे. आपले बंधू **सूर्यतप**ऋषि यांणीं आपल्याला ती नगरी माहित असेल असें सांगून मला इकडे पाठविलें आहे. तर कृपा करून ती नगरी कोठें आहे? तें मला सांगा."

**शक्तिदेवाचें** हें भाषण ऐकून **दीर्घतपा** ऋषि ह्मणाला, "बाबा, तूं येथें आलास हें मोठें साहस केलेंस. व तुझ्या येण्याचें मला फार समाधान वाटतें; पण मला इतकीं वर्षें झालीं आहेत तथापि यापूर्वीं मी या नगरीचें नांव कधींच ऐकलें नव्हतें. तें आज तुझ्याच तोंडांतून

ऐकलें. अनेक देशदेशांतरांतून आलेल्या लोकांशीं माझा विशेष परिचय झालेला आहे. तरी मी **कनकपुरी** हें कधीं नांवदेखील ऐकिलें नाहीं. मग ती पाहण्याची गोष्ट दूरच राहिली. तथापि ती नगरी कोठें तरी दूर ठिकाणीं असेल यांत कांहीं संशय नाहीं. ह्या द्वीपांत तर त्या नांवाची नगरी नाहींच; पण कदाचित् द्विपांतरांत असेल तर कोणास ठाऊक? ज्यापेक्षां ती नगरी पाहण्याचा तुझा अगदीं निश्चय झाला आहे व ह्मणूनच तूं इतका दूर प्रदेश वलांडून आला आहेस, त्यापेक्षां मी तुला एक उपाय सांगतों तो ऐकून घे.

या दक्षिणसमुद्राच्या मध्यभागीं **उच्चस्थल** नांवाचें एक द्वीप आहे. तेथें **सत्यव्रत** नांवाचा कोळ्यांचा राजा असून, तो मोठा धनिक आहे. व्यापारसंबंधानें त्याचें अनेक देशदेशांतरांत व द्वीपांतरांत नेहमीं जाणें येणें असतें. तेव्हां त्याणें ती नगरी कदाचित् पाहिली असेल असें वाटतें. निदान त्याला ती ऐकून तरी माहित असेल; याकरितां आतां तूं असें कर कीं येथून थेट समुद्रकिनारीं जा; तेथें **विटंक** नांवाचें एक मोठें शहर आहे तेथून **उच्चस्थल**द्वीपाला पुष्कळ व्यापारीलोक जहाजांतून जात येत असतात. त्यांपैकीं कोणत्या तरी एका व्यापाऱ्याशीं ओळख करून तूं **उच्चस्थल** नांवाच्या द्वीपांत जाऊन त्या **सत्यव्रता**ची भेट घे, ह्मणजे **कनकपुरी**चा पक्का शोध लागेल. याशिवाय दुसरा कांहीं उपाय नाहीं."

**शक्तिदेवाच्या** आशेप्रमाणें **दीर्घतप्यानें कनकपुरीची** कांहीं माहिती सांगितली नाहीं. तथापि आजपर्यंत कोणत्याही मनुष्याजवळ **कनकपुरी** हें नांव काढलें तर तो—ती नगरी कोठें आहे? हें तर सांगत नव्हताच; पण उलट **शक्तिदेवाला** मूर्ख ठरवून—हा मुळींच कोठें नसलेल्या नगरीचा शोध करण्यास प्रवृत्त झाला आहे, ह्मणून दोष लावीत असे, तसें **दीर्घतप्यानें** केलें नाहीं. आपल्याला माहित नाहीं तरी त्या नांवाची नगरी असण्याचा संभव आहे, असें त्यानें ह्मटलें.

हें ऐकून शक्तिदेवाला फार आनंद झाला. व आतां आपलें कार्य सिद्ध होईल अशी त्याला उमेद आली. मग तो दिवस तेथें घालवून दीर्घतप्याला नमस्कार करून, त्याची आज्ञा घेऊन शक्तिदेव समुद्र-काठीं जाण्यास निघाला.

तो बहुत नद्या व देश उल्लंघन करून समुद्राच्या तीरावरचें जें अत्यंत रमणीय विटंकशहर तेथें प्राप्त झाला. शक्तिदेव इतक्या दूर अनेक मोठमोठीं शहरें, जंगलें व नद्या, पर्वत इत्यादि अतिक्रमण करून आला; तरी त्याचें एका मुख्य गोष्टीकडे सर्व लक्ष्य लागल्या-मुळें नगराची शोभा पाहणें, सृष्टिसौंदर्य पाहणें, किंवा कोणाशीं विशेष दोस्ती करून कोठें राहणें, या गोष्टीकडे त्याचें बिलकुल लक्ष्य नव्हतें. तो आपल्या मुख्य कर्तव्यावर नजर ठेवून कोठेंहीं मनाला आसक्त न होऊं देतां एकसारखा चालला होता. विटंकपूर फारच रमणीय होतें; तरी त्यानें आपल्या मनाला तेथें रमूं दिलें नाहीं. उच्चस्थल नांवाच्या द्वीपाला जाणारें कोणाचें गलबत आहे कीं काय? याचा शोध करण्याकडे त्याचें लक्ष्य लागलें होतें. लौकरच त्याला असें समजलें कीं, समुद्रदत्त नांवाचा कोणी एक व्यापारी असून तो उच्चस्थलाला जाणार आहे; हें वर्तमान ऐकतांच शक्तिदेवानें त्याची तत्काल भेट घेतली; व आपल्याला त्याच्याबरोबर जाण्यास मिळेल अशी सोय केली. समुद्रदत्ताशीं याकरतांच त्याणें चांगलें सख्य केलें. चार दोन दिवसांत समुद्रदत्ताचें गलबत तेथून हाकारलें जाणार होतें. तोंप-र्यंत विश्रांति घेऊन गलबत निघायचें त्या दिवशीं शक्तिदेवानें त्या-च्यावर आपलें प्रस्थान ठेवलें. समुद्रदत्ताशीं त्याचा स्नेह जडला होता, यामुळें वाटेंत खाण्यापिण्याची चांगली व्यवस्था लागली होती. याप्रमाणें त्या अगाध जलराशींत, कनकपुरी पाहण्याविषयीं उत्सुक झालेल्या शक्तिदेवाची स्वारी जहाजांतून प्रवास करूं लागली. बरेच दिवस तें जहाज वारा अनुकूल लागल्यामुळें उत्तमप्रकारें गेलें. सुमारें

एका दिवसाची वाट बाकी राहिली होती. तेथपर्यंत गलबत सुरक्षित चालून, तेथें त्याला मोठा अपाय झाला.

विद्युल्लता हीच ज्याची भयंकर जिव्हा आहे, असा पर्जन्यरूपी राक्षस अकालीं गर्जना करूं लागला. वांकलेल्या वस्तूला ताठ करणारा, व ताठ असलेल्याला खालीं पाडणारा, असा जणूं काय दैवाचा फेराच; या प्रकारचा प्रचंड वारा सोसाट्यानें वाहूं लागला. त्या वाऱ्याच्या वेगानें समुद्राच्या उदकावर मोठमोठ्या लाटा उठल्या त्यापाहून, जणूं काय आपल्या आश्रयाचा पराभव झाल्यामुळें संतप्त होऊन पंखांसहित मोठमोठे पर्वतच वर उड्डाण करताहेत, असें वाटूं लागलें. याप्रमाणें पाणी उचंबळ झाल्यामुळें, ती नांव क्षणभर वर येई व पुन्हा लगेच खालीं जाई. जणूं काय द्रव्यवान् पुरुषांची स्थिती—अर्थात् उच्चनीचभाव प्राप्त होणारी, तीचें तें गलबत अनुकरण करूं लागलें. असें होण्याबरोबर आंत बसलेल्या वाण्यांचा एकच आक्रोश उडाला. त्यांच्या आक्रोशानें गच्च भरलें ह्मणूनच कीं काय, मोठ्या जोरानें तें जहाज एकदां वर उसळी मारून खालीं गेलें, तों तत्काल त्याचे दोन तुकडे झाले!

याप्रमाणें दुर्दैवानें सर्वांच्याच जिवावर आकांत आला. त्याबरोबर बिचारा **शक्तिदेव**ही, त्या संकटांत सांपडला. त्या गलबताचा मालक **समुद्रदत्त** हा समुद्रांत पडला. तरी त्याला गलबताची एक फळी मिळाली तिचा आश्रय धरून तो हळू हळू कसातरी मोठा प्रयत्न करून तरंगत होता. इतक्यांत लौकरच त्याला दुसरें एक गलबत दृष्टीस पडलें. व त्या गलबतवाल्यानें त्याला वर काढून घेतलें. **शक्तिदेव** जो त्या गलबतांतून खालीं पडला; तो—ज्यीणें आपली मुखरूपी गुहा पस-

---

१—पूर्वकालीं पर्वतांला पंख होते. व ते एका ठिकाणापासून दुसऱ्याठिकाणीं पाहिजे तेव्हां जात असत, अशा आशयाच्या पुष्कळ पौराणिक कथा आहेत. इंद्रानें पर्वतांचे पंख छाटून टाकल्यामुळें, ते आतां सपक्ष नाहींत. इंद्रानें पर्वतांचे पंख कापले, ह्मणूनच त्याला 'पर्वतपक्षशातन' असें प्राचीन ग्रंथकारांनीं नांव दिलें आहे.

रली आहे, अशा एका मोठ्या माशाच्या तोंडांत पडला. व त्याचा जबडा फार मोठा असल्यामुळें हातांपायांला कोठें कांहीं इजा न होतां एखाद्या सुग्रास अन्नाच्या घांसाप्रमाणें, तो त्या माशाच्या पोटांत गेला! गलबतांतले बाकीचे लोक ज्याला ज्याचा आश्रय मिळेल, त्याला धरून कांहीं बचावले, कांहीं मेले, कांहीं कोठल्या कोठें जाऊन पोंचले; अशी एकंदरींत सर्वांची वाताहत झाली.

बिचारा **शक्तिदेव** माशाच्या पोटांत खुशाल संचार करीत होता. तें माशाचें पोट एखाद्या विस्तीर्ण खोलीप्रमाणें ऐसपैस असल्यावरून, **शक्तिदेवाला** कांहींच इजा झाली नाहीं. व तो तशा ठिकाणीं होता, तरी आयुष्य सबळ असल्यामुळें त्याचा प्राण गेला नाहीं! तेथें काय ती श्वासोच्छ्वास सोडण्याचीच एक अडचण होती; पण तो मत्स्य ज्यावेळीं श्वास सोडी त्याबरोबर शक्तिदेवालाही आपले श्वास बाहेर सोडण्यास संधी मिळत असे. जणुंकाय दुसरा गर्भवासच, असा तो **शक्तिदेव** त्या माशाच्या पोटांत बरेच दिवस संचार करीत होता!

नंतर कांहीं दिवसांनीं मासे मारणाऱ्या लोकांनीं **शक्तिदेव** ज्या मात्स्याच्या पोटांत होता त्यालाही मारलें. जहाज फुटलें तें **उच्चस्थल** द्वीपाच्या जवळच फुटलें होतें. व तो मासाही त्याच प्रदेशांत संचार करणारा होता. व त्याच द्वीपांत राहणाऱ्या कोळ्याच्या हातीं तो लागला. **उच्चस्थल**द्वीपाचा राजा **सत्यव्रत** हा जातीचा कोळीच होता. व त्या द्वीपांत बहुतकरून कोळ्यांची वस्ती फार होती. मोठमोठ्या माशांच्या पोटांत केव्हां केव्हां अमोलिक वस्तू सांपडतात ह्मणून राजाचा असा हुकुम होता कीं, तशा प्रकारचा मोठा मासा कोणाला मिळाला असला, तर तो त्यांणीं आपल्या समक्ष आणल्यावांचून फाडूं नये. व त्याची कोणत्याही प्रकारची व्यवस्थाही करूं नये. राजाचा असा हुकुम असल्यावरून, **शक्तिदेव** ज्याच्या पोटांत होता, त्या महामत्स्याला कोळ्यांनीं राजाच्या पुढें हजर केलें. व सर्व मंडळी कौतुकानें

पाहत असतां तो मासा **सत्यव्रतानें** कोळ्यांकरवीं कापायला लावला. मासा मध्येंच तोडला असता तर कदाचित् **शक्तिदेव**ही त्याच्या बरोबर कापला गेला असता. पण त्याच्या तोंडाचे दोन भाग धरून कडेकडेनें चिरीत गेल्यामुळें, अचानक त्याचे दोन तुकडे झाले. जसा जोडलेला शिंपला सोडवितांच त्याचे दोन अर्ध होतात; त्याप्रमाणें त्या माशाचीं दोन अर्धें निरनिराळीं करतांच दैवानें ज्याला पुरता हात दिला आहे, असा **शक्तिदेव** त्याच्या पोटांतून निघाला! ज्याला आश्चर्यकारक गर्भवास भोगावा लागला आहे, असा **शक्तिदेव** माशाच्या पोटांतून जीवंत निघतांच, राजा **सत्यव्रत** व तेथें जमलेली इतर मंडळी यांना मोठें आश्चर्य वाटलें. सर्व लोक चकित होऊन त्याच्या तोंडाकडे पाहत आहेत, तोंच **शक्तिदेव** पुढें आला, व त्याणें अनुमानानें राजा तो हाच असावा असें समजून **सत्यव्रता**ला आशीर्वाद दिला.

तरुण व सुस्वरूप असून मोठा साहसी अशा त्या **शक्तिदेवा**ला पाहून, विस्मित झालेला **सत्यव्रत** ह्मणाला, "अहो, तुह्मी कोण अहां? हें मला ठाऊक नाहीं तरी लक्षणांवरून तुह्मी ब्राह्मण अहां, यांत कांहीं संशय नाहीं. पण तुह्मी कोठले? कोण? व या माशाच्या पोटांत तुमचें राहणें कसें झालें? ब्राह्मणा, हा तुमचा अद्भुत वृत्तांत मला निवेदन कराल तर फार समाधान होईल."

हें **सत्यव्रताचें** भाषण ऐकून **शक्तिदेव** त्या धीवरांच्या राजाला ह्मणाला, "अहो, आपण अनुमान केलें त्याप्रमाणें मी ब्राह्मणच आहें. मला **शक्तिदेव** ह्मणतात. **वर्धमान** नांवाचे नगर कदाचित् तुह्मीं ऐकिलें असेल, तर कोणास ठाऊक, तेथें मी राहणारा आहें. व आतां तेथूनच आलों आहें. पुढें जायचें कोठें? ह्मणाल तर **कनकपुरी** नांवाच्या नगरींत मला अवश्य गेलें पाहिजे. ती नगरी कोठें आहे, तें मला मुळींच ठाऊक नाहीं. व लोकांना विचारिलें तर तेही आपल्याला माहित नाहीं असें सांगूं लागले. यामुळें आज पुष्कळ दिवस मी या

भूमंडलावर परिभ्रमण करीत आहें. उत्तरपर्वतावर राहणाऱ्या, **दीर्घतपा** नामक ऋषींच्या सांगण्यावरून ती नगरी कोठें तरी द्वीपांतरांत असावी, अशी संभावना करून तिच्याविषयीं विशेष माहिती मिळविण्याकरितां **उच्चस्थल** नांवाच्या द्वीपाचा राजा याच्याकडे विचारायला मी निघालों आहें. **सत्यव्रताकडे** जात असतां वाटेंत आमची नौका फुटली तेव्हां अर्थात् मी समुद्रांत पडलों, तेथें या माशानें मला गिळलें व त्याच्या पोटांत इतकेदिवस राहून त्याच्याबरोबरच सांप्रत या ठिकाणीं प्राप्त झालों आहें."

**शक्तिदेव** ह्याला ज्या ठिकाणीं जायचें होतें त्या **उच्चस्थल** नामक द्वीपांतच तो प्राप्त झाला होता व त्याला प्रश्न करणारा हाच **सत्यव्रत** राजा होता; तरी **शक्तिदेवाला** त्याची कांहीं माहिती नव्हती. त्याणें जी हकीकत विचारली, ती मात्र त्याणें सांगितली. ती ऐकून **सत्यव्रत** ह्मणाला, "तूं ज्या **सत्यव्रताला** भेटायला निघाला होतास तोच मी. व **उच्चस्थल** नांवाचें द्वीप तें हेंच. पण तुला सांगण्यास मोठी दिलगिरी वाटते कीं, **कनकपुरी** मला माहित नाहीं. मी पुष्कळ द्वीपें पाहिलीं; पण तुला ज्या नगरींत जाणें इष्ट आहे ती **कनकपूरी** माझ्या पाहण्यांत आली नाहीं. तरी इतकें खरें आहे कीं, कोठें द्वीपांतरांत ती नगरी आहे, यांत संशय नाहीं. तथापि अमुकच ठिकाणीं आहे, हें मात्र मला ठाऊक नाहीं."

प्रिय वाचकहो, इतकीं जिवावरचीं संकटें सोसून ज्याच्याविषयीं विशेष उमेद धरून **शक्तिदेव** आला होता, त्याचें हें भाषण ऐकून त्याला किती दुःख झालें असेल, याची कल्पना तुह्मीच करा. **सत्यव्रतानें** **कनकपुरी** आपल्याला माहित नाहीं, असें सांगतांच **शक्तिदेव** फारच दुःखी जाहला. तथापि तो पक्क्या निश्चयाचा होता. यापूर्वी ज्याला ज्याला त्याणें विचारिलें, त्यांणीं त्यांणीं ती नगरी मुळींच नाहीं ह्मणून सांगितलें. **दीर्घतप्यानें** त्या नांवाची नगरी असेल असा संभव असल्याचें

सांगितलें; व आतां **सत्यव्रतानें** द्वीपांतरांत ती खचित आहे असें सांगितलें. यावरून जिच्या अस्तित्वाविषयींच संशय होता ती आहे येथपर्यंत बातमी लागली. आतां पुढें आणखी प्रयत्न करून पाहतां येईल, असें **शक्तिदेवानें** मनांत आणिलें.

तो दुःखी झाला आहे, असें पाहून **सत्यव्रता**ला फार वाईट वाटलें. बिचारा ब्राह्मण आपल्यावर आशा ठेवून इतक्या दूरचा प्रवास व मत्स्याच्या पोटांतला गर्भवास सहन करून आला; आणि आपल्या हातून त्याचें कांहींच कार्य झालें नाहीं, ही गोष्ट **सत्यव्रता**च्या मनाला लागली. तो अतीतअभ्यागतांविषयीं फार कळकळ बाळगीत असे, व त्यांचें कांहीं काम असलें तर तें मोठ्या अगत्यानें करी. तेव्हां **सत्यव्रत शक्तिदेवाला** ह्मणाला, "भटजीबुवा, आपण विषाद पावूं नका. आजची रात्र आपण येथेंच रहा. उद्यां सकाळीं तुमचा मनोदय पूर्ण होण्याविषयीं कांहींतरी उपाय पाहतां येईल. माझ्याकडून होईल तितकी तजवीज मी करतों. तुह्मी उदास मात्र होऊं नका," असे सांगून **शक्तिदेवाचें** त्याणें समाधान केलें. **सत्यव्रत शक्तिदेवाला** प्रीतिपूर्वक आपल्या घरींच ठेवून घेण्यास तयार होता; तरी तो ब्राह्मण असून आपण जातीचे कोळी आहों; तेव्हां आपल्या येथें त्याच्या मनाप्रमाणें व्हायचें नाहीं. असें समजून **सत्यव्रतानें** आपला शिपाई बरोबर देऊन, तेथें जवळच ब्राह्मणांचा मठ होता तेथें त्याला पाठविलें. **उच्चस्थल** हें द्वीप फारसें मोठें नव्हतें. तेथें जे ब्राह्मण राहत असत ते तेथले स्थाईक नसून **विटंकपुर** व त्याच्या आसपासच्या समुद्रकिनाऱ्याचा प्रदेश यांत राहणारे असून भिक्षुकीकरितां त्या द्वीपांत जात असत. धर्मसंबंधी कार्यप्रयोजनांत त्यांची विशेष अपेक्षा असल्यावरून **सत्यव्रत** राजानें त्यांच्याकरतां एक मोठा मठ तयार करवून त्यांच्या खाण्यापिण्याची वगैरे सर्व व्यवस्था लावून पुष्कळ ब्राह्मण त्या मठांत ठेवले होते. जो कोणी ब्राह्मण त्या द्वीपांत येईल, त्याणें तेथेंच उतरायचें. व त्याचा

जेवणाखाणाचा वगैरे सर्व बंदोबस्त तेथें व्हायचा अशी व्यवस्था होती.

**सत्यव्रतानें शक्तिदेवाला** त्या मठांत पाठविला; तेव्हां त्याची तेथें उत्तमप्रकारची सोय लागली. स्नानसंध्या भोजन वगैरे आटपून **शक्तिदेवानें** चांगली एक झोंप काढली. नंतर श्रमांचा परिहार होऊन तो हुषार झाला. भिक्षुक ब्राह्मणांला मुख्य काम ह्मटलें ह्मणजे काय तें स्नानसंध्येचें असतें. तें आटपलें ह्मणजे इकडच्या तिकडच्या गप्पा मारण्यांत त्यांचा मधला वेळ जातो. संध्याकाळ झाली कीं, ते पुन्हां आपल्या कामास लागतात. **शक्तिदेव** निजून उठला, त्यावेळीं सुमारें प्रहर दिवस उरला होता. त्या मठाच्या एका विस्तीर्ण ओटीवर सर्व ब्राह्मणमंडळ बसलें होतें. तेथें अनेकप्रकारच्या गोष्टी चालल्या होत्या. कोणी जेठा बांधून बसले आहेत, कोणी लोडाला टेंकून बसले आहेत; कोणी तपकीर ओढताहेत; कोणी काय करताहेत; अशा रितीनें त्यांचें गप्पाष्टक चाललें होतें.

**शक्तिदेवही** त्यावेळीं रिकामाच होता, व हावेळपर्यंत तेथील मंडळीशीं त्याचें विशेषसें कांहीं बोलणें झालें नव्हतें. ज्या ज्या वस्तुची त्याला गरज लागली, ती ती मागण्यापुरतेंच काय तें त्याचें बोलणें झालेलें. तेव्हां आपणही त्या मंडळींत बसून वेळ घालवावा, असा विचार करून **शक्तिदेव** त्यांत जाऊन बसला. तेव्हां तो नवाच तेथें आल्यामुळें बाकी सर्व मंडळीचें लक्ष त्याच्याकडेच लागलें. वेळ रिकामा असला ह्मणजे अघळ पघळ हव्या तितक्या गोष्टी करण्यास कांहीं हरकत नाहीं. तेथील ब्राह्मणांनीं त्याची सर्व हकीकत विचारून घेतली. **शक्तिदेवानें** जें आपलें वर्तमान सांगितलें त्यावरून **विष्णुदत्त** नांवाचा त्या मठांत एक ब्राह्मण होता, त्याला हा आपल्या पैकींच कोणी असावा; असा कांहीं अदमास वाटला. **शक्तिदेवानें** अद्याप आपल्या कुळाची वगैरे माहिती सांगितली नव्हती; तरी "**वर्धमान**नगराहून आपण आलों," इतकें त्याणें सांगितलें होतें. त्यावरून **विष्णुदत्ताला** तसें वाटलें. त्याणें विशेष

खोदून खोदून प्रश्न केल्यावरून **शक्तिदेवानें** आपल्या देशाचें आपल्या नगराचें आपल्या कुळाचें व आईबापांचें वगैरे संपूर्ण वृत्त विस्तारपूर्वक त्याला सांगितलें.

**विष्णुदत्त** हा **वर्धमान**पुरांतच राहणारा एक मनुष्य होता. फार दिवसांपूर्वी तो फिरत फिरत या द्वीपांत आला असून इतके दिवस येथेंच त्याचें राहणें झालें होतें. फार दूरचा पल्ला असल्यामुळें घराकडचा क्षेमसमाचार—तो निघाल्यापासून हावेळपर्यंत—मुळींच कळला नव्हता. **शक्तिदेवानें** जी हकीकत सांगितली तीवरून हा आपलाच आहे, असें समजून त्याला अतिशय आनंद झाला. व प्रेमाश्रूंनीं त्याचे डोळे भरून गेले, आणि गळा दाटून आला.

**शक्तिदेवाला** हा आपला कोण हें माहित नव्हतें; पण त्यानें जी हकीकत सांगितली तीवरून **शक्तिदेव** आपला मामेभाऊ होतो असें **विष्णुदत्ताला** समजलें. ह्मणून तो त्याला मिठी मारून ह्मणाला, "बाबा, दैवानें तुझी भेट झाली. तूं केवळ माझ्या देशांतला आहेस इतकेंच नव्हे, तर प्रत्यक्ष माझ्या मामाचा मुलगा आहेस. मी लहानपणांतच आपल्या घराहून निघालों, तो फिरतां फिरतां दैवयोगानें येथें येऊन पोंचलों. अन्नोदकाचा ऋणानुबंध असा कांहीं जबरदस्त आहे कीं, येथें आल्यापासून माझा पाय येथून मुळींच निघत नाहीं. व मीही आतां परत जाण्याची आशा सोडली आहे. ध्यानीं मनीं नसतां अकस्मात् तुझी भेट झाली, हें फार चांगलें झालें. आतां तूं कांहीं दिवस येथेंच रहा. द्वीपद्वीपांतराहून येथें पुष्कळ व्यापारी लोक येतात, त्यांच्या द्वारें तुझा मनोरथ पूर्ण होईल. **कनकपुरी**चा शोध लागल्यावांचून राहणार नाहीं व त्यायोगानें तुझें इष्ट कार्य लौकरच सिद्ध होईल."

असें सांगून ते उभयता बंधू एकेठिकाणीं बसून पुष्कळ वेळ गोष्टी करते झाले. **विष्णुदत्तानें** आपले आईबाप बंधू सोयरेधायरे वगैरे जे त्याला माहित होते त्यांचीं नावें **शक्तिदेवाला** सांगितलीं. **शक्तिदेवही**

वाट चालण्याच्या श्रमानें व कार्यसिद्धी लांबत चालली याच्या योगानें फार दुःखी झाला होता. पुष्कळ दिवस त्याला आप्तांचें दर्शन मुळींच झालें नव्हतें. त्यामुळें विष्णुदत्ताचें नातें निघालें, व त्याणें प्रेमपूर्वक त्याला आपला बंधू असे सांगितलें, याचा त्याला फार आनंद झाला. शक्तिदेव थकला भागलेला आहे, असें समजून विष्णूदत्तानें त्याची उत्तमप्रकारें व्यवस्था ठेवली. हळू हळू मार्गक्रमणाचा श्रम व कष्ट यांचें शक्तिदेवाला विस्मरण होऊन फार आनंद झाला. उघडच आहे, परदेशांत आपल्या आप्ताची भेट होणें, हें निरुदक अशा मारवाड[1] देशांत सुंदर पाण्याचा झरा मिळाल्यासारखेंच वाटतें. जरी अद्याप कनकपुरी अमुक ठिकाणीं आहे, असें शक्तिदेवाला खात्रीपूर्वक कांहीं समजलें नव्हतें; तरी आपल्या कार्याची सिद्धि होण्याचा समय अगदीं जवळ आला आहे, असें त्यानें मानलें. कोणत्याही कार्याला प्रवृत्त झालें असून मध्यन्तरीं अनुकूळ अशा कांहीं गोष्टी घडून आल्या ह्मणजे पुढें होणाऱ्या कार्यसिद्धीचें

---

१ मारवाड या नांवाचा देश सांप्रत प्रसिद्धच आहे. याचें, प्राचीन ग्रंथकार ‘मरु’ अथवा ‘मरुधन्व’ या नांवानें वर्णन करितात. सांप्रत हा देश राजपुतान्यापासून सिंध प्रदेशापर्यंत सारखा पसरला आहे. व बहुतकरून एतद्देशीय संस्थानिकांच्याच ताब्यांत हा आहे. जोधपूर बिकानेर आणि जैसलमीर हीं तीन संस्थानें या प्रदेशांत आहेत. या देशांत व विशेषतः बिकानेर आणि जैसलमिर या इलाख्यांत मोठमोठीं मैदानें व वाळवंटें असून तो प्रदेश अगदीं उजाड आहे. दहादहा वीस वीस कोसपर्यंत पाण्याचा थेंब देखील मिळण्याची आशा नसल्यामुळें, त्या प्रदेशांत प्रवास करणाऱ्या लोकांचे फार हाल होतात. तसेंच तेथें विशेषतः उन्हाळ्यांत मृगजळें दिसतात. हल्लींच्या सार्वभौम सरकारानें त्या अशा रूक्ष प्रदेशांतदेखील कांहीं ठिकाणीं जलाशयाच्या सोयी केल्या आहेत. व यामुळें लोकांस बराच उपयोग होतो. तरी एकंदरींत हा प्रदेश अगदीं निर्जल असून निर्वृक्ष आहे. फार प्राचीन काळच्या ग्रंथांतदेखील निर्जलत्वाच्या संबंधानें या देशाची मोठी प्रसिद्धि आहे. तशा प्रदेशांत प्रवास करणाऱ्याला एखादा जलाशय मिळाला तर त्याला किती बरें आनंद वाटेल! याच गोष्टीचें मुळांत वर्णन केलें आहे.

लक्षण समजून येतें. व तसें अवश्य होईल असेंही अनुमान करतां येतें. अर्थात् तें करण्यास प्रवृत्त झालेल्याला मोठी उमेद वाटते.

याप्रमाणें परस्परांचें नातें समजून येऊन, उभयतां **शक्तिदेव** आणि **विष्णुदत्त** या दोघांनीहीं रात्रीं यथेच्छ भोजन केलें. व नंतर एकाच बिछान्यावर दोघेही इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत पडले होते. गोष्टीच्या नादांत दोघांलाही झोंप येत नव्हती. **शक्तिदेवाचें** मन, आपलें कार्य सिद्ध होईल; व पुढें त्यापासून आपल्याला काय काय सुख प्राप्त होईल याकडे लागलें होतें. त्याच्या बाजूला बिछान्यावर पडलेला **विष्णुदत्त शक्तिदेवाच्या** हेतूला अनुकूल अशा अनेक गोष्टी सांगून त्याचें कार्य सिद्ध होईल असें त्याला सिद्ध करून दाखवीत होता. मध्यें मध्यें उभयतांचा विनोदही चालला होता. व त्या विनोदाच्या बहरांत कांहीं चमत्कारिक गोष्टी निघाल्या. गोष्टीवर गोष्ट निघतां निघतां **विष्णुदत्त शक्तिदेवाला** ह्मणाला, "हा तुझा दीर्घ उद्योग व विलक्षण साहस पाहून, मला एक कथा आठवली ती तुला विस्तारपूर्वक सांगतों ऐक."

**विष्णुदत** ह्मणाला, "पूर्वी **यमुनानदीच्या** किनाऱ्यावर असलेल्या एका मोठ्या अग्रहारांत **गोविंदस्वामी** नांवाचा एक मोठा प्रतिष्ठित ब्राह्मण होता. **गोविंदस्वामीला** त्याच्या सारखेच व परस्परांला अनुरूप असून गुण आणि स्वभाव यांणीं एकमेकांशीं तुल्य असे दोन पुत्र होते. थोरल्याचें नांव **अशोकदत्त** आणि धाकट्याचें नांव **विजयदत्त** त्या उभयतां गुणवान् पुत्रांसह **गोविंदस्वामी** मोठ्या आनंदांत संसार करून राहत होता. तो फार मोठा श्रीमान् नव्हता तरी कुटुंबाच्या निर्वाहापुरतें उत्पन्न असून, त्याचा संसार मोठा टुमदार होता. त्याला कोणत्याही प्रकारची ददात नव्हती.

याप्रकारें तो आनंदानें प्रपंचसुखाचा अनुभव घेत असतां एक आकस्मिक अरिष्ट त्याच्यावर प्राप्त झालें. एकाएकीं त्या प्रदेशांत मोठा

दुष्काळ पडला. जिकडेतिकडे लोकांचा हाहाकार झाला. पर्जन्याचा अभाव झाल्यामुळें गरीबापासून श्रीमंतापर्यंत सर्वच लोक फिकीरींत पडले. ज्यांच्या घरीं खायला नव्हतें ते तर उपोषित मरूं लागलेच; पण त्यांच्याबरोबर श्रीमान् लोकांवरही तशी पाळी आली. कोणी कोणाची पर्वा ठेविनासें झालें. बुभुक्षितलोक ज्यांच्या घरीं धान्याचा संग्रह असेल, त्यांच्यावर हल्ले करून खुशाल लुटालुट करूं लागले. त्या देशच्या राजानें पुष्कळ प्रयत्न केला; पण दुष्काळ फार दूरवर पसरला असल्यामुळें, त्याचा कांहीं इलाज चालेनासा झाला.

**गोविंदस्वामी**च्या घरांत धान्याचा बराच संग्रह होता. व कसाही भयंकर दुष्काळ असला तरी त्याच्या कुटुंबाचा निर्वाह होण्यास कांहीं अडचण नव्हती. पण तो मोठा दयाळु असल्यामुळें लोकांचे हाल त्याच्यानें पाहवेनासें झालें. त्याचे आप्त, इष्टमित्र, सोयरे धायरे, या सर्वांनीं त्याच्यावर हल्ला केला. प्रतिदिवशीं शेंकडों मंडळी त्याच्या घरीं जेवणास तयार! ही स्थिती पाहून आतां फार दिवस आपला निभाव लागणार नाहीं असा विचार करून **गोविंदस्वामी** बायकोला ह्मणाला, "अग, हा देश तर दुष्काळानें ग्रासून टाकला आहे. अन्नान्न करीत लोक चहूंकडे फिरत आहेत. आपले सुहृत्संबंधी आपल्या घरीं तळ देऊन बसले आहेत. घरांत जो कांहीं धान्याचा संग्रह होता तो तर सरत आला. तेव्हां आतां या आलेल्या मंडळीची काय व्यवस्था करावी? यांचे हाल माझ्यानें अगदीं पाहवत नाहींत. बरें, यांला द्यायला लागलें तर कोणाकोणांला देणार? आणि किती देणार? या सर्वांचा निर्वाह चालेल असा आपल्याजवळ तरी कोठें संग्रह आहे? यामुळें माझा जीव अगदीं त्रासला आहे. मी एक युक्ति काढली आहे तसें करावें. दररोज यांचे दीनवाणे शब्द ऐकत बसण्यापेक्षां जें कांहीं आपल्या घरीं थोडेंसें राहिलें असेल, तें धान्य या सर्वांला वाटून टाकावें आणि आपण येथून निघून जावें, हें मला बरें

वाटतें. आह्मी आपल्या कुटुंबाचीं माणसें घेऊन येथून **काशिक्षे**त्रांत राहण्याकरतां जाऊंया. तिकडच्या प्रदेशांत दुष्काळ नाहीं, व तें क्षेत्र मोठें असल्यामुळें आपण कसा तरी तेथें निर्वाह करूं. याशिवाय **काशी**वास घडणें हें मोठें पुण्यच आहे. तेव्हां **काशिक्षेत्रांत** जाण्यांत पुण्य आणि पुरुषार्थ दोन्ही सिद्ध होतात. तर यासंबंधानें तुला कसें काय वाटतें तें सांग पाहूं."

**गोविंदस्वामी**चें हें भाषण ऐकून, त्याच्या स्त्रीनें तत्काल अनुमोदन दिलें. ती ह्मणाली, "आपल्याला जी गोष्ट योग्य वाटते ती मला कशी अमान्य होईल? आपण ह्मणतां तें खरें आहे. व मलाही या लोकांचे अन्नाकरतां विलाप ऐकवत नाहींत, तेव्हां एकंदरींत येथून जावें हेंच बरें." याप्रमाणें बायकोनें अनुमोदन देतांच त्या उभयतांनीं अमुक दिवशीं जायचें असा निश्चय ठरवून आपल्या घरांत जें धान्य वगैरे होतें तें चट सारें लोकांस वांटून देऊन, उभयतां त्यांणीं आपल्या पुत्रांसह तेथून प्रस्थान ठेवलें. **गोविंदस्वामी**च्या घरांत नोकर चाकर बरेच होते. त्यांतून परदेशांत जाण्याविषयीं ज्यांचा पक्का निश्चय दिसून आला त्यांना बरोबर घेऊन **गोविंदस्वामी** त्या देशांतून निघाला. वस्तुतः खुद्द **गोविंदस्वामी**च्या कुटुंबावर तसें मोटें संकट प्राप्त झालें नव्हतें. तथापि थोर पुरुष स्वजनांची आपत्ति व त्यांचे दुःख पाहण्यास समर्थ होत नाहींत, असें जें ह्मणतात तें अगदीं खरें आहे. **गोविंदस्वामी** आपल्या आप्त इष्टमित्रांचे हाल पाहवेनात ह्मणूनच तेथून निघाला. तो हळूहळू मार्ग क्रमण करीत असतां वाटेंत एका पवित्र ठिकाणीं मोठ्या झाडाखालीं—जटा धारण करणारा, व अंगाला सफेत भस्म लावलेला, हातांत कपाल धारण केलेला, जणूं काय अर्धचंद्रानें शोभणारा साक्षात्, **शंकर**च असा एक मोठा सत्पुरुष त्याच्या दृष्टीस पडला.

त्याला पाहून **गोविंदस्वामी**ची तत्काल त्याच्यावर विशेष भक्ति ब-

सली. थोडावेळ तरी त्याच्या सहवासाचा लाभ घ्यावा; ह्मणून **गोविंदस्वामीनें** त्या दिवशीं तेथेंच मुक्काम केला. त्याणें मनापासून त्या सत्पुरुषाची सेवा केली. गृहस्थाश्रमी मनुष्याला आपल्या पोरांबाळांचें पुढें कसें होईल? तीं चांगलीं निपजतील किंवा नाहीं; त्यांच्यापासून आपल्याला सुख होईल किंवा नाहीं; इत्यादि गोष्टींची मोठी जिज्ञासा असते. व ते साधू, फकीर, ज्योतिषी, देवऋषि वगैरे प्रकारचे लोक कांहीं सांगतील; असें समजून कुटुंबी लोक तशा प्रकारच्या मनुष्यांच्या नादीं लागत असतात.. व त्यांत बहुतकरून ढोंगी व लबाड लोक फार असतात. आणि ते अकटोविकट कांहीं तरी बरीं वाईट फळें सांगून भोळ्या भाविक लोकांकडून यथेच्छ द्रव्य उपटतात, असे प्रकार वारंवार घडत असतात. **गोविंदस्वामी**ची ज्या साधूशीं गांठ पडली होती त्याच्यावर वर सांगितलेल्या उद्देशानेंच त्याची भक्ति बसली होती. व आपल्या मुलांचें कांहीं शुभाशुभ समजून घ्यावें; ह्मणूनच तो त्याच्या चरणीं लीन झाला होता. तरी तो साधू मात्र खरोखरीचा साधू असून ढोंगी धुताऱ्या नव्हता. यामुळें **गोविंदस्वामी** फसला नाहीं. **गोविंदस्वामीनें** त्या साधू महाराजाच्या पायांवर मस्तक ठेवून आपले उभयतां पुत्र त्याच्या पायांवर घातले, व "महाराज, या मुलांचें पुढें कसें काय होईल तें कृपा करून सांगावें" अशी त्या योग्याची प्रार्थना केली. तेव्हां तो सत्पुरुष त्याला ह्मणाला, "ब्राह्मणा, मी विचार करून पाहिला त्यावरून हे तुझे दोघेही पुत्र पुढें मोठे उदयास येतील असें वाटतें. पण हा जो तुझा धाकटा मुलगा **विजयदत्त** याच्याशीं तुझा कांहींदिवस वियोग होईल, व नंतर हा थोरला पुत्र **अशोकदत्त** याच्या प्रभावानें ह्या **विजयदत्ता**शीं पुन्हां तुझी गांठ पडेल. व नंतर हे दोघेही पुत्र बहुतकाळपर्यंत तुझ्या आज्ञेंत राहून तुझी सेवा करतील, व त्यापासून तुला मोठें कल्याण प्राप्त होईल."

त्या साधूनें असें भविष्य सांगितलें; तें ऐकून **विजयदत्ताचा** वियोग

होणार, असें समजल्यावरून **गोविंदस्वामी**ला अंमळ वाईट वाटलें. पण पुढें त्याच्याशीं समागम होईल असें त्या साधूनें सांगितलें, त्यावर दृष्टि ठेवून विचारपूर्वक त्यानें आपलें समाधान केलें. तो सारा दिवस त्या साधूच्या सहवासांत घालवून दुसऱ्या दिवशीं पाहाटे त्याची आज्ञा घेऊन **गोविंदस्वामी** पुढें निघाला. त्याला त्या सत्पुरुषानें सांगितलेल्या भविष्यावरून हर्ष आणि विषाद असे दोनही विकार प्राप्त झाले होते. व एकंदरींत त्या साधूचें सांगणें बिलकूल खोटें व्हायचें नाहीं अशी त्याची पूर्ण खात्री होती. ह्मणून पुढें प्राप्त होणारें पुत्रवियोगाचें दुःख लौकरच निवृत्त होवो, अशी तो ईश्वरापाशीं प्रार्थना करूं लागला. असो. याप्रमाणें हळू हळू मार्ग क्रमण करीत **गोविंदस्वामी काशी**-क्षेत्रांत येऊन पोंचला.

त्या क्षेत्रांत **गोविंदस्वामी**ची ओळखदेख कांहींच नव्हती. गांवाच्या बाहेर एक लहानसें; पण सुंदर असें **देवी**चें मंदिर होतें. शहरांत गेलें तर आपली उतरण्याची सोय होणार नाहीं; तेव्हां उगीच तेथें जाऊन संकटांत पडावें लागेल ह्मणून **गोविंदस्वामी** त्या **देवी**च्या मंदिरानजीक एक मोठा सघन छायेचा वृक्ष होता त्याच्या खालीं उतरला. तो तेथें पोंचला ती वेळ सकाळची होती. तीर्थक्षेत्रादिकांत संध्याकाळच्या वेळीं जाऊं नये, दोनप्रहरच्या पूर्वींच तेथें पोंचावें अशी धर्म-शास्त्रकारांची आज्ञा[1] असल्यावरून, **गोविंदस्वामीनें** मुद्दाम तशी व्यवस्था करून सकाळच्या वेळींच तेथें प्रवेश केला.

त्या झाडाखालीं आपलें बिऱ्हाड ठेवून व बायकोला स्वयंपाकाच्या तयारीला लावून **गोविंदस्वामी** स्नान करून **देवी**च्या मंदिरांत गेला.

---

१—क्षेत्रांत पाय ठेवतांच तेथें कांहीं नियमित कर्मे करावयाचीं असतात. व भोजन झाल्यानंतर अर्थात् दोनप्रहरानंतर तशा प्रकारचीं कर्मे करण्यास अधिकार नाहीं व तीं केल्यावांचून क्षेत्रांत राहणें प्रशस्त नाहीं. ह्मणून धर्मशास्त्रकारांनीं मुद्दाम सकाळचीच वेळ नियमित केली असावी असें वाटतें.

व पूजा अर्चा करण्यांत त्याणें मधला सारा वेळ घालविला. देवीच्या मंदिरांत त्यांना राहण्यासारखी जागा होती; तरी देवी, महादेव, इत्यादि उग्र देवतांच्या देवळांत बायकामुलें घेऊन राहणें हें ठीक नाहीं. कदाचित् कांहीं अनाचार झाला तर, देवतेचा क्षोभ होईल म्हणून गोविंदस्वामीनें मुलांसहवर्तमान त्या झाडाखालींच मुक्काम केला होता. तेथली जमीन साफसूफ करून रात्रीं सर्वांच्या पथाऱ्या पडल्या. देशांतराहून आलेले आणखीही कांहीं लोक त्या ठिकाणीं राहिले होते. बरीच रात्र होईतोंपर्यंत जमलेल्या मंडळीच्या इकडच्या तिकडच्या गोष्टी झाल्या व सर्व आपापल्या ठिकाणीं स्वस्थ निजले. गोविंदस्वामीला अद्याप झोंप लागली नव्हती. मुलांबाळांसह देशत्याग करून जावें लागलें. मागें आपल्या घरादाराचें काय झालें असेल कोणास ठाऊक? तसेंच दुष्काळाच्या तडाक्यांत आप्तइष्टमित्रांचे काय हाल झाले असतील याचीही त्याला काळजी होती. त्यांतून त्या साधूनें 'पुत्राचा वियोग होईल' असें सांगितलें होतें, इत्यादि सर्व गोष्टी त्याच्या मनांत घोळत असल्यामुळें गोविंदस्वामीला बराच वेळ झोंप लागली नाहीं. तो बिछान्यावर पडून विचार करीत होता. विशेषतः 'पुत्राचा वियोग होईल' असें जें त्या बुवानें सांगितलें होतें, त्याची त्याला काळजी लागली होती. तथापि एव्हांशींच तसा प्रसंग येईल असें त्याला वाटलें नव्हतें. कारण मुलगा वयानें लहान असून कोठें जाण्यायेण्यास अद्यापि तो समर्थ झालेला नाहीं; तेव्हां कदाचित् कांहीं दिवसांनीं वियोग झाला तर होईल असें त्याच्या मनांत आलें होतें. पण जी गोष्ट दूर ढकलावी अशी तो मनापासून इच्छा करीत होता ती गोष्ट लवकरच प्राप्त होण्याचा प्रसंग आला.

वर सांगितल्याप्रमाणें सर्व मंडळी—कोणी आपला बरोबरचा बिस्तर आंथरून व कोणी झाडांचीं पानें आंथरून निजले आहेत. कोणी शिळेवर पडले आहेत, व सर्व मंडळी निश्चितपणें घोरताहेत. गो-

विंदस्वामी आपल्या बिछान्यावर पडला असून त्याच्याजवळच त्याचे दोघे मुलगे व त्याची स्त्री व बरोबर आलेले नोकर निरनिराळ्या आंथरुणांवर झोंपी गेलें आहेत. मध्यरात्रीची गार हवा सुटली असून जिकडे तिकडे शांत झालें आहे. अशा वेळीं एकाएकीं त्याचा धाकटा मुलगा विजयदत्त कुडकुडून कांपूं लागला. त्याच्या सर्वांगांत जबरदस्त हिंव भरलें. तो बिछान्यावर पडला तोंपर्यंत त्याची प्रकृति चांगली असून ज्वर येण्याचा कांहीं सम्भव नव्हता. पण, पुढें आपल्या आप्तांचा वियोग होईल; याचें भयच कीं काय अशा त्या शीतज्वरानें तो अतिशय घाबरला. त्याच्या सर्वांगावर रोमांच ताठ उभे राहिले, व अतिशय कंप सुटला. यावेळीं गोविंदस्वामी गाढ निद्रेंत नव्हता तरी हळू हळू त्याचा डोळा लागत होता. अशा संधीस तो मुलगा ज्वरानें पीडित होऊन अगदीं व्याकुळ झाला व त्याणें बापाला हाक मारून जागें केलें. तो ह्मणाला, "बाबा, मला हा शीतज्वर फारच त्रास देत आहे. जवळचीं सर्व पांघरुणें अंगावर घेतलीं तरी थंडी रहात नाहीं. विस्तवा-पुढें खूब शेकावें असें वाटतें; तर अंमळ विस्तव पेटवून मला शेकवा. त्यावांचून माझें हिंव कमी होत नाहीं. नांहीं तर अशा स्थितींत हीं रात्र माझ्यानें काढवेल कीं नाहीं याचा संशयच आहे."

गोविंदस्वामी पुत्राचें भाषण ऐकून व त्याची ती वेदना पाहून फार व्याकुळ झाला. तशा अपरात्रीं विस्तव कोठून मिळणार? तो ह्मणाला, "बाळा, आतां येथें विस्तव कोठून आणावा बरें? तुला मी आपलीं पांघरुणें घालतों त्यांच्या योगानें उबारा येऊन बरें वाटेल."

याप्रमाणें गोविंदस्वामीनें मुलाचें समाधान करण्याचा प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. पांघरुणें पुष्कळ घातलीं तरी त्याची थंडी कमी झाली नाहीं व शेकल्यावांचून आपलें हिंव कमी व्हायचें नाहीं असा त्याणें हट्ट घेतला. गोविंदस्वामी ज्या ठिकाणीं उतरला होता तेथून त्या गांवचें स्मशान जवळच होतें.

स्मशानांत एकदोन प्रेतें जळत असून चितेचा प्रकाश **गोविंदस्वामी** बसला होता तेथून चांगला दिसत होता. पुढें जसें व्हायचें असेल तदनुसार मनुष्याला बुद्धी सुचतात यांत कांहीं संशय नाहीं. तो चितेचा प्रकाश पाहून **विजयदत्त** बापाला ह्मणाला, "बाबा, अग्नी कोठें मिळेल असें ह्मणतां; पण हा पहा जवळच अग्नि मोठा प्रदीप्त झालेला आहे. आतां येथें विस्तव पेटवून तो चांगला रसरशीत होई तोंपर्यंत पुष्कळ वेळ लागेल, व माझ्यानें तर ही थंडी सोसवत नाहीं. याकरितां हळू हळू मला हा समोर अग्नि पेटलेला दिसतो आहे तेथेंच घेऊन चला. तेथें गेलों ह्मणजे मी आपलें अंग खूब तापवून घेईन. आणि हें हिंवही आपोआप नाहींसें होईल. माझ्या अंगांत कांपरें सुटलें आहे, नाहीं तर मी एकटाच गेलों असतों. तुह्मी माझा अंमळ हात धरून मला तेथें पोंचवा ह्मणजे झालें."

पुढें होणाऱ्या विपरीत प्रसंगानें ज्याची प्रेरणा केली आहे असा आपला पुत्र **विजयदत्त** यानें सांगितलेलें ऐकून तो पुत्रवत्सल **गोविंदस्वामी** त्याला ह्मणाला, "अरे बाळा, तूं तेथें घेऊन जा ह्मणतोस खरें; पण तो अग्नि कसला आहे तो तुला समजला आहे का? तें स्मशान आहे, व प्रकाश दिसतो आहे, ती तेथें चिता जळते आहे. तेव्हां जेथें भुतांखेतांचा विशेष संचार अशा भयंकर स्मशानांत कसा जाशील व मी तरी तुला तेथें कसा घेऊन जाऊं? तुझ्यासारख्या लहान मुलाला तेथें नेणें योग्य नाहीं. येथेंच अंमळ थंडी सहन कर ह्मणजे कांहीं वेळानें ज्वर उतरेल. आणि मग तुला थंडी वाजायची नाहीं."

अत्यंत प्रेमळ अशा आपल्या बापाचें हें वाक्य ऐकून तो मुलगा **विजयदत्त** हंसून मोठ्या अवसानानें **गोविंदस्वामी**ला ह्मणाला, "बाबा, तुह्मीं असे भितां काय? त्या तुच्छ भुतांखेतांनीं माझें काय करायचें आहे! मी असा कोणी नेभळा मनुष्य आहें का? भुतें माझ्या समोर तरी येऊं देत ह्मणजे काय आहे तें दाखवीन. तुह्मी तसली भल-

तीच शंका मनांत आणूं नका, आणि बेलाशक मला तेथें घेऊन चला. अंमळ शेक घेऊन मला स्वस्थ होऊं द्या."

याप्रमाणें तो वीर **विजयदत्त** आग्रहपूर्वक आपल्याला तेथें नेण्याविषयीं सांगूं लागला. तेव्हां **गोविंदस्वामीलाही** त्याच्या ह्मणण्याप्रमाणें करावेसें वाटलें, त्याणें **विजयदत्ताचा** हात धरून त्याला सावकास सावकास त्या स्मशानांत जळत असलेल्या चितेच्या जवळ नेऊन उभें केलें. तो मुलगा आपलें अंग यथेच्छ तापवीत चितेच्या जवळ बसला होता, व **गोविंदस्वामी** त्याच्याजवळच उभा होता. इतक्यांत एक मोठा चमत्कार झाला. अग्नीच्या ज्वाला व त्यांबरोबर निघणारा धूर हेच कोणी एक जिचे कुरळ केश आहेत, व जी मनुष्याचें मांस खाऊन फस्त करीत आहे, अशी जणूं काय राक्षसांची मुख्य देवताच; अशी ती चिता धगधगत होती. थोडा वेळ चांगला शेक मिळाल्यावरून **विजयदत्ताचे** हिंव कमी झालें व तो अंमळ स्वस्थ झाला. हा वेळपर्यंत ज्वराच्या वेदनेंत असल्यामुळें त्याला तेथें काय चाललें आहे तें मुळींच ठाऊक नव्हतें. आतां थोडें बरें वाटल्याबरून—त्या चितेंत जळत असलेल्या प्रेताचें कपाळ जळत होतें. व त्याच्या योगानें वरचे निखारे खालीं वर होत होते, तो चमत्कार पाहून **विजयदत्तानें**—"बाबा, हें असें काय हो आहे?" ह्मणून प्रश्न केला तेव्हां **गोविंदस्वामी** ह्मणाला, "मुला येथें जळत असलेल्या मनुष्याचें हें कपाळ नुकतेंच पेटलें आहे व त्यांतल्या रक्तवसा इत्यादिक शिजत आहेत व त्याच्या योगानें वर असलेले इंगळे हालत आहेत."

असें सांगून ते दोघे पिता पुत्र जवळ जवळ उभे राहिले आहेत व **विजयदत्त** चिता जळण्याचा चमत्कार पाहात आहे; तों त्याला एक विलक्षण बुद्धि उत्पन्न झाली. तें जळत असलेलें प्रेताचें कपाळ फोडावें असें त्याच्या मनांत आल्यावरून त्याणें जणों ज्य आपलें साहसच, असें तेथलें एक जळतें लांकूड घेतलें. आणि त्या लांकडानें पोरस्वभावाप्रमाणें

त्या प्रेताचें कपाळ फोडलें ! हा जो त्याणें उपद्व्याप केला त्याचा परिणाम फार विलक्षण झाला. तें कपाळ फोडल्यामुळें त्याच्या आंत जळत असलेल्या वसेच्या चिळक्या फार दूरवर उडाल्या. व त्यांपैकीं एक चिळकी, आपण केलेल्या कृत्याबद्दल हंसत असलेल्या त्या विजयदत्ताच्या तोंडांत पडली ! ती जणूं काय स्मशानांतल्या अग्नीनें राक्षस होण्याची सिद्धिच त्याला दिली असावी! असो. ती वसेची चिळकी तोंडांत पडतांच तिचा त्या मुलानें आस्वाद घेतला, व त्याच्या योगानें तो तत्काळ राक्षस बनला ![1] ज्याचे केंस अगदीं ताठ उभे राहिले आहेत, ज्याच्या मोठमोठ्या लांब दाढा आहेत, ज्यानें हातांत तरवार घेतली आहे; असा तो विजयदत्त राक्षस होऊन, तत्काल मोठ्यानें गर्जना करूं लागला. त्याणें त्या चितेंत जळत असलेल्या प्रेताचें कपाल बाहेर काढून त्यांतली वसा मोठ्या गोडीनें चाटून पार केली. पेटलेल्या हाडासारखी व अत्यंत चंचल अशा त्या आपल्या जिभेनें त्याणें तें प्रेताचें कपाळ बराच वेळ चाटून त्यांत वसा नाहींसी झाली तेव्हां तें खालीं टाकून दिलें. त्यावेळीं त्याला अतिशय भूक लागली होती, ती थोडीशी वसा मिळाली तेवढ्यानें त्याची तृप्ती झाली नाहीं. तेव्हां तो प्रत्यक्ष आपल्या बापालाच खायला तयार झाला. तो राक्षस झालेला मुलगा तरवार उपसून गोविंदस्वामीच्या अंगावर धांवला, तेव्हां त्याच्यावर मोठा आकांत कोसळला. इतक्यांत गोविंदस्वामीच्या आयुष्यानेंच ज्यांला प्रेरणा केली आहे; अशा सर्व भुतांनीं त्या राक्षसाला बोलाविलें. प्रेताचें कपाळ फोडल्यामुळें तो राक्षस झाला; ह्मणून त्याला भुतांनीं

---

१:—विजयदत्त राक्षस बनला याची वाचकांस उपपत्ति कळणार नाहीं, ह्मणून येथें सांगतों. मंत्रशास्त्रांत जे अनेक प्रकार सांगितले आहेत, त्यांपैकींच हा एक आहे. डाकिनी इत्यादिकांच्या ज्या सिद्धी सांगितल्या आहेत त्यांत मुख्यत्वें नरमांसभक्षण सांगितलें आहे. याविषयीं पु. १ जे. २ स, पृ. १२० पासून पुढें सांगितलेली कथा पहावी.

**कपालस्फोट** असेंच नांव दिलें. ते म्हणाले, "हे देवा **कपालस्फोटा**, तूं आपल्या बापाला मारूं नकोस. असा इकडे ये, आह्मी तुझे सेवक असून तुझ्या आज्ञेची वाट पहात आहों."

हें त्या भुतांचें वाक्य ऐकून व **कपालस्फोट** हें नांव प्राप्त होऊन राक्षस झालेला तो मुलगा बापाला सोडून तत्काल गुप्त झाला. इकडे त्याचा बाप **गोविंदस्वामी**, "हे पुत्रा, हे गुणनिधे, हे **विजयदत्ता**, तुझी अशी अवस्था कशी झाली! व तूं मला सोडून कोठें गेलास!" असा आक्रोश करित होत्साता त्या स्मशानांतून निघून पुनः **देवी**च्या मंदिराजवळ प्राप्त झाला. याप्रमाणें रात्रीं चमत्कार झाला होता; तो इतर सर्व मंडळी सुस्त निजली असल्यामुळें कोणालाच कांहीं समजला नाहीं. **गोविंदस्वामी** परत आपल्या बिछान्यावर जाऊन बसला, व ती सारी रात्र चिंता आणि पुत्रशोक यांत त्याणें घालविली.

प्रातःकाल होतांच त्याची स्त्री व वडील मुलगा **अशोकदत्त** यांणीं **विजयदत्ता**ची चौकशी केली. तेव्हां त्यांला एकांतीं नेऊन **गोविंदस्वामीनें** रात्रीं झालेली सर्व हकीकत सांगितली. ती हकीकत एकांतीं सांगण्याचें कारण इतकेंच कीं तेथें आणखी बरेच प्रवासी लोक उतरले होते. व घडलेली हकीकत मोठी चमत्कारिक होती. तेव्हां ती त्यांना सांगितली व त्यांणीं खरी मानिली तर बरें. नाहींपेक्षां हा मनुष्य चेटकी आहे, असा संशय घेऊन ते कदाचित् बिथरले तर उगीच बभ्रा होईल. पुत्राच्या परी पुत्रही गेला व लोकांच्या मनाची खातरी करतां करतां पुरेवाट होईल. ह्मणून त्याणें **अशोकदत्त** व आपली स्त्री यांवांचून बरोबरच्या इतर नोकरलोकांनादेखील तें वर्तमान कळूं दिलें नाहीं.

**विजयदत्ता**ची तशी स्थिती झाल्याचें ऐकून त्याच्या आईला व बंधूला फार दुःख झालें. जशी अकालीं वीज पडावी, तसें हें दुःख त्यांच्यावर कोसळलें. ते तिघेही चिंताक्रांत बसले असून आतां पुढें

काय करावें; तें त्यांला सुचेनासें झालें. इतक्यांत जो तपोनिधि **गोविंदस्वामी**ला वाटेंत भेटला होता, व ज्याणें पुत्राचा वियोग होईल असें भविष्य सांगितलें होतें, तो अकस्मात् तेथें प्रकट झाला. व त्याणें "प्राप्त झालेला प्रसंग फार दुःखकारक आहे; तरी तूं घाबरा होऊं नकोस. लौकरच यांतून तूं पार पडशील व तुला पुन्हां पुत्राचा समागम होईल." असें सांगून **गोविंदस्वामी**चें समाधान करून तो निघून गेला. त्याच्या वचनावर विश्वास ठेवून; **गोविंदस्वामी**नेंही आपल्या मनाचें समाधान केलें.

**गोविंदस्वामी** ज्या **देवी**च्या देवळाजवळ उतरला होता; तें मोठें जागृतस्थान असल्यावरून शहरांतले पुष्कळ लोक **देवी**च्या दर्शनास येत होते. **गोविंदस्वामी**नें **विजयदत्ता**चा कसा चमत्कारिक परिणाम झाला तो प्रकार जरी गुप्त ठेविला होता, तरी तो त्याचा पुत्र नष्ट झाला ही बातमी तेथें जवळ असलेल्या सर्व लोकांच्या लक्ष्यांत आली व त्याबद्दल लोक हळूहळू बोलूं लागले. झाडाखालीं दीन व उदास होऊन बसलेलें हें कुटुंब पाहून **देवी**च्या दर्शनाला आलेले लोक त्यांची वास्तपूस करूं लागले. व पुत्र नष्ट झाला हें ऐकून त्यांलाही फार दुःख झालें. ते आपआपसांत ह्मणूं लागले, "बिचाऱ्या ब्राह्मणानें दुष्काळाच्या त्रासानें स्वदेश सोडला. व लहान लहान मुलें बरोबर घेऊन ह्या परदेशांत आला. येथें तरी त्याला कांहीं सुख लागायचें होतें; पण दुर्दैवानें मुलगाच नाहींसा झाला. कोण अरिष्ट हें! व काय ही संकटाची परंपरा!! दैव एखाद्याच्या पाठीस लागलें ह्मणजे त्याची अगदीं पाठ पुरवितें." याप्रमाणें जमलेले लोक आपआपल्यांत बोलताहेत, व त्यांची काकळुत करताहेत. कोणी त्यांच्या जेवणाखाणाची व्यवस्था कशी लावावी या विचारांत आहेत. कोणी त्यांला राहायला जागा पाहताहेत, असे अनेकांचे अनेक विचार चालले आहेत. इतक्यांत जणूं काय त्यांच्या सुदैवानेंच प्रेरणा केलेला, असा एक गृहस्थ सहज तेथें प्राप्त झाला.

**गोविंदस्वामी**बरोबर एकदोन नोकरचाकर घोडीं वगैरे, असा थो-
डासा परिवार असल्यावरून परकी पाहणाराला त्याचा बराच डौल दिसत
होता. तरी जवळ असलेलें द्रव्य व धान्य वगैरे सर्व त्यानें आपल्या
आप्तइष्टमित्रांला देऊन टाकलें होतें. जें कांहीं थोडेंसें वित्त बरोबर घेऊन
तो परदेशांत निघाला होता, त्यापैकीं बराच मोठा भाग वाटेंत
खर्चला. आतां त्याच्याजवळ ह्मणण्यासारखी कांहीं पुंजी राहिली
न्हती, तथापि तो मोठा विद्वान् असल्यामुळें त्याला निर्वाहाची काळजी
न्हती. आपण आपल्या विद्येवर द्रव्य संपादन करून परदेशांत-
ही खील यथास्थित प्रपंच चालवूं, अशी त्याला मोठी उमेद होती.
तथापि त्याला तशाप्रकारचा कांहीं उद्योग करण्याचा प्रसंगच आला
नाहीं. त्या **देवीच्या** दर्शनाकरतां पुष्कळ लोक येत जात होते, हें
वर सांगितलेंच आहे. त्यांतच **काशींत** राहणारा **समुद्रदत्त** नांवाचा
एक मोठा सावकार दर्शनाला आला होता. तो प्रथम सरळ **देवीच्या**
मंदिरांत जाऊन तेथें पूजाअर्चा वगैरे जें कांहीं करायचें होतें तें क-
रून परत घराकडे जाण्यास निघाला. तेव्हां **गोविंदस्वामी**च्या कुटुं-
बा भोंवती मंडळीचा गराडा पडलेला पाहून हें काय आहे त्याची
चौकशी करावी, ह्मणून **समुद्रदत्त**ही तेथें आला. जमलेल्या लोकांच्या
सांगण्यावरून—**गोविंदस्वामी** हा कोणी मोठा विद्वान् परदेशाहून येथें
आला असून त्याला राहायला जागा वगैरे नाहीं, ह्मणून तो या झा-
डाखालीं उतरला; व गेल्या रात्रीं येथें त्याचा पुत्र नाहींसा झाला, हें
वर्तमान **समुद्रदत्ता**ला समजतांच तो त्या गर्दींतून पुढें गेला. व **गोविं-
दस्वामी**ला विनयपूर्वक प्रश्न करून त्यानें त्याची थोडीशी हकीकत
विचारून घेतली. व यावेळीं आपल्याला मुख्यत्वें कोणत्या गोष्टीची
अडचण आहे? तें विचारून घेऊन तत्काळ तो **गोविंदस्वामी**ला
त्याच्या सर्व मंडळीसहवर्तमान आपल्या घरीं घेऊन गेला. तेथें
यांच्याकरतां एक निराळी जागा नेमून देऊन शिधासामग्री वगैरे

सर्व दिलें, व एकंदरींत त्यांची कोणत्याही प्रकारची अडचण न होईल अशी तजविज ठेविली. वस्तुतः **समुद्रदत्ता**ला तसें करण्याचें कांहीं कारण नव्हतें; पण उदार पुरुषांचा हा स्वभावच आहे कीं, आपल्या शक्तीप्रमाणें होईल तितकें दुसऱ्याला साह्य करावयाचें. **समुद्रदत्तानें गोविंदस्वामी**ची जी व्यवस्था केली ती केवळ निरपेक्षपणानें. हा ब्राह्मण परदेशी असून आपत्तींत पडला आहे, तर कोणत्याही रीतीनें त्याची व्यवस्था लागावी असाच त्याचा हेतू होता.

बिऱ्हाडाची, जेवणाखाण्याची वगैरे नीट व्यवस्था लागली यामुळें एक मोठी काळजी दूर झाली. **समुद्रदत्तानें**—"आपण खुशाल पाहिजे तितके दिवस मनांत कांहीं शंका न ठेवतां आपल्या घरीं रहावें," अशी **गोविंदस्वामी**ला विनंती केली होती. व त्याचें आदरातिथ्य पाहून तोही प्रसन्नअंतःकरणानें त्याच्या घरीं राहत होता. **समुद्रदत्त** वरचेवर त्याचें, व त्याच्या स्त्रीचें समाधान करीत असे, यामुळें **गोविंदस्वामी**ला हळुहळू दुःखाचा विसर पडूं लागला. त्या सत्पुरुषानें 'पुत्राची पुन्हां भेट होईल' असें सांगितलें होतें, त्यावर विश्वास ठेवून तो ब्राह्मण दिवस काढीत होता. तो सावकार **समुद्रदत्त** याच्या आग्रहावरून **गोविंदस्वामी** पुष्कळ दिवस त्याच्याच घरीं राहिला.

या संधींत **गोविंदस्वामी**चा वडील मुलगा **अशोकदत्त** याला तेथल्या एका पाठशाळेंत घालून बापानें त्याचा विद्याभ्यास सुरू केला. यापूर्वी **गोविंदस्वामीनें** त्याला चांगलें पढविलें होतें, तरी आणखी विशेष अभ्यास करण्याकरितां तो मुलगा पाठशाळेंत जात असे. **अशोकदत्ता**ची शरीरसंपत्ति चांगली मजबूत होती. लहानपणापासूनच त्याला कुस्ती खेळण्याचा मोठा नाद होता. त्यासंबंधीं योग्य शिक्षण प्राप्त झालें नव्हतें, तरी तो मुलांमुलांत बाहुयुद्ध करीत असे. **काशी** ही एक मोठें क्षेत्र असून राजधानी होती. तेथें निरानिराळ्या अनेक विद्या शिकण्याची उत्तम सोय होती. त्याप्रमाणें बाहु-

युद्धाचें शिक्षण देण्याचीही शाळा होती. **अशोकदत्त** बापाच्या सांगण्यावरून पाठशाळेंतला अभ्यास वेळच्यावेळीं करून बाकीच्या वेळांत मल्लयुद्ध शिकण्याच्या शाळेंत जात होता. आधींच त्याला त्याची फार गोडी होती, व शरीर ही सुदृढ होतें. त्यामुळें त्या कलेंत तो चांगलाच तरबेज झाला. त्या आखाड्यांत जे इतर तरुण तरुण लोक कुस्ती शिकत असत त्यांच्यांत **अशोकदत्त** हा अगदीं पहिल्या प्रतीचा बाहुयुद्ध करणारा असें सिद्ध झालें. त्या शाळेंत त्याच्या बरोबर कुस्ती खेळणारा दुसरा एकही विद्यार्थी नाहीं असें उघड ठरलें. नंतर **अशोकदत्तानें** त्या शहरांत दुसरे जे मोठमोठे नामांकित मल्ल होते, त्यांच्याशीं दोन हात करून त्याणें त्या कामांत मोठा नांवलौकिक मिळविला. हळुहळू **काशीनगरींत** **अशोकदत्ताच्या** बरोबरीचा दुसरा कोणीच पैलवान् नाहीं, अशी त्याची ख्याती झाली.

एकेदिवशीं त्या शहरांत एक मोठी जत्रा भरली होती. ती प्रतिवार्षिक असून त्या जत्रेच्या मेळ्यांत मोठमोठ्या कुस्त्या दरसाल होत असत. देशदेशांतराहून मोठमोठे नामांकित मल्ल मुद्दाम त्या प्रसंगीं येत असत. त्याप्रमाणें यावर्षींही आले होते. दक्षिणदेशांतून एक मोठा नामांकित मल्ल तेथें आला. इतर देशांतून जे अनेक मल्ल आले होते त्या सर्वांत हा मोठा बलाढ्य व नामांकित होता. **काशीनगराचा** राजा ह्या जत्रेच्या प्रसंगीं मुद्दाम एक आखाडा तयार करून तेथें मल्लांच्या कुस्त्या करवीत असे. त्या राजाच्या पदरीं जेवढे मल्ल होते त्यांच्याशीं देशांतराहून आलेले मल्ल तेथें लढत. बहुत करून **काशि** राजाचे मल्ल बाहेरच्यांला जिंकीत, असें दरसाल होत असे. ही आख्य ऐकूनच दक्षिणदेशांतून तो मोठा नामांकित मल्ल यावर्षी आला होता.

**अशोकदत्त** मल्लविद्येंत मोठा नामांकित झाला होता हें व सांगितलेंच आहे, तरी तो त्या विद्येचा बाणा बाळगीत नव्हता कारण त्याचें घराणें वेदशास्त्रपारंगत असून बाप मोठा विद्वान्. मह

विद्या ही एक दांडगट लोकांची विद्या आहे. केवळ शोकाखातर आपण तिचा अभ्यास केला, व तींत आपण अजिंक्यही झालों तरी तिचा बाणा बाळगावा हें योग्य नाहीं; असें समजून तो तिच्याविषयीं आपली अनास्था आहे असें दाखवित होता. संप्रदायाप्रमाणें यावर्षी यात्रेंत राजानें मल्लांच्या कुस्त्या सुरू केल्या. काशिराजाजवळ जितके तैनाती मल्ल होते, तितकेही दक्षिणेंतून आलेल्या मल्लाशीं लढले; पण त्याणें त्या सर्वांचा पराभव केला. काशीचा राजा प्रतापमुकुट याला आपल्या समक्ष आपल्या सर्व मल्लांची दुर्दशा झाली ही गोष्ट फार लज्जास्पद वाटली. अशोकदत्त त्या विद्येचा बाणा बाळगीत नव्हता तरी तो त्या कामांत मोठा प्रवीण आहे ही गोष्ट राजाला ठाऊकच होती. इतर सर्व मल्लांचा पराभव झाला; तेव्हां आपली अब्रु जाईल असें समजून राजानें अशोकदत्ताला आग्रहपूर्वक आपल्या जवळ बोलावून आणवून कसेंही करून यावेळीं कुस्तीला उभें राहण्याविषयीं फार आग्रह केला. तशा मोठ्या समाजांत बाहुयुद्ध करून नांव मिळवावें हें अशोकदत्ताला इष्ट वाटत नव्हतें व ह्मणूनच तो त्या प्रसंगांत पुढें आलादेखील नव्हता. तरी राजाच्या आग्रहास्तव तो कुस्ती खेळायला तयार झाला. पैलवानांच्या रीतीप्रमाणें अशोकदत्तानें दक्षिणेंतून आलेल्या त्या विजयी मल्लाला त्याच्या नांवानें हांक मारिली व "यापूर्वी जसा तूं इतर मल्लांचा पराभव केलास तसाच माझाही पराभव करशील असें समजूं नकोस. मोठ्या सावधगिरीनें माझ्याशीं कुस्तीला ये" असें ह्मणाला.

अशोकदत्ताचें हें भाषण ऐकून तो विजयी झालेला भुज नांवाचा मल्ल मोठ्या ताठ्यानें त्याला उत्तर देऊन अशोकदत्ताची त्यानें कांहींशी थट्टाही उडविली. याप्रमाणें प्रथम थोडा वेळ वाग्युद्ध करून नंतर त्या वीरांनीं बाहुयुद्ध करायला आरंभ केला. भुजानें पहिल्या सपाट्यासरशीं अशोकदत्ताला खालीं पाडलें व तो त्याच्या छातिवर बसला.

राजा **प्रतापमुकुट** व इतर सर्व प्रेक्षक यांला यावेळीं फार वाईट वाटलें. कारण, सर्वांला **अशोकदत्ता**चा मोठा भरंवसा होता. व तो आपल्या शहराची अब्रु राखील; अशी विशेष खात्री होती. **भुजानें** त्याला खालीं पाडला; तेव्हां सर्व लोकांच्या तोंडांतून, "अरेरे! हाय! हाय! धिक् धिक्! असे" दुःखाचे व दिलगिरीचे उद्गार निघाले. तेव्हां सर्वांचें समाधान करावें म्हणूनच कीं काय, **अशोकदत्तानें** तितक्यांतले तितक्यांत संधी साधून आपला एक पाय चट्कर **भुजाच्या** गळ्यांत घातला; व त्याला ओढून उताणें पाडलें. **भुजाला** पाडून **अशोकदत्त** उठून उभा राहिला, तेव्हां प्रेक्षकांच्या तोंडांतून "वाहवा! शाबास!" असे शब्द निघाले. **अशोकदत्त** त्याच्या छातीवर बसणार इतक्यांत तो **भुज**ही उठून उभा राहिला. तेव्हां पुन्हां त्यांची झोंबी चालू झाली. आणखी बराच वेळ त्याच्याशीं डावपेच करून **अशोकदत्तानें** चटकन् एका हातानें त्याचा गळा दाबून धरून दुसरा हात गुडघ्याच्या संधीस घालून, त्या शूर पुरुषानें त्या **भुजाला** अलग उचललें; व "घे आतां आपल्या गर्वाचें फळ," असें बोलून धाडकन् फेंकून दिलें. त्या खेळण्याच्या जागीं पडलेल्या मल्लाला इजा होऊं नये म्हणून पुष्कळ रेती घातलेली होती. तरी **अशोकदत्तानें भुजाला** फेंकला तो, खेळण्याकरतां म्हणून जो मध्यें खांब रोंवला होता; त्यावर त्याचें डोकें आपटून, मर्मस्थानीं लागल्यामुळें तत्काल त्याचा प्राण गेला.

यांप्रमाणें त्या मोठ्या बलाढ्य मल्लाचा नाश होतांच, जणूं काय त्या युद्धभूमीनें देखील शाबसकी दिली आहे, असा जिकडे तिकडे टाळ्यांचा गजर होऊन, प्रेक्षकमंडळींत धन्यवाद उत्पन्न झाला. त्या समाजांत— "शाबास, शाबास **अशोकदत्ता**!!! तूं आज कमाल केलीस. तुझ्यासारखा योद्धा होता, म्हणून आज या नगरीची अब्रू बचावली. नाहींपेक्षां या **भुजानें** सर्वांला जिंकलें होतें," याप्रमाणें जिकडे तिकडे लोक **अशोकदत्ता**ची तारीफ करूं लागले. राजा **प्रतापमुकुट** फारच खुष

झाला. **त्यानें अशोकदत्तावर** सुवर्णाच्या व रत्नांच्या अलंकारांची जणूं काय वृष्टीच केली. राजानें इतकीं असंख्य त्याला इनामें दिलीं, व त्या त्याच्या पराक्रमानें संतुष्ट होऊन त्याला आपला पार्श्ववर्ति अर्थात् नेहमीं बरोबर राहणारा केलें. उघडच आहे; राजेलोकांच्या प्राणांला नेहमीं अनेक अपाय होण्याचा संभव असतो. त्यांच्या हातून कोणाचें कल्याण होतें, कोणाचें अकल्याण; कोणावर मर्जी, कोणावर गैर मर्जी; अशा राजकीय संबंधांत अनेक गोष्टी होत असल्यामुळें, त्यांचे शत्रूही पुष्कळ असतात. याकरितां सर्वकाळ त्यांचें रक्षण करणारे असे विश्वासू व शूर पुरुष नेहमीं त्यांच्याबरोबर असावे लागतात. **अशोकदत्ताचें** सामर्थ्य प्रत्यक्ष राजानें पाहिलेंच होतें. व तो इमानी आहे, अशीही त्याणें आपल्या मनाची खात्री करून घेतली. ह्मणून त्याच्यावर पूर्ण विश्वास ठेवून सर्वकाळ तो त्याला आपल्या बरोबर ठेवूं लागला.

**राजा**चा प्रसाद हा कांहीं सामान्य असावयाचा नाहीं. **अशोकदत्ता**वर राजाची विशेष मर्जी बसल्यामुळें तो नेहमीं त्याला मोठमोठ्या देणग्या देऊं लागला. **अशोकदत्त** राजाकडून जें द्रव्य मिळे तें आणून आपल्या बापाजवळ देत असे, व बाप सांगेल त्याप्रमाणें खर्चवेंच करी. त्यामुळें लौकरच त्याच्याजवळ पुष्कळ द्रव्य जमलें. शूर अथवा विद्वान् पुरुषाच्या योग्यतेची परीक्षा करून त्यांचें गौरव करणारा ह्मटला ह्मणजे एक राजाच होय. राजावांचून तसल्या गुणी पुरुषांला संभाळण्याचें दुसऱ्या कोणाचें सामर्थ्य असणार? तात्पर्य जो **अशोकदत्त समुद्रदत्तानें** दिलेल्या अन्नावर निर्वाह करीत होता; तोच आपल्या शौर्यानें राजाच्या गळ्यांतला ताईत होऊन त्याच्या कृपेनें मोठा धनाढ्य झाला. **गोविंदस्वामी**ला **अशोकदत्ता**चें ऐश्वर्य पाहून फार आनंद झाला. तथापि त्याला **विजयदत्ता**विषयीं मोठी काळजी लागली होती. व त्याचा कांहीं शोध लागत नाहीं, ह्मणून तो फार कष्टी होता. पण लौकरच ईश्वरकृपेनें **विजयदत्ता**चीही पुन्हां भेट होण्याचा समय प्राप्त झाला.

मांत्रिक लोक बहुतकरून चतुर्दशीच्या दिवशीं विशेष प्रकारची पूजा करीत असतात. त्यांच्या संप्रदायाप्रमाणें चतुर्दशी ही तिथि मोठी पवित्र मानिली आहे. राजा **प्रतापमुकुट** हा जारण मारण वगैरे मांत्रिकांचीं भयंकर कर्मे करण्याची इच्छा करणारा नव्हता, तरी एकंदरींत तो तांत्रिक संप्रदायांत होता. एकेदिवशीं चतुर्दशी तिथि प्राप्त झाली असून, त्या दिवशीं राजा कांहीं पूजा अर्चा करण्याकरितां गांवाच्या बाहेर व स्मशानाच्या अगदीं जवळ जें **शंकराचें** मंदिर होतें, तेथें रात्रीच्या समयीं गेला. त्या **शिवालयांत** जाण्याची वाट स्मशानावरूनच होती. राजा त्या मंदिराकडे गेला त्यावेळी संध्याकाळचा समय असल्यावरून त्याणें इतर कोणाकडे लक्ष्य न देतां, प्रथम पूजा-अर्चा वगैरे जें कांहीं करायचें होतें तें आटपलें. नंतर तो परत आपल्या वाड्यांत जात असतां स्मशानांतून पुढें लिहिल्याप्रमाणें कोणीं भाषण केल्याचें त्याच्या कानावर आलें. "येथल्या कोतवालानें, त्याच्या आप्तां पैकीं एकानें अपराध केला; असें मीं खोटेंच वर्तमान सांगितल्यावरून माझ्याशीं द्वेष धरून, माझ्यावर दुसऱ्या कोणा मनुष्याचा वध केल्याचा खोटाच आरोप ठेवून न्यायाधीशाकरवीं, मला देहान्त शिक्षा देवविली; व तीप्रमाणें मला येथें सुळावर चढविलें. त्याला आज तीन दिवस झाले. राजा, माझी कोणी चौकशी करीत नाहीं. मी निरपराधी असून ही शिक्षा भोगीत आहें. तीन दिवस झाले, तरी अद्याप माझ्या पूर्वजन्मींच्या पापानें माझे प्राण जात नाहींत. महाराज, मी अत्यंत तान्हेलों आहें. तर कृपा करून मला कोणाकडून तरी पाणी देववा."

हे शब्द ऐकून **राजाला** मोठी दया आली. यावेळीं राजाच्या बरोबर **अशोकदत्त** व इतर बरेच सेवक होते. **अशोकदत्त** त्यांतला मुख्य असल्यावरून **राजा** त्याला ह्मणाला, "शूरा **अशोकदत्ता**, यावेळीं हें काम कोण करील बरें? तो बिचारा प्राणी पाण्यावांचून तळमळत आहे तर त्याला तूं कोणाकडून तरी पाणी नेऊन देवीव."

हें ऐकून **अशोकदत्त** ह्मणाला; "महाराज, अशा रात्रीच्या प्रसंगीं, जेथें भुतांखेतांचा संचार आहे अशा स्मशानांत त्याला पाणी कोण नेऊन देणार आहे ! याकरितां मी स्वतःच पाणी घेऊन जातों. दुसऱ्या कोणाला आग्रह करून उपयोग नाहीं."

हें त्याचें सांगणें राजा **प्रतापमुकुटानें**ही मान्य केलें. व पाणी घेऊन जाण्याविषयीं त्याला आज्ञा दिली. तेव्हां **अशोकदत्त** पाण्याचें एक भांडें भरून घेऊन थेट, तो सुळावर चढविलेला मनुष्य ओरडत होता त्या ठिकाणीं गेला. इकडे राजा **प्रतापमुकुट** बरोबरच्या मंडळीसह आपल्या वाड्यांत निघून गेला. तो साहसी **अशोकदत्त** त्या भयंकर स्मशानांत शिरला तेव्हां अंधकारानें तो सर्व प्रदेश जणूं काय गिळूनच टाकला होता. जिकडेतिकडे प्रेतांचीं हाडें पडलेलीं असून भालुका मोठ्या आनंदानें प्रेताचें मांस तोडतोडून खात आहेत, व मोठ्यानें गर्जना करित आहेत. पुष्कळ प्रेतें, भुतें, डाकिनी शाकिनी इत्यादिकांचा मोठा मेळा जमला असून, कोणी नाचताहेत, कोणी हंसताहेत, कोणी भयंकर आवाज करताहेत, मधून मधून जळत असलेल्या चितांच्या प्रकाशानें दिवे लागल्यासारखें दिसत आहे; त्यांतच वेताळमहाराजांची स्वारी अनेक भुतां खेतां सहवर्त्तमान वाजत गाजत मोठ्या थाटानें चालली आहे; अशा त्या भयंकर स्मशानांत एखादा साधारण मनुष्य असता, तर त्याचे केव्हांच प्राण गेले असते. पण त्या **अशोकदत्ताला** त्याची कांहींच पर्वा वाटली नाहीं. तो खुशाल स्मशानांत जाऊन मोठ्यानें ओरडून ह्मणाला, "अरे, येथें **राजा**जवळ कोणीं पाणी मागितलें तें सांगा; **राजाच्या** आज्ञेवरून हा पहा मी पाणी घेऊन आलों आहें."

हें त्याचें भाषण ऐकून तेथें जवळच सुळावर चढविलेल्या मनुष्यानें "हो हो, मी मागितलें होतें. तुह्मी पाणी आणलें हा मजवर मोठा अनुग्रह केला. कृपा करून माझ्या हातांत आणून द्या," असें ह्मटलें.

याप्रमाणें त्याणें सांगितलेलें ऐकून त्याच्या आवाजाच्या धोरणानें—तो अमक्या दिशेला असेल असें जाणून—अशोकदत्त त्या ठिकाणीं गेला. त्या गुडुप अंधारांत सुळावर चढावलेला मनुष्य त्याला दिसला नसता; पण त्याच्या जवळच एक चिता जळत होती तिच्या प्रकाशानें सुळावर चढविलेला कोणी एक मनुष्य आहे; असें त्याच्या दृष्टीस पडलें. यावेळीं तेथें दुसराच एक मोठा चमत्कार अशोकदत्ताच्या पाहण्यांत आला. सुळाच्या अग्रावर असलेला मनुष्य पाणी पाणी करून विव्हळत आहे व त्याच्या खालीं उत्तम अलंकारांनीं भूषित व आजपर्यंत तशाप्रकारची कधींच दृष्टीस न पडलेली, सर्वांगसुंदर अशी एक स्त्री रडत असलेली अशोकदत्तानें पाहिली. तो कृष्णपक्ष असल्यामुळें रजनीपति (चंद्र) अस्ताला (नाशाला) गेला ह्मणून त्याच्या किरणांनीं रम्य दिसणारी रात्रिरूपिणी त्याची स्त्री जणूं काय चितंत प्रवेश करण्याकरितांच आली आहे; अशा त्या रडणाऱ्या स्त्रीला पाहून अशोकदत्त तिला ह्मणाला, "बाई, तूं कोण आहेस? आणि येथें रडत कां बसलीस? तें गुह्य नसेल तर मला सांग."

अशोकदत्ताचा हा प्रश्न ऐकून ती ह्मणाली; "सत्पुरुषा, बाबा तुला काय सांगूं! ह्यासुळावर दिलेल्या पुरुषाची मी बायको आहें. याच्या मरणानें आतां मला वैधव्य प्राप्त होणार आहे. तेव्हां तशा दुःखकारक स्थितींत वांचणें योग्य न वाटल्यावरून, व पतिवियोग माझ्यानें सहन करवत नाहीं ह्मणून; मी याच्या प्रेतासह चितेवर आरोहण करावें असा निश्चय करून येथें उभी आहें. याचे प्राण लौकर जातील असें वाटलें होतें ह्मणून मी येथेंच वाट पहात बसलें; पण आज तीन दिंवस झाले असूनही अद्यापि याचे प्राण जात नाहींत! हा वरचेवर पाणी मागतो. मी याच्याकरतां पाणी घेऊन आलें आहें. हें पहा, माझ्या हातांत पाणी आहे; पण करूं काय. हा या उंच सुळावर असल्यामुळें माझा हात तेथपर्यंत पोंचत नाहीं व यालाही खालीं येतां येत नाहीं; यामुळें मी फार दुःखी झालें आहें."

हें त्या स्त्रीचें भाषण ऐकून तो महावीर **अशोकदत्त** तिला ह्मणाला, “याणें आक्रोश करून सांगितल्यावरून, **राजानें** माझ्या हातीं याच्याकरतां हें उदक पाठविलें आहे ; पण ज्यापेक्षां तूं या पुरुषाची **स्त्री** आहेस, त्यापेक्षां तूंच आपल्या हातानें याला पाणी पाज. तुझा हात तेथपर्यंत पोंचत नसला तर माझ्या पाठीवर पाय देऊन उभी रहा आणि याच्या तोंडांत पाणी दे. यद्यपि परपुरुषाचा स्पर्श करणें, हें स्त्रियांला दूषण आहे, तथापि अशा आपत्कालीं तसें करण्यास कांहीं हरकत नाहीं व त्याला दूषणही ह्मणतां येत नाहीं.”

**अशोकदत्ता**चें हें सांगणें मान्य करून, ती **स्त्री** त्याच्या पाठीवर चढली. **अशोकदत्त** त्या शूळाच्या जवळ वांकून उभा राहिला होता. त्याला—दृष्टी खालीं झाल्यामुळें—वर काय चाललें आहे तें दिसत नव्हतें. ती **स्त्री** त्याच्या पाठीवर चढून एकदम ज्या पुरुषाला सुळावर चढविलें होतें, त्याचे एक एक अवयव सुरीनें कापून खाऊं लागली ! तिणें अवयव कापल्यामुळें रक्ताचे थेंब टप टप खालीं पडूं लागले. त्याला पाणी पाजित असून, हे रक्ताचे थेंब खालीं कसे पडतात ? याविषयीं **अशोकदत्ता**ला संशय आला, व मान वांकडी करून त्याणें वर पाहिलें. तों ती भयंकर **स्त्री** सुळावर चढविलेल्या माणसाचे मांस खात आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. हें तिचें आसूरी कृत्य पाहतांच **अशोकदत्तानें** तत्काल आपलें अंग तिच्या पायांखालून काढून घेतलें. त्याबरोबर, जिच्या पायांतील पैंजणांचा आवाज झाला आहे, अशी ती **स्त्री** एकदम खालीं पडली. **अशोकदत्तानें** तत्काळ तिची तंगडी धरली ; व तो तिला राक्षसी समजून आतां जमीनीवर आपटून मारणार, इतक्यांत एक हिसका मारून तिणें आपला पाय त्या वीराच्या हातांतून सोडून घेतला. व तत्काल मायेनें आकाशांत उडून गेली, ती क्षणमात्रांत कोठें दिसेनाशी झाली.

तिणें **अशोकदत्ता**च्या हातांतून आपला पाय हिसकून घेतला; त्या-

बरोबर तिच्या पायांतला एक पैंजण त्याच्या हातांत राहिला. नंतर प्रथम सुंदर दिसणारी, व मध्यें नम्र करणारी, आणि शेवटीं भयंकर विकार उत्पन्न करणारी, जणूं काय दुर्जनाची संगतीच, अशी ती स्त्री नाहींशी झाली असून, तिच्या पायांतला दिव्य पैंजण मात्र आपल्या हातांत राहिला. तेव्हां एकंदरींत हा काय चमत्कार आहे याविषयीं **अशोकदत्त** मोठ्या अचंब्यांत पडला. यावेळीं त्या स्त्रीच्या कृत्याचा त्याला मोठा विस्मय वाटला. बिचाऱ्या ज्या दीन मनुष्याला आपण पाणी देण्याकरितां आलों होतों, तें तर त्याला मिळालें नाहींच; पण आपल्या अज्ञानानें त्याचा नाश मात्र झाला, याबद्दल त्याला मोठा पश्चात्ताप झाला. व तो दिव्य पैंजण आपल्या हातांत राहिल्यामुळें; कांहींसा हर्षही झाला. ती स्त्री त्या मनुष्याची बायको नसून कोणी तरी **यक्षिणी** अथवा **राक्षसी** असावी अशी त्याची खात्री झाली. आपण तिच्या विषयीं विशेष विचार न करितां तिच्या सांगण्यावर विश्वास ठेवला ही गोष्ट त्याच्या मनाला फार लागली. तथापि, झालेल्या कृत्याबद्दल आतां कांहीं उपाय नाहीं असें समजून तो पैंजण हातांत घेऊन विस्मित होत्साता त्या स्मशानांतून निघून परत आपल्या राहण्याच्या ठिकाणीं गेला.

या वेळीं रात्र थोडीच राहिली होती. **अशोकदत्ताला** विस्मय, पश्चात्ताप व हर्ष अशा तीन विकारांनीं घेरलें असल्यामुळें, त्याला निद्रा मुळींच आली नाहीं. बिछान्यावर पडून तो झालेल्या गोष्टीविषयीं अनेकप्रकारचे तर्क करीत होता. प्रातःकाल होतांच स्नानसंध्या वगैरे नित्यनेम आटपून, तो राजवाड्यांत गेला. राजाला रात्रीं काय काय झालें, तें ऐकण्याची मोठी उत्कंठा लागली होती. 'आपण **अशोकदत्ताला** तशा भयंकर स्मशानांत जाऊं दिलें हें चांगलें केलें नाहीं. कदाचित् त्याचा नाश होईल; तर मोठा शूर व इमानी असा एक आपला सरदार विनाकारण आपण मृत्युच्या मुखांत ढकलून दिला असें होईल.'

या गोष्टीची राजाला मोठी काळजी लागली होती. तथापि, **अशोकदत्त** हा शूर व मोठा साहसी आहे. तो त्या प्रसंगांतून पार पडेल' असेंही त्याला वाटत होतें. जीवंत राहिला तर सकाळीं आपल्याकडे आल्यावांचून राहणार नाहीं; असें समजून तो त्याची वाट पहात होता. इतक्यांत **अशोकदत्त**ही जाऊन पोंचला. तेव्हां "आलास? बरें झालें. माझा जीव बिनघोर झाला. बरें पण रात्रीं काय काय झालें.? त्या सुळावर चढविलेल्या मनुष्याला तूं पाणी नेऊन दिलेंस काय?" असा राजानें त्याला प्रश्न केला. तो ऐकून **अशोकदत्तानें**, "होय महाराज, आपल्या हुकुमाप्रमाणें मी पाणी घेऊन गेलों होतों." असें सांगून त्या स्त्रीच्या पायांतला पैंजण जो त्यानें आणला होता, तो राजाच्या हातांत दिला. तो दिव्य अलंकार पाहून राजाला मोठें आश्चर्य वाटलें. व त्याणें "हा कोठून आणलास?" ह्मणून त्याला विचारिलें; तेव्हां **अशोकदत्तानें** अद्भुत असून भयंकर असा, गेल्या रात्रीं जो वृत्तांत झाला तो राजाला सविस्तर निवेदन केला. तो ऐकून राजा **प्रतापमुकुट** फारच खुष झाला. असाधारण असें त्याचें धैर्य अवलोकन करून त्याला मोठें आश्चर्य वाटलें. तो मूळपासून **अशोकदत्ताच्या** शौर्याविषयीं व धैर्याविषयीं तारीफ करितच होता; व त्याच्यावर त्याची मोठी मेहेरबानीही होती. तरी यावेळीं त्यानें जें मोठें कृत्य केल्याचें वर्तमान सांगितलें, तें ऐकून राजाला विशेष आनंद झाला. व त्याबद्दल त्यानें त्या शूर पुरुषाला मोठी देणगी देऊन त्याचें फार गौरव केलें.

**अशोकदत्तानें** दिलेला पैंजण घेऊन राजा लौकरलौकर जनानखान्यांत गेला, व त्याणें तो आपली आवडती राणी **सुमनोवती** हिला दिला. ता रत्नखचित पैंजण पाहून राणीला फार आनंद झाला. व ती मनांत त्याची अतिशय तारीफ करून फार फार आभारी झाली. राणीची मर्जी प्रसन्न झाली आहे असें पाहून राजा ह्मणाला, "प्रिये, त्या **अशोकदत्ताची** तारीफ काय सांगूं. तो ब्राह्मण असल्यामुळें जातीनें वर इतर सर्वांहून

श्रेष्ठ आहेच. विद्वत्ता म्हणशील तर तीही असाधारण आहे. सत्व तर त्याचें अवर्णनीयच आहे. कारण त्यानें काल जें साहसाचें कृत्य केलें तें दुसऱ्या कोणत्याही मनुष्याच्या हातून होण्याचा संभव नाहीं. त्याचें सामर्थ्य, तो दक्षिण देशांतून आलेला भुज नांवाचा मल्ल ज्या दिवशीं त्याणें मारला, त्या दिवशीं सर्व शहराला विदित झालेंच आहे. रूपानें तर तो अप्रतिमच आहे. त्याच्या अंगीं जसे हे गुण आहेत; तसेंच दाक्षिण्यही विशेष आहे. तात्पर्य, उत्तम मनुष्याच्या अंगीं जेवढे गुण अवश्य असले पाहिजेत, तेवढे सर्व त्या अशोकदत्ताच्या अंगीं आहेत. यामुळें तो मोठ्यांपेक्षांही मोठा, असें ह्मणण्यास कांहीं हरकत नाहीं. त्याला आठवून माझ्या मनांत एक गोष्ट येते; पण ती तुला मान्य होईल कीं नाहीं कोणास ठाऊक. आपली मुलगी मदनलेखा आतां विवाहाला योग्य झाली आहे. ती सर्वगुणसंपन्न असल्यामुळें तिच्या जोगता नवरा कसा मिळेल याची मला मोठी काळजी लागली आहे. तेव्हां मला असें वाटतें कीं, ती मदनलेखा जर अशोकदत्ताला दिली, तर सर्वप्रकारें चांगलें होईल.

मी तुला अगदीं खात्रीपूर्वक सांगतों कीं, आपल्या कन्येला अशोकदत्तासारखा दुसरा कोणताही योग्य वर मिळावयाचा नाहीं. आतां तूं कदाचित् असें ह्मणशील कीं, 'त्याच्याजवळ धन दौलत कितीशी आहे?' तर ती गोष्ट मात्र कमी आहे. तो माझ्या पदरीं राहिल्यापासून मी त्याला पुष्कळ द्रव्य दिलें आहे. व आतां द्रव्याच्या संबंधानें त्याची स्थिति पूर्वीपेक्षां बरी आहे; तथापि तो कांहीं राजा किंवा राजपुत्र नाहीं, हें अगदीं उघड आहे. पण त्याची गरज तरी काय? वराची निवड करतेवेळीं त्याच्या अंगीं उत्तम गुण आहेत किंवा नाहींत हेंच पाहिलें पाहिजे. लक्ष्मीचें काय, ती क्षणभंगुर आहे. मोठमोठे राजपुत्रदेखील धुळीचे दिवे खात देशोधडीस भटकताहेत. तेव्हां मुख्यत्वें गुणांवरच दृष्टि दिली पाहिजे. मी जें त्याचें वर्णन केलें त्यावरून त्याच्या अंगीं अप्रतिम गुण आहेत हें तुलाही मान्य होईलच. याकरतां माझ्या

मनांत असें आलें आहे कीं, त्या शूर व गुणी पुरुषाला आपली मुलगी द्यावी; यावर तुझें काय ह्मणणें आहे तें सांग. ? ”

भर्त्याचें हें वचन ऐकून राणी मोठ्या आनंदानें आदरपूर्वक ह्मणाली, “आर्यपुत्र, आपण जी गोष्ट मनांत आणिली आहे ती युक्तच आहे. तो तरुण व गुणवान् पुरुष आपल्या **मदनलेखेला** अनुरूप पति आहे, असें मलाही वाटतें. याशिवाय दुसरी एक गोष्ट माझ्या कानांवर आली आहे. ती मी हावेळपर्यंत आपल्याला कळविली नाहीं; तरी पण आतां सांगतें. एकेदिवशीं **मधूद्यान** नावांच्या आपल्या बागेंत कांहीं उत्सवाच्या निमित्तानें आपली **मदनलेखा** गेली होती, व सख्यांसहवर्त्तमान ती तेथें संचार करीत असतां, आतां आपण ज्याचें नांव सांगितलें त्याच **अशोकदत्तावर** तिची दृष्टि गेली. तेव्हांपासून तिचें मन त्याणें हरण केलें आहे. आतांशा तिची स्थिति कांही चमत्कारिक झाली आहे. तिचें मन मुळींच ठिकाणावर नाहीं. कोणी कांहीं सांगितलें तर त्याच्याकडे तिचें लक्ष नसतें. कांहीं पहात नाहीं, कांहीं बोलत नाहीं, अशी ती आपली वेड्यासारखी असते. ही तिची स्थिती तिच्या सख्यांनीं मला सांगितल्यावरून आतां याविषयीं काय उपाय करावा या विचारांत मी पडलें होतें.

काल पहाटे मला एक स्वप्न पडलें. मी निजलें होतें त्या ठिकाणीं कोणी एक स्त्री येऊन तिणें मला असें सांगितलें कीं, “वत्से, ही तुझी कन्या **मदनलेखा** दुसऱ्या कोणाला देऊं नकोस. त्या **अशोकदत्तालाच** दे. पूर्वजन्मींची ही त्याचीच स्त्री आहे. याकरितां दुसऱ्याला देण्याचा विचार करूं नको.” असें सांगून ती दिव्य स्त्री अदृश्य झाली, व तत्काळ मीही जागी झालें. आणि **मदनलेखेजवळ** जाऊन स्वप्नांत दिव्य स्त्रीनें सांगितलेल्या संबंधावर भरंवसा ठेवून मी त्या मुलीचें समाधान केलें व तुझा मनोरथ पूर्ण होईल. तूं कांहीं काळजी करूं नकोस अशी तिची खात्री केली. त्याप्रमाणें आपणही आतां तीच गोष्ट

काढलीत तेव्हां हे सर्व योगायोग अगदीं एकसारखे जमून आल्यामुळें मला हा संबंध व्हावा, हें फारच इष्ट वाटतें. जशी एकाद्या वृक्षाशीं ऋतुकालीं उत्पन्न झालेली वेल संगत होते त्याप्रमाणें **मदनलेखा अशोकदत्ताशीं** संगत होवो, असें मी इच्छितें."

राणीचें याप्रमाणें भाषण ऐकून राजा **प्रतापमुकुट** फार संतुष्ट झाला. गेल्या रात्रीं **अशोकदत्तानें** जें साहस केलें होतें त्याबद्दल राजानें त्याला पुष्कळ मौल्यवान् वस्तू इनाम दिल्याहोत्या; तरी तेवढ्यानें आपण त्याच्या ऋणांतून पार पडलों असें त्याला वाटलें नाहीं. तो कांहींतरी असाधारण देणगी द्यावी, असा विचार करित होता. व ह्मणूनच त्याणें आपलें कन्यारत्न देऊन त्याच्यावर जी आपली मेहेरबानी झाली तिचें सार्थक करण्याचा विचार केला.

राजानें **गोविंदस्वामी**ला आपला विचार कळवून मुहूर्तनिश्चय करून लग्नाची कडेकोट तयारी केली, व मोठ्या समारंभानें आपली कन्या **मदनलेखा अशोकदत्ता**ला यथाविधि दिली. ती राजकन्या व तो ब्राह्मणपुत्र **अशोकदत्त** या उभयतांचा समागम परस्परांच्या शोभेला कारण झाला. लक्ष्मी व विनय यांचा समागम जसा अन्योन्यशोभादायक होतो; ह्मणजे लक्ष्मीनें विनय शोभतो व विनयानें लक्ष्मी शोभते, त्याप्रमाणें **मदनलेखा** आणि **अशोकदत्त** यांचा समागम झाला. **अशोकदत्त** राजकन्या स्त्री प्राप्त झाल्यामुळें, मोठ्या आनदांत सुखाचा उपभोग करूं लागला. तरी त्याच्या हातून आणखी मोठमोठ्या साहसाच्या गोष्टी व्हायच्या होत्या. व बंधूचा समागम होऊन त्याच्याकडून बापाला सुख मिळायचें होतें. तो समय लौकरच प्राप्त झाला.

**अशोकदत्तानें** आणलेला पैंजण राजानें आपल्या राणीला दिला होता, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्या अप्रतिम दागिन्याची जोडी पाहिजे होती. तो एकच असल्यामुळें, राणीला तो जरी प्रिय वाटत होता, तरी ती तो कधीं अंगावर धारण करित नव्हती. कारण एका पायांत तसा

तो बहुमोल दागिना घालावा व दुसरा पाय बुच्चा ठेवावा; किंवा त्यां
कसला तरी दुसरा हलक्या प्रतीचा पैंजण घालावा याची तिला ला
वाटत असे. बायकांला दागिन्यांची विशेष आवड असते, हें अग
प्रसिद्धच आहे. एकेदिवशीं राणी राजाला सहज विनोदानें ह्मणाल
"आर्यपुत्र, आपण हा एकच पैंजण आणून दिला, हा मला नाह
चांगला वाटत. याच्या जोडीचा दुसरा असला तर याचा उपयोग. ह
एकच घेऊन काय करायचें आहे? तर कसेंही करा; पण मला याच्य
जोडीचा पैंजण पैदा करून द्या."

राजाला तो पैंजण कोणत्या रितीनें आला होता, हें माहीत
होतें. तेव्हां जेथून हा एक आला तेथून दुसरा येण्याचा कांहीं संभ
नाहीं, असें समजून त्याणें चांगल्या चांगल्या नामांकित कारागीर सो
नारांला बोलावून, "तुह्मी काय मागाल तें देतों; पण याच्या जोडीच
दुसरा पैंजण करून द्या." ह्मणून सांगितलें. सोनारांनीं तो इकडेतिकं
खालींवर परतून नीट रेखून पाहिला; पण तशा प्रकारचा आपल्य
हातून होईल; असें एकाही कारागिराला वाटलें नाहीं. ते ह्मणाले, "स
रकार, आपण आज्ञा कराल तर दुसऱ्या पाहिजे त्या तऱ्हेचा पैंज
आह्मी करून देऊं; पण याप्रकारचा आमच्या हातून मुळींच व्हायच
नाहीं. ही कारागिरी मनुष्यांची नसून साक्षात् देवांचें हें कौशल्य आहे
तेव्हां आमच्या हातून तसें कसें होईल! ह्यांत जीं रत्नें बसविलीं आहे
तशाप्रकारचीं या सर्व भूमंडळावर फारच थोडीं कोठें असलीं तर अस
तील. याकरितां याच्यासारखा आमच्या हातून होणार नाहीं. आपल्या
ला याच्या जोडीचा पाहिजे असेल तर जेथून हा आपल्याकडे प्रा
झाला तेथेंच शोध केला पाहिजे."

राणीला कारागीर लोक तसा दुसरा करून देतील असें वाटं
होतें. पण त्यांनीं हात पाय गाळलेले पाहून तिची अगदीं नि
राशा झाली. व तिला विषाद वाटल्यावरून राजालाही फार विषा

वाटला. **अशोकदत्त** यावेळीं तेथें जवळच होता. राजा व राणी हीं उभयतां खिन्न झालीं हें पाहून तो पुढें होऊन ह्मणाला, "त्याची इतकी काळजी ती कशास पाहिजे? मीच याच्या जोडीचा दुसरा पैंजण घेऊन येतों; आपण कांहीं काळजी करूं नये." याप्रमाणें **अशोकदत्तानें** प्रतिज्ञा केली. व तो प्रतिज्ञेप्रमाणें अवश्य घेऊन येईल असें **राजा**लाही वाटलें; पण त्याच्याकडून तसें साहस करवावें हें मात्र त्याला युक्त वाटलें नाहीं.

यापूर्वी **अशोकदत्तावर** केवळ त्याचें प्रेमच होतें; पण आतां तर तो जांवई झाल्यामुळें त्याचा जवळचा संबंधी झाला होता. 'तो प्रतापी आहे तरी साहस करतांना कदाचित् भलतेंच एखादें झालें तर काय करावें? साहस हें सर्वकाल सिद्ध होतेंच असें नाहीं. तेव्हां उगीच आपल्या हातानें आपला पाय तोडून घेतला असें होईल' ह्मणून राजा स्नेहपूर्वक **अशोकदत्ता**ला निवारण करूं लागला; पण त्याणें त्याचें मुळींच ऐकलें नाहीं. धाडशी मनुष्याला तसे प्रसंग यावे हें इष्टच वाटतें. वस्तुतः यावेळीं **अशोकदत्ता**वर कोणी जुलूम केला होता? तो उगाच बसला असता ह्मणजे झालें होतें. मुद्दाम पुढें येऊन प्रतिज्ञा करण्याचें काय कारण होतें? पण तशा मनुष्याच्यानें प्रसंगीं उगीच बसवत नाहीं. ते बळेंच आपल्या अंगावर कांहीं तरी कृत्य ओढून घेतल्यावांचून राहत नाहींत. असो.

**मदनलेखेनें, राजानें, राणीनें,** व इतर त्याच्या मित्रमंडळींनीं नको ह्मणून पुष्कळ आग्रह केला, तरी 'मी जी प्रतिज्ञा केली ती पुरी केल्यावांचून कधींही राहाणार नाहीं.' असें सांगून व राणीजवळ जो एक पैंजण होता तो मागून घेऊन' **अशोकदत्त,** ज्या स्मशानात तो त्याला प्राप्त झाला होता तेथेंच पुनरपि गेला. पहिल्या खेपेप्रमाणेंच या खेपेसही कृष्ण चतुर्दशीच यादिवशीं होती. व पूर्वीच्याप्रमाणेंच भुतांखेतांच्या आरोळ्या, वेताळमहाराजांची स्वारी, श्वापदांच्या गर्जना आणि चितांचा प्रकाश यांणीं अत्यंत भयंकर दिसत असलेलें तें **स्मशान**

अशोकदत्तानें गांठलें. पाशांनीं ज्यांचे गळे बांधले आहेत अशीं मनुष्यांचीं प्रेतें खांद्यावर लोंबत असल्यामुळें, फलांच्या घोंसांनीं जसे वृक्ष शोभतात त्याप्रमाणें, पुष्कळ राक्षस त्या स्मशानांत संचार करीत होते! याप्रमाणें जरी तें फार भयंकर होतें, तरी अशोकदत्त मोठ्या धैर्यानें बेफिकरपणें पुढें चालला होता. तो त्या स्त्रियेचा शोध करीत होता. 'ती भेटेल तर आपल्याला दुसरा पैंजण तिच्याकडून मिळेल' असें त्याला वाटत होतें.

त्याणें त्या स्मशानभर चहूंकडे शोध करून पाहिलें; पण ती स्त्री त्याला कोठेंच दृष्टी पडली नाहीं. तेव्हां आतां ती भेटण्याला काय उपाय करावा, याविषयीं तो विचार करूं लागला. पूर्वी जें तिणें कृत्य केलें होतें त्यावरून तिला महामांस अर्थात् मनुष्याचें मांस फार आवडतें असें त्याच्या लक्षांत आलें होतें. तेव्हां आतांही आपण तशीच कांहींतरी युक्ति करावी असा विचार करून, तेथें झाडाच्या खांदीला टांगून फांशी दिलेल्या एका मनुष्याचें प्रेत लोंबत होतें तें अशोकदत्तानें काढून घेतलें. आणि 'हें महामांस कोणाला पाहिजे त्याणें घ्यावें. मी विकायला आणलें आहे. योग्य किंमत मिळाली तरच मी हें विकणार' असें मोठ्यानें पुकारीत अशोकदत्त त्या स्मशानांत चहूंकडे फिरूं लागला. इतक्यांत—"हे महासत्वा, हे शूर पुरुषा, मला तें तुझें महामांस पाहिजे आहे. ही पहा मी तुला त्याची किंमत देतें. ती घेऊन कृपाकरून मला तें दे." असें दुरून एका स्त्रीनें हाक मारून त्याला सांगितलें.

तें ऐकून अशोकदत्त तिच्याजवळ गेला. तेव्हां त्याला झाडाखालीं बसलेली, एक दिव्य स्त्री दृष्टीस पडली. ती अनेक उत्तम उत्तम अलंकारांनीं व वस्त्रांनीं विभूषित असून, रत्नखचित अशा एक सिंहासनावर बसली होती. तिच्या आसपास तिच्या सारख्याच सुंदर सुंदर स्त्रिया उभ्या होत्या. हें पाहून अशोकदत्ताला मोठा अचंबा वाटला. मारवाडदेशांत जशी कमलिनी दिसावी तशी प्रेतभूतांदि

कानीं व्याप्त अशा त्या भयंकर स्मशानांत ती सुंदर स्त्री कशी प्राप्त झाली? याचें **अशोकदत्ता**ला मोठें नवल वाटलें. तो तसाच त्या स्त्रीच्या जवळ जाऊन उभा राहिला. व 'आपण मनुष्याचें मांस विकायला आलों आहें. तर तुमची इच्छा असल्यास आपल्यापासून घ्यावें' असें त्यानें त्या स्त्रीला सांगितलें.

तें ऐकून ती स्त्री ह्मणाली, "हे सत्ववान् पुरुषा! तूं जें विकत देणार ह्मणतोस त्याच्याबद्दल तुला काय दिलें पाहिजे? व कोणच्या मतलबानें तूं तें देणार? तें सांगशील तर बरें होईल."

हें ऐकून तो महावीर **अशोकदत्त** आपल्या हातांत जो एक पैंजण होता तो तिला दाखवून ह्मणाला, "जर कोणी ह्या पैंजणासारखाच दुसरा पैंजण मला देईल तर माझ्या पाठीवर जें हें मनुष्याचें प्रेत लोंबत आहे त्याचें मांस मी त्याला देईन. जर कोणाजवळ असला दागिना असेल तर त्याणें तो मला द्यावा."

हें ऐकून ती स्त्री **अशोकदत्ता**ला—त्याच्या हातांतला पैंजण ओळखून—ह्मणाली, "बरें बरें, माझ्याजवळ असला दुसरा पैंजण आहे. व हाही पैंजण माझाच आहे. तूं ज्यादिवशीं तो माझ्या पायांतून हरण केलास त्या दिवशीं सुळाजवळ जिला तूं पाहिलें होतेंस तीच मी. सांप्रत मी दुसरें रूप घेतलें आहे ह्मणून तुला माझी ओळख पटली नसेल. बरें असो, तें तुझें महामांस मला घेऊन काय करायचें आहे? मी तुला एक गोष्ट सांगतें ती कर ह्मणजे झालें. जर तूं माझ्या सांगण्याप्रमाणें करशील तर मी याच्या जोडीचा दुसरा पैंजण तुला मोठ्या संतोषानें देईन."

याप्रमाणें त्या स्त्रीनें सांगितलें तेव्हां ती पुढें काय सांगणार? व ती जें सांगेल तें तिचें काम आपल्या हातून होईल किंवा नाहीं? याविषयीं कांहीं एक विचार न करतां **अशोकदत्त** तिला ह्मणाला, "हे स्त्रिये, तूं जें कांहीं सांगशील तें मीं आतांच करीन."

हें ऐकून त्या स्त्रीनें मूळापासून आपला सर्व वृत्तांत सांगितला. ती ह्मणाली, "भद्रपुरुषा, **हिमाचल** नांवाच्या प्रसिद्ध पर्वताच्या शिखरावर **त्रिघंट** नांवाचें एक मोठें नगर आहे. तेथें **लंबजिव्ह** नामक एक मोठा राक्षस रहात होता. तो शूर असून आसपासच्या सर्व राक्षसांचा राजा होता. त्याची **विद्युच्छिखा** नांवाची मी पत्नी आहें. मला इच्छेप्रमाणें पाहिजे तें रूप घेऊन हवें तिकडे संचार करण्याची शक्ति आहे. मला त्या पतीपासून एकच कन्या उत्पन्न झाली व नंतर दुर्दैवानें तो युद्धांत मरण पावला. सांप्रत **कपालस्फोट** नांवाचा जो आह्मा राक्षसांचा राजा आहे तो माझ्या पतीच्या वेळीं सेनापति होता. त्याच्या देखतच **लंबजिव्ह** युद्धांत मरण पावला. तेव्हां सर्व राक्षसांनीं **कपालस्फोटा**लाच आपला राजा केला. याप्रमाणें राक्षसांचा राजा झालेल्या **कपालस्फोटा**नें माझ्यावर प्रसन्न होऊन ज्या **त्रिघंट** नांवाच्या नगरांत पूर्वी आह्मी रहात होतों, तें मला दिलें. व त्याच्याजवळच्याच दुसऱ्या एका नगरांत तो राहूं लागला. मी सध्यां त्या **त्रिघंट**पुरांत मुलीसहवर्तमान सुखानें रहात आहें. ती माझी मुलगी सांप्रत तारुण्यांत आली आहे. तिला कोणी तरी पराक्रमी वर मिळावा असें माझ्या मनांत असून हावेळपर्यंत मी त्याच्या शोधांत आहें.

त्या दिवशीं तूं राजासहवर्तमान या वाटेनें जात होतास. तुला पाहून माझ्या मनांत कांहीं हेतु उत्पन्न झाला. ती चतुर्दशीची रात्र होती. चतुर्दशीच्या चतुर्दशीला मी या ठिकाणीं येत असतें. तुला पाहून, 'हा पुरुष भव्य असून तरुण आहे. व मोठा पराक्रमी दिसतो तेव्हां आपल्या मुलीला हा नवरा योग्य होईल,' असें समजून याच्या प्राप्तीविषयीं कांहीं तरी उपाय कां करूं नये?' असें माझ्या मनांत आलें. ह्मणून त्या सुळावर चढविलेल्या मनुष्याच्या बोलण्याचें निमित्त करून मी तुला आपल्याकडे आणण्याचा कांहींतरी उपाय केला. वस्तुतः त्यावेळीं सुळावर कोणींच मनुष्य नव्हता, व कोणीं पाणीही मागितलें नव्हतें. मीच

आपल्या राक्षसीमायेनें ती सर्व योजना करून पाणी देण्याच्या निमित्तानें तुला स्मशानांत आणिलें. त्यावेळीं ज्या ज्या गोष्टी तूं पाहिल्यास त्या सर्व तुला फसविण्याकरतां मी खोट्याच रचल्या होत्या, असें समज. तुझें धैर्य, तुझें साहस वगैरे मला पाहायचें होतें तें मी त्यावेळींच पाहून घेतलें. व पुनः तूं माझा शोध करीत यावेंस ह्मणूनच मी आपल्या पायांतला हा पैंजण तुझ्या हातीं लागेल अशी व्यवस्था केली. जणूं काय तुला आकर्षण करण्याचा साखळदंडच, असा हा पैंजण तुझ्या हातीं लावून, मी तेथून निघून गेलें. त्यावेळीं मी तशी युक्ति केली ह्मणूनच तूं आज येथें मला भेटलास. तो पैंजण बायकांच्या उपयोगाचा दागिना असल्यामुळें तूं तो कोणातरी स्त्रीलाच देशील व ती 'याच्या जोडीचा आणून दे,' असा हट्ट धरल्यावांचून राहणार नाहीं, असें समजूनच मी ती युक्ति केली होती व त्याप्रमाणें ती सिद्धही झाली. असो.

आतां तूं माझ्या घरीं चल. आणि तेथें पतिसमागमाची वाट पहात बसलेल्या माझ्या तरुण मुलीचा स्वीकार कर. कांहीं दिवस तेथें राहून तूं परत ये. ह्मणजे मी तुला दुसरा पैंजण देईन." याप्रमाणें त्या राक्षसीनें सांगितलें. कोठें **हिमाचलाचें** शिखर! कोठें तें **त्रिघंटपुर**! कोठें तिची मुलगी! आणि कोठें **अशोकदत्त**! पण या गोष्टीचा त्या साहसी पुरुषानें मुळींच कांहीं विचार केला नाहीं. जिनें त्यादिवशीं रात्रीं तसें कपट केलें, ती सांप्रत ज्या गोष्टी सांगत आहे त्या खऱ्या कशावरून? व पुढें ती आपलें काय करील? याविषयीं **अशोकदत्ताच्या** मनांत कांहींच शंका आली नाहीं! त्या निशाचरीचें सांगणें मान्य करून तो तत्काल तिच्याबरोबर जाण्यास सिद्ध झाला. तेव्हां तिणें आपल्या राक्षसीमायेनें **अशोकदत्ताला** घेऊन आकाशांत उड्डाण केलें. व लौकरच त्याच्यासहवर्तमान ती आपल्या नगरींत प्राप्त झाली.

त्या नगराची शोभा काय विचारायची आहे! तें **हिमाचलाच्या** एका उंच शिखरावर वसलेलें असून, आंतील घरें दारें वगैरे झाडून-

सारें सुवर्णमय होतें. सोनें, हिरे, माणकें वगैरे यांच्या प्रकाशानें—आकाशमार्गानें चालतां चालतां श्रमलेल्या **सूर्याचें** मंडल तेथें विश्रांति घेत बसलें आहे कीं काय ? असें प्रेक्षकांला वाटत होतें. त्या निशाचरीसहवर्तमान **अशोकदत्त** त्या नगरांत प्रवेश करिता झाला. तेथें राक्षसांचा राजा **लंबजिव्ह** याची कन्या **विद्युत्प्रभा** त्याच्या दृष्टीस पडली. जणूं काय आपल्या साहसाची प्रत्यक्ष सिद्धीच, अशा त्या राक्षसकन्येशीं प्रीतिविवाह करून, **अशोकदत्तानें** तिचा स्वीकार केला. सासूच्या अपरंपार ऐश्वर्याचा यथेच्छ उपभोग घेऊन **विद्युत्प्रभेसहवर्तमान** **अशोकदत्तानें** बरेच दिवस खुशाल चैन उडविली. नंतर 'आतां आपण परत स्वस्थानीं जावें,' असें त्याच्या मनांत आलें. तेव्हां तो सासूला ह्मणाला, "मला येथें येऊन फार दिवस झाले. माझे आईबाप वगैरे माझी वाट पहात असतील. व माझें काय झालें ? मी कोठें गेलों ? वगैरे त्यांना कांहीं माहित नसल्यामुळें ते माझ्याबद्दल रात्रंदिवस दुःख करीत असतील. याकरितां मला आतां **वाराणसीनगरीला** परत गेलें पाहिजे. तर पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तो दुसरा पैंजण कोठें आहे तो दे. प्रथम जो माझ्या हातीं मिळाला होता, त्याच्या जोडीचा दुसरा पैंजण घेऊन येतों, अशी मी तेथील **राजा**जवळ प्रतिज्ञा केली आहे, ती मला पुरी केली पाहिजे."

**अशोकदत्ताचें** भाषण ऐकून त्याला एव्हांशींच निरोप द्यावा; हें ती राक्षसी **विद्युच्छिखा** हिच्या मनांत नव्हतें; तरी 'पूर्वीं आपण त्याला वचन दिलें, तें पुरें केलें पाहिजे. व कदाचित् तसें न केलें, तर तो साहसी व शूर असल्यामुळें, भलताच एखादा अनर्थ उठवील.' असें समजून तिणें प्रथम कबूल केल्याप्रमाणें, **अशोकदत्ता**ला दुसरा पैंजण दिला. व त्याच्याबरोबरच एक सोन्याचें कमलही त्याला दिलें. वस्तुतः यावेळीं कमळ देण्याचें कांहीं कारण नव्हतें; पण परत त्याला आपल्याकडे येणें भाग पडावें, ह्मणून—पूर्वीं जसा तिणें एकच पैंजण दिला होता. तसेंच

या वेळींही हें सोन्याचें कमल दिलें. एक कमल असल्यावरून त्याच्या जोडीला दुसरें असावें असें सहज कांहीं तरी कारण उत्पन्न होईल; व त्या निमित्तानें तरी ही स्वारी परत येईल. व आपल्या मुलीचो आणि याची भेट होईल असा विचार करून तिणें तें कमल मुद्दाम दिलें. आपण प्रतिज्ञा केल्याप्रमाणें दुसरा पैंजण मिळून आणखी हें सुवर्णकमलही मिळालें हें पाहून **अशोकदत्ता**ला फार आनंद झाला. त्याणें आपली स्त्री **विद्युत्प्रभा** व सासूबाई **विद्युच्छिखा** या दोघींचाही मोठ्या प्रेमानें निरोप घेऊन, 'मी पुन्हां अवश्यमेव आल्यावांचून राहणार नाहीं,' अशा आणा शपथा देऊन निरोप घेतला.

**अशोकदत्ता**ला आकाशमार्गानें जाण्याची शक्ति नव्हती. त्याच्या सास्वेनें जसें त्याला आपल्या प्रभावानें आणलें, तसेंच पुनरपि **काशि**-क्षेत्राच्या जवळच्या स्मशानांत—ज्या ठिकाणाहून पूर्वी नेलें होतें; त्या ठिकाणीं—परत आणून पोंचविलें. पूर्वी ज्या झाडाखालीं **विद्युच्छिखा** **अशोकदत्ता**ला भेटली होती; त्या झाडाखालीं येऊन ती त्याला ह्मणाली, "हे वीरा जांवया, प्रत्येक कृष्णचतुर्दशीच्या रात्रीं मी नेमानें येथें येत असतें; तेव्हां, तुला ज्या ज्या वेळीं मला भेटावें असें वाटेल; त्या त्या वेळीं तूं कृष्णचतुर्दशीच्या रात्रीं येथें येत जा ह्मणजे माझी भेट होईल. कदाचित् मध्यंतरींदेखील तुला माझी भेट घेण्याचें कारण पडलें; तर तूं या झाडाखालीं येऊन माझें स्मरण कर ह्मणजे मी तुला दर्शन देईन. हें वडाचें झाड आहे. याची तूं चांगली नीट आठवण ठेव. आतां तूं खुशाल आपल्या घरीं जा. आईबापांला भेट. पण जिणें सर्वस्वीं तुझ्यावर आपला हेतू ठेवला आहे; व जिचें तूं पाणिग्रहण केलें आहेस, त्या माझ्या मुलीला मात्र विसरूं नकोस!" असें सांगून **विद्युच्छिखेनें अशोकदत्ता**ला निरोप दिला.

तेव्हां 'तूं सांगितल्याप्रमाणें आपण करीन' असें तिला सांगून, तो महावीर **अशोकदत्त** तेथून निघाला. तो राजवाड्यांत न जातां प्रथम आ-

पल्या बापाच्या घरीं प्राप्त झाला. **अशोकदत्ता**चा पिता **गोविंदस्वामी**, धाकटा पुत्र **विजयदत्त** याच्या वियोगानें आधींच रात्रंदिवस तळमळत होता. तशांतून **अशोकदत्त**ही कोठें नाहींसा झाला. यामुळें त्याला किती दुःख झालें होतें, त्याचें वर्णन करतां येत नाहीं. यावेळीं अत्यंत दुःखित झालेल्या आईबापांचें समाधान करित होत्साता एकाएकीं येऊन **अशोकदत्त** त्यांला आनंद देता झाला. **गोविंदस्वामी** "बाबा इतके दिवस कोठें होतास? तूं अशा साहसांत कां पडतोस?" असें त्याला ह्मणत आहे, तों **अशोकदत्त** आल्याचें वर्तमान त्याचा सासरा राजा **प्रतापमुकुट** याला कळलें, व तोही लौकर तेथें प्राप्त झाला.

त्या साहसी **अशोकदत्ता**च्या स्पर्शानें भय वाटलें ह्मणूनच कीं काय, रोमांचित झालेल्या आपल्या शरीरानें राजानें त्याला आलिंगन देऊन, बहुतवेळपर्यंत तो त्याच्या स्पर्शसुखाचा अनुभव घेत होता. याप्रमाणें मातापितरांचें व राजाचें समाधान करून **अशोकदत्त** राजवाड्यांत निघून गेला. जणूं काय मूर्तिमान् प्रमोदच, असा तो, मोठ्या साहसानें आणलेली पैंजणाची जोडी व तें सुवर्णकमल सासुबाईच्या देखत सासऱ्याला अर्पण करित झाला. झणझण वाजणाऱ्या शब्दानें **अशोकदत्ता**च्या पराक्रमाची स्तुतीच करीत आहे कीं काय; अशी ती पैंजणाची जोडी राजानें तत्काळ राणीच्या हातांत दिली. व जणुं राक्षसराजाच्या भाग्यश्रीच्या हातांतलें खेळायचें कमलच, असें तें सुवर्णकमल आपल्या जवळ ठेविलें. नंतर राजा, राणी व त्याची स्त्री यांणीं प्रेमपूर्वक विचारल्यावरून, **अशोकदत्ता**नें येथून गेल्यापासून परत येईपर्यंत काय काय गोष्टी घडल्या, त्या सर्व विस्तारपूर्वक निवेदन केल्या. कानांला आनंद देणारें व मनाला उल्हास आणणारें असें तें त्याचें विचित्र चरित्र श्रवण करून राजाला फार समाधान झालें. तो ह्मणाला, "साहस करण्याचें पत्करल्यावांचून मोठें यश कोठून प्राप्त होणार?"

याप्रमाणें जांवयाची स्तुति करित होत्साता राजा, अशा पुरुषाशीं

आपला संबंध झाल्यावरून, आपल्याला कृतकृत्य मानता राणीला तिच्या इच्छेप्रमाणें पैंजणांची जोडी प्राप्त झाल्यावरून फारच संतुष्ट झाली. ज्या दिवशीं **अशोकदत्त** आला, त्या दिवशीं राजानें साऱ्या शहरभर मोठा उत्सव करविला. जिकडेतिकडे मंगलकारक वाद्यें वाजताहेत, कोठें गायन चाललें आहे, कोठें नृत्य चाललें आहे, कोठें जपजाप्य पूजापुनस्कार वगैरे चालले आहेत, अशारितीनें तें सर्व शहर आनंदमय झालें. यावेळीं जिकडेतिकडे **अशोकदत्ताच्या** गुणांची तारीफ चालली होती. याप्रमाणें आपल्या विलक्षण साहसानें व शौर्यानें ज्यानें मोठी कीर्ती संपादन केली आहे, असा **अशोकदत्त** सासुसासरे, मातापिता व आपली प्रियपत्नी **मदनलेखा** हिच्या सहवर्तमान मोठ्या आनंदांत राहूं लागला.

**अशोकदत्त** मध्यंतरी कांहीं दिवस नाहींसा झाला होता; यामुळें **गोविंदस्वामी** व त्याची पत्नी यांला जें विशेष दुःख झालें होतें; तें त्याच्या पुनरागमनानें नाहींसें झालें, तरी धाकटा पुत्र **विजयदत्त** याचा कांहींच ठिकाण नसल्यामुळें ते फार दुःखी होते. त्या सत्पुरुषानें '**अशोकदत्तच** त्याला आणील,' असें सांगितलें होतें. व अशोकदत्ताचे गुण व साहस पाहून तो तें काम करील अशी **गोविंदस्वामीची**ही खात्री होती. 'अरे, तूं अशीं अशीं मोटीं साहसें करतोस, तसाच एकदां आपल्या भावाचाही शोध लाव' असें त्याला सांगावें; असें **गोविंदस्वामीच्या** व त्याच्या स्त्रीच्या मनांत येत होतें; तथापि किती झालें तरी ते मातापितरच. सासूनें पैंजणाविषयीं हट्ट धरला व तो आणण्याकरितां **अशोकदत्ताला** साहसाविषयीं प्रवृत्त केलें आणि सासऱ्यानेंही त्याला अनुमोदन दिलें; पण ती गोष्ट अगदीं निराळी. कारण किती झालें तरी ते सासुसासरेच. त्यांला आपल्या मुलीकरतां जांवयावर प्रेम करावें लागतें; पण **गोविंदस्वामीची** गोष्ट तशी नव्हती. त्याचें आंतडें मनापासून तळमळत होतें. त्याला—'**अशोकदत्ताला** आपल्या भावाचा शोध

त पाठविलें. आणि त्याणें भलतेंच एखादें साहस केलें, व कदाचित् दुर्दैवानें कांहीं विपरीत गोष्ट घडून आली; तर हाही नाहींसा होईल. व आपल्याला सर्वांशीं शोकसागरांत बुडावें लागेल' ही काळजी होती. ह्मणून **अशोकदत्ताकडे** त्यांणीं मुळींच गोष्ट काढली नाहीं. दैवयोगानें कधीं भेट होणार असेल त्या दिवशीं होईल; असें समजून तीं स्वस्थ बसलीं होतीं. पण तसा योग आपोआप येण्याचा प्रसंग लवकरच आला.

राजाला **अशोकदत्तानें** जें सुवर्णाचें कमल आणून दिलें होतें. तें त्याणें आपल्या घरांतील देव्हाऱ्यांत देवाच्या दोहोंबाजूंला जे रूप्याचे कलश ठेविले होते; त्यांपैकीं एकावर ठेवलें. कमल ठेवल्यामुळें तो कलश फारच शोभूं लागला. तो कलश रुप्याचा असल्यामुळें, त्याच्यावर सोन्याचें कमल ठेवलें तेव्हां त्याची कांती लाल व पांढरी अशी मिश्र दिसूं लागली. **राजा** आणि **अशोकदत्त** या उभयतांचे प्रताप व यश एकत्र झाले आहेत कीं काय? अशी त्यावर लोक कल्पना करूं लागले. ते, कमल आणि कलश यांची शोभा पाहून राजाला फारच आनंद झाला. तो **शंकराच्या** भक्तिरसाच्या आवेशांत ह्मणाला, "वाहवा! ह्या कमलाच्या योगानें हा उंच असलेला कलश फारच शोभतो. अंगाला भस्म लावलें असून शुभ्र दिसणारा **महादेव**, जसा पिंगट दिसणाऱ्या जटाजूटानें शोभतो; तसेंच हें मला दिसतें. पण हें कमल एकच आहे. यामुळें केवळ एक बाजू मात्र सुशोभित दिसते. असेंच जर दुसरें कमल असतें, तर मी ह्या दुसऱ्या कलशावर तें ठेवलें असतें व त्याच्या योगानें फारच शोभा आली असती."

याप्रमाणें राजानें भाषण केलें; तेव्हां **अशोकदत्त** जवळच उभा होता. तो पुढें येऊन ह्मणाला, "मामा साहेब, आपण असे उद्गार कां काढतां? मी तुमच्या करितां असलें दुसरेंही कमल आणून देतों. त्याची मोठी काळजी नको."

**अशोकदत्ताचें** हें भाषण ऐकून राजा ह्मणाला, "नको नको. मला दुसऱ्या कमळाची गरज नाहीं. मी आपलें सहज ह्मटलें; आजपर्यंत साहस केलेंस तेवढें पुरे. आतां कृपा कर. तशा गोष्टी करण्याविषयीं मी तुला प्रवृत्त होऊं देणार नाहीं, व तूंही ऊगीच भलतेसलते विचार मनांत आणूं नकोस."

**अशोकदत्ता**ला कमल आणायला सांगितलें तर तो निःसंशय आणील; पण मागें एकवेळ पैंजणाकरतां म्हणून त्याला जाऊं दिलें. व उगीच त्याचा जीव धोक्यांत घालून काळजी करीत बसावें लागलें. तोच प्रसंग पुन्हांही येईल; ह्मणून राजानें 'आपल्याला कमळच नको.' असें सांगितलें. त्याणें आपल्याकडून **अशोकदत्ता**ला निवृत्त केला, तरी **अशोकदत्तानें** 'दुसरें कमल आणायचें;' असा आपल्या मनांत निश्चय करायचें सोडलें नाहीं. ज्या दिवशीं ही गोष्ट निघाली त्यादिवशीं कृष्ण चतुर्दशी नव्हती. ती येईपर्यंत तो तसाच राहिला. त्याणें आपला हेतू कोणालाच कळविला नाहीं. कांहीं दिवस जातांच कृष्ण चतुर्दशी प्राप्त झाली. हळूहळु आकाशरूपी सरोवरांतलें जणूंकाय सुवर्णाचे कमळच, असा भगवान् सूर्यनारायण अस्ताचलाच्या शिखरावर आरुढ होऊन लौकरच अदृश्य झाला. आणि जिकडेतिकडे अंधकाराचें साम्राज्य पसरलें.

तो महासाहसी **अशोकदत्त** त्या रात्रीं भोजन वगैरे लौकरच आटपून पुनः त्या स्मशानांत जाण्यास सिद्ध झाला होता. पण मंडळी नको ह्मणत आहेत; तेव्हां आतांच जाण्याचे वेळानें जावें हें बरें,' असा विचार करून तो आप तेथें आपली पत्नी **मदनलेखा** इच्यासहवर्तमान च्या तिकडच्या गोष्टी व विलास करण्यांत त्याणें उभयतांही निजलीं. यावेळीं **मदनलेखे**ला मात्र ग गली होती; पण **अशोकदत्तानें** झोपेचें केवळ नि

आपल्या पत्नीला गाढ निद्रा लागली; असें पाहून व राजवाड्यांतले लोक जिकडे तिकडे निद्रारूपी राक्षसीनें घेरले आहेत असें जाणून, तो शूरपुरुष हातांत तरवार घेऊन, एकटाच कोणाला नकळत आडवाटेनें राजवाड्याच्या बाहेर पडला, आणि तेथून थेट त्या स्मशानांत गेला.

तेथें वडाच्या झाडाखालीं ती त्याची **विद्युच्छिखा** नांवाची राक्षसी (सासू,) आपल्या बरोबरच्या दुसऱ्या राक्षसींसहवर्त्तमान आनंदांत बसली होती. जरी ती राक्षसी होती; तरी **अशोकदत्तानें** आपल्या विलक्षण साहसानें तिचें मन आपल्याकडे ओढून घेतलें होतें. 'जांवयीं गेला त्याला फार दिवस झाले असून अद्याप त्याणें भेटदिली नाहीं,' याबद्दल ती काळजी करीत होती. 'आपण जें सुवर्णाचें कमल दिलें आहे, तें कदाचि[illegible] त्याला आपल्याकडे आणील' असें तिला वाटत होतें. इतक्यांत **अशोकदत्त** अकस्मात् तेथें प्राप्त झाला. त्याला पाहून **विद्युच्छिखेला** फार आनंद झाला. तिणें त्याचें स्वागत करून कुशलप्रश्न केला. उभयतांचा क्षेमसमाचार उभयतांना कळल्यावर फार दिवस लावल्याबद्दल जांवयाला प्रेम पूर्वकच; पण थोडेसें उपरोधिक, असें कांहीं भाषण ऐकवून; **विद्युच्छिखेनें** आपल्या घरीं चल ह्मणून सांगितलें. व लौकरच त्याला घेऊन ती आकाशमार्गानें **हिमाचलाच्या** शिखरार **त्रिघंटनामक** आपल्या नगरांत [illegible] पोंचली.

बहुत दिवसांनीं दृष्टीपडलेल्या पतील प्रेमपूर्वक **विद्युत्प्रभा** भेटली. [illegible] सहवर्तमान प्रतिदिवशीं नव्या नव्या करमणूका, नव्या नव्या प्र[illegible] विलास[illegible] [illegible]र्णेपिणें, इत्यादिप्रकारच्या सुखाचा अनुभव करित [illegible] आपल्या सासुरवाडींत सुखानें राहिला. सुवर्णाचें [illegible]करीतां ह्मणून तो याखेपेस आला होता; पण [illegible] मुळें बरेच दिवसपर्यंत त्याला त्या गोष्टीचें स्मरणही [illegible] आहे, आधींच स्त्रिया ह्मटलें ह्मणजे त्या अतिशय [illegible]ी स्त्री मायावी राक्षसीण, मग काय विचारतां?

सासुबाई **विद्युच्छिखा** आणि बायको **विद्युत्प्रभा** ह्या एकवटलेल्या दोघी विद्युल्लतांच्या इंद्रजालांत सांपडलेला, **अशोकदत्त** मोहित झाला यांत आश्चर्य तें कसलें! असो.

याप्रमाणें तो स्त्रीविलासांत निमग्न झाला तरी लौकरच त्याला मागची आठवण झाली. विषयसुख असेंच आहे. तें कितीही उत्तमप्रकारचें असलें तरी कांहींदिवस त्याचा उपभोग घेतांच त्याच्याविषयीं—मग तो फार वेळ न राहो; पण थोडासातरी—तिरस्कार अथवा अनादर उत्पन्न होतो. **अशोकदत्त** आपण कशाकरितां येथें आलों, या गोष्टीचो आठवण करून लौकरच आतां परत जावें असा त्याणें विचार केला; व सासूजवळ—"जसें हें एक सुवर्णाचें कमल तूं मला दिलेंस, तसेंच दुसरें एक कमल कोठून तरी आणून दे." असें त्याणें मागितलें. सासुबाईची जांवयावर आपल्या पुत्रापेक्षांही अधिक प्रीति असते. त्यांतून तो लाडका असला ह्मणजे तर पुसूंच नका. तो काय मागेल तें देण्याविषयीं सासुबाई तयार असायच्याच! **अशोकदत्त विद्युच्छिखेचा** लाडका जांवई होता. उघडच आहे, गुणी मनुष्याचे लाड कोण पाहिजे तो करील; मग सासू करील यांत नवल काय! **अशोकदत्तानें** कमल मागितलें तेव्हां **विद्युच्छिखा** ह्मणाली, "माझ्या लाडक्या जांवया, दुसरें कमल मला कोठून मिळणार? आमचे महाराज **कपालस्फोट** यांचें एक दिव्य सरोवर आहे; तेथें असलीं सोन्यांचीं कमलें पुष्कळ होतात; पण तीं दुसऱ्या कोणाला मिळत नाहींत. **कपालस्फोट** महाराज जेव्हां सेनापति होते तेव्हां त्यांणीं आपले यजमान ह्मणजे विद्युच्छि[illegible] यांला हें एक कमल सहज आणून दिलें होतें. तें माझ्याजवळ पास मी तुला दिलें. आतां त्याच्या जोडीचें दुसरें कमळ मी क[illegible]

सासूनें याप्रमाणें समाधान केलें; पण जांवईबुवा क[illegible] ते ह्मणाले, "असें असेल तर त्या सरोवराजवळ मल[illegible] णजे मी आपल्या हातानें त्यांतलें पाहिजे तें कमल [illegible]

**विद्युच्छिखा** ह्मणाली, "छे ! छे !! नकोग बाई ! त्यासरोवराचा केवढा बंदोबस्त आहे. मोठमोठे भयंकर राक्षस त्याची रखवाली करित आहेत. उगीच भलताच आग्रह करूं नकोस. एक आहे तेवढेंच पुरें आहे. कदाचित् दुसरें मिळालें तर मी यत्न करून पाहिन; पण तुला मात्र मी तेथें मुळींच जाऊं द्यायची नाहीं."

हें तिचें ममतेचें सांगणें त्या साहसी **अशोकदत्ता**ला कोठून मान्य होणार? त्यानें अगदीं हट्टच घेतला. 'मला तें दाखवलेंस तर बरें, नाहीं पेक्षां आपण प्राणत्याग केल्यावांचून राहणार नाहीं,' असें त्याणें सांगितलें.

याप्रमाणें त्या लाडक्या जांवयानें हट्ट धरिला, तेव्हां ती बिचारी करते काय? निरुपायास्तव तिला त्याचा हेका पुरवावा लागला. **विद्युच्छिखा** ही प्रत्यक्ष राक्षसी, इतकेंच नव्हे तर माजी राजाची मान्य राणी असून तिलाही ज्या ठिकाणीं जाणें धोक्याचें वाटत होतें; त्या ठिकाणीं जायला **अशोकदत्ता**ला मुळींच कांहीं शंका वाटली नाहीं. **अशोकदत्त** तसा हटवादि होता असें नाहीं. तरी जशा पुढें होणाऱ्या गोष्टी, तदनुसार मनाच्या प्रेरणा होत असतात. **गोविंदस्वामी** ज्या आपल्या पुत्राकरितां शोक करित होता त्याची भेट होऊन त्या बिचाऱ्या वृद्ध पित्याच्या दुःखाचा शेवट व्हायचा होता. ह्मणूनच **अशोकदत्ता**ला तशी बुद्धी सुचली व सासरा नको नको ह्मणत असतांही तो येथपर्यंत येऊन पोंहोचला. आणि सासूबाई आग्रहपूर्वक समजावीत क्षां न ऐकून तिला घेऊन ज्या ठिकाणीं सुवर्ण कमलें होतीं त्या ठ दाखल झाला.

खेनें एका उंच पर्वताच्या शिखराच्या पायथ्याशीं असलेलें रन **अशोकदत्ता**ला दाखविलें. ज्यांचे दांडे नेहमीं ताठ हेत अशा हजारों सुवर्णकमलांनीं जणूं काय; **सूर्या**ण्याकरितां नेहमीं ज्यांणीं तोंड वर केलें आहे, अशा दिसणारें तें सरोवर पाहून **अशोकदत्त** मोठ्या

आनंदानें आंत उतरला, व त्यांतलीं कमळें काढून घेऊं लागला. तों इतक्यांत त्या सरोवराची रखवाली करणारे भयंकर राक्षस त्याला हरकत करण्यास आले. यःकश्चित् मनुष्य असून अशा अगम्य ठिकाणीं येऊन, एकदम कमळें काढूं लागला, ही गोष्ट त्या रखवालदारांला फारच आश्चर्यकारक वाटली. त्यांणीं प्रथम सामोपचारानें त्याला, मुकाट्यानें काढलेलीं कमळें टाकून तेथून वर निघण्यास सांगितलें; पण **अशोकदत्तानें** त्यांच्या ह्मणण्याकडे मुळींच लक्ष्य दिलें नाहीं. तो आपला एकसारखीं कमलें तोडीत सुटला. तें पाहून त्या राक्षसांला फार राग आला. त्यांणीं तत्काल **अशोकदत्तावर** शस्त्रप्रहार चालविला. तेव्हां **अशोकदत्तानें**ही कमळें तोडण्याचें अंमळ तहकूब ठेवून त्या राक्षसांचा समाचार घेण्याकडे लक्ष्य दिलें. त्याची तरवार त्याणें आपल्या बरोबर घेतलेलीच होती. तो रागारागानें सरोवराच्या काठांवर आला आणि आपल्यावर शस्त्रप्रहार करणाऱ्या त्या राक्षसांची त्याणें कत्तल सुरू करून लौकरच त्यांचा पराभव केला व ते पळून गेले. तेव्हां पुनः कमलें काढण्याचें काम त्याणें सुरू केलें.

रखवालदार राक्षसांपैकीं कांहीं जिवंत राहिले होते. ते धांवत धांवत आपला राजा **कपालस्फोट** याच्याकडे गेले. आणि 'कोणी मनुष्य सरोवरांत उतरून कमळें काढीत आहे. व त्याला आह्मी हरकत केल्यामुळें त्याणें पुष्कळ राक्षसांचा सप्पा उडविला,' असें त्यां आपल्या धन्याला कळविलें. तें ऐकून **कपालस्फोटाला** फारच श्चर्य वाटलें. हा **कपालस्फोट** कोण हें वाचकांस सांगावयास **अशोकदत्ताचा** बंधू **विजयदत्त** हा पूर्वी ज्यावेळीं राक्षस झा त्याला स्मशानांतील राक्षसांनीं हें नांव दिलें होतें, हें म आहे. त्या राक्षसांनीं सांगितलेलें वर्तमान ऐकून कप नवल वाटलें. 'मनुष्य असून अशा अगम्य ठिका मोठमोठे पराक्रमी राक्षस मारले. तेव्हां तो कोणी

असेल,' असें समजून तो राक्षसराज स्वतः आपणच त्या सरोवराच्य काठीं आला; तों **अशोकदत्त** भराभरा कमळें तोडीत असून कांहींस श्रमला आहे, व पुनः राक्षस येतात कीं काय ? ह्मणून चहूंकडे वरचेवा पहात आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें.

**कपालस्फोट** हा मुळचा **विजयदत्त** असून राक्षस झाला होता त्याला आपल्या आईबापांचें वगैरे मुळींच कांहीं स्मरण नव्हतें. कारण पूर्वी कोणा महात्म्याचा शाप झालेला होता. व त्या शापाच्या योगानेंच तो राक्षस झाला होता. त्या शापाचा अंत होण्याची हीच वेळ होती. **अशोकदत्ता**ला पाहतांच, **विजयदत्ता**ला अथवा **कपालस्फोट**नांवाच्या राक्षसराजाला त्याची ओळख पटली. हा आपला बंधू **अशोकदत्त** येथें कसा प्राप्त झाला ? याविषयीं त्याला मोठें आश्चर्य वाटलें. त्याला पुरते-पणीं ओळखून त्याच्या आगमनाविषयीं विस्मित होत्साता हातांतलें शस्त्र टाकून, प्रेमाश्रूंनीं ज्याचे डोळे भरून आले आहेत; असा **कपा-लस्फोट** धांवत जाऊन त्याणें तत्काल तो आपला वडील बंधू **अशो-कदत्त** याचे पाय धरिले. **अशोकदत्ता**लाही या गोष्टीचें मोठें आश्चर्य वाटलें. 'हा शस्त्र घेऊन आपल्याशीं लढाई करायला यायचा असून पायांवर मस्तक ठेवतो हें काय?' तें **अशोकदत्ता**च्या लक्ष्यांत आलें नाहीं. नं[तर] तो **कपालस्फोट** **अशोकदत्ता**ला ह्मणाला, "दादा, मी तुमचा [धा]कटा बंधू आहें. **विजयदत्त** ह्मणतात तो मीच. आपण उभयतां [...]ष्ठ **गोविंदस्वामि** यांचे पुत्र. इतके दिवस दुर्दैवानें मी असा [...]ऊन राहिलों होतों. मी जळत्या प्रेताचें कपाळ फोडलें; [कपा]लस्फोट असें माझें नांव पडलें आहे. सांप्रत तुझें दर्शन [...] आपल्या ब्राह्मण्याची आठवण झाली. मोहानें माझ्या [...] केदिवसपर्यंत आच्छादन घातलें होतें. तें आतां [...] माझें राक्षसपण समूळ नष्ट होऊन पूर्वीप्रमाणें मी

याप्रमाणें **विजयदत्तानें** सांगितलें तें ऐकून, बंधुदर्शनानें हर्षित होत्साता **अशोकदत्त** त्याला मिठी मारून, राक्षसपणानें दूषित झालेलें त्याचें अंग, जणूं काय आनंदाश्रूंनीं धुवूनच टाकीत आहे असा, फार दिवस अंतरलेलें बंधूच्या आलिंगनाचें सुख अनुभवित होता. इतक्यांत **विजयदत्ताला** शाप देणारा **प्रज्ञप्तिकौशिक** नांवाचा विद्याधरांचा गुरु आकाशांतून तेथें उतरला. तो त्या दोघांही बंधूंला ह्मणाला, "माझ्या **प्रिय** शिष्यानों, तुह्मी सर्वेही विद्याधर आहां. शापानें तुह्मांला ही अवस्था प्राप्त झाली. सांप्रत तो तुमचा शाप क्षीण झाला आहे. याकरितां आतां तुह्मी पूर्वरूपाला प्राप्त व्हाल. तुमचे बांधव इतर विद्याधर यांला ज्या विद्या सहज प्राप्त होतात, त्याच ह्या तुह्मी माझ्यापासून ग्रहण करा, आणि लौकर येथून आपल्या स्थानाला जा. तेथें स्वजनांला भेटा."

**प्रज्ञप्तिकौशिकानें** त्यांला असें सांगून विद्याधरांला जन्मतः स्वयं प्राप्त होणाऱ्या विद्या त्यांना दिल्या व तो त्यांना आशिर्वाद देऊन आकाशांत निघून गेला. इकडे गुरूनें सांगितल्याप्रमाणें **अशोकदत्त** आणि **विजयदत्त** दोघेही तें सुवर्णाचें कमल घेऊन तेथून **विद्युच्छिखा** ज्या ठिकाणीं रहात होती या **हिमाचलाच्या** शिखरावर **त्रिघंटपुरांत** आकाशमार्गानें गेले. [illegible] गेल्यावर **अशोकदत्त** राक्षसराजाची कन्या **विद्युत्प्रभा** हिला [illegible]श. तीही पूर्वजन्मींची विद्याधरी असून शापामुळें तिला राक्षसी[illegible] प्राप्त झाला होता. **अशोकदत्त** [illegible] **विजयदत्त** यांचा शाप [illegible]ण झाला, त्याबरोबरच तिचाही क्षीण होऊन ती तत्काल विद्याधरी झाली. **अशोकदत्त** सास्वेचा निरोप घेऊन, प्रिय[illegible]त्नी **विद्युत्प्रभा** हिच्या सह[illegible] **यदत्ताला** बरोबर घेऊन, पु[illegible] [illegible]त्रांत येऊन पोंच[illegible] **शिकानें** ज्या विद्या दिल्या [illegible] [illegible]काशमा[illegible] इत्यादि सर्व विद्या हो[illegible]

[illegible] इतका दूर [illegible]

पुत्रवियोगरूप अग्नीनें ज्यांचीं शरीरें संतप्त झालीं आहेत, अशा मातापितरांना ते उभयतां बंधू प्रथम भेटले. त्यांनीं आपलें दर्शन हेंच कोणी एक अमृत त्याची वृष्टि करून आईबापांला शांत केलें. ज्यांनीं दुसऱ्या देहाचें धारण न करतांही विचित्र जन्मांतराचा स्वीकार केल्याप्रमाणें, निरनिराळ्या अवस्थांचा उपभोग केला, असे ते उभयतां बंधू केवळ आपल्या मातापितरांच्याच नव्हे, तर सर्व लोकांच्या उत्सवाला कारणीभूत झाले. त्यांचा पिता **गोविंदस्वामी** याणें, बहुत दिवस गेल्यामुळें ज्याच्या भेटीविषयीं विशेष आशा राहिली नव्हती, अशा **विजयदत्ता**ला वरचेवर घट्ट आलिंगनें देऊन त्याणें इतक्या दिवसांच्या वियोगदुःखाची शांति केली. बापाच्या भुजांच्या मध्यभागीं सांपडून **विजयदत्ता**नेंही त्याचे मनोरथ पूर्ण केले.

**विजयदत्ता**सहवर्तमान **अशोकदत्त** एका सुंदर स्त्रीला बरोबर घेऊन आला आहे; हें वर्तमान तत्काल त्याचा सासरा राजा **प्रतापमुकुट** याला समजलें, तेव्हां तोही हर्षानें त्याच्या घरीं प्राप्त झाला. **राजानें** त्या उभयतांचा मोठा सत्कार केला. व **अशोकदत्ता**ला बंधू, आई व बाप यांसहवर्तमान मोठ्या समारंभानें तो आपल्या राज [illegible] ज्यांत घेऊन गेला. राजानें एकाच सुवर्णकमलाची इच्छा केली होती; प[illegible] **अशोकदत्तानें** त्याला शेंकडों कमलें—जीं त्यानें आपल्याबरोबर आ[illegible] [illegible]ीं होतीं तीं—अर्पण केलीं. [illegible]**कदत्ता**चा दैववान् सासरा राजा **प्रत**[illegible]**मुकुट** जांवयाच्या अचाट [illegible] अतिशय आनंद पावला. नंतर राजा, [illegible]ाणी, **अशोकदत्ताची स्त्री** [illegible] व इतर मंडळी आश्चर्ययुक्त हो[illegible]ऊन, **विजयदत्ता**चा वृत्तांत [illegible] उत्सुक झाले आहेत, असें [illegible]ाहून **गोविंदस्वामिनें विज**[illegible]ानें प्रश्न केला. [illegible], "बाबा **विजयदत्ता**, त्या [illegible]ला रा[illegible] [illegible]मीं पाहिलें होतें. पण त्यानं[illegible] [illegible]विषयीं मन फार उत्सुक [illegible]

यामप्रमाणें **गोविंदस्वामीनें** प्रश्न केला, तो ऐकून **विजयदत्त** ह्मणाला, "बाबा, पोरस्वभावानें दगडटाकल्यामुळें चितेंत जळत असलेल्या कपाळांतून वसेची एक चिळकी उडाली ती थेट माझ्या तोंडांत गेली. त्या वसेच्या आस्वादानें तत्काल मी राक्षस होऊन आपल्याला विसरलों, हें तुह्मीं पाहिलेंच आहे. लगेच तेथें असलेल्या दुसऱ्या राक्षसांनीं मला **कपालस्फोट** अर्थात् कपाल फोडणारा असें नांव ठेविलें; आणि त्यांणीं मला आपल्या मंडळींत बोलावून नेलें, व मीही त्यांच्यांत जाऊन मिळालों.

त्या राक्षसांनीं मला तेथून आपला राजा जो **विद्युज्जिव्ह** त्याच्याजवळ ह्मणजे **हिमालय** नांवाच्या पर्वतावर **त्रिघंट**नामक नगरांत नेलें. राक्षसराज मला पाहून फार खुष झाला. व त्याणें मला आपला सेनापति केलें. मी बरेंच दिवस तो अधिकार चालवीत असतां मदोन्मत्त झालेल्या त्या राक्षसांच्या राजानें गंधर्वांशीं कांहीं उद्दामपणाचें वर्तन केल्यावरून, त्यांच्याबरोबर त्याची लढाई सुरू झाली. मी त्याचा सेनापति असल्यामुळें मलाही गंधर्वांशीं लढाई करणें भाग पडलें. बहुत दिवस त्या राक्षसराजानें मोठ्या शौर्यानें गंधर्वांशीं युद्ध केलें; पण शेवटीं त्यांणीं त्याला ठार मारलें. त्यावेळीं तेथें असलेल्या सर्व राक्षसांत मीच गुणांनीं श्रेष्ठ होतों. अर्थात **विद्युज्जिव्हा**च्या प्रधानांनीं मला त्याच्या राज्यावर बसविलें. व त्या नगरांत राहून मी बहुत दिवस राक्षसांचें राज्य क[illegible] लागलों. मला तुमच्या इकडच्या कोणत्याच गोष्टीचें स्मरण झालें न[illegible] अशा स्थितींत [illegible] एकाएकीं सोन्याचें कमल आणण्याकरितां **अशोकदत्त** तेथें प्राप्त झाला. याणें पुष्कळ राक्षसांचा वध के[illegible] मी याच्या नाशाकरतां ह्मणून आलों होतों; पण याला [illegible] पूर्वींच्या सर्व गोष्टींचें स्मरण झालें. व तत्काल माझा शा[illegible] मी राक्षसपणांतून मुक्त झालों. नंतर शापाचा अंत झ[illegible] मूळच्या विद्या आह्मांला प्राप्त झाल्या. आतां या[illegible] दादाच तुह्मांला सांगेल."

**याप्रमाणें** आपला वृत्तांत सांगून **विजयदत्त** स्तब्ध राहिला. तेव्हां **अशोकदत्तानें** मुळापासून आपली सर्व हकीकत निवेदन केली. तो ह्मणाला, "पूर्वी हा माझा धाकटा बंधू आणि मी आह्मी दोघेही विद्याधर होतों. तेव्हां एकेदिवशीं आकाशमार्गानें आह्मी यथेच्छ विहार करित असतां सहज **गालव**ऋषीच्या आश्रमानजीक पोंचलों. तो आश्रम **गंगा**नदीच्या तीरावर होता. तेथें **गंगें**त ऋषींच्या सुंदर मुली स्नान करीत होत्या. त्यांला पाहून आमचें मन त्यांच्यावर आसक्त झालें. व त्यांलाही आमच्याविषयीं अभिलाष उत्पन्न झाला. याप्रमाणें मुनिकन्यका व आह्मी उभयतां एकमेकांवर साभिलाष झालों आहों. ही गोष्ट त्यांचे बंधू तेथें राहत होते त्यांला समजली. ते दिव्यदृष्टी असल्यामुळें मनांतल्या गोष्टी सहज त्यांच्या लक्ष्यांत आल्या. याप्रमाणें आह्मी तपोवनवासाच्या विरुद्ध इच्छा करीत आहों, असें पाहून त्या ऋषिनीं आह्मांला शाप दिला. ते ह्मणाले, 'हे पापाचारहो, तुह्मी दोघेही मनुष्यलोकांत जन्म घ्या. तेथेंही तुह्मांला कांहीं विचित्र कारणानें परस्परांचा वियोग अनुभवावा लागेल. तुमच्यांतला एक जेथें मनुष्यांचा संचार होण्याचा मुळींच संभव नाहीं अशा फार दूरच्या प्रदेशांत राहील. व तेथें मोठ्या साहसानें दुसरा जेव्हां प्राप्त होईल, तेव्हां त्याला पाहून तुह्मी उभयतांही शापापासून मुक्त व्हाल. तुह्मांला पूर्वींच्या संबंधाची आठवण होईल. व त्या वेळीं तेथें विद्याधरांचे गुरु येऊन तो तुह्मांला तुमच्या विद्या देईल, याप्रमाणें तुह्मी शापमुक्त होऊन पुनः आपल्या आप्तांला भेटाल."

[illegible]दत्त ह्मणाला, "त्या ऋषींनीं असा शाप दिल्यामुळें आह्मी [illegible]झालों. आमचा परस्पर वियोग कसा झाला तो सर्व वृतां[illegible]तच आहे ह्मणून मी पुनः सांगत नाहीं. थोड्या दिव[illegible]कमल आणण्याकरितां मी आपल्या सास्वेच्या अर्थात् [illegible]रीच्या प्रभावानें राक्षसराजाचें नगर **त्रिघंटपुर** येथें [illegible]झा धाकटा बंधू मला भेटला. आमचे गुरु **प्रज्ञप्ति**-

**कौशिक** यांणीं आह्मांला आपल्या विद्या दिल्या. तत्काल आह्मी **विद्याधर** होऊन आकाशमार्गानें लौकर येथें तुमच्या जवळ प्राप्त झालों."

आई, बाप, ती प्रियतमा राजकन्या **मदनलेखा** हिला, व इतरमंडळीला आपला वृत्तांत सांगून व शापरूपी अज्ञानापासून मुक्त होऊन, आपल्या उत्तम विद्यांच्या प्रभावानें **अशोकदत्तानें** विचित्र अशीं पुष्कळ कृत्यें केलीं. त्याच्या त्या कृत्यांनीं इतर विद्याधरांला फार आनंद झाला. नंतर **अशोकदत्तानें** आपला सासरा **प्रतापमुकुट** व सासूबाई यांचा प्रेमपूर्वक निरोप घेतला. आणि आपले मातापितर तशीच राक्षसराजाची कन्या **विद्युत्प्रभा** व **प्रतापमुकुटाची** कन्या **मदनलेखा** यांसहवर्तमान आपला बंधू **विजयदत्त** याला बरोबर घेऊन **अशोकदत्त** एकाएकीं आकाशांत उडाला. व अंतरिक्षमार्गानें त्वरेनें आपल्या पूर्वीच्या स्थानांत प्राप्त झाला. तेथें सर्वप्रकारची व्यवस्था पूर्ववत् पाहून संतुष्ट झाला. विद्याधरांनीं त्याला **अशोकवेग** व त्याच्या बंधूला **विजयवेग** अशीं नांवें दिलीं. याप्रमाणें ते तरुण विद्याधरश्रेष्ठ आपल्या आप्तांसह **गोविंदकूट**-नामक **हिमालयाच्या** शिखराप्रत प्राप्त होऊन, तेथें सुखानें वास्तव्य करिते झाले.

इकडे **वाराणसीचा** राजा **प्रतापमुकुट** याला झालेल्या सर्व गो[illegible] चें विलक्षण आश्चर्य वाटलें. त्याणें आपल्या देव्हाऱ्यांत अस[illegible] कलशावर **अशोकदत्तानें** दिलेल्या सोन्याच्या कमलांपैकीं ए[illegible] ठेविलें व आणखीही कमलें राहिलीं होतीं, तीं भक्तिपूर्व[illegible] **शंकराला** अर्पण केलीं. विचित्र पराक्रमी अशा **अशोक**[illegible] पला संबंध झाला, यावरून त्याणें आपलें कुल कृ[illegible] मानलें.

याप्रमाणें **अशोकदत्ताची** विचित्र कथा सांग[illegible] **देवाला** ह्मणाला, "जसा तो **अशोकदत्त** सा[illegible] असून कांहीं कारणानें मनुष्यलोकांत प्राप्त

नेक प्रकारच्या विचित्र व अलौकिक गोष्टी केल्या, तसेच अन्यही कित्येक दिव्य पुरुष कारणवशात् मृत्युलोकीं जन्मधारणकरतात. आणि आपल्या महत्त्वाला उचित असें सत्व व उत्साह धारण करून मनुष्यांला कधींही प्राप्त व्हायच्या नाहींत अशा प्रकारच्या अनेक गोष्टी सिद्ध करतात. हे सत्वनिधे **शक्तिदेवा**, तूंही मोठा विलक्षण मनुष्य आहेस तुझ्या अचाट उद्योगावरून तूं कोणीतरी देवांश आहेस असें मला वाटतें. तुझ्या इष्टकार्याची सिद्धि अवश्यमेव होईल यांत कांहीं संशय नाहीं. मोठमोठ्या लोकांलाही दुष्कर अशा पुष्कळ गोष्टी तूं केल्यास. कर्त्याची उत्साहयुक्त वृत्तीच त्याच्या अंगीं कांहीं विशिष्ट व असाधारण सामर्थ्य आहे असें सुचविते."

जिच्याकरतां तूं असें मोठें जिवावरचें संकट सोसून येथें प्राप्त झालास ती राजकन्या **कनकरेखा** ही कोणी तरी दिव्य स्त्री असावी यांत कांहीं संशय नाहीं. नाहींपेक्षां **कनकपुरी** पाहून आलेल्या पुरुषालाच आपण वरावें अशी त्या तरुण मुलीला इच्छा कशी झाली असती? ज्या ठिकाणीं **कनकपुरी** हें नांवदेखील कोणाला ऐकून ठाऊक नाहीं त्या ठिकाणीं जन्मास आलेल्या मुलीला अशी इच्छा हो गें हा कांहींतरी तिच्या लौकिकपणाचा प्रभाव आहे. यामुळें मी तुला खात्रीपूर्वक सांगतों कीं, तुझा हेतू पूर्ण होईल व तुह्मां उभयतांचा समागम होईल हीं संशय नाहीं." याप्रमाणें एकांतीं **विष्णुदत्ता**पासून सुश्रवण करून, तो **शक्तिदेव कनकपुरी** पाहण्याची उत्कंठा फार आतुर झाला होता; तरी धैर्य धरून त्याणें राहिलेली आपल्या मामेभावाच्या सहवासांत घालविली.

प्रमाणें रात्र निघून गेली. अरुणोदय होतांच **शक्ति**-... नैनादि कृत्य आटपून स्नान संध्या करून तो यांतून मोकळा झाला. व आतां पुढें जाण्याची विचार करीत होता. इतक्यांत कोळ्यांचा

राजा **सत्यव्रत** काल सांगितल्याप्रमाणें **शक्तिदेवा**ला भेटण्याकरितां त्या मठांत प्राप्त झाला. **शक्तिदेवा**चा हेतु काय आहे तें त्याला कळलेंच होतें. तो त्याला ह्मणाला, "ब्राह्मणा, तुझा इष्ट हेतु सिद्ध होण्याकरतां मी एक उपाय योजला आहे. येथून बऱ्याच अंतरावर समुद्रामध्यें **रत्नपुर** नांवाचें उत्तम द्वीप आहे. तेथें समुद्रानें प्रार्थना केल्यावरून भगवान् **विष्णू** भक्ताचें कल्याण करित होत्साता वास्तव्य करित आहे. तें देवस्थान मोठें जागृत आहे. आषाढ शुद्ध द्वादशीच्या दिवशीं तेथें मोठी यात्रा भरते त्या उत्सवांत निरनिराळ्या अनेक ठिकाणांहून भक्तमंडळीचा मोठा समाज तेथें जमतो. देवाची पूजा करण्याकरतां अशा दूरच्या ठिकाणीं देशदेशांतराहून पुष्कळ लोक येतात. तेव्हां मला असें वाटतें कीं, तेथें तुझ्या त्या **कनकपुरी**चा कदाचित् शोध लागला तर लागेल. तुझी मर्जी असेल तर मी तयारी करतों. मलाही देवाचें दर्शन घ्यावें अशी फार इच्छा आहे. तुझ्या निमित्तानें सहज तो योग येईल. तुझी मर्जी असेल तर आतां तो उत्सवाचा दिवस जवळ आला आहे. याकरतां आपण उभयतां तिकडे जाऊं" **शक्तिदेवा**ला **कनकपुरीं**त जाण्याची किती उत्कंठा होती, हें पूर्वीच्या त्याच्या साहसावरून उघडच झालें आहे. **सत्यव्रता**नें सांगण्याबरोबर **शक्ति-**
**वा**नें त्याचें सांगणें मान्य करून 'हँ चला, करा तयारी.' असें सांग
तेव्हां **सत्यव्रता**नें एक चांगलें मजबूद जहाज तयार केलें. त्या
कांहीं साधनें पाहिजे होतीं तीं सर्व घेतलीं. जातीचा कोळी अ
त्याला खाण्यापिण्याची तयारी करण्याचें कांहीं विशेष अग
समुद्रांतूनच प्रवास करायचा होता, व त्याचें जे सग
होतें! पाहिजेत्यावेळीं त्याला ताजें ताजें मिळण
व्हती. **शक्तिदेवा**लाही—त्याचें मन **कनकपुरी**कडे
पिण्याची फारशी परवा नव्हती. तरी त्याचा प्रेम
याणें त्याला वाटेंत खाण्यापिण्याची सर्व तयारी

घेऊन **शक्तिदेव सत्यव्रता**बरोबर गलबतांत बसला. बरोबर आणखीही कांहीं खलाशी लोक घेतलेले होते.

वारा अनुकूल लागल्यामुळें त्यांचें जहाज बरेंच दूरपर्यंत सुरक्षितपणें गेलें. जातांजातां सुकाणूं धरून बसलेल्या **सत्यव्रताला शक्तिदेवानें** विचारिलें. तो म्हणाला, "येथून समोर दूर अंतरावर हें मोठें काय दिसत आहे ? त्याचा रंग काळा असून समुद्राच्या पाण्याच्या काळसरपणामुळें हें त्याहून कांहीं निराळें आहे, असें एकाएकीं वाटत नाहीं. तरी लक्ष्यपूर्वक पाहिलें ह्मणजे हा कांहीं तरी उंचवटा आहे असें दिसतें; व यावरून पंख असलेला पर्वतरूपी पक्षी समुद्राच्या पाण्यावर क्रिडा करतो आहे कीं काय असा भास होतो. ! तेव्हां हें काय आहे तें तुला माहित आहेका ?"

**शक्तिदेवा**चा हा प्रश्न ऐकून **सत्यव्रत** ह्मणाला, "होय. हा एक मोठा वडाचा वृक्ष आहे. याला **वटदेव** असें ह्मणतात. याच्या मुळाजवळ एक पाण्याचा मोठा भोंवरा आहे. व त्याच्या खालीं वड्वाग्नी-[1]

---

१ समुद्राच्या पोटांत वडवाग्नि नांवाचें एक मोठें तेज आहे, असें प्राचीन ग्रंथांत
नेक ठिकाणीं वर्णन केलें आहे. व त्याच्यासंबंधानें निरनिराळ्या चमत्कारिक कथाही
केल्या आहेत. कोणीएक ऋषीची स्त्री होती तिणें कांहीं कारणामुळें आपल्या पोटां-
र्भ ऊरू ह्मणजे मांडी हींत धारण केला होता, व तो पुढें जन्मास आला तेव्हां त्याला
न झाला ह्मणून और्व असें नांव प्राप्त झालें. तो एक मोठा प्रख्यात ऋषि होता.
ग्निरूपानें समुद्रांत जाऊन राहिला, अशी कथा आहे. समुद्रांत जो अग्नि आहे;
ग्रंथकार फार वर्णन करतात, त्याला और्व व वडवा हीं नांवें त्यांणीं दिलीं
ेतलेलें वडवामुख हेंही याच अर्मीचें एक स्थान असावें. अर्वाचीन शो-
सर्व पना आहेत ,असें ते ह्मणतात. व वडवामुख ह्मणजे ज्वाला-
लामुखी पृथ्वीच्या गोलांत पुष्कळठिकाणीं आहेत व त्या
ाचे देश उध्वस्त करतात. थोड्या दिवसांपूर्वी यवद्विप अथवा
ो मोठी प्रचंड ज्वालामुखी प्रकट होऊन तिणें त्या बेटाचा
केला. ही गोष्ट वाचकांस आठवत असेलच. जशा स्थलांतून
च उदकांतूनही प्रकट होण्याचा संभव आहे. यावरून

चें मुख आहे असें लोक सांगतात. या समुद्रांतून गलबतावरून प्रवास करणारे लोक त्या ठिकाणाला वळसा देऊन आपलें गलबत नेतात. कारण कदाचित् ह्या भोंवऱ्यांत कोणाचें गलबत सांपडलें तर पुनः त्याला वर येतां येत नाहीं."

**सत्यव्रतानें** याप्रमाणें त्याला सांगून त्या भोंवऱ्याला वळसा घालून आपलें गलबत चालविण्याविषयीं मोठ्या जोरानें प्रयत्न चालविला; पण लौकरच **शक्तिदेवाचा** उत्तम दैवयोग व त्या **सत्यव्रताचा** मृत्यु, या दोघांनीं निरनिराळ्या, अर्थात् एकमेकांच्या विरुद्ध दिशेनें वाहणाऱ्या वायूचें रूप धारण करून, जणूं काय त्यानें प्रेरणाच केली आहे, असें तें गलबत अनावर होऊन सपाट्यानें त्या भोंवऱ्याकडेसच वळलें! भोंवऱ्याकडे गलबत चाललें असून आपल्याला तें आवरत नाहीं असें पाहून **सत्यव्रत** घाबरा होऊन **शक्तिदेवाला** ह्मणाला, "ब्राह्मणा, काय सांगावें! मोठा घात झाला. आपल्या नाशाची वेळ खरोखर अगदीं जवळ प्राप्त झाली. पहा हें गलबत मी किती जोरानें आवरून धरीत आहें; पण हें त्या भोंवऱ्याकडेसच चाललें आहे. कांहींकेल्या माझ्या आटोक्यांत येत नाहीं. यावरून या खोल अशा भोंवऱ्यांत; किंवा केवळ मृत्यूच्या मुखांतच असें ह्मटलें तरी चालेल, प्रबल कर्मगतीसारखें भासणारें असें जें हें समुद्राचें उदक, तें आह्माला आकर्षण करून नेत आहे! खरें ह्मणशील तर मला माझ्या प्राणाची मोठीशी काळजी नाहीं. हें पंचभूतात्मक शरीर कधींतरी कोणाचें स्थिर राहिलें आहे ? केव्हांतरी याचा नाश व्हायचा तो आजच झाला ह्मणून मला दुःख वाटणार नाहीं. पण मित्रा, तूं इतकें संकट व हालअपे[illegible] रून आलास; आणि तुझें कार्य सिद्ध होत नाहीं,

---

प्राचीन ग्रंथकारांनीं समुद्राच्या पोटात वडवाग्नी आहे असें जें वर्णन के[illegible] खरें आहे. इतकेंच कीं, त्याच्यासंबंधानें त्यांणीं ज्या अनेक कथा व[illegible] मात्र कदाचित् कल्पित असल्या तर असतील. तथापि एकंदर[illegible] यात्मक असें कांहींच सांगवत नाहीं.

फार दुःख वाटतें. पण यांतल्या यांत तुला मी एक युक्ति सांगतों, ती कर. मी हें गलबत अंमळ आंवरून धरतों. हें आतां भोंवऱ्यांत फिरूं लागलें आहे; माझ्यानें फारवेळ आंवरून धरवणार नाहीं. पण तितक्यांतलेतितक्यांत तूं ह्या वडाच्या झाडाच्या खांद्या खालीं लोंबत आहेत त्यांला घट्ट धरून जहाजांतून आपले पाय वर घे. येरव्हीं याठिकाणीं अशा स्थितींत जिवंत राहण्याचा कांहीं उपयोग नाहीं; पण तुझ्या आकृतीवरून व विलक्षण साहसावरून कदाचित् तूं जीवंत राहशील; व तुझें कार्यही होईल असें मला वाटतें. कारण दैवाचे विलास आणि या समुद्राच्या लाटा ह्या कशा व कोणीकडून येतील याविषयीं कोणी अनुमान करावें?"

वस्तुतः यावेळीं **सत्यव्रता**लाही आपले प्राण वांचवितां आले असते. या ठिकाणाहून पुढें कशी सुटका होईल याविषयीं जरी आज कांहीं कल्पना करण्यास मार्ग नव्हता, तरी आतांच भोंवऱ्यांत सांपडून बुडून मरण्यापेक्षां झाडाचा आश्रय धरून कांहींवेळ तरी जीवंत राहतां आलें असतें; पण त्या परोपकारी पुरुषानें तसा प्रयत्नच केला नाहीं. कारण गलबत भोंवऱ्यांत सांपडलें होतें तें चक्रासारखें गरगर फिरत होतें. अशा स्थितींत अंमळ आंवरून धरल्यावांचून झाडाची खांदीदेखील हातांत येण्याचा संभव नव्हता. व **सत्यव्रत** आंवरून न धरता तर **शक्तिदेवा**ला झाडाची फांदी धरतां आली नसती. 'आ' कदाचित् त्यांतल्यात्यांत झाडाला धरूं; पण एवढें मोठें कार्य याविषयीं प्रवृत्त झालेला-हा ब्राह्मण फुकट मरेल.' असें समजून **सत्यव्रतानें** आधीं त्याचे प्राण वांचविण्याचा प्रयत्न केला. सत्पुरुष लोकांच्या कार्याकरतां आपल्या जिवावर उदारच थोडे असतात.

केवळ परोपकारबुद्धीनें तसें सांगितलें; पण **शक्तिदे**य करावी हें योग्य वाटलें नाहीं. ज्याणें आपल्या-

करतां एवढा प्रयत्न केला, त्याला मरूं देऊन आपण वांचावें हें त्याला कसें योग्य वाटेल ? **शक्तिदेव** झाडाच्या फांदीला धरण्यास तयार होईना. तेव्हां **सत्यव्रता**नें बळेंच त्याला तसें करावयास लावलें. व 'आतां उगीच गडबड करूं नकोस. हें गलबत लौकरच नाहींसें होणार आहे. याकरतां कृपाकरून झाडाची फांदी घट्ट धर' असें सांगून **सत्यव्रता**नें **शक्तिदेवा**कडून खांदी धरविली. क्षणमात्रांत तें गलबत फारच जोरानें फिरूं लागलें. **शक्तिदेव** झाडाची फांदी धरतोआहे इतक्यांत तें गरगर फिरून तत्काल आंत बुडून गेलें ! व त्याबरोबर तो परोपकारी **सत्यव्रत**ही कोठें दिसेनासा झाला ! त्या गलबतावर आणखी जे खलाशीलोक होते ते भयानें यापूर्वीच उड्या टाकून पार झाले होते.

यांप्रमाणें तो साहसी व दैवशाली पुरुष **शक्तिदेव** त्या वडाच्या झाडाची खांदी धरून वांचला. व त्याला चांगला आश्रय मिळाल्यामुळें, हळू हळू फांदीला धरून वर चढून तो मोठमोठे दोन खांदे जेथून फुटले होते, अशा त्या झाडाच्या एका दुबेळक्यांत जाऊन स्वस्थ बसला. **सत्यव्रत** तर बिचारा—दुसऱ्याकरतां ज्याणें आपलें शरीर वडवाग्नीचें भक्ष्य कल्पिलें आहे असा—परोपकाराकरतां गलबतासह नाश पावला. **शक्तिदेव** यावेळीं त्या वृक्षाच्या शाखेचा आश्रय धरून बसला होता. तरी आपल्या कार्यसिद्धीविषयीं अगदीं निराश झाला होता. तो मनांत ह्मणाला, मी ती **कनकपुरी** पाहिली नाहींच. आणि माझ्याकरतां आपल्यावर संकटें ओढून घेणाऱ्या या **सत्यव्रता**चाही घात होण्यास मी कारण झालों. खरेंच आहे, अशा आकस्मिक अनर्थाचें निवारण माझ्या हातून कसें होणार ? सर्वांच्या मस्तकावर सार्वकाल आपला पाय ठेवून चालणारी भगवती भवितव्यता कोणाच्यानें खोटी करवणार आहे ? आतां हा सभोंवतीं पसरलेला समुद्र, अथवा जणूं काय माझें दुःखच, याचें माझ्यानें कसें अतिक्रमण होणार ! जसा मी पूर्वी माशाच्या पोटांत सांपडून **उत्स्थल** द्वीपांत येऊन

पोंचलों. तसाच आतांही कांहीं योग येईल ह्मणावें तर ह्या झाडाच्या सभोंवतीं पाण्याचा भोंवरा आहे. याच्या आसपास मासे किंवा सुसरी वगैरे जलचरेदेखील संचार करीत नाहींत. कदाचित् मी खालीं उडी टाकली, तर विनाकारण या भोंवऱ्यांत सांपडून मरून मात्र जाईन! तेव्हां एकंदरींत या ठिकाणाहून माझी सुटका होण्याचा कांहींच संभव दिसत नाहीं. अन्नपाण्यावांचून माझे प्राण तरी किती दिवस राहणार आहेत? तेव्हां येथेंच आपल्याला मेलें पाहिजे, यांत कांहीं संशय नाहीं.

याप्रमाणें ज्या कठिण अवस्थेंत शक्तिदेव सांपडला होता, तिला उचित असे अनेक विचार त्याच्या मनांत घोळूं लागले. तो सारा दिवस त्याच विचारांत गढून गेला. पण दैवाची लीला मोठी विचित्र आहे. कोणती गोष्ट शक्य, व कोणती गोष्ट अशक्य, याविषयीं कांहींच निर्णय करतां येत नाहीं. कितीएक असंभावित् अशाही गोष्टी घडतात. यावेळीं शक्तिदेव कनकपुरी अवलोकन करण्याची इच्छा सोडून आपण कसा वांचेन याच फिकिरींत पडला होता. पण दैवानें लौकरच त्या काळजींतून त्याला मुक्त केलें. इतकेंच नव्हे तर त्याचा हेतूदेखील पूर्ण होण्याचा योग आणला. तो असा कीं, सायंकालचा समय झाल्यामुळें नित्याप्रमाणें त्या वडाच्या झाडावर, दिवसभर अन्यत्र संचार करून विश्रांती घेण्याकरितां अनेक मोठमोठे पक्षी प्राप्त झाले. त्या प्रदेशांत संचार करणारे पक्षी फार मोठे असून, त्यांला घरटीं करण्याला आश्रय कायतो तो वडाचा वृक्षच होता. बाकीचा सर्व प्रदेश जलमय असल्यामुळें सर्व पक्षी तेथेंच राहत होते. ज्याणीं आपल्या किलबिलाटानें दशदिशा नादावून सोडल्या आहेत असे अनेक मोठमोठे पक्षी त्या झाडावर येऊन बसले. त्यांच्या मोठमोठ्या विस्तीर्ण पंखांच्या वाऱ्यानें वर उसळणाऱ्या मोठमोठ्या लाटांच्या मिषानें तो जलाचा निधि समुद्र, बहुतदिवसांच्या परिचयानें प्रीतिपूर्वक त्यांला सामोराच गेला आहे कीं काय असें वाटूं लागलें!

ते पक्षी यथावकाश आपापल्या नियमित ठिकाणीं त्या वृक्षाच्या निरनिराळ्या फांद्यांवर बसले. त्यांला मनुष्यांसारखें बोलतां येत होतें. अनेक ठिकाणीं संचार करून सायंकाळीं ते एकोठिकाणीं जमले होते. तेव्हां आपापल्या सफरींत काय काय चमत्कारिक गोष्टी घडल्या तो वृत्तांत ते एकमेकांला सांगूं लागले. शक्तिदेवाचा त्यांच्यांशीं कांहीं परिचय नव्हता. एकाएकीं आपण त्यांच्या पुढें गेलों तर, न जाणों ते आपला स्वीकार करतील, किंवा कदाचित् विरुद्ध होऊन नाशही करतील; ह्मणून तो त्या वृक्षाच्या एका ढोलींत दडून बसला होता. पक्ष्यांचा परस्पर संवाद चालला त्यांत कोणीं द्वीपांतरची हकीकत सांगितली; कोणीं पर्वताचें वर्णन केलें; कोणीं देशांतराचें वर्णन केलें; याप्रमाणें जोजो पक्षी ज्याज्या ठिकाणीं गेला होता, त्याणें त्याणें त्या त्या स्थलाचें वर्णन केलें.

त्यांत एक वृद्ध असून मोठा विशाल असा पक्षी होता, तो आपली हकीकत सांगूं लागला. तो ह्मणाला, "गड्यानों, मी तर आज कनकपुरींत विहार करण्यास गेलों होतों, व उद्यांही मला पुन्हा तेथेंच जायचें आहे. ती पुरी येथून जवळच आहे. माझ्याहातून आतां दूरदूरचा पल्ला झेंपणें होत नाहीं. व तसें केल्यानें फार श्रम होतात. तेव्हां दूर जाऊन उगीच श्रम करण्यांत काय अर्थ आहे. मला त्या कनकपुरींतच फार सुख वाटतें." असें त्या पक्ष्यानें आपलें वृत्त सांगितलें.

तें ऐकून एकाएकीं जशी अमृतवृष्टि व्हावी त्याप्रमाणें शक्तिदेवाला वाटलें, आजपर्यंत 'कनकपुरी आपण पाहिली आहे' किंवा 'आपण तेथें जाणार' किंवा 'गेलों होतों,' यापैकीं एकाही प्रकारचें वाक्य कोणी तोंडावाटे काढलें नव्हतें. शक्तिदेव जरी आपल्या विलक्षण साहसाच्या जोरावर पुढें पुढें चालला होता, तरी केव्हां केव्हां हा आपला प्रयत्न अगदीं व्यर्थ जाईल असें त्याला वाटत होतें. पण यावेळीं त्या म्हाताऱ्या पक्ष्यानें 'आपण आज गेलों होतों, व उद्यांही जाणार

आहे; ' असें ह्मटल्यावरून **शक्तिदेवाला** मोठा [illegible] वाटला. आजपर्यंत त्याला जो आपल्या कृत्याचा संताप होत होता; तो आतां शांत झाला. तो मनांत ह्मणाला, एकूण **कनकपुरी** नांवाची नगरी आहे असें सिद्ध झालें, हें माझें सुदैवच होय ! आतां तेथें जाण्याविषयीं उपाय केला पाहिजे. आणि तो उपाय ह्मटला तर हा विशाळ देहाचा पक्षी, यालाच आपलें वाहन करून जावें. यावांचून दुसरें कांहीं साधन नाहीं. पण या पक्ष्याशीं आपला मुळींच स्नेह नाहीं. बरें सामर्थ्याच्या जोरावर त्याला आपलें वाहन करावें; तर त्याच्यापेक्षां आपल्या अंगीं सामर्थ्यही विशेष नाहीं. कदाचित् तो एकटाच असता; तर कांहीं हालचाल करून पाहिली असती. पण हे पक्षी पुष्कळ आहेत. एकाशीं मी भांडण करूं लागलों तर सगळेच माझ्यावर उठतील व त्यांणीं सहज मला उचलून समुद्रांत टाकून दिलें ह्मणजे पुन्हां मी चौऱ्यांयशीच्या फेऱ्यांत पडेन ! किंवा एखादवेळ मरूनही जाईन. तेव्हां तसें कांहीं न करतां युक्तीनेंच आपण हें काम साधलें पाहिजे.

**शक्तिदेव** याप्रमाणें विचार करीत बसला आहे, तों ते पक्षी बराचवेळ आपआपसांत गोष्टी करून झोंपीं गेले. विचार करतांकरतां **शक्तिदेवाला** असें वाटलें कीं; 'हा पक्षी विशाळ आहे; आपण त्याच्या पंखांत हळूच दडून बसलों तर त्याला कांहींच समजणार नाहीं. जसें एखादें कस्पट कशाला तरी अडकावें त्याप्रमाणें मी याच्या पंखांत राहीन. व तो सकाळीं **कनकपुरीला** जाणारच आहे. तेव्हां त्याच्या बरोबर आयताच तेथें मी पोंचेन. तेथें जातांच आपण मुकाट्यानें बाहेर निघालें ह्मणजे झालें.' ही युक्ति **शक्तिदेवाला** शक्य वाटली. व लगेच तो हळुहळु, तो ह्मातारा पक्षी ज्या ठिकाणीं निजला होता तेथें जाऊन त्याच्या पंखांत दडून बसला. व त्या विशाळ पक्ष्याला त्याबद्दल कांहींच समजलें नाहीं !

पहाट होतांच रात्रीं त्या वडाच्या झाडावर जमलेले पक्षी चहूंकडे

निघून गेले. त्यांच्याबरोबर तो म्हातारा पक्षीही **कनकपुरीला** जाण्यास निघाला व त्याबरोबर गुप्तपणें त्याच्या पंखांत दडून बसलेला **शक्तिदेव**ही निघाला. ज्यानें विलक्षण पक्षपात (पंखाची गति) दाखविला आहे, असें दैवच कीं काय, याप्रकारचा तो पक्षी दडून बसलेल्या **शक्तिदेवाला** आपल्या पाठीवर वहात होत्साता यथेच्छ चरण्याकरतां लौकरच **कनकपुरींत** येऊन पोंचला. आकाशांत असतांनांच त्याणें अमक्या एका बागेंत उतरायचें असा संकेत केला होता. त्याप्रमाणें नियमित ठिकाणीं तो खालीं उतरला. पक्षी जमिनीवर बसतांच **शक्तिदेव**ही हळूच पाठीकडच्या बाजूनें जमीनीवर उतरून मागच्या मागें त्याला दृष्टी न पडतां दूर निघून गेला. वस्तुतः त्या पक्ष्यानें **शक्तिदेवाचें** फार मोठें साह्य केलें होतें; पण तें करावें म्हणून त्याणें केलें नव्हतें. तर **शक्तिदेवानें**च आपल्या विचित्र युक्तीनें त्याच्याकडून तें साह्य करवून घेतलें. तथापि एकंदरींत **शक्तिदेव** त्याचे उपकार मानल्यावांचून राहिला नसता. पण आपण जें साहस केलें त्याबद्दल रागावून कदाचित् तो पक्षी आपला नाश करावयाला प्रवृत्त होईल कीं काय असें भय वाटल्यावरून तो मुकाट्यानें तेथून निघून गेला.

याप्रमाणें आपल्या विचित्र साहसाची सिद्धीच अशा त्या **कनकपुरींत** **शक्तिदेवाची** स्वारी प्राप्त झाली. आज कित्येक वर्षें **कनकपुरी कनकपुरी** असें तो रात्रंदिवस घोकीत होता. व त्याच्या ध्यानीं मनीं **कनकपुरी**च लागली होती. ती एकदांची त्याला मिळाली. पक्ष्याला सोडून बराच दूर गेल्यावर आतां येथें काय करावें? याविषयीं त्याच्या मनांत विचार घोळूं लागले. तो म्हणाला, "आपल्याला आणखी विशेष काय करायचें आहे? ती राजकन्या **कनकरेखा** हिणें फक्त '**कनकपुरी पाहून** आलेल्या मनुष्याला आपण वरणार' इतकेंच सांगितलें आहे. याहून अधिक कांहीं नाहीं. त्याप्रमाणें आपण **कनकपुरींत** तर येऊन पोंहचलों. आतां चहूंकडे फिरून येथल्या कांहीं खाणाखुणा लक्ष्यांत

ठेवाव्या ह्मणजे झालें." असा विचार करीत तो त्या बागेच्या दुसऱ्या प्रदेशांत फिरत होता. इतक्यांत त्याच्या इच्छेपेक्षां अधिक फळ देण्याविषयीं तयार झालेल्या दैवानें, जणूं काय आपल्या दूतीच पाठविल्या आहेत, अशा दोघी तरुण सुंदर स्त्रिया तेथें फुलें काढीत असलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या.

त्या स्त्रियांच्या जवळ जाऊन **शक्तिदेव** आदरपूर्वक त्यांना ह्मणाला "बायांनों, हा कोणचा प्रदेश आहे? याचें नांव काय? व तुह्मी कोण आहां? तें कृपा करून सांगाल तर बरें होईल. कांहीं परिचय नसता मी एकदम तुह्माला प्रश्न केला, याची क्षमा करा. परदेशी असल्यामुळें मला कांहीं माहिती नाहीं. ह्मणून मी तुम्हांला विचारिलें."

हें त्या **शक्तिदेवाचें** भाषण ऐकून त्या दोघी स्त्रिया ह्मणाल्या "भद्रपुरुषा, तूं विचारिलेंस यांत राग येण्यासारखें काय आहे? ठाऊक नसलेली गोष्ट विचारून घेतलीच पाहिजे. या प्रदेशाला **कनकपुरी** असें ह्मणतात. ही विद्याधरांची राहण्याची नगरी आहे. भल्या गृहस्था, येथें **चंद्रप्रभा** नांवाचीएक विद्याधरी राहत असते. ही सर्व नगरी तिच्याच ताब्यांत आहे. आह्मी दोघीही तिच्या सेवेंत राहणाऱ्या असून या बागेच्या रक्षणाचें काम तिणें आमच्याकडे दिलें आहे. सांप्रत आह्मी ही फुलें कादित आहों हींदेखील तिच्याचकरितां आहेत."

हें त्या स्त्रियांचें भाषण ऐकून, **शक्तिदेव** ह्मणाला, "बायांनो, तुह्मी तर मोठ्या उदार मनाच्या दिसतां. तुमचें तें शांत व कोमल भाषण तुमची मनोरम आकृती, व तुमचा मर्यादशीलपणा आणि दुसऱ्याविषयी साहजिक सरळपणा, ह्या गोष्टी पाहून मला फार समाधान वाटलें. ज्यापेक्षां तुह्मी माझ्यावर एवढा अनुग्रह केला आहे, त्यापेक्षां मी आणखी थोडेसें काम सांगितलें, तर तें तुह्मी कराल असें वाटतें. तुमच्या सांगण्यावरून मला तुमची धनीण जी **चंद्रप्रभा**, तिचें दर्शन घ्यावें अशी इच्छा उत्पन्न झाली आहे. या नगरीची मुख्य स्वामीण तरी

आहे. व इतक्या दूर मी दैवयोगानें येथें प्राप्त झालों आहें. तेव्हां तिचें दर्शन घेतल्यावांचून जावें हें मला युक्त वाटत नाहीं. तर तुह्मी याकामीं मला साह्य करा आणि कसेंही करून मला त्या तुमच्या स्वामिणीचें दर्शन करवून द्या.''

**शक्तिदेव** एखाद्या देवासारखा अलौकिक मोठा तेजस्वी होता असें जरी नाहीं, तरी त्याचा चेहरा मोठा पाणीदार असून त्यावर त्याच्या साहसी स्वभावाची झांक माख होती. अंगानें सडपातळ असून तो चांगला देखणा होता. तरी अनेक हालअपेष्टा भोगीत आल्यामुळें त्याचें साहजिक शरीरसौंदर्य पुष्कळ मलिन झालें होतें. तथापि यावेळीं ज्या ठिकाणीं तो प्राप्त झाला होता; त्या ठिकाणीं मनुष्याचें जन्मांत कधीं दर्शनदेखील व्हायचें नाहीं. तेव्हां **शक्तिदेवाला** पाहून त्या उद्यानपालिकांला मोठा अचंबा वाटला होता. त्या, त्याच्या तेजानें धर्षित झाल्या ह्मणून त्याणीं त्याची विनंति मान्य केली असें नाहीं. तरी त्यांला जो अचंबा वाटला होता; त्यामुळें त्यांणीं त्याचें सांगणें मान्य केलें. व त्याला घेऊन त्या दोघीही शहरांत गेल्या. तेथें **शक्तिदेवाला** त्या थेट राजवाड्यांत घेऊन गेल्या. त्या शहरांत बहुतकरून जिकडेतिकडे स्त्रियाच होत्या, व राजवाड्यांत तर लहानमोठ्या अधिकारावर दुसरें कोणीच नव्हतें. जेथें माणकांचे खांब उभे आहेत, व सोन्याच्या भिंती आहेत, लहान मोठे सर्व पदार्थ हिरे, माणकें व सुवर्ण यांनीं घडविलेलें आहेत, असें तें दिव्य गृह पाहून **शक्तिदेवाला**, हें संपत्तीचें केवळ स्थानच आहे असें वाटलें. हा चमत्कारिक प्राणी आजपर्यंत कोणी कधीं न पाहिलेला, एकाएकीं दृष्टी पडल्यामुळें राजवाड्यांतील सेवकजन आश्चर्यचकित झाले. त्यांला हा कोण? कोठला ? व कशाकरितां आला ? याच्याबद्दल विलक्षण कल्पना उत्पन्न झाल्या. लगेच त्यांतले कांहीं सेवक धांवत धांवत आपली यजमानीण **चंद्रप्रभा** हिला सांगण्यास गेले. ते ह्मणाले, "अहो बाईसाहेब, अहो

बाईसाहेब, हें पहा काय चमत्कारिक प्रकर्ण आहे तें. कोणीएक मनुष्य आपल्या वाड्यांत आला आहे. आजपर्यंत मनुष्य कसला असतो तो आह्मी कधीं पाहिलादेखील नव्हता. असा हा चमत्कारिक प्राणी येथें कां आला ? तें आपणच समजून घ्या."

आश्चर्ययुक्त झालेल्या सेवकांनीं सांगितलेलें ऐकून **चंद्रप्रभेनें** तत्काल चोपदारणीला त्याला लौकर आंत घेऊन येण्याविषयीं आज्ञा केली. तेव्हां चोपदारीण लगबगीनें बाहेर जाऊन, तिणें त्या उद्यानपालिकांच्याबरोबर आलेल्या **शक्तिदेवाला** त्यांच्यासह आंत नेलें. **शक्तिदेव** आंत गेला व त्याणें—**ब्रम्हदेवाच्या** मनोहर वस्तु निर्माण करण्याच्या कुशलतेची केवळ सीमाच अशा—नेत्रांला आनंद देणाऱ्या त्या **चंद्रप्रभेला** अवलोकन केलें. **शक्तिदेवाला** पाहतांच, **चंद्रप्रभा** रत्नखचित पलंगावर बसली होती तेथून उठून पुढें आली. व तिणें त्याचें स्वागत करून त्याला आसनावर बसविलें. वस्तुतः तिला इतका आदरमान करण्याचें कांहीं कारण नव्हतें; पण **शक्तिदेवाच्या** दर्शनानेंच ती त्याला वश झाली होती. यामुळें, तिचा त्याच्याठिकाणीं विलक्षण प्रेमभाव उत्पन्न झाला !

**शक्तिदेव** आसनावर बसल्यावर थोडावेळ त्याला विश्रांति घेऊं देऊन; **चंद्रप्रभा** मोठ्या कौतुकानें त्याला ह्मणाली, "भाग्यशाली पुरुषा! मला आपली अगदींच माहिती नाहीं ह्मणून प्रश्न करावा लागला याची क्षमा करा. आपण असे विलक्षण साहसी कोण आहां ? कोणत्या ठिकाणीं आपलें वास्तव्य ? व मनुष्यांला अगम्य अशा या भूमींत आपण कसे प्राप्त झालां ? हें सांगून माझी जिज्ञासा पूर्ण कराल तर मला फार समाधान होईल. तुमच्या दर्शनानें परम आनंद झाल्यामुळें मला ही इच्छा उत्पन्न झाली आहे."

**चंद्रप्रभेनें** कौतुकानें याप्रमाणें प्रश्न केला. तो एकून **शक्तिदेव**—आपलें नांव, जात, कुल, गोत्र, राहण्याचें स्थान, वगैरे सर्व सांगून ह्मणाला, "आमच्या राजाची कन्या **कनकरेखा** हिणें 'ही तुमची **कनकपुरी**

ज्याणें पाहिली असेल त्याला आपण वरणार,' असा पण लाविल्यामुळें तिच्या प्राप्तीची अपेक्षा करणारा मी अनेकप्रकारचीं दुःखें व संकटें भोगून येथें प्राप्त झालों." असें सांगून नंतर **शक्तिदेव** आपण कोणकोणत्या रितीनें येथें आलों तें सर्व तिला निवेदन करिता झाला. तें ऐकून **चंद्रप्रभा** कांहींशी दुःखित होऊन अगदीं तटस्थ झाली.

नंतर तिणें एक लांब सुस्कारा सोडला. व त्या **शक्तिदेवाला** बरोबर घेऊन ती तेथून दुसऱ्या एकांतस्थळीं गेली. व नंतर **शक्तिदेवाला** ह्मणाली, " सुभगपुरुषा, तूं सांगितलेंस त्यावरून सर्व कांहीं माझ्या लक्ष्यांत आलें. आतां मी तुला एक गुह्य गोष्ट सांगतें ती ऐकून घे. या भूतलावर सर्व विद्याधरांचा अधिपति **शशिखंड** नांवाचा एक विद्याधर आहे. आह्मी त्याला अनुक्रमानें चौघी मुली झालों. सर्वांत वडील मी. माझें नांव **चंद्रप्रभा**, दुसरीचें नांव **चंद्ररेखा**, तिसरीचें नांव **शशिरेखा**. व चवथीचें नांव **शशिप्रभा**. अशा आह्मी चौघी सख्या बहिणी आहों. हें आमच्या बापाचें घर. येथें आह्मी मोठ्या सुखांत अनुक्रमानें लहानाच्या थोर झालों. एकेदिवशीं माझ्या धाकट्या तिघीही बहीणी स्नान करण्याकरतां **भागिरथी**च्या कांठीं गेल्या. मीही त्यावेळीं गेलें असतें; पण मी कन्याव्रत धारण केलें होतें यामुळें मला जातां आलें नाहीं. त्या माझ्या बहिणी **गंगे**च्याकांठीं जाऊन तेथें जलक्रीडा करूं लागल्या. त्या ठिकाणीं **अग्रयतपा** नांवाचा एक तपस्वी ऋषि; **गंगे**च्या उदकांत बुडी मारून तप करित होता. तारुण्याचा मद कांहीं विलक्षण आहे. त्या माझ्या बहिणी तेथें जलक्रीडा करित असतां त्यांणीं त्या ऋषीची थट्टा आरंभली. त्या एकसारख्या त्याच्या अंगावर ओंझळींनीं पाणी घालूं लागल्या ! एकदोनवेळां त्याणें त्यांला नको ह्मणून सांगितलें ; पण जोंजों तो नकोनको ह्मणत होता तोंतों माझ्या बहीणींला अधिकाधिकच हर्ष वाटूं लागला. व त्यांणीं एकसारखा त्याच्या अंगावर पाण्याचा मारा सुरू केला ! तो त्यांचा उद्दामपणा पाहून त्या ऋषीला

राग आला; व त्याणें—"दुष्ट कारट्यांनों, तुमच्या दांडगेपणाचें फल तुह्मांला मिळालें पाहिजे. जा, तुह्मी मनुष्यलोकांत जन्म धारण कराल. हा घ्या तुह्मांला शाप!" असें म्हटलें.

त्या तापस्यानें असें सांगितलें; तेव्हां माझ्या बहिणींच्या डोळ्यांवरचा मद झरकन् उतरला. त्या त्याच्या पायांपडून त्याला प्रसन्न करून घेण्याचा प्रयत्न करूं लागल्या; पण त्याणें त्यांच्यावर मुळींच अनुग्रह केला नाहीं. नंतर त्या तिघीजणी दुःखित होऊन परत घरीं आल्या व त्यांणीं बाबांला झालेली सर्व हकीकत सांगितली. ते तरी करतात काय? त्या तपोनिधीचें वचन खोटें पाडण्याचें कोणाचें सामर्थ्य आहे? त्याला प्रसन्न करून घ्यावें; असा विचार करून आमचे बाबा तत्काल तो ऋषी ज्या ठिकाणीं होता तेथें गेले. त्यांणीं—"महाराज, त्या पोरी मूर्ख आहेत, अज्ञान आहेत; त्यांणीं केलेल्या अपराधांची क्षमा करून आपण त्यांच्यावर अनुग्रह करावा." अशी पुष्कळप्रकारें प्रार्थना केली. तेव्हां तो ऋषि अंमळ शांत होऊन ह्मणाला, "मी दिलेला शाप तर कधीं खोटा व्हावयाचा नाहींच; पण त्या तुझ्या मुली आपल्या पूर्वजातीचें स्मरण करणाऱ्या होतील. त्यांचें दिव्य ज्ञान कायम राहिल. मनुष्यपणाचा स्वीकार केला; तरी त्यांच्या पूर्वींच्या स्थितींत कांहीं अंतर पडणार नाहीं." असें सांगून त्याणें "निरनिराळ्या रितीनें त्या शापापासून मुक्त होतील" असें सांगितलें.

याप्रमाणें त्या माझ्या तिघी बहिणींला शाप झाल्यामुळें, लवकरच त्यांना मनुष्यभाव प्राप्त झाला. त्यांणीं आपापलीं शरीरें टाकून मनुष्यलोकांत प्रयाण केलें. तिघी मुलींवर असें संकट कोसळल्यावरून आमच्या बाबांना फारच दुःख झालें. त्यांणीं ही नगरी माझ्या हवालीं करून तपोवनाचा आश्रय केला. त्या दिवसापासून मी एकटी या नगरींत राहत आहें. थोड्या दिवसांपूर्वीं मला स्वप्नांत साक्षात् देवी **भवानी** हिणें दर्शन देऊन—"मुली, एक मोठा साहसी मनुष्य तुझा

पति होईल' असें सांगितलें. बाबांनीं माझ्या लग्नाविषयीं पुष्कळ प्रयत्न केले. अनेक तरुण व सुस्वरूप विद्याधरांनीं, मी आपली स्त्री व्हावें अशी इच्छा केली; पण मी त्या सर्वांलाही नापसंत केलें. माझ्या पित्याच्या मनांत लौकर माझा विवाह व्हावा असें असून ते आग्रह करीत होते. तरी त्यांचें समाधान करून मी अद्याप अविवाहितच राहिलें आहें. सांप्रत, आश्चर्यकारक अशा या तुझ्या आगमनानें व तुझ्या सुंदर रूपानें वश झालेली मी, तुलाच अर्पित झालें आहें. मी मनोभावानें तुला वरलें आहे. व **पार्वतीनें** मला स्वप्नांत सांगितलें होतें त्याप्रमाणें तिणेंच तुला माझ्याकरतां अशा अगम्य ठिकाणीं आणलें असें मी समजतें. आपणां उभयतांचा विवाह आतांच होण्यास दुसरी कांहीं अडचण नाहीं; पण माझे वडील **हिमाचलावर** तप करीत आहेत. व त्यांच्या संमतीनें विवाह करावा हें शास्त्राला व रूढीलाही अनुसरून आहे. आणि मलाही तें अवश्य वाटतें. ह्मणून मी तुला अशी विनंति करतें कीं आज पंचमी तिथि आहे. येत्या चतुर्दशीच्या दिवशीं मी तुझ्याबद्दल बापाला विनंति करण्याकरतां **ऋषभपर्वत** नांवाच्या **हिमाचलाच्या** शिखरावर त्यांना भेटायला जाऊन विनंति करणार आहें. तेथें सर्व विद्याधर देशदेशांतराहून येतील. ह्या चतुर्दशीच्या दिवशीं भगवान् **शंकराची** पूजा करण्याकरतां प्रतिवर्षी ते तेथें जमत असतात. माझा बापही तेथें येईल. तेथेंच मी त्याला विनंति करून त्याची आज्ञा घेऊन, पुन्हा लौकर येथें येईन. व मग तूं यथाविधी माझ्याशीं विवाह करून घे. तोंपर्यंत तूं येथेंच सुखानें वास्तव्य कर."

असें सांगून विद्याधरांला उचित असे उत्तमोत्तम सर्व भोग तिणें **शक्तिदेवाला** अर्पण केले. व मोठ्या प्रेमळ मनानें त्याचें उत्तम आदरातिथ्य केलें. प्रतिदिवशीं इकडच्या तिकडच्या अनेक गोष्टी करून **शक्तिदेव** व **चंद्रप्रभा** मनाची करमणूक करून घेत होते. **चंद्रप्रभेनें** त्याच्याशीं विवाह करून घ्यायचा निश्चय केल्यावरून **शक्तिदेवाला** विलक्षण

आनंद झाला होता. उघडच आहे. तो केवळ **कनकपुरी** पाहण्य करतांच ह्मणून तेथें गेला होता, असें असून तेथें **चंद्रप्रभे**सारख्या ला ण्यवतीचा लाभ होणार हें ऐकून त्याला आनंद कां न व्हावा ? त्या जेवढ्याची इच्छा केली होती, त्याहून अधिक द्यावें अशी दैवाची यं जना होती. व त्याप्रमाणें सर्व गोष्टी हळू हळू घडल्या, त्या अनुक्रम पुढें येतीलच. असो.

चतुर्दशी तिथि येईपर्यंत **चंद्रप्रभा शक्तिदेवाशीं** अनेकप्रकार हास्य, विनोद व करमणूक करीत होती. ती त्याची बरदास्त ठेवण्य तत्पर राहिली. चतुर्दशी येतांच, मागें त्याची सर्व प्रकारची व्यवस् उत्तम रितीनें लागेल असा बंदोबस्त करून **शक्तिदेवा**ची आज्ञा घेउ ती **ऋषभ** पर्वतावर जाण्यास निघाली. जातेवेळीं ती **शक्तिदेवा** प्रेमपूर्वक ह्मणाली. "प्रियसख्या, आज बाबांला, तुझ्याबद्दल विनंति क रण्याकरतां मला गेलें पाहिजे. हे माझे दास दासी वगैरे सेवकजन माझ्य बरोबरच येतील. तुला येथें एकटेंच रहावें लागेल. तरी सर्व तऱ्हे भोग तुला अनुकूल होतील अशी मी व्यवस्था करून ठेविली आहे. दं नच दिवसांत मी परत येईन. तोंपर्यंत तूं येथें सुखानें रहा. आपण एक आहें असें समजून दुःखी होऊं नकोस. तूं एकाकी या मंदिरांत अस बाकी पाहिजे त्याठिकाणीं जा, पाहिजे ती वस्तू घे, त्याविषयीं कांह हरकत नाहीं. पण या घराच्या माडीवर मधला दिवाणखाना आहे त्यां मात्र तूं कधींही जाऊं नकोस; येवढी मर्यादा परिपालन कर."

असें सांगून ती **चंद्रप्रभा**, आपलें मन त्या तरुण पुरुषाजवळ ठेवू त्याच्या मनाच्या अनुलक्ष्यानें गमन करणारी होत्साती, तेथून निघाल तिच्या बरोबरच तिचे नोकरचाकरही गेले. त्या मोठ्या भव्य वाड्यां कायतो एकटा **शक्तिदेव**च राहिला. तेथें खाण्यापिण्याची वगैरे सर्व तय रीच होती. मनास वाटेल त्यावेळीं पाहिजे तो पदार्थ सिद्ध होता. वे कसा घालवावा याचीच कायती अडचण होती. त्या वाड्यांत अने

चमत्कारिक वस्तू होत्या. अनेक रमणीय स्थळें होतीं. जिकडे पहावें तिकडे सोनें, हिरे, माणकें यांवांचून दुसरें कांहींच नव्हतें. **शक्तिदेव** या ठिकाणाहून त्या ठिकाणांत, व त्या ठिकाणांतून दुसऱ्या ठिकाणांत अशा रितीनें परिभ्रमण करीत करीत मनाची कर्मणूक करीत होता.

**चंद्रप्रभेनें** 'माडीवरच्या मधल्या दिवाणखान्यांत मात्र जाऊं नको,' असें सांगितलें होतें. त्याची त्याला आठवण होती. तो रिकामा बसला असून त्याला हरकत करणारा तेथें कोणींच नव्हता. यामुळें त्याच्या मनांत असें आलें कीं, 'त्या विद्याधराच्या मुलीनें आपल्याला त्या दिवाणखान्यांत जाऊं नको असें सांगितलें तें कां ? आग्रहानें तिणें नको ह्मटलें यावरून त्या ठिकाणीं कांहींतरी विलक्षण प्रकार असेल. व तो तर आपण अवश्य पाहिलाच पाहिजे.' याप्रमाणें त्याच्या मनांत आलें. नंतर त्या दिवाणखान्यांत काय आहे तें पाहण्याविषयीं ज्याला कौतुक उत्पन्न झालें आहे असा तो **शक्तिदेव** माडीवर गेला. त्याणें प्रथम हळूच त्या दिवाणखान्याचें दार उघडून आंत प्रवेश केला. वस्तुतः अमोलिक वस्तूंनीं भरलेला येवढा मोठा वाडा जिणें आपल्या हवालीं केला तिला त्या एका दिवाणखान्याबद्दलच कांहीं शंका आली असेल, असें मानण्यास कांहींच सबळ आधार नव्हता. तसेंच कांहीं विशेष कारण असेल ह्मणूनच तिणें नको ह्मटलें असावें; असेंही त्याच्या मनांत आलें. तरी कोणतीही गोष्ट कोणाला करूंनको असें सांगितलें; ह्मणजे ती करण्याविषयीं त्याची अधिकच प्रवृत्ति होते. अशी साधारणतः सर्व मनुष्यांच्या मनाची स्थितीच आहे. त्याप्रमाणें **चंद्रप्रभेनें** नको ह्मटलें, तर तें अवश्य पाहिलेंच पाहिजे, असें **शक्तिदेवा**च्या मनांत आलें ! असो.

**शक्तिदेव** त्या दिवाणखान्यांत गेला तेव्हां तेथें त्याला तीन मोठमोठे रत्नखचित मंडप (खोल्या) दृष्टीस पडले. त्यांचीं दारें लावलेलीं होतीं. त्यांपैकीं एकाचें दार उघडून **शक्तिदेवानें** आंत प्रवेश केला. आंत जाऊन पाहतो तों हिऱ्याच्या पांढऱ्या सफेत मोत्या

पलंगावर कोणी निजलें आहे, व त्याच्या अंगावर सफेत चादर घातली आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें. त्या साहसी **शक्तिदेवाची** जिज्ञासा येवढ्यानेंच परिपूर्ण झाली नाहीं. त्याणें पलंगावर जें कोणी निजलें आहे असें त्याला वाटलें होतें त्याच्या अंगावरचें हळूच पांघरूण काढलें. आणि पाहतो तों, ती **वर्धमान**नगरीचा राजा **परोपकारी** याची कन्या, जिच्याकरतां आपण येथपर्यंत आलों ती **कनकरेखाच** आहे असें त्याला वाटलें!

नंतर हळूच तिला हलवून पाहिलें; तर तिचें तें केवळ शरीर मात्र असून त्यांत प्राण मुळींच नाहींत असें दिसलें. तेव्हां तो चिंतातुर होऊन ह्मणाला, "अरे! हा काय चमत्कार आहे कोणास ठाऊक? पुन्हा कधींच जागें व्हायचें नाहीं अशा रितीनें ही निजली आहे, किंवा हिला मूर्च्छा आली आहे, अथवा मलाच भ्रांति झाली आहे! जिच्याकरतां मी एवढा मोठा दीर्घ प्रवास केला ती तर येथेंच आहे. आणि येथें, तिचें प्राण गेलेलें शरीर असून **वर्धमान** नगरींत त्या राजाच्या येथें ती जीवंत आहे. बरें, ही मेली असें ह्मणावें तर हिच्या शरीराची कांति अगदीं टवटवीत दिसते. यावरून मेली असें ह्मणतां येत नाहीं. तेव्हां हें आहे तरी काय? एकंदरींत कांहीं कारणानें, दैवानें मला मोह उत्पन्न करण्याकरतां हें एक इंद्रजाल निर्माण केलें असावें यांत कांहीं संशय नाहीं!" याप्रमाणें विचार करीत **शक्तिदेव** त्या मंडपांतून बाहेर आला. व आणखी दुसऱ्या मंडपांत काय आहे तें पहावें ह्मणून त्याणें त्यांचीं दारें उघडून पाहिलें. तों त्याही दोन मंडपांत एकेक शरीर प्रथमच्या मंडपांतल्यासारखेंच, पलंगावर असलेलें त्याच्या दृष्टीस पडलें. त्यावरून **चंद्रप्रभेनें** आपल्या तीन बहिणींची जी हकीकत सांगितली तिचा या शरीरांशीं संबंध आहे, असें त्याच्या लक्ष्यांत आलें. व शापानें मनुष्यलोकांत गेलेल्या तिघींचीं हीं तीन शरिरें आहेत असेंही तो समजला. नंतर आश्चर्यचकित झालेला **शक्तिदेव** खालच्या मजल्यांत आला. तेथें फिरतांफिरतां त्या

मंडपाच्या खालच्या प्रदेशांत एक उत्तम तळी, स्वच्छ पाण्यानें भरलेली असून जींत दिव्य कमलें प्रफुल्लित झालेलीं आहेत अशी; त्याच्या दृष्टीस पडली. तळी पाहून तिच्या रमणीय शोभेकडे **शक्तिदेवाचें** मन वेधलें आहे इतक्यांत, ज्याच्यावर रत्नखचित खोगीर घातलें आहे, सुवर्णमय लेंडीला मोत्यांचे घोंस लावले आहेत, जरबंदाला मोठा एक मोत्यांचा झुबका लावलेला असून त्यांत एक तेजःपुंज हिरा लोंबत आहे! व रत्नखचित कलगी व तुरा आणि सोन्याचा लगाम यांणीं सुशोभित दिसणारा असा एक उत्तम घोडा त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां तळी पाहण्याकडे जें त्याचें लक्ष्य लागलें होतें तें घोड्याकडे गेलें. मोठ्या कौतुकानें **शक्तिदेवानें** तो घोडा लक्षपूर्वक पाहिला.

**शक्तिदेव** जातीचा ब्राह्मण होता तरी मूळपासून लफंगेपणांत व चैनींत त्याचे बरेच दिवस गेले असल्यामुळें साधारणतः नागरिक मनुष्याच्या अंगीं जी चतुरस्रता असते, ती त्याच्या अंगीं बरीच होती. घोड्यावर बसणें, पोहणें, इत्यादि कला त्याला चांगल्या अवगत होत्या. यासर्वांपेक्षांही त्याचा स्वभाव अतिशय हूड असून मोठा साहसी होता, व प्रत्येक लहानसहान गोष्टीचीदेखील त्याला जिज्ञासा विशेष होती. ह्याच अलौकिक गुणांमुळें त्याच्या हातून आजपर्यंत मोठीं साहसाचीं कृत्यें झालीं. असो. घोडा पाहिला तेव्हां त्याची शोभा पाहून **शक्तिदेवानें** तेवढ्यावरच तृप्त व्हावें कीं नाहीं. पण त्याला तसें कोठलें वाटायला! त्याच्या भोंवतीं फिरून व त्याच्या पाठीवर थाप मारून **शक्तिदेवानें** त्या घोड्याची अंमळ चांचणी पाहिली. व लगेच त्याच्यावर स्वार व्हावें असें त्याच्या मनांत आलें! तत्काल त्याणें डाव्या हातानें घोड्याचा लगाम धरून रिकिबींत पाय ठेवला, त्याबरोबर घोडा पलिकडे सरला, व त्याणें अंमळ मागें फिरून एक लाथ अशी जोरानें मारली कीं तीसरसा **शक्तिदेव** जवळच्या—वर सांगितलेल्या—तळींत सपशेल पडला!

तळींत पडतांच **शक्तिदेव** प्रथम खालीं गेला. आणि उसळी मारून तोंड वर काढून पाहतो, तों ती **कनकपुरी** नाहीं, ती दिव्य तळी नाहीं, तो घोडा नाहीं, व तो त्या **चंद्रप्रभेचा** अप्रतिम राजवाडाही नाहीं ! **शक्तिदेव** आपली जन्मभूमि **वर्धमानपुर** येथें, एका बागेंतल्या तळींत येऊन पोंचला ! तो गडबडीनें वर येऊन पाहतो तों **चंद्रप्रभे**वांचून दीन झालेल्या कुमुदा सारखा आपण आहें, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तो ह्मणाला, "अरे हा काय चमत्कार आहे ! ही **वर्धमान**नगरी कोठें ! आणि त्या विद्याधरांची **कनकपुरी** कोठें ! मी कोठें त्या तळींत पडलों होतों आणि कोठें येऊन पोंचलों ! हा काय चमत्कार झाला. एकंदरींत ही सर्व माया पसरली आहे असें वाटतें. काहीं तरी विचित्र कृत्य करणाऱ्या कोणीतरी मला दुर्दैव्याला फसविलें असावें असें वाटतें. अथवा पुढें आणखी काय काय होणार आहे हें तरी कोणास ठाऊक ! दैवाची गति मोठी विचित्र आहे."

अशा अनेक प्रकारच्या कल्पना करितहोत्साता **शक्तिदेव** दीन होऊन त्या तळीच्या कांठावर आला. जसा एखादा मनुष्य स्वप्नांत मोठ्या सुखांत निमग्न झालेला असून एकाएकीं जागा होऊन दुःखांत पडतो, तसा **शक्तिदेव** यावेळीं अतिशय दुःखांत पडला होता. झालेल्या सर्व गोष्टींबद्दल त्याला मोठें विलक्षण आश्चर्य वाटत होतें. 'झालें तें झालें, आतां आपण आपल्या घरीं जावें' असा विचार करून तो हळूहळू बापाच्या येथें प्राप्त झाला. किती झालें तरी आईबापांचें आंतडें कळकळल्यावांचून राहणार नाहीं. **शक्तिदेव** जुगारी, रंडिबाज, हूड व साहसी असा विलक्षण होता तरी तो नाहींसा झाला त्यादिवसापासून त्याचे मातापितर सतत काळजी करित होते. शाहणा असो किंवा वेडा असो; आईबापाला मुलगा सुखरूप असावा असेंच वाटत असतें. बहुत दिवस नाहींसा होऊन एकाएकीं आलेल्या **शक्तिदेवाला** पाहतांच, त्याच्या मातापितरांला व घरच्या इतर मनुष्यांला फार आनंद झाला. बापानें

प्रेमपूर्वक त्याला आपल्याजवळ बसवून घेतलें. व "इतके दिवस कोठें गेला होतास?" वगैरे हकीकत विचारली. शक्तिदेवानें, आपण कोठें गेलों होतों व वाटेंत काय काय केलें याविषयीं तपशीलवार असें कोणासच कांहीं सांगितलें नाहीं. 'इकडेतिकडे फिरत होतों व फिरतांफिरतां आपले इतके दिवस गेले.' असें तो ज्यालात्याला सांगत असे. असो.

याप्रमाणें शक्तिदेव परत घरीं आल्यावरून घरच्या मनुष्यांला आनंद होऊन त्यांणीं व त्याच्या मित्रांनीं त्याचें विशेष गौरव केलें. तो दिवस त्याचा असाच आनंदांत गेला. दुसरेदिवशीं सकाळीं ओटीवर तो आपल्या मित्रांशीं बोलत बसला आहे, तों इतक्यांत पडघम वाजलेला त्याच्या कानांवर आला. तेव्हां तो दरवाज्याच्या बाहेर येऊन ऐकत उभा राहिला. तों—"ब्राह्मण अथवा क्षत्रिय या दोन वर्णांतील ज्या मनुष्यानें खरोखर कनकपुरी पाहिली असेल त्याणें सांगावें; ह्मणजे आमचे महाराज त्याला आपली मुलगी देऊन यौवराज्यही देण्यास तयार आहेत," असें राजाच्या सेवकांनीं पुकारलें. तें ऐकून शक्तिदेव त्या पडघम वाजविणाऱ्यांजवळ जाऊन ह्मणाला, "अहो, मी सांगतों तें ऐका, ती कनकपुरी मी पाहून आलों आहें. व याबद्दल मी पाहिजे तर खात्री करून देईन."

राजा आपल्या सेवकांकडून प्रतिदिवशीं तशी दवंडीपिटवीत होता. पण 'आपण ती नगरी पाहिली आहे' असें कधींच कोणीं ह्मटलें नाहीं. शक्तिदेवानेंच पूर्वीं एकवेळ तसें ह्मटलें होतें; पण अखेरीस तें त्याचें सांगणें खोटें झालें, हें मागें सांगितलेंच आहे. आज पुनः शक्तिदेवानें 'ती नगरी आपण पाहिली' असें सांगितल्यावरून राजपुरुषांला फार आनंद झाला; व त्यांणीं त्याला तत्काल राजाजवळ नेलें. त्या सेवकांला शक्तिदेवाची ओळख नव्हती; पण राजानें त्याची चांगली ओळख ठेविली होती. त्याला पाहतांच पूर्वींची गोष्ट आठवून त्या खेपेसारखेंच यावेळींही हा खोटें सांगत आहे असें राजा-

त्या वाटलें. ह्मणून त्याणें—"भटजीबुवा, खरोखरीच तुह्मीं ती नगरी पाहिली आहे का?" असें विचारलें. तेव्हां शक्तिदेव ह्मणाला, "जर मी ती नगरी पाहिली नसेल व मी खोटें सांगतों असें ठरेल तर महाराजांनीं मला पाहिजे तसली शिक्षा करावी. पाहिजे तर सुळावर चढवावें! माझ्या-कडून हरकत नाहीं. याखेपेस मी आपल्या शरीराला पण लावून सांगतों आहें; राजकन्येनें आतां मला पाहिजे त्या तेथल्या खाणाखुणा खुशाल विचाराव्या, त्या मी सर्व सांगून देतों."

शक्तिदेवानें विशेष खात्रीपूर्वक सांगितल्यावरून 'हा इतका छातीला हात लावून सांगतो, तेव्हां याणें ती नगरी पाहिली असेल' असें राजालाही वाटलें. तेव्हां तत्काल त्याणें चोपदारास सांगून आपली मुलगी कनकरेखा हिला तेथें बोलावून आणलें. कनकरेखेला शक्तिदेवाची चांगलीच ओळख होती. त्याला पाहतांच ती राजाला ह्मणाली, "कनकपुरी पाहून आला आहे तो हाच का? बाबा, तुह्मांला काय भ्रम झाला आहे [illegible] काय कोणास ठाऊक? हा ब्राह्मण अगदीं खोटें बोलतो. याणें मागें एकवेळ असेंच सांगितलें होतें, [illegible] तुम्हाला ठाऊक नाहीं का? मग पुन्हा तुह्मी कशाला याच्यावर विश्वास ठेवतां?"

पूर्वींच्या खेपेस राजकन्येनें शक्तिदेवाचा निषेध केला; तेव्हां तो उगीच बसला होता. कारण त्याणें तें खोटेंच सांगितलें होतें; पण यावेळीं तो तें कां ऐकून घेईल? कनकरेखेनें 'हा ब्राह्मण खोटें बोलतो' असें ह्मणतांच, तो पुढें येऊन ह्मणाला, "हांहां, उगीच तसें बोलूं नका. तुम्हाला काय काय विचारायचें असेल तें आधीं विचारा. मी त्या कनकपुरींतल्या सर्व खाणाखुणा सांगून देतों. त्या कनकपुरींत तूं एका पलंगावर निजलेली आहेस, निदान तुझें शरीर तरी तेथें आहे, ही गोष्ट खरी किंवा खोटी इतकेंच सांग ह्मणजे झालें. आणि तूं तेथें केवळ शरीरमात्रानें असून येथें जीवंत आहेस हा काय चमत्कार?"

कनकरेखेला आणखी कांहीं विशेष खाणाखुणा ऐकण्याचें कारण

राहिलें नाहीं. **शक्तिदेवानें** मुख्य गोष्ट सांगतांच तिणें त्याचें बोलणें तत्काल कबूल केलें. व बापाला ह्मणाली, "बाबा, या महात्म्यानें ती **कनकपुरी** खरोखर पाहिली आहे, यांत कांहीं संशय नाहीं. आतां मी लौकरच तेथें जाणार व तेथें असतांना हा माझा पति होईल. तेथें माझ्या आणखी तीन बहिणी आहेत. त्यांच्याशींही हा विवाह करून नेईल. व सर्व विद्याधरांचें राज्य हा त्या **कनकपुरीं**त राहून करील." बापाच्या गळ्याला मिठी मारून ह्मणाली; "बाबा, मला आतां तुमचा निरोप असावा. ऋषींच्या शापानें मी येथें तुमच्या घरीं जन्मास आलें. आज तो माझा शाप क्षीण झाला. आतां मी पुन्हा आपल्या शरीरांत प्रवेश करणार. व त्या **कनकपुरीं**त जाऊन राहणार. '**कनकपुरीं**त तुझें शरीर कोणी मनुष्य जेव्हां पाहून येईल, तेव्हां मनुष्यपण कसें प्राप्त झालें याचें तुला स्मरण होऊन, तूं त्या मानवशरीराचा त्याग करशील. व तेव्हांच तुझ्या शापाचा अंत होईल, आणि जो मनुष्य तुझें शरीर पाहून येईल, तोच तुझा पति होईल.' असा मला शाप देणाऱ्या **अग्रयतपा**नांवाच्या ऋषीनें नियम केला आहे. मी मनुष्य झालें आहें तरी मला पूर्वजातीचें स्मरण आहे, व माझें पूर्वींचें ज्ञान मुळींच नष्ट झालें नाहीं. तर आतां मी आपल्या पूर्वींच्या विद्याधरीच्या शरीराचा स्वीकार करण्याकरितां स्वस्थानीं जातें, तुमची मला आज्ञा असावी."

बापाला असें सांगून **कनकरेखेनें** मनुष्यजन्मांतली आपली आई **कनकप्रभा**, व बाप राजा **परोपकारी** या उभयतांची आज्ञा घेतली. लाडक्या मुलीनें देहत्याग करून जावें हें आईबापांला कसें इष्ट वाटेल! कन्येचा वियोग सहन करण्याविषयीं ते असमर्थ होते, तरी **कनकरेखेनें** आपला जो वृत्तांत सांगितला त्यावरून—'ती गेल्याशिवाय राहणार नाहीं. तेव्हां तिला आग्रह करण्यांत कांहीं अर्थ नाहीं,' असें समजून मातापितर स्तब्ध बसले. **कनकरेखेनें**, कांहीं उत्तर

न देणें हीच त्यांची आज्ञा असें समजून तत्काल देहाचा त्याग केला व ती तेथून निघून गेली. प्राण आंतून गेल्यामुळें तें शरीर लांकडासारखें निर्जीव होऊन तत्काल धाडकन् जमीनीवर पडलें. त्याबरोबर राजवाड्यांत एकच कल्लोळ झाला. राजा व राणी या उभयतांच्या शोकाला पारावार नाहींसारखा झाला. वस्तुतः आईबापांचा त्याग करून जाणें हें त्या मुलीला योग्य नव्हतें; पण दिव्य लोकांत राहणारे असून जे केवळ शापाच्या निमित्तानेंच मनुष्यलोकांत येतात, त्यांला मानवदेह हा एक प्रकारचा तुरुंगच आहे, असें वाटत असतें. नियमित शिक्षा भोगून सरतांच तुरंगांत पडलेला मनुष्य जसा तेथल्या सहवासानें परिचित झालेल्या इतर लोकांच्या स्नेहाला गुंतून न राहतां तत्काल कैदखान्याच्या बाहेर पडतो, त्याप्रमाणें शाप सरतांच दिव्य लोक इहलोकच्या आपल्या आप्त सोयरे वगैरेंची फारशी ओढ धरीत नाहींत. त्यांला हें मर्त्यशरीर सोडून कधीं मोकळे होऊं असें वाटतें. त्याप्रमाणें **कनकरेखे**लाही वाटलें असेल ह्मणून ती त्वरेनें निघून गेली.

बिचारा **शक्तिदेव** मात्र दोहोंकडूनही नाडल्यासारखा झाला. जिच्याकरतां त्याणें एवढे सायास केले तिची प्राप्ती झाली नाहीं. उलट ती निघून गेल्यामुळें राजवाड्यांतल्या सर्व लोकांचीं दुरुत्तरें त्याला ऐकावीं लागलीं. **शक्तिदेवानें कनकपुरी** पाहून येऊन त्याणें तिच्या शरीराचें वर्तमान सांगितलें ह्मणूनच ती निघून गेली. नाहीं तर गेली नसती. तेव्हां **शक्तिदेवच कनकरेखे**च्या शरीरत्यागाला कारण झाला असें समजून संतापलेला राजा, राणी व इतर लोक यांणीं बिचाऱ्या ब्राह्मणावर निंदेचा आणि अभिश्रापांचा एकसारखा वर्षाव केला. पण तो करतो काय.! त्याला मुकाट्यानें तें सहन करावें लागलें. इतके क्लेश भोगून ज्यांच्यावर त्याचें मन आसक्त झालें होतें त्या **चंद्रप्रभा** आणि **कनकरेखा** या दोघींचीही त्याला प्राप्ति झाली नाहीं. आपला मनोरथ पूर्ण न झाल्यामुळें खिन्न होऊन त्याणें आपली पुष्कळ निंदा क-

रून घेतली. सर्व लोक क्षुब्ध झाल्यामुळें आतां येथें राहणें चांगलें नाहीं, असें समजून तो तत्काल राजवाड्यांतून बाहेर पडला.

तो मनांत ह्मणाला, 'मला जी गोष्ट इष्ट आहे ती पुढें होईल असें तर त्या **कनकरेखेनें** सांगितलेंच आहे. तेव्हां आतां मी जो असा दुःखी झालों आहें, याचें कारण काय ? कोणत्याही कार्याची सिद्धि होणें हें दैवाच्या साह्यावर व आपल्या धैर्यावर अवलंबून आहे. पूर्वी **कनकपुरी** कोठें आहे ? काय आहे ? याची मला मुळींच माहिती नसतां मी तेथें गेलों. व मोठ्या प्रयासानें ती नगरी पाहून आलों. आतांतर मला सर्व माहित झालें आहे. ज्या मार्गानें पूर्वी मी गेलों त्याच मार्गानें पुन्हा मी **कनकपुरीं**त जाऊं शकेन ! तेथें गेलों ह्मणजे ज्यांच्यावर माझें मन आसक्त झालें, त्या दोघींही विद्याधरकन्यका मला अवश्य मिळतील. **उच्चस्थला**हून **कनकपुरीं**त मी पूर्वीं गेलों, त्यावेळीं पक्ष्याची संगत मिळून माझें मोठ्या चमत्कारिक रितीनें कार्य सिद्ध झालें. कदाचित् आतां फिरून तसाच योग येईल असें कांहीं ह्मणतां येत नाहीं. पण या गोष्टीची तरी आपण कशाला काळजी करावी ? मी मूळापासून हें सर्व साहस आरंभलेलें आहे. आणि माझ्या साहसाला दैवाची पूर्ण अनुकूलता आहे. तेव्हां जसा पूर्वीं मी तेथें गेलों तसाच दैवाच्या साह्यानें यावेळींही जाईन ! त्यावेळीं तो पक्षी मिळाला होता, यावेळीं दुसराच कोणी तरी भेटेल. तेव्हां एकंदरींत आपणास त्याविषयीं कांहीं काळजी करावयास नको.' असा विचार करून **शक्तिदेव वर्द्धमान**पुरांतून बाहेर पडला. व पूर्वींप्रमाणें थेट त्याणें **कनकपुरी**ची वाट धरली.

उघडच आहे. धैर्यवान् पुरुष कोणत्याही कामाला प्रवृत्त झाले ह्मणजे इच्छित अर्थ सिद्ध होईपर्यंत कधींही त्याचा पिच्छा सोडीत नाहींत. **शक्तिदेव** पूर्वीं ज्या मार्गानें गेला होता त्याच मार्गानें हळूहळू चालत पुष्कळदिवसांनीं तो समुद्राच्या कांठीं असलेल्या त्या **विटंकपुरांत पुनः**

पोंचला. तेथें ज्याणें, आपल्या गलबतांत बसवून **उच्चस्थल** नांवाच्या द्वीपाकडे त्याला पूर्वी नेलें होतें त्या **समुद्रदत्त** नामक व्यापाऱ्याची आणि त्याची अकस्मात् गांठ पडली. पूर्वींच्या खेपेस जहाज फुटून जिकडेतिकडे वाताहत झाली होती. तेव्हां **समुद्रदत्ता**ला **शक्तिदेव** जीवंत असेल असें वाटलें नव्हतें. व **शक्तिदेवा**लाही **समुद्रदत्त** जीवंत असेल असें वाटलें नव्हतें. कारण तो प्रसंगच तसा होता. विटंक-**पुराच्या** बाजारांतून **शक्तिदेव** चालला होता. व [illegible] कोणत्यातरी व्यापाऱ्याचें गलबत **उच्चस्थल**नामक द्वीपा[illegible] जाणार असेल तर त्याची चौकशी करावी या विचारांत तो होता; तों **समुद्रदत्त** समोरून येत असलेला त्याच्या दृष्टीस पडला. त्याला ओळखून **शक्तिदेव** त्याच्या जवळ गेला ; तेव्हां **समुद्रदत्ता**नेंही याला ओळखलें, व तत्काल मोठ्या आनंदानें त्याणें **शक्तिदेवा**ला मिठी मारली. व प्रेमपूर्वक त्याला आपल्या घरीं नेलें. तेथें जेवणखाण आटपल्यावर **समुद्रदत्ता**नें 'जहाज फुटल्यानंतर तूं समुद्रांतून कसा पार पडलास?' ह्मणून **शक्तिदेवा**ला प्रश्न केला. तेव्हां **शक्तिदेवा**नें आपल्याला माशानें कसें गिळलें व तेथून **उच्चस्थल** द्वीपाला आपण कसा पोंचलों; तेथून पुढें त्या भोंवऱ्यांतल्या वडाच्या झाडावर कसा चढलों व पुढें **कनकपुरीं**त कसा गेलों वगैरे सर्व वृत्तांत विस्तारपूर्वक **समुद्रदत्ता**ला सांगितला. आणि "तूंही समुद्रांतून कसा पार पडलास तें सविस्तर सांग "असें त्याला ह्मणाला.

तें ऐकून **समुद्रदत्त** ह्मणाला, "गलबत फुटून आपण सर्व मंडळी समुद्रांत पडलों हें तर तुला माहीतच आहे. मला त्या गलबताची एक फळी मिळाली, तिला धरून तीन दिवसपर्यंत मी समुद्रांतच चहूंकडे फिरत होतों. चौथ्या दिवशीं त्याच वाटेनें येणारें एक मोठें गलबत माझ्या दृष्टीस पडलें. हळूहळू तें माझ्याजवळ आलें. तेव्हां मी त्या गलबतावरच्या लोकांला आपल्याला वर घेण्याविषयीं ओरडून सांगितलें, तेव्हां त्यांणीं कृपाकरून मला वर घेतलें. वर चढल्यावर दै-

वयोगानें असा चमत्कार झाला कीं माझा बापच त्या गलबतावर भेटला. तें जहाज स्वतः त्याचें नव्हतें, तरी तो ज्या द्वीपांतरास व्यापाराकरितां गेला होता, तेथून त्याणें तें भाड्यानें ठरवून आणलें होतें. माझा बाप द्वीपांतरला जाऊन पुष्कळ वर्षें झालीं होतीं. तो तेथें मोठा व्यापार-धंदा करून विपुळ द्रव्य मिळवून परत घराकडे चालला होता. मला पाहून त्याणें प्रथम 'तूं कोठला? कोण?' ह्मणून विचारलें. फार दिवस झाल्यामुळें माझ्या चेहऱ्यांत [illegible]च फरक दिसत होता ह्मणून एकदम ओळख पटली नाहीं. मी आपलें नांव वगैरे सांगितलें तेव्हां तत्काल ओळखून त्याणें मला आपल्या पोटाशीं धरलें, व प्रेमाश्रूंनीं स्नान घालित होत्साता, तो मला आपली हकिकत विचारूं लागला. तेव्हां मी त्याला असें सांगितलें कीं, "बाबा, आपल्याला द्विपांतरीं जाऊन फार वर्षें झालीं असूनही आपण परत आलां नाहीं, तेव्हां व्यापारउदीम करणें हा आपला धंदा आहे, असें समजून स्वतः मीच व्यापार करूं लागलों. मी उच्चस्थलद्वीपाला निघालों होतों. तेथें पोंहचण्यापूर्वींच एकाएकीं आमचें गलबत फुटलें; व सर्व मंडळी समुद्रांत पडली. बाकीचे लोक कोणीकडे गेले असतील त्यांचा कांहीं ठिकाण नाहीं; पण मी मात्र दैवयोगानें एका फळीचा आश्रय धरून तुमच्याजवळ येऊन पोंचलों. तुमचें गलबत न मिळतें तर मी समुद्रांत बुडालों असतों!'

यापप्रमाणें मी सांगितलेली हकीकत ऐकून माझा पिता मला ह्मणाला, "अरे मुला, तूं विनाकारण अशा जिवावरच्या संकटांत कां पडलास! आमच्या घरांत किती द्रव्य आहे तें कदाचित् तुला ठाऊक नसेल; पण तें पुष्कळ आहे. शिवाय आणखी द्रव्य मिळविण्याकरतां मी व्यापारधंदा करीतच आहें. पाहिजे तर तूं हें गलबत पाहूनघे. हें मोठें जहाज सोनें, मोतीं, व हिरेमाणकें यांणीं भरलेलें आहे! असें असून तुला हे उपद्व्याप कोणी करायला सांगितले"

यापप्रमाणें मला समाधानाच्या दोन गोष्टी सांगून त्याच तारवांतून

तो मला आपल्या घरीं घेऊन आला. मी ह्या **विटंकपुरांत** त्याच्याच निमित्तानें परत आलों. नाहींतर कोठल्या कोठें गेलों असतों कोणास ठाऊक."

याप्रमाणें **समुद्रदत्तानें** आपली हकीकत सांगितली; ती ऐकून आणखी कांहीं इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलत **शक्तिदेवानें** ती रात्र तेथें घालविली. दुसऱ्या दिवशीं प्रातःकालचें कृत्य आटपून **शक्तिदे**व **समुद्रदत्ताला** ह्मणाला, "मित्रा, मला **उच्चस्थल**द्वीपांत जायचें आहे. तर सांप्रत माझें तेथें जाणें कसें होईल याची कांहींतरी तजवीज पहा."

हें ऐकून **समुद्रदत्त** ह्मणाला, "मग त्याची कसली काळजी? माझे आडत्ये याच द्वीपांत राहणारे असून ते कांहीं माल खरेदी करण्याकरतां येथें आले आहेत. त्यांला माल पाहिजे होता तो मीं दिला. आतां आजच त्यांची निघण्याची तयारी आहे. त्यांच्यांशीं मी तुझी ओळख करून देतों. तूं त्यांच्या गलबतावर बसून जा ह्मणजे झालें. ते तुला फार चांगल्या रितीनें घेऊन जातील."

**समुद्रदत्ताचें** हें भाषण ऐकून **शक्तिदेवाला** फार आनंद झाला. तो ह्मणाला, "असें असेल तर दैवानें मजवर मोठा अनुग्रह केला ह्मणायाचा. मला त्या व्यापाऱ्यांची ओळख करून दे. मी आजच त्यांच्या बरोबर जातों." **समुद्रदत्ताच्या** मनांत **शक्तिदेवानें** चार दिवस रहावें असें होतें. पण पुढें गलबताची सोय मिळेल किंवा नाहीं याचा नेम नव्हता ह्मणून **समुद्रदत्तानें** त्याला विशेष आग्रह केला नाहीं. लौकर लौकर त्याच्या जेवणाखाणाची तजवीज करून, बरोबर कांहीं फराळाचे जिन्नस देऊन त्याणें **शक्तिदेवाला** आपल्या अडत्यांच्या जहाजावर नेउन पोंचविलें. व 'याला चांगल्या रितीनें घेऊन जावें;' असें त्यांना [illegible] प्रकारें सांगून **समुद्रदत्तानें शक्तिदेवाचा** निरोप घेतला. नंतर लौकरच तें जहाज तेथून हाकारलें. वारा अनुकूळ लागला; व मध्यंतरीं वादळ वगैरे कांहीं झालें नाहीं, यामुळें सातव्या दिवशीं तें जहाज **उच्चस्थल-**

द्वीपाच्या किनाऱ्यास लागलें. याप्रमाणें व्यापाऱ्यांबरोबर **शक्तिदेव** सुखरूपपणें **उच्चस्थल**द्वीपाच्या किनाऱ्यावर उतरला.

हा येथला गैरमाहित असेल, तेव्हां याच्या राहण्याची वगैरे सोय लावून द्यावी; असा विचार करून जहाजवाल्या व्यापाऱ्यांनीं **शक्तिदेवाला** त्याविषयीं विचारलें; पण तो ह्मणाला, "**विष्णुदत्त** नांवाचा माझा [illegible] येथें रहात असतो. मी त्याच्याच येथें जाणार. त्याचा **मठ** कोठें आहे तेंही मला ठाऊक आहे. याकरितां माझ्या राहण्याच्या **सं**बंधानें तुह्मी कांहीं काळजी करूं नका. मला सुखरूपपणें तुह्मी येथपर्यंत आणून पोंचविलें याबद्दल मी तुमचा फार आभारी आहें." असें सांगून **शक्तिदेवानें** स्नेहपूर्वक त्या व्यापाऱ्यांचा निरोप घेतला. आणि त्या द्वीपांतल्या बाजारांतून मठाकडे जाण्याचा मार्ग होता तिकडे निघाला.

साहसी असून दैवशाली असलेल्या पुरुषांचें चरित्र मोठें विलक्षण असतें. एकावर एक अशी त्यांच्यावर मोठमोठीं संकटें येत असतात. आणि ते त्यांतून केवळ मुक्तच होतात असें नाहीं तर त्या संकटांतूनच त्यांला मोठमोठे लाभ होतात असा कांहीं चमत्कार आहे! **उच्चस्थल**द्वीपाचा राजा **सत्यव्रत** याच्याबरोबर **शक्तिदेव** पहिल्या खेपेस जहाजांत बसून **कनकपुरी**कडे जायला निघाला होता, हें पूर्वीं सांगितलचें आहे. व **सत्यव्रता**चा भोंवऱ्यांत सांपडून काय परिणाम झाला, तेंही वर सांगितलेंच आहे. **शक्तिदेव** त्या खेपेस या द्वीपांत राहिला होता व **सत्यव्रताच्या** पुत्रांची आणि त्याची चांगली ओळख झाली होती. **शक्तिदेवाला** **कनकपुरींत** पोंचविण्याकरतां **सत्यव्रत** जहाजावर बसून त्याच्या बरोबर गेला होता. हें त्याच्या पुत्रांला माहित होतें; पण पुढें त्याचाकाय परिणाम झाला; तें त्यांला समजलें नव्हतें. जहाज भोंवऱ्याकडे वळलें तेव्हां त्यतील खलाशीलोकांनीं भराभर पाण्यांत उड्या टाकल्या हें पूर्वीं सांगितलेंच आहे. त्यांतले कांहीं खलाशी मेले व कांहीं दैवयोगानें परत आपापल्या घरीं आले. तेव्हां त्यांच्याकडून जी हकीकत

समजली होती तीवरून 'आपला बाप **सत्यव्रत** व **शक्तिदेव** हे दोघेच गलबतावर असून गलबत पाण्याच्या भोंवऱ्यांत सांपडलें', इतकें वर्तमान **सत्यव्रता**च्या पुत्रांला कळलें होतें व त्यावरून ते दोघेही बुडून मेले असावे असें ते समजले होते.

**शक्तिदेव** यावेळीं बाजारांतून चालला असतां **सत्यव्रता**च्या पुत्रांपैकीं एक पुत्र सहज त्या वाटेनें चालला होता, त्याच्या तो अकस्मात [illegible] पडला. तेव्हां तत्काल त्याणें त्याला ओळखलें. 'दोघे[illegible] भोंवऱ्यांत सांपडले असून हा मात्र जीवंत आला आणि आपल्या बाप[illegible] ठिकाण नाहीं,' तेव्हां त्याला मोठा संशय आला. त्याणें **शक्तिदेवा**[illegible] जवळ जाऊन त्याला आपल्या वाड्यांत बोलावून नेलें. व दुसऱ्या आपल्या बंधूला भेटविलें. **सत्यव्रता**चे पुत्र व त्यांच्या वाड्यांतली इतर [illegible]ळी यांनीं **शक्तिदेवा**च्या भोंवतीं गराडा देऊन त्याला प्रश्न केला. ते ह्मणाले, "भटजीबुवा, आमचे बाबा आणि तुह्मी दोघेही **कनकपुरी**चा [illegible] करण्याकरतां येथून गेलों. असें असून बाबा परत आले नाहींत आणि तुह्मी एकटेच आज येथें दृष्टीस पडलां हें काय? बाबा कोठें आहेत?"

हें ऐकून **शक्तिदेव** खिन्न होऊन ह्मणाला, "बाबांनों, मला ती गोष्ट सांगण्यास फार लाज वाटते. पण उपयोग काय? दुर्दैवानें जो प्रसंग घडून आला; तो तुह्मांला सांगितला पाहिजे. परोपकारी तुमचा पिता आणि मी येथून निघालों; ते आह्मी बरेच दूरपर्यंत सुरक्षितपणें गेलों. नंतर दुर्दैवानें त्या तुमच्या पित्याचें जहाज समुद्रांतल्या पाण्याच्या भोंवऱ्यांत सांपडलें. त्याणें तो चुकविण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला; पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. जहाज भोंवऱ्यांत सांपडून आपल्या कर्मचक्रासारखें गरगर फिरतां फिरतां एकाएकीं आंत गेलें! व त्याबरोबर तुमचा पिता **वडवाग्नी**च्या मुखांत पडला! मी तेथल्या वडाच्या झाडाला धरून राहिलों यामुळें माझा बचाव झाला. ही गोष्ट फार वाईट झाली; पण त्याला कांहीं उपाय नाहीं. माझ्या

सामर्थ्याच्या बाहेर असल्यामुळें; मला आपल्यादेखत तुमच्या पित्याचा नाश झाला—व तो केवळ माझ्याचकरितां झाला असून—ती गोष्ट पाहणें भाग पडलें !"

असें सांगून **शक्तिदेवानें** त्यांचें समाधान करण्याचा प्रयत्न केला. पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. 'आपण जीवंत राहून आ[illegible]पाला मात्र याणें मारविलें;' असें समजून **सत्यव्रताच्या** पुत्र[illegible]शय राग आला. ते आपल्या सेवकांला ह्मणाले, "अरे, पा[illegible]? हा ब्राह्मण नव्हे. मित्राचा घात करणारा चांडाळ आहे. या [illegible]ा मुसक्या बांधा. आमच्या पित्याचा याणेंच घात केला. नाहींपेक्षा एका तारवांत दोघेही बसलेले असून एक **वडवाग्नीच्या** मुखांत पडला, व दुसरा वांचला ही गोष्ट होईल तरी कशी? 'वडाच्या झाडाला [illegible] आपण राहिलों होतों. व पक्ष्याच्या पाठीवर बसून **कनकपुरींत** [illegible] आणि तेथें तळींत बुडालों, तो एकदम **वर्धमानपुरांत** वर नि[illegible].' असें जें हा सांगत आहे, तें कोणाला तरी खरें वाटेल काय? या दुष्टानें गलबत भोंवऱ्यांत सांपडलें वगैरे सर्व गोष्टी अगदीं बनावट सांगितल्या आहेत. कोठेंतरी या चांडाळानें आमच्या पित्याचा घात केला असेल; व आपल्यावरचा दोष उडविण्याकरितां **वडवाग्नीचें** निमित्त केलें असेल यांत कांहीं संशय नाहीं. असो, ज्या महात्म्यानें ह्या घातक्यावर उपकार करण्याकरतां आपला जीव धोक्यांत घातला, त्याचाच याणें वध केला ! पिता तर आतां परत येत नाहींच; पण त्याचा सूड उगविणें हें पुत्रधर्माप्रमाणें आमचें कर्त्तव्य आहे. याकरितां या दुष्टाला **चंडिकादेवीच्यापुढें** पशुसारखा बली द्यावा. उद्यां आयतीच अष्टमी तिथी आहे. देवीची महापूजा आपल्याला करायचीच आहे. तेव्हां याचा बलि देऊन देवीला तृ[illegible]ावें. ह्मणजे झालें!"

१ :—आपल्या आर्यलोकांच्या धर्माची रचना मोठी चमत्कारिक आहे. या धर्मांत लहान मोठ्या—मग त्या प्रापंचिक असोत किंवा पारमार्थिक असोत—सर्व

त्या राजपुत्रांनीं याप्रमाणें हुकूम करतांच सेवकांनीं **शक्तिदेवाच्या** तत्काळ मुसक्या बांधल्या व त्याला, मोठ्या भयाण दिसणाऱ्या **देवीच्या** देवळांत नेलें. देवीला त्याचें शरीर अर्पण करायचेंच होतें. ह्मणून **शक्तिदेवाचे** हातपाय बांधून त्या देवळांतच त्यांणीं त्याला ठेविलें. त्या देवळाचा भयंकरपणा काय वर्णन करावा! आजपर्यंत हजारों प्राणी तेथें बलि गेले होते! तो त्या देवीचा गाभारा हेंच को[illegible] लि गेलेल्या प्राण्याला सांठविणारें पोट असून, दोहों बाजूं [illegible] ल्या घाटांच्या माळा ह्याच कोणी एक दंतावली, अशा, मृत्यूच [illegible] र-ऱ्या भयंकर दिसणाऱ्या त्या देवीच्या गाभाऱ्यांत **शक्तिदेव**[illegible] ून, दाराला बाहेरून कुलूप लावून सेवक लोक तेथून निघून गेले!

याप्रमाणें **शक्तिदेव,** ज्याचे हातपाय बांधलेले आहेत अशा स्थितींत तेथें पडला होता. ज्यावेळीं त्याला आंत नेऊन घातलें, ती वेळ सकाळची होती. व दुसऱ्या दिवशीं त्याला बळी द्यायचा निश्चय ठरला होता.

---

गोष्टी ईश्वरार्पणबुद्धीनें करायच्या, हें एक मुख्य तत्त्व आहे. कोणाला मारायचें असलें; तरी तें देवाचा उद्देश करून मारायचें. अशी चाल आहे. ब्राह्मण, क्षत्रिय वगैरे उंच-वर्णाचे लोक यज्ञयागादिकांच्या निमित्तानें हिंसा करीत. व अगदीं कनिष्ठ प्रतीचे ह्मणजे कोळी, रामोशी वगैरे अडाणीलोकदेखील कोणाला मारायचें झालें; तर तें देवाच्या उद्देशानेंच मारित असत! परधर्मी लोकांच्या व्यर्थ आक्षेपांला भुललेल्या लोकांला काय पाहिजे तें वाटो, पण आर्यधर्मांत असे जें एक मुख्य तत्त्व आहे तें फार महत्वाचें आहे. चांगले तितकेच ईश्वराचें व वाईट तें सर्व मनुष्याचें अशी जी कित्येक परधर्मी लोकांची समजूत आहे, ती केवळ अडाणीपणाची आहे. वस्तुतः ईश्वर हा जर जगाचा प्रभू ह्मणून मानिलें आहे, तर बरी अथवा वाईट कसलिही गोष्ट असली तरी ती त्याच्याच आज्ञेनें होते असें समजून त्याला अर्पण करणें अत्यंत आवश्यक आहे. यावरून प्राणिहिंसा वगैरे कृत्यें आह्मांस पसंत वाटतात असें मात्र कोणी समजूं नये. तीं वाईटच आहेत; पण त्यांतलेत्यांत ईश्वराला अर्पण करून त्यांचें आचरण केलें असतां, एक प्रकारें त्यानें चांगलेंच केलें असें ह्मणण्यास कांहीं बाध नाहीं. असो सत्यव्रताचे मुलगे बापाचा सूड उगविण्याकरतांच शक्तिदेवाला मारण्यास तयार झाले होते. तरी त्यांणीं त्याला विनाकारण न मारतां देवीच्या उद्देशानें मारण्याचा विचार केला, हें फार चांगलें केलें असें ह्मणणें भाग आहे.

मुळें एकेक घटका जातां जातां आपण मृत्यूच्या जवळ जात आहों असें त्याला वाटत होतें. बिचारा सात दिवस जहाजावर राहून पुष्कळ श्रमला होता. पण थोडी विश्रांति घेण्यास देखील अवकाश न मिळतां. त्याला अशा संकटांत रहावें लागलें. अन्न नाहीं, पाणी नाहीं, हातपायदेखील मोकळे नाहींत, अशा स्थितींत सरासरी त्याणें दिवस काढला व रात्रीला प्रारंभ झाला. आतां आपल्याला वांचविलें, तर ही देवीच वांचवील, हिच्यावांचून दुसऱ्या कोणाचें सामर्थ्य नाहीं, असें समजून **शक्तिदेव** देवीची स्तुति करूं लागला.

तो ह्मणाला, "हे भगवति, हे देवी, बालसूर्याच्या मंडलासारखी जिची कांति आहे, अशा त्वां यथेच्छ प्राशन करून खालीं पडलेलें, असें रुरूनामक दैत्याच्या कंठाचें रुधिर, याच्या योगानें तुझें स्वरूप लाल दिसत आहे, असे हे भगवति, जगताला पीडा कर[illegible] मोठ्या [illegible] दिकांचा नाश करून, तूं ति[illegible] ्वाचें पालन केलें आहेस. तेव्हां [illegible] चरणकमलाच्या [illegible] ठिकाणीं ज्याचें मस्तक नम्र आहे, व जो सांप्रत निष्कारण वैरी झालेल्या लोकांच्या हातांत सांपडला आहे, व इष्ट असलेल्या जनाची प्राप्ति होण्याच्या इच्छेनें आपला देश, गणगोत वगैरे सर्व सोडून फार दूर आला आहे, अशा मला अनाथाला तूं या संकटांतून रक्षण कर!"

याप्रमाणें अनन्यभावानें देवीची स्तुति करीत, व आपलें रक्षण करण्याविषयीं तिची प्रार्थना करीत, **शक्तिदेव** तेथेंच झोंपी गेला. नंतर लौकरच त्याला स्वप्न पडलें. स्वप्नांत त्या देवीच्या गाभाऱ्यांतून एक स्त्री प्रकट होऊन त्याच्याजवळ प्राप्त झाली. ती दिव्य आकृतीची स्त्री ममतेनें त्याला ह्मणाली, "अरे **शक्तिदेवा**, भिऊं नकोस. तुझें कोणत्याही-रितीनें अनिष्ट व्हायचें नाहीं. ज्या कोळ्याच्या राजाच्या मुलांनीं तुला येथें हातपाय बांधून ठेविलें आहे, ते तुला मारूं शकणार नाहींत. त्यांची **बिंदुमति** नांवाची बहीण आहे; ती उद्यां प्रातःका-

लीं येथें माझ्या दर्शनाकरितां येईल. व तुला पाहून मोहित होत्साती 'तूं आपला पति हो' ह्मणून तुझी प्रार्थना करील. तेव्हां ती कोळ्याची मुलगी असें समजून तूं तिचा अनादर करूं नकोस. तिच्याशीं विवाह करण्याचें कबूल कर, ह्मणजे तीच तुला या संकटांतून सोडवील. खरोखर ती कोळ्याची मुलगी नव्हे. ती दिव्यलोकांत राहणारी विद्याधरकन्या आहे. शापानें तिला कोळ्याच्या घरीं जन्म प्राप्त झालें. अतएव तूं तिचा स्वीकार कर; ह्मणजे तुझे सर्व मनोरथ पूर्ण होतील."

यानप्रमाणें दृष्टांत देऊन ती स्त्री तेथेंच गुप्त झाली, व **शक्तिदेवाचे** डोळे तत्काळ उघडले. ही वेळ अगदीं पहाटेचीच होती, व स्वप्नांत जें कांहीं आपल्याला दिसलें तें साक्षात् देवीनेंच प्रसन्न होऊन आपल्याला अभय दिलें, असें समजून **शक्तिदेव** त्या स्वप्नाविषयींच विचार करीत पडला. [illegible]त **सूर्योदयाची** वेळ झाली. तेव्हां त्याच्या नेत्रांला आनंद देणारी केवळ अभ्राची छटाच; अशी ती [illegible] नामक **सत्यव्रताची** कन्या देवीच्या दर्शनाकरितां त्या [illegible]त झाली. तिनें प्रथम देवीचें दर्शन करून तिला भक्तिपूर्वक प्रदक्षिणा, नमस्कार वगैरे केलें. नंतर तेथें जवळच हातपाय बांधून पडलेल्या **शक्तिदेवाकडे** सहज पाहिलें. ब्रह्मलिखित कांहीं निराळ्याच प्रकारचें असतें. स्त्री आणि पुरुष यांचा नवराबायकांचा संबंध ह्मटला ह्मणजे ती एक जन्माची गांठ होय. तेव्हां ती गांठ मारतेवेळीं किती गोष्टींचा विचार केला पाहिजे. व ज्या उभयतांचा तो संबंध जडायचा त्याणीं एकमेकांविषयीं किती बारीक शोध केला पाहिजे, हें सांगावयास नको. पण विधिघटित असें जोरावर असतें कीं; तें अशाप्रकारच्या जन्माच्या गांठीं कांहीं विशेष विचार न करितां एका क्षणांत मारून सोडतें! असो.

**शक्तिदेवाला** पाहतांच **बिंदुमतीला** हा आपल्याला योग्य वर आहे. असें वाटलें. व लगेच ती त्याचें नांव, गांव, वगैरे विचारून घेऊन ह्मणाली,

तूं आतां प्राणावरच्या संकटांत आहेस. तुला मी अवश्य सोडवून घेतें; पण त्वां मी सांगतें तें ऐकलें पाहिजे. तसें करशील, तर मी तुला सोडवून घेईन."

थोड्यावेळापूर्वी देवीनें स्वप्नांत जिच्याविषयीं सांगितलें होतें, तीच ही असें शक्तिदेवाच्या लक्ष्यांत तेव्हांच आलें. तरी त्याणें तिच्याविषयीं कांहीं विशेष हकीकत विचारली. तेव्हां आपलें नांव व आपल्या बापाचें नांव वगैरे सांगून बिंदुमती ह्मणाली, "माझ्यापेक्षां वडील असे माझे चौघे बंधू आहेत. सांप्रत वडिलोपार्जित ह्या द्वीपाचें राज्य त्यांच्याच हातीं आहे. त्यांणीं योग्य वराशीं माझा विवाह करायचा निश्चय करून अनेक तरुण पुरुष माझ्याकरतां निवडले; पण त्यांतून मला एकही पसंत झाला नाहीं. मी त्या सर्वांचा धिक्कार केल्यावरून सांप्रत माझे बंधू मोठ्या विचारांत पडले आहेत. याविषयीं मी तरी काय करूं! मला त्यांतला कोणिच पसंत पडला नाहीं, तेव्हां ते नकोत असें सांगणें मला भाग पडलें. पण काय चमत्कार असेल तो असो. म्यां मोठमोठ्या राजपुत्रांचा तिरस्कार केला; तरी तुला पाहतांच तुझ्यावर माझी प्रीति बसली. यावरून ब्रह्मदेवानें तूंच माझा पति व्हावेंस असा निश्चय केला असावा असें वाटतें! तेव्हां तूं आतां माझा स्वीकार कर."

प्रिय वाचकहो, शक्तिदेवासारखा तरूण व रंगेला पुरुष; त्यांतूनही चारदोन घटकांनीं तो देवीला बळी जाण्याच्या स्थितींत असून त्याला सोडविण्याविषयीं तयार झालेली; व जिचा स्वीकार करण्याविषयीं देवीनें स्वप्नांत प्रत्यक्ष येऊन सांगितलें, आणि जी दिव्य कन्या आहे असें त्याला समजलें होतें, अशा त्या सुंदर व तरुण बिंदुमतीनें आपण होऊन पति होण्याविषयीं प्रार्थना केली असतां, शक्तिदेवाच्यानें तिचा अनादर करवेल काय? त्याणें स्वप्नांत देवीनें सांगितलेल्या गोष्टीची आठवण करून मोठ्या आनंदानें तिची विनंति मान्य केली. व 'आपण तुझ्याशीं विवाह करून घेतों' असें तिला वचन दिलें.

**शक्तिदेवानें** विवाहाविषयीं वचन देतांच, **बिंदुमतीनें** त्याच्या हातपायांचीं बंधनें सोडून त्याला तत्काल मोकळें केलें. त्याच रात्रीं देवीनें तिच्या बंधुंलाही दृष्टांत दिला होता कीं, 'तुह्मी ज्या आपल्या बहिणीच्या विवाहाची काळजी करीत आहां तिचा, तुह्मी बली देण्याकरतां माझ्याजवळ जो मनुष्य आणून ठेवला आहे तोच पति होणार. याकरतां तुह्मी त्याला मारूं नये. व त्याच्याशीं आपल्या बहिणीचा विवाह करून द्यावा.'

याप्रमाणें पूर्वींच दृष्टांत झाला असल्यावरून **सत्यव्रताच्या** पुत्रांनीं **शक्तिदेवाला** बळी द्यायचा जो विचार केला होता, तो रहित केला; व सूर्योदय होतांच ते मोठ्या आनंदानें देवीच्या मंदिरांत आले. ते येण्यापूर्वींच **बिंदुमतीनें शक्तिदेवाला** मोकळें केलें होतें. **बिंदुमती** ही प्रत्यक्ष त्यांची बहीणच होती. तिणेंच **शक्तिदेवाला** सोडविलें तेंव्हां तें त्यांला मान्य करणें भागच होतें. पण त्यांतूनही **देवीनें** दृष्टांत दिला होता यामुळें त्यांणीं त्याबद्दल बहिणीला चकारशब्ददेखील न बोलतां उलट त्या गोष्टीबद्दल आनंदच मानला. "आपण विनाकारण तुह्माला त्रास दिला याची क्षमा करा," असें सांगून त्यांणीं **शक्तिदेवाला** प्रसन्न करून घेण्याचा प्रयत्न केला. व त्याच दिवशीं विवाहाची तयारी करून **बिंदुमती** यथाविधि **शक्तिदेवाला** अर्पण केली.

पुष्कळ दुःख भोगून अकस्मात् सुख प्राप्त झालें; ह्मणजे तें फारच प्रिय वाटतें. यापूर्वीं **शक्तिदेवाला** पुष्कळ वर्षेंपर्यंत प्रवासाचे श्रम एकसारखे सोसावे लागले होते. मुळीं खाण्यापिण्याचीदेखील पंचाईत, मग सुंदर स्त्रीचा समागम किंवा इतर ऐषआराम यांचें नांव तरी कशास पाहिजे? तात्पर्य **शक्तिदेवानें** हावेळपर्यंत फारच दुःख भोगलें होतें. तें सर्व जाऊन सांप्रत तो मोठ्या आनंदांत व चैनींत मजा मारूं लागला. **बिंदुमतीसारखी** प्रेमपूर्वक सेवा करणारी ज्याची स्त्री आहे, व त्या द्वीपाचे राजे जे **सत्यव्रताचे** मुलगे ते— बहिणीच्या लोभास्तव सर्वकाळ

मावोजी भावोजी, करून भावोजी कोठें बसतील, काय खातील, काय बोलतील, याविषयीं सर्वकाळ जपत आहेत, अशा स्थितींत त्याला किती आनंद झाला असेल बरें? जणूं काय आपल्या पुण्याची सिद्धीच प्रत्यक्ष रूप धारण करून प्राप्त झाली आहे, अशा त्या **बिंदुमतीसहवर्तमान शक्तिदेव** येथेच्छ सुखाचा उपभोग घेऊं लागला.

याप्रमाणें सासुरवाडींत चैन भोगीत असतां, एकेदिवशीं **बिंदुमती**-सहवर्त्तमान तो आपल्या महालाच्या ग्यालरींत उभा होता. त्याच्या जवळूनच रहदारीचा मोठा रस्ता होता. त्या रस्त्यानें गायीच्या मांसाचें ओझें डोक्यावर घेऊन जात असलेला, एक कसाई त्याच्या दृष्टीस पडला. त्याला पाहून **शक्तिदेवाला** फार वाईट वाटलें. त्याच्याजवळ **बिंदुमती** उभी होती, तिला तो ह्मणाला, "पाहिलेंस? हा काय क्रूरपणा तो! हे राजकन्ये अग, या गायी सर्व त्रैलोक्याला वंद्य असून हा पापी (चांडाल) त्यांचें मांस कसें नेतो? या दुष्टाला त्या गायींवर शस्त्र चालवितांना कांहीं भीति वाटली नाहीं का? बरें तें एक असो. पण हा अधम त्यांचें मांस खायलाही संकोच पावत नाहीं याचें मला मोठें दुःख वाटतें."

हें ऐकून **बिंदुमती** ह्मणाली, "आर्यपुत्र, हें पाप मोठें अचिंत्य आहे. याविषयीं काय बोलावें? मीं पूर्वी गायींचा थोडासा अपराध केला होता, तेवढ्याच्या योगानेंच मी या अपवित्र अशा कोळ्यांच्या वंशांत उत्पन्न झालें. आणि हा चांडाल तर त्यांचें मांस खायला तयार झाला आहे. तेव्हां याची त्या पापापासून मुक्ति कोठून होणार!"

**बिंदुमतीनें** सहज आपल्या पूर्वजन्माची गोष्ट सांगितली. ती ऐकून **शक्तिदेवाला** मोठें आश्चर्य वाटलें. तो ह्मणाला, "प्रिये, तुला पूर्वजन्मींची अद्याप आठवण कशी राहिली हें मोठें नवल आहे. यावरून तूं कोण आहेस? व तूं गायींचा कोणता अपराध केलास ह्मणून तुला या कोळ्यांच्या घरीं जन्म प्राप्त झालें तें सांग?"

बोलण्याच्या नादांत आठवण न राहून **बिंदुमतीच्या** तोंडांतून गा-

यीचा अपराध केल्याची गोष्ट निघून गेली; पण तो वृत्तांत उघड करणें योग्य नव्हतें, ह्मणून तिनें आपल्या पतीच्या प्रश्नाला उत्तर दिलें नाहीं. पण शक्तिदेव कसचा ऐकतो? त्याणें अगदीं हट्टच घेतला, तेव्हां तिला सांगणें भाग पडलें. ती ह्मणाली, "आर्यपुत्र, आपण जी गोष्ट विचारली ती फार गुप्त आहे. ती उघड करणें योग्य नाहीं. तथापि तुमच्या आग्रहापुढें माझा इलाज नाहीं, ह्मणून मी सांगतें. पण मी एक गोष्ट सांगेन ती करण्याचें आधीं वचन द्याल तर मी आपलें पूर्वजन्मींचें वृत्त सांगेन. नाहींतर मुळींच सांगणार नाहीं."

शक्तिदेवाला प्रत्येक गोष्टीची विशेष जिज्ञासा होती, हें पूर्वी सांगितलेंच आहे. आतां ही जें पुढें करायला सांगणार तें चांगलें अथवा वाईट किंवा शक्य अथवा अशक्य कसें आहे, या गोष्टीचा त्याणें मुळींच विचार केला नाहीं. "प्रिये, तूं सांगशील तें खरोखर करीन," असें सांगून त्याणें शपथ घेतली. तेव्हां तिणें प्रथम आपल्याला जी गोष्ट कर्तव्य होती ती सांगितली. बिंदुमती ह्मणाली. "प्रिया, याच द्वीपांत माझ्याशिवाय दुसरी एक आणखी तुझी बायको होणार आहे. लग्न होतांच तिला लौकरच गर्भधारण होईल. तेव्हां गर्भाला आठवा महिना लागला ह्मणजे तिचें पोट फाडून तूं तो तिच्या पोटांतला गर्भ ओढून काढ! याकामीं दया मुळींच करूं नकोस. हें माझें इष्ट कार्य आहे व 'आपण तूं सांगशील तें करतों' असें वचन दिलें आहे. तेव्हां हें कार्य तुह्माला केलेंच पाहिजे."

शक्तिदेव मोठा धैर्यवान् व साहसी होता; तरी त्याचा स्वभाव मोठा दयाळू होता. क्रूरपणाचें कोणतेंही कृत्य करावें असें त्याला वाटत नव्हतें. बिंदुमतीला आपण वचन तर देऊन चुकलों. आणि आतां ती स्त्रीचें पोट फाडून त्यांतला गर्भ काढण्यास सांगत आहे, या गोष्टीचा त्याला मोठा विस्मय वाटला. दयेनें—'तशाप्रकारचें कृत्य आपल्या हातून होणार नाहीं,' असें तो बोलणार इतक्यांत बिंदुमती

त्याला ह्मणाली, "हां, हां, आतां तुह्मी पुढें काय बोलणार तें मी समजलें; पण तें कांहीं चालायचें नाहीं. त्याचें कारण कांहींही असो; पण मी सांगितलें त्याप्रमाणें तुह्माला केलेंच पाहिजे."

हें ऐकून, शपथपूर्वक प्रतिज्ञा करून बांधला गेलेल्या शक्तिदेवाला होय ह्मटल्यावांचून दुसरी गति नाहींशी झाली. त्याणें 'करतों' ह्मणून कबूल केलें, तेव्हां बिंदुमती ह्मणाली, "आतां माझा वृत्तांत ऐकून घ्या. मी पूर्वजन्मीं कोण होतें व या कोळ्यांच्या येथें मला कसें जन्म प्राप्त झालें, तें सर्व सांगतें ऐका. मी पूर्वजन्मांत विद्याधराची कन्या होतें. सांप्रत मी येथें मनुष्यलोकांत प्राप्त झालें आहे, याचें कारण ऋषींचा शाप. त्या शापाच्या योगानें मी आपल्या स्थानापासून भ्रष्ट झालें. पूर्वी मी विद्याधरी असतांना मला बीन वाजविण्याचा मोठा नाद होता. एकेदिवशीं तें वाद्य वाजवीत असतां अकस्मात् त्याची तार तुटली. विनाला आंतड्याच्या तारा लावतात व तीं आंतडीं गायींचीं किंवा बैलांचीं असतात. तार तुटतांच मी दुसरी तार घेऊन ती त्याला जडवूं लागलें व ती लांब होती ह्मणून त्या गडबडींत, विशेष विचार न करतां मी ती दातांनीं तोडली हा मोठा अपराध केला! सुकलेलें गायीचें आंतडें म्यां आपल्या तोंडाला लावलें, या अपराधानें मला अधोगति प्राप्त झाली. तेव्हां त्यांचें मांस भक्षण करणारांस कसली गति प्राप्त होईल तें काय सांगावें?"

याप्रमाणें बिंदुमती शक्तिदेवाला आपली पूर्वजन्मींची कथा सांगत आहे, इतक्यांत तिचा एक बंधू घाबऱ्यांघाबऱ्यां तेथें येऊन शक्तिदेवाला ह्मणाला, "भावोजी, भावोजी, चला उठा, उठा लौकर, अहो चला. हा पहा एक डुकर कोठूनसा आला आहे. यांणें गांवांतले पुष्कळ लोक मारले असून, हा तुमच्या अगदीं समोर येत आहे तर लौकर येथून आंत चला!"

हें आपल्या मेव्हण्याचें भाषण ऐकून, शक्तिदेव भ्याला तर नाहींच;

पण त्याला मोठें अवसान आलें. वस्तुतः यावेळीं तो माडीवर होता तेव्हां डुकरानें पुष्कळ गडबड केली तरी शक्तिदेवाला त्याचें कांहीं भय नव्हतें. पण तो डुकर इतर सामान्य डुकरांसारखा नसून तो एक दैत्य होता व त्याणें मायेनें डुकराचें रूप धारण केलें होतें! तो क्षणमात्रांत पाहिजे त्या ठिकाणीं जात होता. व अशाच रितीनें त्याणें अनेक-लोकांचा वध केला होता. ह्मणून मेव्हण्यानें लवकर लवकर येऊन त्याला सांगितलें.

शक्तिदेव माडीवरून खालीं उतरला, व तत्काल हातांत धनुष्य घेऊन एका घोड्यावर बसून तो त्या डुकराच्या पाठीस लागला. डुकर क्षणभर दिसे; व एकाएकीं अदृश्य होत असे आणि पुन्हां आणखीं दृष्टी पडे. याप्रमाणें शक्तिदेवाला त्याणें बऱ्याच झुकांड्या दिल्या. तरी त्यांतल्यात्यांत संधि साधून त्या ब्राह्मणवीरानें त्याला असा एक मर्मस्थानीं बाण मारला कीं, त्याच्या प्रहारानें तो मेल्यावांचून राहूंच नये. शक्तिदेवाचा बाण लागतांच डुकर पडला नाहीं तरी जखमीं होऊन तो एका मोठ्या बिळांत शिरला. तेव्हां शक्तिदेवही त्याच्या पाठोपाठ बिळांत गेला. डुकराला पहात पहात तो बिळांत बराच दूरवर गेला. पुढें अकस्मात्, एक मोठा सुंदर बंगला असून त्याच्या आसपास मनोरम बगीचा आहे, असें त्याच्या दृष्टीस पडलें. डुकर जवळ कोठें दिसला नाहीं, ह्मणून तो त्या बागेंत शिरला व सावकास सावकास त्या उपवनाची शोभा पहात आंतल्या बंगल्याजवळ येऊन पोंचला. तेथें अत्यंत मोहक जिचें रूप आहे, अशी एक कन्या त्याच्या दृष्टीस पडली. जणूं काय त्या बागेची देवताच प्रेमपूर्वक गडबडीनें त्याला भेटायला आली आहे; अशा त्या तरुण मुलीला पाहून शक्तिदेव विस्मित झाला. नंतर प्रेमपूर्वक तो तिला ह्मणाला, "हे कल्याणि स्त्रिये, तूं कोण आहेस? आणि तुला गडबड कसली झाली आहे? तें गुह्य नसेल तर मला सांग."

हें ऐकून ती स्त्री हंसऱ्या मुखानें शक्तिदेवाला ह्मणाली, "दक्षिण

देशांत **चंडविक्रम** नांवाचा एक राजा आहे, त्याची मी कन्या. माझें नांव **बिंदुरेखा.** हे भाग्यशाली पुरुषा, मी आपल्या बापाच्या येथें असतां एका लाल नेत्राच्या दैत्यानें मला येथें पळवून आणलें. तो पापी मोठा कपटी आहे. त्याणें कपट करून मला बापाच्या घरांतून हरण केलें. त्याचा माझ्याविषयीं वाईट हेतु होता; पण ह्यावेळपर्यंत मी त्याला मूळींच दाद दिली नाहीं. खायाला कांहींतरी पाहिजे ह्मणून तो शिकारीकरतां डुकराचें रूप धारण करून येथून बाहेर गेला होता. तेथें त्याला कोणीएक पराक्रमी वीरानें वर्मस्थानीं बाण मारून जखमी केलें आहे. तो तसाच पुन्हां या गुहेंत आला, पण आधींच भुकेनें व्याकूळ झाला होता व त्याला तहान अतिशय लागली होती, अशा स्थितींत वर्मस्थानीं जोरानें बाण लागल्यामुळें तो येथें येऊन मरण पावला! मला काय तो त्याचाच प्रतिबंध होता. तो मेला असें पाहून मी येथून पळून जाण्याकरतां निघालें आहें. अद्याप माझें कन्यापण दूषित झालेलें नाहीं."

हें ऐकून **शक्तिदेव** ह्मणाला, "असें असेल तर इतकी गडबड कशाला पाहिजे? हे राजकन्ये त्या डुकराला बाण मारला होता तो मींच."

हें ऐकून **बिंदुरेखा** ह्मणाली, "तर मग आपण कोण आहां? आपलें कुळ व गोत्र कोणतें तें कृपाकरून सांगा?"

**शक्तिदेव** ह्मणाला, "मी जातीचा ब्राह्मण आहें. माझें नांव **शक्तिदेव.** मी सहज येथें प्राप्त झालों असून त्या डुकराला बाण मींच मारला. आणि त्याच्या पाठीस लागून येथें आलों."

हें ऐकून ती ह्मणाली, "तर मग माझा तूंच भर्ता हो. मी त्या डुकराला बाण मारणाऱ्याशींच विवाह करून घेण्याचा संकल्प करून राहिलें आहें. त्याप्रमाणें तूं डुकराला मारलेंस तेव्हां तूंच माझा पति."

**शक्तिदेवाला** मिळतील तितक्या बायका पाहिजेच होत्या. तशा सुंदर स्त्रियेनें आपण होऊन प्रार्थना केल्यावरून **शक्तिदेवानें** तेथल्या तेथेंच तिच्याशीं विवाह करून घेतला व तिच्यासह परत **बिंदुमतीच्या**

भावांच्या येथें प्राप्त झाला. याप्रमाणें ज्याला मुळीं एकादेखील बायकोचा ठिकाण नव्हता; त्या दैवशाली **शक्तिदेवाला** एकापेक्षां एक सुंदर अशा दोघी बायका मिळाल्या! नवऱ्यानें सवत करून आणली तर ती पहिल्या बायकोला मुळींच सहन होत नाहीं, ही गोष्ट अगदीं उघड आहे. तथापि **बिंदुरेखेच्या** संबंधानें **बिंदुमतीला** मुळींच कांहीं वाईट वाटलें नाहीं. कारण त्या दोघीही सख्या बहिणीच होत्या. यामुळें त्यांना परस्परांचा उत्कर्ष पाहून असमाधान वाटण्याचें कांहीं कारण नव्हतें. तशांतून शापानें मनुष्यदेहांत प्राप्त झाल्या असल्यामुळें त्यांला लौकरच त्या आपापल्या शरीरांचा त्याग करायचा होता. **शक्तिदेव** दोघीही स्त्रियांशीं सारखाच वागत होता. याप्रमाणें आनंदांत दिवस घालवीत असतां, **शक्तिदेवाची** दुसरी स्त्री **बिंदुरेखा** गरोदर झाली.

तिच्या गर्भाची कशी काय व्यस्था करावी, तें **बिंदुमतीनें** पूर्वींच **शक्तिदेवाला** सांगितलें होतें. आठ महिने होईपर्यंत तिणें त्यासंबंधानें कांहीं गोष्ट काढली नाहीं. आठवा महिना लागतांच वडील स्त्री **बिंदुमति शक्तिदेवाला** ह्मणाली, "हे वीरा, पूर्वीं आपण शपथपूर्वक माझ्याजवळ जें काम करण्याचें कबूल केलें होतें, त्याची आठवण करा. तुमच्या दुसऱ्या बायकोला गरोदर होऊन आठवा महिना लागला आहे. याकरितां तुह्मी तिचें पोट फाडून त्यांतला गर्भ काढून घेऊन या. जी गोष्ट प्रतिज्ञापूर्वक करण्याचें तुह्मी कबूल केलें आहे ती केल्याशिवाय राहूं नका."

पोट फाडून गर्भ काढणें व त्यांतूनही प्रत्यक्ष आपल्या बायकोचा गर्भ काढणें, ही गोष्ट किती क्रूरपणाची आहे? व ती करण्याविषयीं पाषाणहृदयी मनुष्य असला तरी त्यालादेखील ती कशी योग्य वाटेल? **बिंदुमतीचें** भाषण ऐकून **शक्तिदेव** स्नेह आणि कृपा यांनीं व्याकुळ झाला. तथापि प्रतिज्ञा केली असल्यामुळें तो परतंत्र झाला होता. आतां

हें काम करावें किंवा न करावें याचा त्याला मोठा विचार पडला होता. तो बराचवेळ विचार करीत बसला आहे असें पाहून **बिंदुमती** कांहीं बोलली नाहीं. नंतर—ज्यापेक्षां शपथ घेऊन सांगितलें आहे; त्यापेक्षां बोलल्याप्रमाणें केलें पाहिजे; असा निश्चय करून तो, **बिंदुरेखा** ज्या ठिकाणीं होती त्या ठिकाणीं प्राप्त झाला. त्याचा चेहरा उतरलेला असून मुद्रा खिन्न आहे, असें पाहून **बिंदुरेखा** ह्मणाली, 'आर्यपुत्र, आपण असे खिन्न कां झालां? **बिंदुमतीनें** माझा गर्भ काढून घेण्याकरतां तुह्माला पाठविलें आहे हें मीं समजलें. तर त्याविषयीं आपण कांहीं चिंता करूं नये; तें आपलें अवश्य कर्तव्य आहे व त्यापासून पुढें मोठें कार्य साधायचें आहे ह्मणून, व तसें करण्यांत कांहीं क्रूरपणाही नाहीं, याकरितां तुह्मी माझी दया करूं नका. लौकर आपलें कर्तव्य करा. या संबंधानें मला एक कथा आठवली, ती आपल्याला सांगतें.

प्राणनाथ, **जंबुक** नांवाच्या शहरांत पूर्वीं **हरिदत्त** नांवाचा एक मोठा विद्वान् ब्राह्मण राहत होता. तो बराच द्रव्यवान् होता. त्याला **देवदत्त** नांवाचा एक पुत्र झाला. **देवदत्तानें** लहानपणीं चांगला विद्याभ्यास केला; पण तो वयांत आल्यावर दुष्टलोकांच्या संगतीनें फारच बिघडला होता. त्याला जुगाराचें मोठें विलक्षण व्यसन लागलें होतें. त्याणें घरांत कांहीं मिळेल तें नेऊन जुगारांत घालवावें, असा क्रम धरल्यामुळें त्याच्या घरच्या मनुष्यांनीं त्याच्यावर सक्त नजर ठेवली होती. लहानमोठी कसलीही वस्तू ते त्याच्या हातीं लागूंदेत नसत. तथापि तो चोरून मारून आपले गुण उधळल्याशिवाय राहतच नसे. एकेदिवशीं घरांतलें एक रुप्याचें भांडें त्याच्या हातीं लागलें. तें घेऊन तो जुगार खेळायला बसला आणि लौकरच दुर्दैवानें त्याचें तें भांडें हरलें. जेव्हां खेळायला त्याच्याजवळ दुसरें कांहीं नाहींसें झालें, तेव्हां जुगाऱ्यांनीं त्याची खूपच थट्टा उडविली. **देवदत्ताच्या** अंगावर कपडे चांगले मौल्यवान् होते. जुगाऱ्यांनीं त्याला फार हिणसावलें; तेव्हां ईर्षेला पडून त्याणें आपल्या

अंगावरचीं वस्त्रेंदेखील पणास लावलीं व तीं सर्वही तो हरला. ! शेवटीं जुगाऱ्यांनीं त्याला एक लंगोटी दिली. ती लंगोटी लावून **देवदत्ता**ची स्वारी त्या जुवेबाजांच्या अड्ड्यांतून बाहेर पडली!

ज्याच्याजवळ द्रव्य नाहीं अशा मनुष्याला वेश्येच्या घरीं किंवा जुगाऱ्यांच्या अड्ड्यांत थारा मिळत नाहीं, हें उघडच आहे. **देवदत्त** व्यसनी होता, तरी तो अगदींच निलाजरा बनला नव्हता. वस्त्रें गेल्यामुळें तो लज्जित होत्साता घराकडे न जातां; तसाच एका ओसाड देवळांत जाऊन बसला.

त्या देवळांत, ज्याणें अनेक मंत्र साधले आहेत असा मोठा मांत्रिक **जालपाद** नांवाचा एक जादुगीर एकटाच कांहीं जप करीत बसलेला त्याच्या दृष्टीस पडला. हळूच त्याच्याजवळ जाऊन **देवदत्तानें** त्याला नमस्कार केला. यद्यपि **जालपाद** मौन धरून बसला होता, तथापि **देवदत्ता**ची दीन मुद्रा पाहून त्याला दया आली. त्याणें मौन सोडून त्याचें स्वागत केलें. **देवदत्त** क्षणभर बसून विश्रांति घेत आहे तों, त्याणें— 'तुझी अशी वाईट स्थिती होण्याचें कारण काय? व तूं दुःखी कां झालास?' ह्मणून त्याला विचारलें. तेव्हां 'जुगाराच्या व्यसनानें सर्व वित्ताचा क्षय होऊन आपली अशी दशा झाली आहे' असें **देवदत्तानें** त्याला सविस्तर सांगितलें.

तें ऐकून **जालपाद** ह्मणाला, 'बाबा, तूं फार वाईट गोष्ट स्वीकारलीस. व्यसनी पुरुषांला पुरें होईल इतकें द्रव्य या सगळ्या पृथ्वीवर देखील मिळायचें नाहीं. मग एकट्या तुझ्याजवळचें अल्पस्वल्प वित्त कोठून पुरणार? एकंदरींत या व्यसनासारखें घातक दुसरें कांहींच नाहीं. आतां तुझ्या मनांत ही आपली विपत्ति जावी असें जर असेल तर मी सांगतों तें कर. मी आपल्याला विद्याधराची पदवी प्राप्त व्हावी ह्मणून कंबर बांधली आहे, याकरतां तूंही माझ्याबरोबर विद्याधरत्व प्राप्त होण्याविषयीं प्रयत्न कर. तुझ्या लक्षणांवरून तूं खरोखर तें पद मिळविशील

अशी माझी खात्री आहे; पण एक गोष्ट मुख्य कर्तव्य आहे. ती ही कीं, तूं माझी आज्ञा पाळली पाहिजेस. माझ्या आज्ञेंत राहशील तर तुझ्या सर्व विपत्ती अवश्यमेव नाहींशा होतील."

**जालपादाचें** हें सांगणें ऐकून **देवदत्तानें** त्याच्या आज्ञेप्रमाणें वागण्याचें कबूल केलें. **देवदत्त** ह्यावेळापासून त्या **जालपादाच्या** सेवेंत तत्पर होत्साता सर्वकाळ त्याच्याजवळ राहूं लागला. एकेदिवशीं तेथल्या स्मशानांत एक मोठा वडाचा वृक्ष होता त्याच्याखालीं जाऊन मध्यरात्रीच्या सुमारास **जालपादानें** मोठी पूजा केली. पायसाचा नैवेद्य दाखविला व दशदिशांला बली दिले. याप्रमाणें देवतेची यथाविधि पूजा करून तो मांत्रिक **जालपाद**, जवळ उभा असलेल्या **देवदत्ताला** ह्मणाला, "बाबा, मीं आज कशी पूजा केली ही तूं पाहिलीस ना? आतां आजपासून प्रत्येकदिवशीं रात्रीं येथें येऊन तूं पूजा करावीस. व शेवटीं—'हे **विद्युत्प्रभे**, ही मी यथाशक्ति पूजा केली आहे तिचा स्वीकार कर,' अशी देवीची प्रार्थना करीत जा. असें केलेंस ह्मणजे यापासून पुढें काय होणार तें मला माहित आहे; यापासून तुझी आणि माझी दोघांचींही कार्यसिद्धि खचित होईल."

याप्रमाणें **देवदत्ताला** सांगून व आणखीं जी कांहीं विशेष माहिती द्यायची होती, तीही देऊन **जालपाद देवदत्तासहवर्तमान** परत आपल्या स्थानीं प्राप्त झाला. **देवदत्तानें जालपादाला** आपला गुरूच करून घेतला होता. व त्याच्या आज्ञेप्रमाणें करणें हें तो आपलें मुख्य कर्तव्य समजत होता. ह्मणून त्याणें, **जालपादानें** सांगितल्याप्रमाणें प्रतिदिवशीं त्या वडाच्या झाडाखालीं जाऊन पूजा करण्याचा नियम चालू केला. याप्रमाणें बरेच दिवस **देवदत्ताचा** क्रम चालला असतां एकेदिवशीं कांहीं चमत्कार घडला. एकाएकीं त्या वडाच्या झाडाचे दोन भाग झाले; व त्यांतून दिव्यरूप धारण करणारी एक स्त्री प्रगट झाली. ती **देवदत्ताच्याजवळ** येऊन ह्मणाली, "भद्रपुरुषा,

माझ्याबरोबर ये; आमची धनीन तुला बोलावीत आहे. तूं माझ्या मागून ये ह्मणजे मी तुला तिच्याजवळ घेऊन जातें."

देवदत्तानें हें तिचें सांगणें कबूल केलें, तेव्हां ती त्याला घेऊन त्याच झाडांत शिरली. आंत जातांच देवदत्ताला एक रत्नखचित अत्यंत सुंदर असा वाडा दृष्टीस पडला. त्याच्या आंत प्रवेश करून पाहतो तों, एका मोठ्या पलंगावर दिव्य रूप धारण करणारी एक स्त्री डाव्या हातावर मान ठेवून पडली आहे; असें त्याणें पाहिलें. तिला पाहून आपण केलेल्या नेमाची, ही प्रत्यक्ष रूप धारण करणारी सिद्धीच असावी असें देवदत्त मनांत आणीत आहे; तों ती स्त्री तत्काल पलंगावरून उठून सामोरी आली. तिणें देवदत्ताचें उत्तम स्वागत करून त्याचें मन रंजविलें. जिच्या पायांतील पैंजणांचा खुळखुळ आवाज होत आहे, अशी ती स्त्री मोठ्या प्रेमळ मुद्रेनें देवदत्ताकडे पाहून त्याचा हात धरून, तिणें त्याला आपल्या पलंगावर नेऊन बसविलें. आणि स्नेहपूर्वक ह्मणाली, "महाभागा, रत्नवर्ष नांवाच्या यक्षपतीची मी कन्या आहें. माझें नांव विद्युत्प्रभा. ह्या जालपाद नांवाच्या मांत्रिकानें माझी पुष्कळ आराधना केली; तरी माझें त्याच्यावर मनापासून प्रेम बसत नाहीं. त्याच्या आराधनेनें संतुष्ट झाल्यावरून मी केवळ त्याचा मनोरथ पुरविणारीच आहें. पण तूं तर प्राणांपेक्षांही मला प्रिय वाटतोस. माझ्या जिवाचा तूंच धनी आहेस. तेव्हां जिचें तुजवर प्रेम आहे अशा माझें पाणिग्रहण करून तूं माझा हेतू पुरीव. याहून आणखीं तुला काय सांगायचें आहे. तूं माझ्या सर्वस्वाचा धनी आहेस. येवढ्यांत काय तें समज."

विद्युत्प्रभेचें हें भाषण ऐकून देवदत्ताला अतिशय आनंद झाला. त्याणें तत्काल तिची विनंति मान्य केली व तेथल्या तेथेंच उभयतांचा विवाह झाला. दुःखीकष्टी झालेल्या देवदत्ताला यक्षकन्येच्या सहवासापासून फारच सुख झालें. त्याणें तिच्याशीं अनेकप्रकारचे विलास

ोगले. नंतर लौकरच ती **विद्युत्प्रभा** गरोदर झाली. तेव्हां **देवदत्त** पुन्हां आपला गुरू **जालपाद** याच्याकडे जाण्यास निघाला. व **विद्युत्प्रभेनें**-ी त्याला पूर्वस्थलीं आणून पोंचविलें. मूळच्या ठिकाणीं येतांच **देवदत्त** लौकरलौकर आपल्या गुरूजवळ गेला. **देवदत्त** प्रतिदिवशीं पूजेला जात होता; तरी पूजा आटपून तो लौकर परत येत असे. त्यादिवशीं तो गेला त्याला कित्येक महिने झाले तरी तो आला नाहीं; ह्मणून **जालपाद** काळजी करीत होता. अशा समयांत एकाएकीं देवदत्त येतांच त्याला फार संतोष झाला. **देवदत्तानें**, त्याला नमस्कार करून झालेलें सर्व वर्तमान निवेदन केलें. गुरूच्या आज्ञेवांचून आपण विद्युत्प्रभेचा समागम केला याविषयीं त्याला भय वाटत होतें.

**जालपादानें देवदत्ताला** आपला शिष्य करून घेतला होता; तरी तो त्याच्याशीं मनापासून वागत नव्हता. बाह्यात्कारें गोड गोड बोलत असे; तरी **देवदत्ताकडून** कांहीं तरी कार्य करून घ्यावें; व त्याची सिद्धि आपल्याला मिळावी असें त्याच्या मनांत कपट होतें. **देवदत्त** मात्र भोळ्या भावानें मनापासून त्याच्या सेवेंत तत्पर होता. त्याणें सांगितलेली हकीकत ऐकून **जालपाद** ह्मणाला, "बाबा, तूं त्या **विद्युत्प्रभेचा** समागम केलास यांत कांहीं अपराध केला नाहींस. केलेंस तें चांगलेंच झालें; पण आतां एक काम मात्र अवश्य तुला केलें पाहिजे. तुझ्यापासून त्या यक्षकन्येला गर्भधारण झालें आहे, असें तूं सांगतोस तर आतां परत तिच्याकडे जा आणि तिचें पोट फाडून युक्तीनें तो गर्भ माझ्याजवळ घेऊन ये! हें काम तुला अवश्य केलेंच पाहिजे. ज्यावेळीं मी तुला आपल्याजवळ ठेविलें त्याच वेळीं तुला 'माझ्या आज्ञेप्रमाणें वागलें पाहिजे' असें सांगितलें होतें, त्याची आठवण आहेना? तर आतां जा लौकर. न कचरतां धीरानें तिच्या पोटांतला गर्भ काढून घेऊन ये."

हें ऐकून **देवदत्ताला** फार वाईट वाटलें. आपल्याचस्त्रीचा आपण

गर्भ काढून आणण्याविषयीं त्याला कठीण पडलें ; तरीं जालपादा-जवळ—'तूं सांगशील त्याप्रमाणें करीन' अशी पूर्वीं त्याणें प्रतिज्ञा केली होती. तेव्हां निरुपायास्तव तो पुन्हां ती आपली प्रिया यक्षकन्या हिच्याजवळ गेला. आपण मोठें क्रूर व वाईट कर्म करण्यास आलों आहें असें समजून देवदत्त आपल्याच ठिकाणीं फार खिन्न झाला होता. ती त्याची मुद्रा पाहून विद्युत्प्रभा आपण होऊन त्याला ह्मणाली, "आर्यपुत्र, तुह्माला कांहींतरी मोठा खेद झाला आहे असें वाटतें. व तो होण्याचें कारण काय तेंही माझ्या लक्ष्यांत येऊन चुकलें. तुह्माला त्या जालपादानें माझा गर्भ काढून आणण्यास सांगितलें आहे हेंचना? तर मग त्याविषयीं इतका खेद करण्याचें कांहीं कारण नाहीं. ती गोष्ट मला मान्य आहे. आपण कांहींएक शंका न धरतां खुशाल माझें पोट फाडून आंतला गर्भ घेऊन जा. हें मी स्वसंतोषानें आपल्याला सांगतें. इतकेंही असून कदाचित् आपल्याच्यानें तसें करवतच नसेल तर स्वतः मीच तें काम करतें. कारण त्यापासून कांहीं मोठें कार्य साधायचें आहे. तर आपली मर्जी कशी आहे ती सांगा?"

बिचारा देवदत्त मोठा पापभीरु होता. त्याच्यानें तसलें क्रूर कृत्य करण्याचें धैर्य करवलें नाहीं. गुरूच्या आज्ञेस्तव कदाचित् त्याला आपलें मन घट्ट करावें लागलें असतें; पण विद्युत्प्रभेनें स्वतःच आपण तसें करतें असें सांगितल्यावरून देवदत्ताला एक प्रकारें संतोष झाला. तो तिला ह्मणाला, "माझ्यानें तर तसें करवत नाहीं. जणूं काय माझ्या मनाला बांधून टाकणारे तीन पाशच, अशा तीन वळकट्यांनीं सुंदर दिसणारें, तुझें उदर प्रथम मी ज्यावेळीं पाहिलें, त्यावेळापासून तें माझेंच आहे असें मला वाटूं लागलें आहे. सांप्रत आंत गर्भ असल्या-मुळें त्या वळकट्या दिसत नाहींत. तरी प्रथम माझी त्यांवर जी भावना होती तीच आतांही आहे. ह्मणून त्याच्यावर शस्त्र चालविण्यास मला धैर्य होत नाहीं." देवदत्तानें असें सांगितल्यावरून, एकंदरींत त्याच्या-

हातून हें व्हायचें नाहीं; असें समजून **विद्युत्प्रभेनें** आपल्या हातानें आपलें पोट फाडून त्यांतला गर्भ बाहेर काढला! आणि **देवदत्ताच्या** पुढें ठेवून त्याला म्हणाली, "आर्यपुत्र, विद्याधरपदवीचा उपभोग करण्याची जर तुह्माला इच्छा असेल तर त्याचें मुख्य कारण, असा हा गर्भ आहे. हा तुह्मी घ्या." असें बोलून तिणें **देवदत्ताच्या** हातांत तो गर्भ दिला व "मी विद्याधरी असून शापानें या यक्षाच्या घरीं जन्मास आलें आहें. माझ्या शापाचा शेवट अशाच गोष्टीनें व्हायचा असा पूर्वीं नियम ठरला आहे. मला पूर्वजातीचें स्मरण आहे. व ह्मणूनच मी हें कठोर कृत्य केलें. आतां मी आपल्या स्थानाला जातें. तुमचा आमचा पुनरपि त्याच ठिकाणीं समागम होईल." असें सांगून **देवदत्ता**-ला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन **विद्युत्प्रभा** तत्काल तेथून निघून गेली.

वस्तुतः **विद्युत्प्रभेनें** स्वतः आपल्या हातानें जें कृत्य केलें त्यावरून राक्षसीपेक्षांही ती मोठी कठोर होती असें कोणी ह्मणेल; पण त्यांत तिचा हेतु निराळा होता. ती कोणत्याही रितीनें आपला शाप सरून आपण पूर्वस्थितीला प्राप्त व्हावें अशी इच्छा करीत होती. तेव्हां दुःखांतून मुक्त होण्याकरतां तिला तसें अवश्यमेव केलेंच पाहिजे होतें. नाहींपेक्षां शापाचा शेवट झाला नसता. असो. प्रियेच्या विरहानें दीन झालेल्या **देवदत्तानें** **विद्युत्प्रभेनें** दिलेला गर्भ तेघला व तो तेथून खिन्नअंतःकरण होत्साता, तो जादूगीर **जालपाद** याच्याजवळ प्राप्त झाला. **जालपादानें** जें मंत्रसाधन केलें होतें, त्यावरून त्याला तशा प्रकारचा गर्भ खाणें अवश्य होतें! व गर्भ खातांच त्याला विद्याधरत्व प्राप्त व्हायचें होतें! वस्तुतः विद्याधरत्वाची प्राप्ती होण्याचें मुख्य साधन कायतें हाच गर्भ. असें **विद्युत्प्रभेनें देवदत्ताला** सांगितलें होतें. तेव्हां त्याणें आपणच त्याचा स्वीकार करायचा होता. पण त्या प्रामाणिक शिष्याला तसें करणें योग्य वाटलें नाहीं. कारण **जालपादानें** 'तो गर्भ आपल्याकडे घेऊन ये' असें सांगितलें असून **देवदत्तानें** तसें कर-

ण्याचें कबूल केलें होतें. ह्मणून त्याणें तो गर्भ **जालपादाच्या** हत्र दिला. उघडच आहे, सत्पुरुष दुर्लभ वस्तू असली तरी तीविषयीं प्पलपोटेपणा धारण करीत नाहींत.

**जालपादानें देवदत्ताला** प्रथम आपल्याजवळ ठेवून घेतलें त्यावेळीं 'तुला व मला विद्याधरत्वाची प्राप्ति होण्याविषयीं आपण साधन करता, व तूं, मी सांगेन त्याप्रमाणें ऐक,' असें सांगितलें होतें. त्यावरून **जालपाद** आपल्याला त्यांतला हिस्सा देईल; असें **देवदत्त** समजला होता. पण तो **जालपाद** होता मोठा कपटी. त्याणें **देवदत्ताच्या** भोळेपणाचा फायदा घेऊन आपलें कार्य साधून घेण्याचा विचार केला. त्याणें **देवदत्तानें** आणलेल्या गर्भाचें मांस शिजत ठेवलें. व याला कोणत्या तरी निमित्तानें येथून घालवून द्यावें, असा विचार करून तेथून दूर एका अरण्यांत **भैरवाचें** स्थान होतें, तेथें जाऊन पूजा करून ये असें त्याला सांगितलें. 'तूं येईपर्यंत आपण वाट पाहतों. नंतर दोघेही यथाविधि याचें सेवन करूं,' असें तो ह्मणाला. **देवदत्ताच्या** भोळेपणामुळें त्याला आपल्या गुरूचें कपट समजलें नाहीं. त्याच्या सांगण्यावर विश्वास ठेवून तो **भैरवाची** पूजा करण्यास निघून गेला.

**देवदत्ताची** अडचण नाहींशी होतांच **जालपादानें** शिजून तयार झालेल्या त्या मांसावर ताव देऊन आपलें कार्य साधून घेतलें. बऱ्याचवेळानें **देवदत्त भैरवाची** पूजा करून परत येऊन पाहतो तों, त्या कपटी **जालपादानें** सगळें मांस खाऊन फस्त केलें. तें पाहून **देवदत्ताला** फार वाईट वाटलें. "अहो गुरुजी, मला कांहींच न देतां तुह्मी सर्व मांस खाऊन पार केलें. हें काय?" ह्मणून **देवदत्त** त्याला विचारीत आहे इतक्यांत, गर्भमांस खाल्ल्यामुळें ज्याला सिद्धि प्राप्त झाली आहे; असा तो कपटी **जालपाद** तत्काल विद्याधराचें रूप धारण करून आकाशांत उडून गेला. आभाळासारख्या रंगाची तरवार हातांत असून, गळ्यांत रत्नांचा हार व बाहुभूषणें इत्यादि मोठ्या अलंकारांनीं सुशोभि-

त असा विद्याधराचा देह धारण करून **जालपाद** आकाशांत गेला, तेव्हां **देवदत्त** अत्यंत निराश होऊन मोठ्या चिंतेंत पडला.

तो ह्मणाला, "अरेरे !! मी किती तरी श्रम केले. आणि **या दुष्टानें ( जालपादानें )** पापबुद्धि धारणकरून मला सर्वस्वीं फसविलें. खरोखर हें जगच असें लबाड आहे. अगदीं सरळपणानें वागणाऱ्याचा जगांत पराभव झाल्यावांचून मुळींच रहात नाहीं. **मी** याच्यावर पूर्ण विश्वास ठेवून वागल्यामुळें अगदीं नाडलों गेलों. **दैवयो**गानें मला ती यक्षकन्या प्राप्त झाली होती ती तर गेलीच. **पण** आपल्याला विद्याधरत्व मिळेल अशी जी आशा होती तीही, **गुरु ह्मण**विणाऱ्या या चांडाळानें नाहींशी केली ! तरी पण आपण धैर्य **सोडतां** कामा नये. ज्यानें आपला अपकार केला असेल त्याचा सूड घेतल्यावांचून राहूं नये. या कपटी **जालपादा**ची खूप फजिती केली पाहिजे. **पण** आतां त्याची भेट होणार कशी !"

याप्रमाणें दुःखित झालेला **देवदत्त** फारवेळ विचार करीत बसला होता. **जालपादानें** त्याला अनेक मंत्रतंत्रांचीं साधनें सांगितलीं होतीं. विचार करतां करतां **वेताळाचें** साधनकेल्यावांचून यावेळीं दुसरा कांहीं उपाय नाहीं, असा त्याचा निश्चय ठरला. अवशिष्ट राहिलेला दिवस घालवून तो सायंकाळीं स्मशानांत गेला. व तेथें एक प्रेत पडलें होतें तें उचलून त्याणें त्या झाडाखालीं आणलें; आणि त्यावर **वेताळाचें** आवाहन करून त्याची यथासांग पूजाअर्चा केली. व शेवटीं स्मशानांतल्या दुसऱ्या एका प्रेताचें मांस काढून त्याचा बली देऊन **वेताळाला** त्याणें तृप्त करण्याचा प्रयत्न केला; पण त्या मांसानें तो तृप्त झाला नाहीं. **देवदत्ताच्या** पुढें प्रगट होऊन "आणखी कांहीं तरी खायला दे" असें तो मागूं लागला. स्मशानांत पुष्कळ प्रेतें पडलेलीं होतीं. त्यांतलें आणखी एखादें प्रेत आणून देतों असें **देवदत्तानें** सांगितलें; पण **वेताळाला** दम निघेनासा झाला. **तेव्हां**

त्याणें स्वतः आपलें मांस त्याला देण्याचा निश्चय करून, तो आपलें अंग कापण्यास प्रवृत्त झाला! तेव्हां त्याचें तें विलक्षण सत्त्व पाहून **वेताळ** प्रसन्न होऊन त्याला ह्मणाला, "बाबा, तुझ्या या प्रेतानें मी संतुष्ट झालों आहें. आतां उगीच आपलें अंग कापून घेण्याचें साहस करूं नकोस. तुझें इष्टकार्य काय आहे तें सांग? ज्याकरितां तूं माझें आराधन केलें असशील तें तुझें काम मी साधून देतों."

याप्रमाणें **वेताळा**नें सांगितलें तें ऐकून तो वीर **देवदत्त** त्याला ह्मणाला, "विश्वास ठेवणाऱ्याला फसविणें हें मोठें पाप आहे. व त्या पापिष्ठाचा नाश अवश्यमेव केलाच पाहिजे. याकरितां सर्वस्वीं एकनिष्ठपणानें विश्वास ठेवून वागणाऱ्या मला, ज्या दुष्टानें फसविलें त्या **जालपादा**जवळ मला घेऊन जा. सांप्रत तो विद्याधरांच्या लोकांत राहत असेल तेथें मला ने. ह्मणजे मी त्याचा समाचार घेतों."

हें ऐकून **वेताळा**नें 'बहुत बरें' असें सांगून **देवदत्ता**ला, तत्काल आपल्या खांद्यावर घेऊन आकाशमार्गानें क्षणमात्रांत विद्याधरांच्या स्थानांत नेऊन पोंचविलें. तेथें अनेक विद्याधर होते. यामुळें **जालपादा**चा शोध करायला बराच वेळ लागला. **वेताळा**च्या खांद्यावर बसून **देवदत्त** त्या ठिकाणीं फिरत असतां अकस्मात् एका सुंदर महालाच्या गच्चीवर बसलेला, ज्याला विद्याधरांचें आधिपत्य प्राप्त झालें आहे असा, रत्नखचित सिंहासनावर विराजमान झालेला **जालपाद** त्याच्या दृष्टीस पडला. त्याच्या जवळच, **देवदत्ता**शीं जिणें विवाह केला होता, ती **विद्युत्प्रभा** उभी होती. व ती त्याला अनुकूल नसून **जालपाद**, खोट्यानाट्या कांहीं तरी गप्पा सांगून, तिणें आपली स्त्री व्हावें ह्मणून तिचें मन वळविण्याविषयीं प्रयत्न करीत होता. याप्रमाणें आपला शत्रु व प्रियपत्नी **विद्युत्प्रभा** या उभयतांचें एकाच वेळीं दर्शन झाल्यामुळें, क्रोध आणि आनंद हे परस्परविरोधी असे [illegible] त्याच्या मनांत उत्पन्न झाले. क्रोध हा तर आधींच त्याच्या अभि-

ाला व्यापून राहिला होता; पण त्यांत प्रियेच्या दर्शनापासून आनं-
ही उत्पन्न झाला. **जालपादा**ला पाहतांच तो तरुण **देवदत्त वेताळा**-
ाहवर्तमान एकदम त्याच्या अंगावर धांवला. त्याला पाहून, आनंद
ावलेल्या **विद्युत्प्रभे**चे नेत्र हेच कोणी एक चकोर त्यांला अमृतवृष्टि
ारून आनंद देणारा केवळ **चंद्र**च असा, **देवदत्त** एकाएकीं जवळ
ाप्त झाला. हें पाहून **जालपादा**ची मोठी धांदल उडाली. तो भय-
ीत होऊन त्रासानें एकदम आसनावर उठून उभा राहिला. व त्या
ाडबडींत मंत्रांनीं भारून तयार केलेली त्याची तरवार खालीं पडली.
ाव्हां **देवदत्तानें** तत्काल ती तरवार उचलून घेतली. वस्तुतः यावेळीं
ाणें **जालपादाचें** मस्तक उडविलें असतें तर, त्याच्यानें आपला ब-
ाव करवला नसता; पण **देवदत्तानें** त्याला मारलें नाहीं. उघडच
ाहे; थोरमनाचे पुरुष शत्रु असला तरी तो भयभीत झाला असें
ाहून त्याच्यावर दया करतात.

याप्रमाणें **देवदत्तानें जालपादा**ला सोडलें तरी शत्रुघाताकरतां
ाणून त्याणें ज्याला सिद्ध केलें होतें, त्या **वेताळानें जालपादाची**
ाडी धरली. **वेताळा**च्या मनांत त्याला मारायचेंच होतें; पण **देवदत्त**
ाध्यें पडून त्याणें त्याला सोडवून घेतलें. आणि **वेताळा**ला ह्मणाला,
ा बिचाऱ्या पाखंड्याला ( **जालपादाला** ) मारून आपल्याला काय
ारायचें आहे? तूं आतां याला मृत्युलोकांत घेऊन जा, व ज्या ठि-
ाणीं पूर्वीं होता त्या ठिकाणीं याला नेऊन ठेव. हा पापी जादूगीर त्याच
ठेकाणीं राहून पुन्हां अनेक दुष्ट प्रयोग, अनेक दुष्ट साधनें, करीत
ाहूं दे. त्याला आपल्या कपटाचें फल येवढेंच पुरे आहे!"

याप्रमाणें **देवदत्त** बोलत आहे इतक्यांत तत्काल आकाशांतून
ाक्षात् देवी **भवानी** तेथें प्रगट झाली. तिला पाहून **देवदत्तानें** तिच्या
ायांवर मस्तक ठेवला. तेव्हां **पार्वती** त्याला ह्मणाली, "बा पुत्रा,
ांप्रत मी तुजवर प्रसन्न झालें आहें. हें तुझें असाधारण सत्त्व पाहून

मला फार संतोष झाला. याकरितां मी तुला विद्याधरांचा राजा करतें. तूं याच ठिकाणीं विद्याधरांचें राज्य करीत आनंदांत रहा." असें सांगून **भवानीनें** विद्याधरांला ज्या ज्या विद्या प्राप्त होत असतात त्या त्या सर्व **देवदत्ता**ला दिल्या. व त्याणें केलेल्या पूजेचा स्वीकार करून ती तेथेंच अदृश्य झाली.

इकडे **देवदत्तानें** सांगितल्याप्रमाणें **वेताळानें जालपादाला** तेथून उचलून पुन्हां मूळच्या ठिकाणीं आणून आपटलें. त्याला ज्या सिद्धी प्राप्त झाल्या होत्या त्या सर्वही नष्ट झाल्या. उघडच आहे; अधर्मानें ऐश्वर्य मिळविलें तरी तें फार दिवस टिकत नाहीं. **जालपाद** आपल्या दुष्ट कृत्यानें सर्वतोपरी भ्रष्ट झाला. विद्याधरांची पदवी तर मिळाली नाहींच; पण इतके दिवस मोठमोठीं साधनें करून त्याणें ज्या सिद्धी मिळविल्या होत्या त्याही नाहींशा झाल्या. व सरळ मार्गानें जाणारा भला मनुष्य जो **देवदत्त** तो सर्वतोपरी सुखाला प्राप्त झाला. तो आपली प्रिया **विद्युत्प्रभा** हिच्यासहवर्तमान **पार्वतीनें** दिलेल्या विद्याधरांच्या आधिपत्याचा पुष्कळ दिवस यथेच्छ उपभोग घेता झाला."

याप्रमाणें आपला पति **शक्तिदेव** याला कथा सांगून, जिला पोटांतला गर्भ काढण्याची विशेष गडबड झाली आहे अशी ती **बिंदुरेखा** पुन्हां विशेष गोड शब्दांनीं त्याला ह्मणाली, "आर्यपुत्रा, अशीं मोठमोठीं कार्यें सिद्ध व्हावयाचीं असतात; याकरतां **बिंदुमतीनें** सांगितल्याप्रमाणें माझा गर्भ आपण काढून घ्या. व याविषयीं कांहीं शोक करूं नका. याचा परिणाम फार चांगलाच होईल."

त्या गर्भाचें आकर्षण करून **शक्तिदेवानें** विद्याधरत्व मिळवावें अशी **बिंदुमति** व **बिंदुरेखा** या दोघींचीही इच्छा होती; ह्मणूनच त्यांणीं त्याला तसें कृत्य करण्याविषयीं आग्रह चालविला होता. पण ती गोष्ट **शक्तिदेवा**च्या लक्षांत आली नाहीं. ह्मणून **बिंदुरेखेनें** त्याला

**देवदत्ता**ची कथा सांगितली. तीवरून तरी हा समजेल असें तिला वाटलें होतें; पण **शक्तिदेव** मूळच्या पदावरच होता. 'हें पापकर्म आपण कसें करावें' अशी त्याच्या मनांत जी शंका आली होती, ती अद्याप गेली नव्हती. तो पुन्हां कांकूं करतो असें पाहून आतां याला काय सांगावें, याचा **बिंदुरेखे**ला मोठा विचार पडला होता, इतक्यांत—"अरे **शक्तिदेवा**, तूं निःशंकपणें ह्या **बिंदुरेखे**च्या पोटांतला गर्भ काढून घे. हा गर्भ मुठींत धरून आपल्या गळ्याकडे नेलास, ह्मणजे तत्काल त्याची तरवार होईल. तूं याविषयीं कांहींच शंका मानूं नकोस!"

याप्रमाणें आकाशवाणी झाली ती ऐकून **शक्तिदेवा**ला धैर्य आलें. त्याणें विशेष कांहीं विचार न करतां एकदम **बिंदुरेखे**चें पोट फाडून त्यांतून तत्काल गर्भ बाहेर काढला. व तो हातांत धरून गळ्याजवळ नेतो आहे इतक्यांत तो त्याच्या हातांत खड्गरूपानें परिणाम पावला! जणुं काय आपल्या धैर्यानें, सिद्धीचा विस्तीर्ण केशपाशच आकर्षण केला आहे, असा तो खड्ग हातांत घेतांच तो ब्राह्मण **शक्तिदेव** तत्काल विद्याधर झाला; व ती त्याची पत्नी **बिंदुरेखा** क्षणमात्रांत कोठें दि-, सेनाशी झाली. हा झालेला चमत्कार पाहून विस्मित झालेल्यातून **शक्तिदेवानें** कोळ्यांच्या राजाची मुलगी जी **बिंदुमति** नामक आ सा- दुसरी स्त्री तिला ही हकीकत सांगितली. ळेल्या

ती ऐकून **बिंदुमति** ह्मणाली, "प्राणनाथ, आह्मी विद्याधरपतीच्या मुली आहोंत. आह्मी तिघी बहिणी ऋषीच्या शापानें **कनकपुरी**पासून भ्रष्ट झालों. **वर्धमान**पुरांत जी तुह्मी राजकन्या पाहिली, ती **कनक-रेखा**ही आमच्यापैकींच एक होय. तिच्या शापाचा अंत कसा झाला तो तुम्ही पाहिलाच आहे. ती सांप्रत आपल्या नगरीला गेली आहे. दुसरी बहीण **बिंदुरेखा** हिचाही शाप कसा सरला हें तुह्मी नुकतेंच पाहिलें आहे. तीही **कनकपुरी**लाच गेली असेल. कारण दै-वयोगानें तिच्या शापाचा शेवट असाच कांहीं विचित्र होता. आतां

त्यांतली तिसरी मी. माझाही शाप आतांच सरला आहे. मी या क्षणींच त्या **कनकपुरी**ला निघून जाणार. हे प्रिया, आह्मी तिघीही आपल्या पूर्वजन्मींच्या विद्या व विज्ञान यांपासून भ्रष्ट झालों नाहीं. मनुष्यजन्मांतदेखील त्या आह्माला प्राप्त झाल्या होत्या. आह्मा तिघींचीं पहिलीं शरीरें त्या **कनकपुरीं**तच आहेत. **चंद्रप्रभा** नांवाची आमची वडील बहीणही तेथेंच आहे. तर आतां मला निरोप असूं द्या. मी पुढें निघून जातें. तुमच्या हातांत ही जी तरवार आहे, ही एक मोठी सिद्धि आहे. हिच्या प्रभावानें आपणही लौकरच **कनकपुरीं**त याल. ह्मणजे तेथें आह्मी चौघीही बहिणी तुमच्या स्त्रिया होऊं. सांप्रत अरण्यांत राहून तप करीत असलेल्या आमच्या पित्यानें आपलें सर्व राज्य आमच्या हवालीं केलें आहे. तर तुह्मी आमचे पति होऊन त्या राज्याचा यथेच्छ उपभोग घ्या."

याप्रमाणें अगदीं खरी खरी गोष्ट होती, ती **बिंदुमतीनें शक्तिदेवाला** सांगितली. तेव्हां ती सत्य मानून **शक्तिदेव**ही **कनकपुरीं**त जाण्यास सिद्ध जाहला. **बिंदुमतीनें** तत्काल मनुष्यदेहाचा त्याग घेताऊन **कनकपुरी**चा रस्ता धरला. व तिच्या पाठोपाठ **शक्तिदेव**ही यडे निघाला. त्या **कनकपुरीं**त पोंचल्यावर **शक्तिदेवानें** पहिल्या तला ग, निरनिराळ्या मंडपांत निर्जीव होऊन पडलेलीं स्त्रियांचीं जीं शरीरें अवलोकन केलीं होतीं, त्याच शरीरांत त्यांचे त्यांचे आत्मे प्रविष्ट वझाले असून, **कनकरेखा** इत्यादि तिघी स्त्रिया पुन्हां **शक्तिदेवाच्या** दृष्टीस पडल्या! जी **चंद्रप्रभा** त्याला आपल्या महालांत ठेवून पित्याकरडे गेली होती, व जिच्याकरतां तो फार उत्सुक झाला होता ती यावेळचीं मंगलकारक आरती घेऊन **शक्तिदेवाला** सामोरी येत असलेली त्याणें पाहिलेली. बहुत दिवस दर्शन न झाल्यामुळें उत्कंठित झालेल्या दृष्टीनें **शक्तिदेवाच्या** रूपाचें जणूं काय प्राशनच करीत आहे, अशी **चंद्रप्रभा** बराच वेळ तटस्थ होऊन त्याच्याकडे पाहत होती. आपापलं

नेमलेलीं कामें करण्याविषयीं तत्पर असलेल्या दासीदास इत्यादि सेवक जनांनीं प्रेमपूर्वक अवलोकनानें ज्याच्या आगमनापासून झालेला आनंद व्यक्त केला आहे, अशा त्या **शक्तिदेवा**ला हातीं धरून **चंद्रप्रभेनें** आपल्या महालांत नेऊन पलंगावर बसविलें. तिच्या तिघी बहिणी यावेळीं **शक्तिदेवा**च्या जवळच उभ्या राहिल्या होत्या. क्षणभर त्याला विश्रांति घेऊं देऊन **चंद्रप्रभा शक्तिदेवा**ला ह्मणाली, "भाग्यशाली पुरुषा, **वर्धमान** नगरींत **परोपकारी** राजाची कन्या **कनकरेखा** नांवाची जी तुह्मी पाहिली होती, तीच ही माझी बहीण. हिला **चंद्ररेखा** असें ह्मणतात," असें सांगून तिला **शक्तिदेवा**च्या जवळ आणून बसविलें. नंतर **बिंदुमती**ला हातीं धरून **चंद्रप्रभा** ह्मणाली, "**उच्चस्थल** द्वीपांतला कोळ्यांचा राजा **सत्यव्रत** याची कन्या **बिंदुमति**, जी तुमची तेथें स्त्री झाली होती, तीच ही माझी दुसरी बहीण. हिचें नांव **शशिरेखा**," असें बोलून तिला **शक्तिदेवा**जवळ आणून बसविलें. नंतर **बिंदुरेखे**ला हातांत धरून ह्मणाली, "त्याच **उच्चस्थल**द्वीपांत एका दैत्यानें पळवून आणलेली जी राजकन्या **बिंदुरेखा** तुमची स्त्री झाली होती, तीच ही माझी तिसरी बहीण. हिचें नांव **शशिप्रभा**," असें बोलून तिलाही **शक्तिदेवा**जवळ बसवून **चंद्रप्रभा** ह्मणाली, "हे कुशल व साहसी पुरुषा, या प्रमाणें आह्मी चौघीही बहिणी तुझ्यावर आसक्त झालेल्या असून मनापासून आह्मीं तुला वरलें आहे, तर आतां आमच्या पित्याजवळ आमच्याबरोबर चल. तो यथाविधि आमचें दान करील. तें स्वीकारून तूं आमचा पति हो !"

याप्रमाणें **कामदेवा**च्या आज्ञेनें प्रेरित झालेल्या **चंद्रप्रभेनें** सांगितलें, तें ऐकून **शक्तिदेव** त्या चौघींलाही बरोबर घेऊन, त्यांणीं दाखविलेल्या मार्गानें लौकर लौकर त्यांच्या पित्याजवळ जाता झाला. तेथें पायांवर मस्तकें ठेवून **शक्तिदेवा**ला वरण्याचा ज्यांणीं आपला हेतु निवेदन केला आहे, व तत्काल आकाशवाणी होऊन तसेंच करण्या-

वेषयीं ज्याची प्रेरणा झाली आहे, अशा त्या **शशिखंड**नामक वि-
ग्राधरराजानें एकाच वेळीं त्या चारही कन्या **शक्तिदेवा**ला यथाविधी
अर्पण केल्या. त्या प्रसंगीं तेथें असलेले सर्व विद्याधर फार आनंदित
झाले. नंतर त्या विद्याधरांच्या राजानें **शक्तिदेवा**ला मोठें समृद्ध असें
**कनकपुरी**चें राज्य दिलें; व विद्याधरांला ज्या विद्या प्राप्त होतात त्या स-
र्वही तत्काल प्रीतिपूर्वक आपल्या जांवयाला दिल्या. याप्रमाणें सर्व विद्या
देऊन नंतर विद्याधरांच्या संप्रदायाला अनुसरून' '**शक्तिदेव**' असें जें
याचें नांव होतें, तें बदलून **शक्तिवेग** असें नांव ठेविलें. आणि त्या-
ला ह्मणाला, "प्रिय जामाता, तुला दुसरा कोणीही जिंकण्याविषयीं स-
मर्थ होणार नाहीं; व तुझ्यावर कोणाचेंही वर्चस्व चालणार नाहीं.
तुझ्या बुद्धीचा प्रभाव इतर सर्व विद्याधरांहून अधिक आहे. पण **वत्स-
राजा**पासून जो पुत्र होईल तो मात्र तुझ्यापेक्षां श्रेष्ठ होईल. तो
तुह्मा विद्याधरांचा सार्वभौम होणार. **नरवाहनदत्त** असें त्याचें नांव
प्रसिद्ध होईल. तो महाप्रतापी जेव्हां जन्मास येईल तेव्हां त्याच्याशीं
मात्र तूं नम्रपणानें वाग."

असें सांगून **शशिखंड**नामक विद्याधराधिपतीनें आपल्या तपो-
वनापासून जाण्याविषयीं जांवयाला आज्ञा दिली, व गळ्याला मि-
ठ्या मारून प्रेमपूर्वक ज्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहत आहेत,
अशा आपल्या मुलींचें समाधान करून त्यांसहवर्तमान **शशिखंडानें
शक्तिवेगा**ला निरोप दिला. सासऱ्याचा निरोप घेऊन **शक्तिवेग** ते-
थून निघून आपली राजधानी **कनकपुरी** येथें प्राप्त झाला. विद्याधर-
लोकांत अतिउत्तम अशा त्या नगरींत आपल्या स्त्रियांसहवर्तमान प्र-
वेश करून, **शक्तिवेगानें** विद्याधरांचें आधिपत्य स्वीकारलें. सु-
वर्णमय मोठमोठ्या हवेल्यांनीं शोभायमान, व जींतील अत्यंत उंच
अशा चकचकीत शिखरांनीं सूर्याची कांति जणूं काय ओढूनच घेतली
आहे, अशा त्या नगरींत अप्रतिम रूपवती अशा चौघी स्त्रियांसहव-

तेमान रत्नखचित पायऱ्यांनीं सुशोभित दिसणाऱ्या सुंदर बागेंतील पुष्करणींत अनेकप्रकारें विहार करीतहोत्साता, पत्नीसहवर्तमान **शक्तिवेग** बहुत सुख भोगता झाला.

येथवर **शक्तिवेगानें** आपलेंच चरित्र विस्तारपूर्वक कथन केलें. आणि बोलण्याच्या कामांत मोठा कुशल असा तो विद्याधरराज **वत्सराजाला** ह्मणाला, "हे शशांककुलभूषणा, ज्या **शक्तिवेगाचें** मी चरित्र हावेळपर्यंत आपल्याला निवेदन केलें, तो प्रत्यक्ष मीच असें आपण समजा. माझ्या सासऱ्यानें सांगितल्याप्रमाणें पुढें आमचा सार्वभौम होणारा जो आपला पुत्र **नरवाहनदत्त** त्याच्या चरणकमलाचें दर्शन घेण्याविषयीं उत्सुकता उत्पन्न झाल्यावरून मी येथें प्राप्त झालों. मी पूर्वी मनुष्य असतांही, भगवान् **शंकराच्या** प्रसादानें मला विद्याधरांचें आधिपत्य प्राप्त झालें. मी ज्याकरतां आलों होतों, तें आपल्या पुत्राचें दर्शन घडलें. आतां मी स्वस्थानास जातों. आमचा भावी राजा पाहिल्यावरून मी फार संतुष्ट झालों. ईश्वर तुमचें कल्याण करो!" असें भाषण करून, हात जोडून सत्कार करणाऱ्या **वत्सराजाची** अनुज्ञा घेऊन **शक्तिवेग** तत्काल आकाशांत निघून गेला. व इकडे **वत्सराज** त्या आपल्या बालतनयासहवर्तमान **यौगंधरायणादिक** प्रधान, **पद्मावती** व राणी **वासवदत्ता** यांसहवर्तमान पुत्राचें माहात्म्य ऐकून मोठा आनंद पावता झाला.

याप्रमाणें **शक्तिवेगानें** व **नारद** इत्यादिकांनीं ज्याचें माहात्म्य वर्णन केलें आहे, व पुढें विद्याधरांचें ऐश्वर्य ज्याला प्राप्त होणार असा आपला पुत्र **नरवाहनदत्त** याचें उत्तमप्रकारें रक्षण करीतहोत्साता, **वत्सराज** सुखांत दिवस घालवीत होता. आईबापांनीं ज्याला सर्वकाल फुलांत घालून बाळगला आहे, असा **नरवाहनदत्त** शुक्लपक्षींच्या **चंद्राप्रमाणें** दिवसानुदिवस वाढत गेला. त्याबरोबरच त्याच्या मातापितरांचा आनंदही वाढत होता. लौकरच त्या राजपुत्राला आठवें

वर्षे लागलें. तेव्हां **वत्सराजानें** त्याला विद्याभ्यास करविण्यास प्रारंभ केला. तो बाल असल्यामुळें त्याच्यावर अभ्यासाचा विशेष बोजा घातला नव्हता. लेखन आणि वाचन हें तर तो यापूर्वींच शिकला होता. पांचवें वर्ष लागलें तेव्हांच त्याला 'ॐनामा' शिकविण्यास प्रारंभ झाला होता. त्याच्या बरोबर **यौगंधरायण, रुमण्वान्, वसंतक,** आणि राजपुरोहित या चौघांच्या मुलांचा अभ्यास चालत होता. व्यायामशिक्षण अगदीं लहानपणापासून त्याला मिळत होतें. त्याचा स्वभाव मोठा खिलाडू होता. आपल्या सोबत्यांबरोबर तो जे खेळ खेळत असे, तेच खेळ त्याचे शिक्षक त्याला योग्यरितीनें खेळण्यास शिकवीत असत. **वत्सराजानें** त्याच्या शिक्षणाची अशी उत्तम व्यवस्था केली होती कीं, प्रत्येक विषयाचा एकेक शिक्षक निरनिराळा ठेवला होता. व जो तो आपापला विषय नियमितवेळीं त्याला शिकवीत असे. कोणत्याही विषयाच्या संबंधानें शिक्षक त्याजवर सक्ती मुळींच करीत नव्हते.

हळू हळू निरनिराळ्या विद्यांचें ज्ञान व त्याचें शरीर एकसारखें वाढत चाललें होतें. राणी **वासवदत्ता** आणि **पद्मावती** या दोघींचा स्नेह त्य मुलावर एकवटला होता. त्या रात्रंदिवस एकसारख्या त्याला जपत होत्या. उत्तम वंशांत जन्म झाल्यामुळें, व गुण चढविल्यामुळें न झालेल्या व हळू हळू भरत चाललेल्या, अशा शरीरानें व धनुष्यानेंही तो फार शोभता झाला. त्या मुलाचा पिता **वत्सराज** पुत्राच्या संबंधा 'आतां लौकरच त्याची मुंज करूं, मग लग्न करूं, नंतर त्याला युवरा करूं, अशाप्रकारें अनेक मनोरथ करीत होत्साता, प्रत्यक्ष आपला आ त्माच देहांतर धारण करून प्राप्त झाला आहे, अशा त्याला पाहून फा

---

१ या वाक्यांतले 'वंश' आणि 'गुण' या दोन शब्दांत श्लेष आहे. नरवाहनदत्त अर्थ लावतेवेळीं वंश म्हणजे कुळ, व गुण ह्मणजे शौर्य, औदार्य, इत्यादि हे घ्यावेत, धनुष्याकडे लावतेवेळीं—वंश ह्मणजे वेळू व गुण ह्मणजे दोरी, असा अर्थ घ्यावा.

आनंद मानता झाला. अशा संधीस तेथें, एक गोष्ट घडून आली ती येथें अवश्य सांगितली पाहिजे.

**वितस्ता**[1] नांवाच्या नदीच्या कांठीं **तक्षशिला**[2]नांवाची एक मोठी नगरी होती. ज्या नगरींतल्या उंच उंच महालांचीं, जवळून वाहणाऱ्या **वितस्ता** नदीच्या उदकांत प्रतिबिंबें दिसत होतीं. व त्यामुळें प्रतिबिंबित झालेली नगरी, हीच कोणी एक पातालांतील पुरी, त्या **तक्षशिला**नगरीची शोभा पाहायला आली आहे काय? असें प्रेक्षकांला वाटत होतें. त्या नगरींत **कलिंगदत्त** नांवाचा मोठा शूर राजा होता. हा राजा **बौद्ध**धर्मांतील शाखा अथवा **जैन**धर्म असें ज्याला ह्मणतात त्याला मानणारा होता. व त्याच्या प्रजाही बहुतकरून जैनधर्मीच होत्या. राजा **कलिंगदत्त** स्वतः जैनधर्मी होता; तरी तो इतर धर्मांचा द्वेष करीत नव्हता. ज्याज्या धर्माला पाळणाऱ्या त्याच्या प्रजा होत्या त्यांला तो त्यांच्यात्यांच्या धर्माप्रमाणें वागवीत होता. त्या राजानें, निरंतर चमकणारीं अशीं अनेक रत्नें ज्यांला लावलीं आहेत असे उत्तमोत्तम चैत्य[3]

---

१ या नांवाची नदी काश्मीरदेशांत आहे. सांप्रत हिला झेलम असें ह्मणतात. पूर्वकाळीं हिला वितस्ता—विस्तार पावणारी, असें नांव असून सांप्रत तिला झेलम ह्मणतात, याचें कारण काय तें समजत नाहीं. आपल्या भरतखंडांतील निरनिराळीं शहरें, नद्या व पर्वत इत्यादिकांची मूळचीं नांवें बदलून मुसलमानांची कारकीर्द या देशांत सुरू झाली तेव्हां त्यांणीं दुसरीं नावें दिलीं आहेत. उदाहरणार्थ काशीला बनारस; प्रयागाला अलहाबाद वगैरे नावें जणूं काय आपल्या कारकीर्दीचें चिरकाल स्मरण राहावें ह्मणूनच त्या लोकांनीं दिलीं. त्याचप्रमाणें वितस्ता हें नांव बदलून काश्मीरांत मुसलमान राजांची सत्ता सुरू झाली तेव्हां त्यांणीं झेलम हें नांव दिलें असावें. पंजाबांतल्या शतद्रू नदीला जसें सतलज हें नांव दिलें तसेंच हेंही असावें असें वाटतें.

२ रामाचा बंधू भरत याचा पुत्र तक्ष याला त्याणें तक्षशिला नांवाच्या नगरींत राज्याभिषेक करविला होता, असें रामायणांत वर्णन केलें आहे. त्यावरून तक्षशिला ही नगरी फार प्राचीन काळापासून प्रसिद्ध असावी असें दिसतें.

३ चैत्य या शब्दाची रचना मोठी चमत्कारीक आहे. मूळधातूच्या अर्थाकडे व त्याच्या रूढार्थाकडे पाहिलें, तर त्यांचा परस्पर मेळ बसत नाहीं. अमरसिंहानें चैत्य शब्द आयतनाचा—अर्थात् यज्ञ करण्याच्या स्थानाचा वाचक आहे; असें सांगितलें

त्या नगरींत अनेक बांधले होते. त्या चैत्यांच्या उंचउंच शिखरांनीं माझ्यासारखी दुसरी कोणतीच नगरी नाहीं' असा गर्व धरून तिनें आपली मान ताठ केली आहे कीं काय, असें वाटत होतें. त्या परमधार्मिक राजा **कलिंगदत्तानें** आपल्या प्रजेचें केवळ पित्याप्रमाणें फक्त पालनच केलें असें नाहीं; तर गुरूप्रमाणें तो प्रजेला उपयुक्त ज्ञानही देण्याविषयीं काळजी घेत होता.

या राजाच्या कारकिर्दींत त्याच नगरींत **वितस्तादत्त** नांवाचा एक मोठा सावकार होता. तोही श्रावकधर्मी असून तद्धर्मीय जति अथवा भिक्षुक यांची सेवा करण्याविषयीं मोठा तत्पर असे. त्याचा **रत्नदत्त** नांवाचा एक तरुण मुलगा होता. त्या **रत्नदत्ताला** जैनलोकांची धर्मस्थिति बिलकूल मानत नव्हती. जेव्हां तो अगदीं अज्ञान होता, तेव्हां—कांहीं समजत नसल्यामुळें—तो कांहीं बोलत नव्हता; पण प्रौढ झाल्यावर त्याला त्या जैनधर्माचा फारच तिटकारा येऊं लागला. तो बापाची त्या धर्माच्या संबंधानें फार निंदा करित असे. जेव्हां तेव्हां तो जैन लोकांला मोठे पापी व अमंगळ असें ह्मणत असे.

प्रथम प्रथम **वितस्तादत्त** आपल्या पुत्राच्या ह्मणण्याकडे विशेष लक्ष्य देत नव्हता. कारण त्याला असें वाटे कीं, 'हा अज्ञान आहे; याला या धर्माची माहिती नाहीं ह्मणून हा कांहीं तरी बडबडतो. पण प्रौढ झाल्यावर याला आपोआप या धर्माचें रहस्य कळून येईल. व तो

---

आहे (अमरकोश द्वितीयकाण्ड पुरवर्ग श्लोक ७ पहा) मेदिनीकोशाच्या यान्तवर्गांत एकविसाव्या श्लोकांत 'चैत्य ह्मणजे वैदिकधर्मी लोकांचें आयतन व बुद्धलोकांचे अर्थात् जैनांचेंदेखील वंद्यस्थान ह्मणजे त्यांचें मंदिर' असें ह्मटलें आहे. त्यावरून चैत्य शब्दानें विशेषतः जैनलोकांचें मंदिर असा अर्थ घेतां येतो. तेव्हां चैत्यह्मणजे जैनांचे देऊळ असें समजावें.

१:—जैनधर्मी लोकांस श्रावक असेही ह्मणतात. श्रावक या शब्दाचा अर्थ उघड आहे. श्रवण करणारा किंवा ऐकणारा जो तो श्रावक. जैनधर्मात गुरूनें सांगितलेला ध[र्म] व ज्ञान ऐकणें हें मुख्य मानलें आहे. व ते तसें करतात. ह्मणून त्यांला श्रावक अ[सें] नांव पडलें आहे.

निंदा करायची सोडून देईल.' बापाची अशी मसजूत होती, पण मुलग्याचें वर्तन दिवसेंदिवस अगदीं त्याच्या विरुद्ध होऊं लागलें. तो जेव्हां फारच निंदा करूं लागला, तेव्हां एकेदिवशीं **वितस्तादत्त** त्याला ह्मणाला; "अरे बाबा, तूं आतां कांहीं अज्ञान नाहींस. तुला सारें समजतें. असें असून तूं सार्वकाळ माझी निंदा करतोस याचें कारण काय? तें एकदां सांगशील तर बरें होईल. मला हें तुझें बोलणें आतां ऐकवत नाहीं."

याप्रमाणें बापानें प्रश्न केला. तेव्हां **रत्नदत्त** असूयापूर्वक त्याला ह्मणाला, "बाबा, मी निंदा करतों याचा राग मानूं नका. **ऋग्वेद, यजुर्वेद** आणि **सामवेद** या वेदत्रयींत सांगितलेल्या धर्माचा त्याग करून तुह्मी वेदबाह्य अशा या अधर्माला धर्मबुद्धीनें स्वीकृत केलें आहे. पवित्र अशा वेदवेत्त्या ब्राह्मणांचा त्याग करून तुह्मी नेहमीं या अमंगळ जतिलोकांची पूजा करतां. शिव! शिव!! या जतींचा भ्रष्टपणा कोठवर सांगावा! बेटे स्नानदेखील करीत नाहींत. नियमित वेळीं अर्थात् सूर्यास्ताच्या पूर्वीं,[१] यथेच्छ पोट भरून घेण्याविषयीं हे तत्पर असतात. ज्यांनीं शेंडी काढून टाकली आहे, जे सगळें डोकें भादरून घेतात, लंगोटी नेसतात, विहार[२] करून राहण्याविषयीं ज्यांचा

१ जैनधर्मांत प्राणिमात्राची हिंसा न करणें, हें मुख्य मानलें आहे. रात्रीं भोजन केलें, तर कदाचित् त्यांत किडामुंगी वगैरे मरेल ह्मणून जैनलोक दिवसां-उजेडीं जेवतात. दांत घांसणें हातपाय धुणें, स्नान करणें इत्यादिकांच्या संबंधानें त्यांचा नियम ह्मणून मुळींच नसतो. आधीं जेऊन नंतर स्नान करण्यांत त्यांस कांहीं अयोग्य वाटत नाहीं! कदाचित् आठवड्याचे आठवडे स्नान न घडलें तरी कांहीं हरकत नाहीं! त्यांच्या धर्मांत नेमनिष्ठा वगैरे कायती जेवणाच्याच संबंधानें आहे. फक्त जेवणावांचून नियमितवेळीं अवश्य करावयाचें असें त्यांचे दुसरें कोणतेंच कर्म नसतें.

२ जैनलोकांचे संन्याशी अथवा जति राहण्याकरतां एक मठासारखी जागा तयार केलेली असते. तींत ते लोक राहतात. अशाप्रकारच्या जाग्याला त्यांणीं विहार हें नांव दिलें आहे. पुण्याजवळचें कारलें, घारापुरी, वेरूळ इत्यादि प्राचीन स्थलांत जैनधर्मी लोकांचे विहार असल्याचें अद्यापही दिसून येतें.

विशेष लोभ; बहुतकरून ज्यांच्यांत हीनजातींचा भरणा पुष्कळ, असे अधम लोक ज्या धर्माचा आश्रय करतात, तो बौद्धधर्म घेऊन तुह्मांला काय करायचें आहे? मला तर त्याचा अगदीं कंटाळा येतो. तेव्हां तुह्मी हा धर्म सोडून द्या ह्मणजे निंदा बंद झाली."

पुत्राचें हें भाषण ऐकून **वितस्तादत्त** ह्मणाला, "बा मुला, तुला अद्याप धर्माची विशेष माहिती नाहीं. धर्माचें रूप एकच नाहीं. विशिष्टप्रकारचा लोकोत्तर धर्म निराळा, व सर्वलोकांनीं आचरण करण्याचा सामान्य धर्म निराळा. तूं ब्राह्मणांला मोठें पवित्र मानतोस; पण ब्राह्मण्यही फार दुर्मिळच आहे. बाप ब्राह्मण असला ह्मणून मुलगा ब्राह्मण होतो असें नाहीं. कामक्रोधादि सहा शत्रूंला ज्याणें जिंकलें असेल तोच ब्राह्मण या पदवीला योग्य आहे. जो सत्य भाषण करतो व सर्व प्राण्यांवर दया करतो, त्यालाच ब्राह्मण ह्मणावें. ब्राह्मणजातिविशिष्ट शरीराला ब्राह्मण ह्मणणें हें अगदीं खोटें आहे. आणखीं असें पहा कीं, हा आमचा जैनधर्म[1] मोठा लोकोपकारक आहे. याधर्मांत कोणत्याही प्राण्याची हिंसा करायची नसून सर्वांला अभय देणें हें मुख्य आहे. तूं जो या धर्मावर दोष देतोस तो केवळ कांहीं व्यक्तींच्या आचरणावरून देत आहेस, असें वाटतें. व्यक्तिविशेषानें—अर्थात् एखाद्या पुरुषानें वाईट रितीचें वर्तन केलें, ह्मणून त्यामुळें त्याचा धर्म दूषित होत नाहीं. दुसऱ्यावर उपकार करणें हा मुख्य धर्म आहे असें को-

---

१ जैनधर्मांत जातिभेद मुळींच नाहीं. सांप्रत गुजराथेंत वगैरे जे जैनलोक आहेत त्यांत कांहीं भेद असल्याचें दिसून येतें. ओसवाल, दसावाल वगैरे त्यांच्या पोटभेदांचीं निरनिराळीं नांवें आहेत. तरी पूर्वकाळीं त्यांच्यांत अशाप्रकारचे भेद मुळींच नव्हते. गृहस्थ आणि विरक्त अथवा जति हे कायते दोनच भेद; पण याही भेदांला जातीचा कांहीं संपर्क नाहीं. गृहस्थ असतील ते घरदार संसार करून गृहांत व जति संसारत्याग करून विहारांत राहून ईश्वरसेवेंत तत्पर असत. खाण्यापिण्याच्या वगैरे संबंधानें परस्परांत कांहींच भेद नाहीं. जैनधर्मी असला ह्मणजे झालें. मग तो कोणत्याही जातीचा असला; तरी त्याला अधिक किंवा उणें मानण्यांत येत नव्हतें!

**वितस्तादत्त** ह्मणाला, "पुत्रा; मला तरी काय ठाऊक? आपला राजा मोठा कडक आहे. तरी तुझ्या हातून कांहीं अपराध झाला असेल ह्मणूनच त्याणें तसा हुकूम केला. तो निरपराध्याला कधींही शिक्षा करणार नाहीं. तुझ्या हातून कोणता अपराध झाला असेल त्याचा तूंच विचार कर ह्मणजे झालें." बापाचें हें भाषण ऐकून **रत्नदत्त** मोठ्या गोंधळांत पडला. कांहीं अपराध झाला असल्याचें त्याच्या लक्षांत येईना. व दोन महिन्यांनीं आपल्यावर मृत्यु येणार ही गोष्ट त्याच्या डोळ्यांपुढें दिसूं लागली. त्याला रात्रीं झोंप नाहीं, दिवसां चैन नाहीं; खाण्यावर इच्छा नाहीं, अशी त्याची स्थिती झाली. व मरणाच्या भयानें तो अगदीं झुरणीस लागला.

'दोन महिने पुरे होतांच, **रत्नदत्ता**ला आपल्यापुढें उभा करावा' असा राजानें हुकूम केला होता त्याप्रमाणें, अत्यंत कृश झाला असून ज्याचें अंग अगदीं पांढरें फाटिक झालें आहे; अशा आपल्या पुत्राला **वितस्तादत्तानें** मुदत भरतांच राजापुढें हाजर केला. त्याला पाहून राजा ह्मणाला, "अरे, तूं इतका कृश कां झालास? मी तुला खाऊं पिऊं नको असें सांगितलें होतें काय? तुला सर्व गोष्टींची मुभा असतां तुझी अशी अवस्था कां झाली तीं सांग?"

राजाचा हा प्रश्न ऐकून **रत्नदत्त** ह्मणाला, "महाराज, मरणाच्या भयानें मला आपल्या आत्म्याचीदेखील आठवण नाहींशी झाली; मग खाण्यापिण्याची वार्ता कशाला पाहिजे? ज्यादिवशीं आपण मला मरणाची शिक्षा दिल्याचा हुकूम ऐकविला, त्या दिवसाला आज दोन महिने झाले; घडोघडीं मृत्यु आला, मृत्यु आला, असें मला वाटत आहे! अशा स्थितींत मी हावेळपर्यंत जीवंत राहिलों हेंच आश्चर्य! कृश झालों यांत कांहीं नवल नाहीं."

हें ऐकून राजा हंसत हंसत त्याला ह्मणाला, "बाबा, भिऊं नकोस. मी तुला मारणार नाहीं. प्राण जाण्याचें भय किती आहे हें तुला

युक्तीनें समजवावें, ह्मणून मीं तसा हुकूम दिला होता. आतां मृत्यूचें भय किती आहे हें तुला स्वतः समजलें ना? तर यावरून असें समज कीं; प्रत्येक प्राणिमात्राला असेंच मृत्यूचें भय वाटल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां अशा प्राण्यांचें रक्षण करणें हा त्यांच्यावर मोठा उपकार आहे कीं नाहीं? व त्यापरता दुसरा कोणता धर्म अधिक आहे तें सांग? मीं युक्तीनें तुला जी ही गोष्ट कळविली ती तुला धर्माचें ज्ञान व्हावें, व मोक्षाविषयीं इच्छा उत्पन्न व्हावी, ह्मणूनच कळविली आहे. जो मनुष्य मरणाचें भय धारण करतो तोच—जर बुद्धिमान् असेल तर—मोक्षाविषयीं यत्न करतो. असो. यावरून प्राण्यांचें रक्षण करणें हा मुख्य धर्म आहे किंवा नाहीं तें सांग ह्मणजे झालें."

**रत्नदत्ता**ला अनुभवावरून ती गोष्ट उत्तमप्रकारें समजून आली होती. ह्मणून तो ह्मणाला, "महाराज, आपलें सांगणें खरें आहे. प्राण्यांचें रक्षण करणें हा मुख्य धर्म आहे हें मी कबूल करतों."

हें ऐकून राजा **रत्नदत्ता**ला ह्मणाला, "जर तूं असें कबूल करतोस तर अहिंसा ज्या धर्मांत प्रधान आहे अशा धर्माप्रमाणें वागणाऱ्या तुझ्या बापाची तूं निंदा करावीस हें योग्य आहे काय? तो उत्तम धर्माचें आचरण करीत आहे असें नाहींका तुला वाटत?"

राजाचें हें भाषण ऐकून **रत्नदत्ता**नें तें शिरसामान्य केलें. व आजपासून आपण बापाची निंदा करणार नाहीं; असें सांगून तो पुन्हां राजाला ह्मणाला, "महाराज, आपण जो हा मला धर्मोपदेश केला, तेणेंकरून माझा भ्रम दूर झाला. मी आतां धर्माचें आचरण करीन. धर्माचें ज्ञान झाल्यामुळें मला मोक्षाची इच्छा उत्पन्न झाली आहे; तर कृपा करून आपण मोक्षमार्गाचाही उपदेश कराल तर माझा उद्धार होईल."

याप्रमाणें **रत्नदत्ता**ची विनंती ऐकून राजानें त्याला मोक्षमार्गाचा उपदेश करण्याचें कबूल केलें. व 'आतां तूं आपल्या घरीं जा आणि मीं सांगितलेल्या गोष्टीचा नीट विचार कर. लौकरच मी तुला बोलावून

मोक्षाचा उपदेश करीन,' असें सांगून त्याला निरोप दिला. **रत्नदत्त** राजाच्या सभेंत आला होता त्यावेळीं 'घटका दोन घटकांनीं आपण मरणार' असें समजून त्याची विलक्षण अवस्था झाली होती; पण परत जातेवेळीं तो मोठ्या आनंदानें बापासहवर्तमान आपल्या घरीं गेला. व त्यावेळेपासून त्याणें जैनांच्या धर्माची निंदा तर केली नाहींच; पण उलट श्रद्धापूर्वक त्याचें आचरण करूं लागला. तात्पर्य **रत्नदत्ताचें** लक्ष्य सारावेळ धर्माकडे लागलें.

याप्रमाणें थोडे दिवस गेल्यावर राजानें एकेदिवशीं अकस्मात् त्याला बोलावूं पाठविलें. त्यादिवशीं शहरांत कसलासा मोठा उत्सव होता यामुळें जिकडेतिकडे लोक नाचरंग, तमाशे वगैरे गोष्टींत निमग्न झाले होते. **रत्नदत्तही** त्यांतच गुंग होता; पण राजाचा हुकूम येतांच तो तत्काल त्याच्यापुढें हाजर झाला. तेव्हां राजानें कांठापर्यंत तेलानें भरलेलें एक उथळ भांडें त्याच्या हातांत दिलें. आणि त्याला ह्मणाला, "बाबा **रत्नदत्ता**, हें पात्र हातांत घेऊन तूं हें सगळें शहर फिरून ये. यांतल्या तेलाचा एक बिंदुदेखील खालीं पडूं देऊं नको. हे नागव्या तरवारी हातांत घेतलेले शिपाई तुझ्याबरोबर येतील. जर या भांड्यांतल्या तेलाचा एक तरी थेंब खालीं पडला; तर हे शिपाई तत्काल तुला ठार केल्यावांचून राहणार नाहींत!" असें सांगून त्याच्याबरोबर जाणाऱ्या शिपायांला ह्मणाला, "अरे, तुह्मी नीट समजलां ना? तुह्मी या **रत्नदत्ता**च्या अगदीं बरोबर चाला. याच्या हातांतल्या भांड्यांतून तेलाचा थेंब पडला कीं; लगेंच याचें तेथल्या तेथें डोचकें उडवा!" अशी आज्ञा राजानें **रत्नदत्ताला** शहरांत फिरायला पाठविलें.

क्रुमाप्रमाणें **रत्नदत्ताला** पुढें करून ते **शस्त्र**धारी पुरुष त्याच्या पाठीन जाऊं लागले. बिचाऱ्या त्या **रत्नदत्ता**वर हा मोठा आकांत ळला. तेलाचा एक बिंदु खालीं पडेल तर आपलीं शंभर वर्षें ार, असें समजून त्या भांड्याकडे सर्व लक्ष्य लावून **रत्नदत्त** हळू-

हळू नगरांतून चालला होता. पुष्कळ वेळानें मोठ्या संकटानें शहरभर फिरून **रत्नदत्त** पुन्हां राजाजवळ प्राप्त झाला. त्याच्या हातांतल्या भांड्यांतून तेलाचा एक थेंबदेखील खालीं पडला नाहीं, असें पाहून राजा त्याला ह्मणाला, "बाबा, सर्व शहर फिरून आलास? बरें झालें. बरें पण आज फिरतेवेळीं शहरांत काय काय चमत्कार पाहिलेस ते सांग पाहूं? चमत्कारिक असें कांहीं तुझ्या पाहण्यांत किंवा ऐकण्यांत आलें काय?"

हा राजाचा प्रश्न ऐकून हात जोडून **रदत्तत्न** ह्मणाला, "महाराज, माझें सारें लक्ष्य या तेलाच्या भांड्याकडे लागलें होतें. यांतून एक थेंबदेखील पडूं द्यायचा नाहीं, याविषयीं माझा सगळा यत्न चालला होता. यामुळें शहरांत मीं कांहीं पाहिलें नाहीं, व ऐकलेंही नाहीं! तेलाचा थेंब खालीं पडतांच पाठीमागून चालणाऱ्या पुरुषांची तरवार माझ्या मानेवर पडणार, या भयानें मीं दुसऱ्या कोणत्याच गोष्टीकडे लक्ष्य दिलें नाहीं."

हें ऐकून राजा ह्मणाला, "यावेळीं तेल हा एकच तुझ्या **दृष्टीला** विषय झाला होता व तुझें सर्व लक्ष्य तिकडे लागलें होतें. यामुळें तूं शहरभर फिरलास तरी तुला कांहीं एक दृष्टीं पडलें नाहीं, व ऐकूंही आलें नाहीं. यावरून कोणत्याही एका वस्तूकडे लक्ष्य लागलें असतां; इंद्रियांचे व्यापार कांहींच होत नाहींत. सर्व इंद्रियें तिकडेच लागतात, ही गोष्ट तुझ्या ध्यानांत आली ना?"

**रत्नदत्त** ह्मणाला, "होय, आपण सांगितलें तें खरें आहे. जिकडे-जिकडे चित्त आसक्त होईल तिकडेच सर्व इंद्रियें लागतात. त्यांचे व्यापार बंद होतात हें खरें आहे."

राजा ह्मणाला, "हें जर खरें आहे, तर जसें तूं ह्या तेलाच्या भांड्यावर चित्त एकाग्र केलेंस; तसेंच परमेश्वराकडे चित्त एकाग्र चित्त एकाग्र झालें ह्मणजे इंद्रियांचे बाह्य व्यापार होतनासे

मुख्य तत्त्वावर **दृष्टी** लागेल. आणि तत्त्वाचें दर्शन झालें ह्मणजे मग पुन्हां कर्मजालानें मनुष्य बद्ध होत नाहीं. मोक्ष ज्याला ह्मणतात तो हाच. हा मोक्षाचा उपदेश मीं तुला संक्षेपानें केला आहे. यावरून तूं विशेष विचार कर."

याप्रमाणें राजानें सांगितलें तें ऐकून मोक्षाचा मार्ग समजून घेऊन **रत्नदत्त** राजाला नमस्कार करून कृतार्थ होत्साता मोठ्या आनंदानें आपल्या बापाच्या घरीं जाता झाला. असो. यारितीनें राजा **कलिंगदत्त** आपल्या प्रजेला धर्माचा आणि मोक्षाचा उपदेश करून तिचें उत्तमप्रकारें रक्षण करीत होता.

राजा **कलिंगदत्ता**ची, त्याच्या कुलशीलादिकाला शोभेल अशी, **तारादत्ता** नांवाची पट्टराणी होती. जसा उत्तम कवी, रीतियुक्त चांगल्या वृत्ताची जींत योजना केली आहे, व नानाप्रकारच्या दृष्टांतांनीं सरस झाली आहे, अशा आपल्या उत्तम कवितेनें शोभतो; तसा तो राजा **तारादत्ते**च्या योगानें विशेष शोभत होता. स्पष्ट दिसणाऱ्या गुणांनीं स्तुत्य झालेली, व प्रकाशरूप गुणानें श्लाघ्य अशा चंद्रिकेप्रमाणें शोभत असून; जशी ती चंद्रिका **चंद्रा**हून निराळी असत नाहीं, तद्वत् **तारादत्ता** आपल्या पतीहून शरीरानें मात्र निराळी होती; पण अंतःकरणानें अगदीं अभिन्न होती. याप्रकारच्या अत्यंत सुरूप व गुणसंपन्न अशा राणीसहवर्तमान सुखाचा उपभोग घेत असलेल्या राजा **कलिंगदत्ता**चे, स्वर्गांत **इंद्राणी**सह **इंद्रा**चे जसे आनंदांत दिवस जातात तसे, दिवस जात होते. कोणत्याही प्रकारें त्या दंपत्याला दुःखाची

:ती.

---

आणि 'वृत्त' या दोन शब्दांत श्लेष आहे. तारादत्तेकडे चांगली रीत व वृत्त ह्मणजे सुवर्त्तन असा अर्थ घ्यावा. र्भी इत्यादि ज्या कवितेच्या रीति वर्णन केल्या आ-
: व वृत्तशब्दानें छंदाचें ग्रहण करावें.

अशा संधीस स्वर्गलोकांत कांहींनिमित्तानें इंद्राच्या येथें एक मोठा उत्सव चालू झाला. त्या उत्सवांत स्वर्गांत राहणाऱ्या सर्व अप्सरा नृत्य करण्याकरतां आल्या होत्या. त्यांत **सुरभिदत्ता** नांवाची एक मुख्य अप्सरा मात्र आली नव्हती. इंद्रानें अनुक्रमानें प्रत्येक अप्सरेचें नृत्य व गायन वगैरे चालविलें होतें. तेथें बाकीच्या सर्व अप्सरा दिसत असून एकटी **सुरभिदत्ता** मात्र कोठें दिसत नाहीं. याचें कारण काय? याविषयीं त्यानें विशेष चौकशी केली. त्यानें आपल्या अंतर्ज्ञानानें, कोणा एका विद्याधरासहवर्तमान **नंदन**वनांत ती यथेच्छ क्रीडा करण्यांत निमग्न झाली आहे, असें पाहिलें. तेव्हां त्याच्या मनांत अतिशय क्रोध उत्पन्न झाला. तो आपल्या ठिकाणींच ह्मणाला, अरे! हे दोघेही मदांध कामवश होऊन, केवढा मोठा दुराचार करीत आहेत पहा! या विद्याधराची गोष्ट घटकाभर असो; पण ही सटवी (अप्सरा) आमची सेवक असून आज आमच्यायेथें ऐवढा मोठा समारंभ चालला असतां त्याची कांहींच पर्वा न बाळगतां जणूं काय आपण अगदीं स्वतंत्र आहें, असें समजून खुशाल त्या विद्याधराशीं क्रीडा करीत बसली आहे! त्यांतूनही या उभयतांची क्रीडा चालली आहे कोठें? तर आमच्या बागेंत! जेथें माझ्यावांचून इतर देव सहसा जाण्यास शंका पावतात; तेथें ही बटकीची अप्सरा खुशाल चैन उडवते आहे! खरोखर या विद्याधरानें आह्मा देवांच्या बागेंत असें कृत्य करणें हा याचा मोठाच अपराध आहे; पण विचार केला तर या गरिबाचा तरी यांत कसला दोष? त्या टवळीनें आपल्या रूपानें वश करून त्या बिचाऱ्याला आकर्षण करून
उरस्थल भरगच्च आहे व लावण्यरूप उद
तिच्या दृष्टिपातरूपी लाटांनीं ओढून नेलेल
सांवरून घेऊं शकेल! अशा मोहक स्त्रियं
झालेल्या मोठमोठ्यांची फजिती उडाली

देव जो **शंकर** दृढ ब्रह्मचारी असून तोदेखील **तिलोत्तमेला** पाहून क्षुब्ध झाला नाहीं काय ? कारण **ब्रह्मदेवानें** सर्व उत्तमोत्तम वस्तूंतील तिळा तिळा येवढा अंश घेऊन तिला निर्माण केली होती; अर्थात् सर्व जगांत उत्तम अशा तिला पाहिल्यावर तशी अवस्था झाली, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तसेंच **विश्वामित्र** ह्मटला ह्मणजे मोठा कृतांतकाळ; पण **मेनकेचा** मुखचंद्र पाहतांच त्याच्या मनाला पाझर सुटला. व हजारों वर्षे कष्ट करून संपादन केलेल्या तपाचा नाश करून स्वारी तिच्या नादीं लागली ! तसाच एवढा मोठा राजा **ययाति**; पण **शर्मिष्ठेच्या** रूपाला भुलून त्याणें तिचा स्वीकार केला. व त्या निमित्तानें त्याला ह्मातारपणाचा अनुभव करावा लागला ! यावरून तो तरुण विद्याधर अ-

---

१ ही कथा इतर अनेक पुराणांत वर्णन केली आहे; पण महाभारताच्या आदिपर्वांत विस्तारपूर्वक सांगितली आहे. ती वाचकांच्या समजुतीकरितां थोडक्यांत येथें देतों.—

कौरव व यादव या दोन मोठ्या वंशांचा मूळ पुरुष राजा ययाति हा प्रतिष्ठान अथवा प्रयाग याठिकाणीं राज्य करीत होता. तो एकेसमयीं मृगया करीत फिरत असतां अकस्मात् दैत्यांचे गुरू शुक्राचार्य याची प्रियकन्या देवयानी विहिरींत पडलेली त्याच्या दृष्टीस पडली. राजानें तिला आपला शेला विहीरींत सोडून त्याणें तिला वर काढली. व तेथेंच तिणें प्राणरक्षण करणाऱ्या त्या राजाला आपला पति करून घेण्याचा निश्चय ठरविला.

दैत्यांचा राजा वृषपर्वा याच्या घरीं शुक्राचार्य रहात होता. वृषपर्व्याची शर्मिष्ठा नांवाची कन्या . देवयानीचें आणि तिचें भांडण झाल्यामुळें तिणें तिला विहिरींत ढकलून दिलें होतें राजानें देवयानीला वर काढल्यावर ती आपल्या बापाकडे गेली व झालेली सर्व हकीकत तिणें त्याला कळविली. तेव्हां शुक्राचार्य रागानें दैत्यांला सोडून जाऊं लागला. त्याच्यावांचून आपला निभाव लागणार नाहीं; असें समजून वृषपर्व्यानें पुष्कळ प्रार्थना केली. तेव्हां 'देवयानीला राजीखुशी करशील तर आपण राहूं' असें त्याणें सांगितले. वृषपर्व्याला तें अवश्य कर्त्तव्य होतें. त्याणें देवयानीला तुझें कोणतें प्रिय करावें ह्मणून विचारलें तेव्हां 'तुझी मुलगी शर्मिष्ठा हिणें माझा बाप मला ज्या पुरुषाशीं लग्न करून देईल त्याच्या येथें, हजार दासींसहवर्त्तमान माझी बटीक होऊन राहावें' असें तिणें सांगितलें.

शुक्राचार्याला राहवून घेण्याची फारच जरूर होती. आपल्या बापावर हें एक सं-

पराधी आहे असें ह्मणतां येत नाहीं. त्या अप्सरेचें सौंदर्यच तसें विलक्षण आहे कीं; त्याच्या योगानें त्रैलोक्याचादेखील क्षोभ होईल ! तिच्या रूपानें हरल्यामुळें त्या विद्याधराच्या हातून हा अपराध झाला तेव्हां मुख्यत्वें ती चांडाळीण अप्सराच दोषी आहे. ही देवांची स्त्री असून देवांपेक्षां हीन अशा विद्याधराशीं रममाण झाली, आणि हिनेंच त्या अजाणत्या विद्याधराला या नंदनवनांत मुद्दाम आणलें, याकरतां या दुष्टेलाच शिक्षा केली पाहिजे.

असा विचार करून त्या तरुण विद्याधराला शिक्षा न करतां; इंद्रानें त्या सुरभिदत्ता नामक अप्सरेलाच शाप दिला. तो असा कीं; "हे चांडाळणी, हे अपराधिनी, तूं मनुष्य लोकांत जा. अयोनिसंभव

---

कट आलें आहे, असें जाणून त्या सुशील कन्येनें (शर्मिष्ठेनें) देवयानीची बटीक होण्याचें कबूल केलें. व शुक्राचार्यांने ययातिराजाशीं तिचा विवाह करून दिला, तेव्हां शर्मिष्ठा हजार दासींसहवर्तमान देवयानीचा दासीपणा स्वीकारून तिच्याबरोबर राजाच्या येथें गेली. वरात निघतेवेळीं शुक्राचार्यांनें 'देवयानी व शर्मिष्ठा या दोघींलाही अगदीं बरोबरीनें वागवीत जा; पण शर्मिष्ठेला कधीं आपल्या पलंगावर मात्र घे नकोस,' अशी सक्त आज्ञा केली होती. राजा ययातीनें त्यावेळीं तें कबूल केलें; पण घरीं आल्यावर कांहींदिवसांनीं शर्मिष्ठा त्याच्या गळीं पडली. तेव्हां त्याच्यानें तिचा त्याग करवला नाहीं. राजापासून देवयानीला दोन मुलगे झाले. व शर्मिष्ठेला तीन झाले. त्या दोघी निरनिराळ्या महालांत राहत असल्यामुळें बरेच दिवस ही गोष्ट उघडकीस आली नाहीं; पण पुढें सहज राजाचें कपट देवयानीच्या पाहण्यांत आलें. व ती तत्क रागानें आपल्या बापाकडे फिर्यादीस गेली. राजानें आपला अपराध कबूल [illegible] शुक्राचार्यांनें त्याला 'तुला म्हातारपण प्राप्त होईल!' असा शाप दिला. नंतर पुष्कळ प्रार्थना केल्यावरून 'तुझ्या पांच मुलांतून ज्याला तूं ही जरा देशील त्याच्या अंगी जाईल,' असा उःशाप मिळाला. राजाने घरीं येऊन अनुक्रमानें चौघांपुत्रांला विचारलें; पण त्यांणीं तें म्हातारपण घेण्याचें नाकबुल केलें. शेवटीं शर्मिष्ठेचा धाकटा पुत्र [illegible] याणें तिचा स्वीकार केला. तेव्हां राजानें त्याचें तारुण्य घेऊन पुष्कळ वर्षें विषयोपभोग घेऊन; शेवटीं सर्व राज्याचा अधिकार पूरूला देऊन तपोवनाचा आश्रय केला. याप्रमाणें आगजाळ्या देवयानीनें शर्मिष्ठेचा पाडाव करण्याकरतां अनेक प्रयत्न केले; पण दैवानें शेवटीं तिच्याच पुत्राला सार्वभौम पदवी दिली !

अशी एक मुलगी तुला प्राप्त होईल. तेथें कांहीं दिव्य **कृत्य** करून कालांतरानें तूं पुन्हां या दिव्यलोकांत येशील."

याप्रमाणें स्वर्गलोकांत त्या अप्सरेला शाप झाला; त्याच संधीस **तक्षशिला** नगरींत राजा **कलिंगदत्ता**ची राणी **तारादत्ता** ही ऋतुस्नात झाली होती. **इंद्राच्या** शापानें मृत्युलोकीं जन्म घेण्याकरतां तयार झालेली; **सुरभिदत्ता** नामक अप्सरा **तारादत्ते**च्या उदरांत जन्म घेण्याकरतां तेथें प्राप्त झाली. त्या दिव्य अप्सरेनें **तारादत्ते**च्या उदरांत प्रवेश केल्यामुळें ती फारच सुंदर व तेजस्वी दिसूं लागली. त्या अप्सरेनें **तारादत्ते**ला प्रत्यक्ष दर्शन दिलें नाहीं; तरी ती रात्रीं निजली असतां स्वप्नांत—आकाशांतून एक मोठी ज्वाला खालीं पडली, व ती आपल्या पोटांत शिरली, असें **तारादत्ते**ला दिसलें. याप्रमाणें रात्रीं स्वप्नांत जें तिणें पाहिलें तें प्रातःकालीं विस्मयपूर्वक आपला पति राजा **कलिंगदत्त** याला निवेदन केलें.

राणीला त्या स्वप्नानें स्वरूप व फळ काय आहे तें बरोबर समजलें नव्हतें; पण राजाला त्याचें तत्त्व काय तें समजलें. तो संतुष्ट होऊन राणीला ह्मणाला, "प्रिये, दिव्यलोकांत राहणारे पुण्यवान् प्राणी शापाच्यावगैरे निमित्तानें केव्हांकेव्हां मनुष्ययोनींत जन्म घेत असतात. तेव्हां तूं जें स्वप्न सांगितलेंस त्यावरून कोणीतरी दिव्य प्राणी तुझ्या गर्भांत प्रविष्ट झाला आहे असें वाटतें. चांगल्या व वाईट अनेकप्रकारच्या कर्मांनीं बद्ध झालेले जीव आपापल्या कर्मानुसार शुभ अथवा अशुभ फळांचा उपभोग करण्याकरितां या त्रैलोक्यांत सर्वत्र संचार करीत असतात. तेव्हां तशाच प्रकारचा कोणी पुण्यवान् प्राणी तुझ्या गर्भांत प्रविष्ट झाला असेल तर कोणास ठाऊक!"

याप्रमाणें राजा **कलिंगदत्तानें** सांगितलें; तें ऐकून राणी ह्मणाली, "आर्यपुत्र, आपण ह्मटलें तेंच खरें असावें. कोणी तरी पुण्यवान् शापादिकांच्या निमित्तानें माझ्या उदरीं आला असेल, यांत कांहीं

संशय नाहीं. प्रत्येक प्राण्याला चांगले अथवा वाईट जेजे भोग भोगावे लागतात, तेते त्यात्याप्रकारच्या त्याच्या कर्मानेंच त्याला प्राप्त होत असतात. मला एका विद्वान् ब्राह्मणानें यासंबंधानें एक कथा सांगितली होती, ती मी आपल्याला सांगतें. कोसलदेशाचा धर्मदत्तनामक पूर्वी एक मोठा राजा होता. त्याची नागश्री नांवाची महापतिव्रता राणी होती. तिच्या पातिव्रत्याची चहूंकडे किती ख्याती होती, तिचें वर्णन करणें कठीण आहे. ह्या पृथ्वीवर साध्वी स्त्रियांची धूर जिनें धारण केली आहे; ह्मणून जिला अरुंधती असें लोक ह्मणतात, अशी जी वसिष्ठाची पत्नी अरुंधती तिच्या एकटीवरच हा येवढा मोठा पातिव्रत्याचा भार ओढण्याचें काम पडलें आहे; तेव्हां तिला साह्य करावें ह्मणूनच कीं काय, तिच्या बरोबरीनें धूर ओढणारी ही नागश्री भूतलावर उत्पन्न झाली, असें लोक समजत असत. त्या अनुरूप स्त्रीपुरुषाचें जोडपें धर्माला आणि न्यायाला अनुसरून गृहस्थाश्रमसुखाचा अनुभव करीत असतां; मी त्या नागश्रीच्या उदरीं जन्मास आलें. मला त्या जन्माची पूर्वी आठवण नव्हती; पण ज्या तपोनिधीनें मला ही कथा सांगितली त्याणेंच त्याची आठवण दिल्यावरून तेव्हांपासून मी आपल्या पूर्वजन्मींच्या सर्व गोष्टी प्रत्यक्ष पहात आहें! असो.

मी अगदीं लहानच होतें. आईबापांची मी एकटीच लाडकी असल्यामुळें तीं उभयतां मजवर अतिशय प्रेम करीत होतीं. माझी आई नागश्री माझ्या बाललीला पाहून स्वर्गसुखापेक्षांही विशेष आनंद मानीत होती. एकेदिवशीं—ती मला आपल्या मांडीवर घेऊन बसली आहे, माझा पिता धर्मदत्तही जवळ बसला आहे, माझ्या गोजिरवाण्या तोंडाकडे पहात व वरचेवर मुके घेत आणि माझ्या बाललीलेचें वर्णन करीत तीं उभयतां करमणूक करीत आहेत, इतक्यांत अकस्मात् माझ्या आईला आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें! तेव्हां तिच्या मनाची स्थिती कांहीं चमत्कारिक झाली.

**नागश्री** शून्यहृदय झाल्यासारखी होऊन, आपल्या पतीला ह्मणाली, 'आर्यपुत्र, यावेळीं कांहीं विलक्षण चमत्कार झाला आहे. कांहीं कारण नसतां मला आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें आहे. आणि त्यापासून एक विलक्षण अडचण उत्पन्न झाली आहे. ती अशी कीं मी जर माझ्या पूर्वजन्मांतलें वृत्त आपल्याला न सांगेन तर आपली मजवर अप्रीति होईल व जर सांगेन तर मला त्यापासून खरोखर मरण येईल! असा माझा घोंटाळा झाला आहे. जाणतीं माणसें असें सांगतात कीं एकाएकीं पूर्वजन्माचें स्मरण झालें असून जर तें वर्त्तमान दुसऱ्याला सांगितलें तर निःसंशय मृत्यु आल्यावांचून राहणार नाहीं. यामुळें मला मोठा विषाद वाटतो. आपल्याजवळ त्या जन्माचें सविस्तर वर्णन करावें याची तर मला मोठी उमेद आहे; पण मरणाचें भय डोळ्यांपुढें उभें राहिलें आहे. तेव्हां काय करावें तें सुचत नाहीं!'

याप्रमाणें राणी **नागश्री** हिणें सांगितलें तें ऐकून राजा तिला ह्मणाला, 'प्रिये, जसें तुला यावेळीं पूर्वजन्माचें स्मरण झालें तसेंच मलाही आपल्या पूर्वजन्माचें स्मरण झालें आहे. याकरतां आह्मी असें करूया कीं, तूं आपल्या पूर्वजन्माचें वृत्त मला सांग व मीही तुला आपल्या पूर्वजन्माचें वृत्त सांगतों. यापासून पुढें काय होणार असेल तें खुशाल होवो. भवितव्यता कोणाच्यानेंही खोटी करवणार नाहीं. तूं ह्मणतेस त्याप्रमाणें मृत्यु आला; तर दोघांलाही येईल. नाहींपेक्षां उभयतांही जीवंत राहूं.'

याप्रमाणें राजानें पूर्वजन्माचें वृत्त सांगण्याविषयीं प्रेरणा केलेली राणी **नागश्री** राजाला ह्मणाली, 'आर्यपुत्र' सांगण्याविषयीं जर आपला आग्रहच असेल; तर मी कांहीं नाहीं ह्मणत नाहीं. पुढें काय होणार असेल तें होईल. त्याविषयीं आपण काय करणार! आतां मी आपली हकीकत सांगतें ती श्रवण करावी. याच देशांत पूर्वी **माधव**नांवाचा एक श्रीमान् ब्राह्मण रहात होता. त्याची मी पूर्वजन्मीं **सुव्रता**

अर्थात् चांगल्या वर्तनाची अशी एक दासी होतें. याचठिकाणीं **देवदास** नांवाचा माझा पति होता. तो एका सावकाराच्या घरीं कामधंदा करून आपलें पोट भरीत असे. आह्मी उभयतांनीं आपल्या गरिबीला साजेल असें एक लहानसें घर केलें होतें. दोघांचीही निरनिराळ्या दोघां धन्यांजवळ चाकरी होती ; तरी आह्मी जेवणखाण आपापल्या यजमानाच्या घरीं करीत नव्हतों. तेथें आह्माला जे ठाय वाढून देत असत; ते आपल्या घरीं आणून त्यांवर उभयतांही निर्वाह करीत होतों. त्या आमच्या घरांत ऐश्वर्य ह्मणाल तर किती होतें त्याचें वर्णन करावयासच नको. पाणी सांठवून ठेवण्याचा एक डेरा, एक घागर, झाडलोट करावयाची झाडणी, एक खाटलें, एक लहानसा तांब्या व मी आणि माझा पति; इतक्याच काय त्या जिनसा त्या घरांत होत्या. तरी तसें तें भिकार झोपडें आह्मा उभयतांना स्वर्गापेक्षांही अतिशय आनंदकारक वाटत होतें ! उघडच आहे, ज्या घरांत भांडणकज्जा नाहीं ; व जेथें घरांत असलेलीं मनुष्यें एक विचारानें व मिळेल त्यावर शांतवृत्तीनें निर्वाह करून राहणारीं असतात; त्याला स्वर्गाहून कमी कसें मानतां येईल ? मूर्तिमान् आनंद तशाप्रकारच्या घरांत नांदत असल्यावांचून राहणार नाहीं.

याप्रमाणें तशा गरिबींतदेखील देव, पितर, अतिथि यांची सेवा करून व मिळालेल्या अन्नांतून त्यांला भाग देऊन, राहील त्याच्यावर आह्मी निर्वाह करीत होतों. आमच्या घरांत कोणताही पदार्थ अधिक ह्मणून ठेवण्यांत मुळींच आला नव्हता. एका जातीच्या दोन वस्तू असल्या कीं आह्मी त्यांतली एक ठेवून दुसरी कोणातरी दरिद्र्याला— ज्याला तिची विशेष गरज असेल त्याला—देऊन टाकीत होतों ! तात्पर्य आपल्या निर्वाहापुरत्या वस्तूंवांचून आह्मी दुसरें कांहींच संग्रह करून ठेवीत नव्हतों. याप्रमाणें शांतवृत्तीनें आह्मी संसार करीत असतां कांहीं दिवसांनीं त्या देशांत मोठा दुष्काळ पडला. तो इतका

भयंकर झाला कीं, मोठमोठे श्रीमान् लोक देखील अतिशय घाबरले. ज्याला त्याला आतां पुढें आपला निर्वाह कसा होईल? याची विलक्षण काळजी लागली. आह्मा उभयतांचेही यजमान मोठे संपन्न होते; पण दुष्काळाचें स्वरूप फार भयंकर दिसूं लागल्यावरून; त्यांनींही आपापला खर्च हळूहळू कमी करण्याची सुरुवात केली. आमच्या निर्वाहाकरतां प्रतिदिवशीं त्यांच्याकडून आह्मांस जे ठाय मिळत असत ते आमचें पोट भरून आणखी त्यांतलें बरेंच अन्न शिल्लक रहात असे; पण आतां दुष्काळ पडल्यामुळें तो ठाय दिवसेंदिवस कमी कमी होऊं लागला. कांहींदिवसांनीं त्यापासून आमचें देखील पोट भरेनासें झालें! अर्ध्यापोटीं रहावें लागल्यामुळें; सारादिवस खाईन खाईन असें वाटूं लागलें. व क्षुधेनें शरीरांतलें रक्त शोषण केल्यामुळें आह्मी उभयतांहीं कृश झालों. तथापि आमच्या संतोषांत मात्र कांहीं कमी पडलें नाहीं.

दैवानें प्राप्त झालेला प्रसंग मोठ्या शांतपणानें सहन केला पाहिजे, असा विचार करून आह्मी जें कांहीं थोडें अन्न मिळत होतें, त्यावरच निर्वाह चालविला होता. एकेदिवशीं आह्मी जेवायला बसण्याच्या तयारींत आहों; इतक्यांत क्षुधार्त झालेला एक ब्राह्मण अतिथि आला. यद्यपि त्यावेळीं आमच्याजवळ फारच थोडें अन्न होतें, व त्यावर आमचीच क्षुधा शांत होण्यासारखी नव्हती; तथापि आह्मी मोठ्या संतोषानें त्या अतिथीला सत्कारपूर्वक जेवायला बसविलें. तो फारच क्षुधार्त झाला होता. आमच्याजवळ जेवढें अन्न होतें; तेवढें सगळें त्याला वाढलें तरी त्याची विशेष तृप्ति झाली असें दिसलें नाहीं. आणखी थोडेंसें मिळतें तरी तो तें खाता. पण आमच्याजवळ आतां अन्न मुळींच शिल्लक नाहीं; असें पाहून त्याणें तेवढ्यावरच तृप्ति करून घेतली. व त्याच्या पोटांतला जो भाग रिकामा राहिला होता; तो तांब्याभर पाणी पिऊन त्याणें भरून काढला. खरोखर यावेळीं आह्मा उभयतांचे प्राण, जावें कीं रहावें या संशयांत पडले होते. जें थोडेंसें अन्न आम-

त्याजवळ होतें, त्याच्यावर टकळा ठेवून प्राणांनीं अंमळ धीर धरला होता. पण तें अन्न अतिथीनें खाऊन टाकलें असें दृष्टीपडतांच प्राणांनीं दम सोडला. आमच्यापेक्षां अतिथीला हा फार अधिक मानतो ह्मणून रागावलेच कीं काय; असे माझ्या भर्त्याचे प्राण तत्काल त्याच्या शरीराला सोडून गेले! माझेदेखील प्राण त्यांच्या बरोबरच जाण्यास निघाले होते; पण पतीच्या शरीराचा संस्कार करून जाण्याचा माझा निश्चय झाला. मीं तत्काल त्या आपल्या घरांतील लांकडें काढून एकावर एक रचलीं आणि आपल्या भर्त्याचें कलेवर त्यावर ठेवून अग्नी लावला. व त्या धर्मशील भर्त्याच्या चरणांचें ध्यान करीत होत्साती मी त्या चितेवर आरूढ झालें! व त्याबरोबरच माझ्यावरच्या विपत्तींचा सर्व भारही उतरून गेला! याप्रमाणें सद्वर्तनानें मी आपल्या देहाचें सार्थक केल्यामुळें; या जन्मांत मी राजाच्या घरीं उत्पन्न झालें. व आपल्यासारख्या मोठ्या राजाची पट्टराणी झालें. पुण्यरूपी वृक्षाला कशीं उत्तम फळें येतील याचें कांहीं अनुमान करवत नाहीं.'

याप्रमाणें राणी **नागश्री** हिणें आपल्या पूर्वजन्माचा वृत्तांत सांगितला. तो ऐकून राजा **धर्मदत्त** तिला ह्मणाला, 'प्रिये, तूं सांगितलेंस तें खरें. जो त्याजन्मीं तुझापति होता तोच मी आहें. वाण्याच्या घरीं चाकरी करणारा **देवदास** तो मीच. मलाही आपल्या पूर्वजन्माचें स्मरण यावेळीं झालें आहे.'

हें ऐकून राणीनें त्याला अनेक खुणेच्या गोष्टी विचारल्या, त्या सर्व सांगितल्यावरून हा आपला पूर्वजन्मींचा पति आहे खरा, अशी तिची पूर्ण खात्री झाली. त्यानें पूर्वजन्मींचें वृत्त निवेदन केल्यावरून त्याला देहाचा त्याग अवश्य केलाच पाहिजे होता. त्याप्रमाणें मोठ्या आनंदानें राजा **धर्मदत्त** मर्त्य शरीराचा त्याग करून स्वर्गास निघून गेला. व त्याच्या पाठोपाठ—मुलीकडे किंचित् लक्ष लागल्यामुळें जिला विषाद वाटला आहे; अशी—**नागश्री**ही भर्त्याकडे गेली!'

अशी कथा सांगून तारादत्ता ह्मणाली, "याप्रमाणें ते माझें माता-पितर एकाएकीं परलोकास गेले. हें वर्तमान ऐकून माझ्या मावशीनें मला आपल्या घरीं नेलें. ती मला पोरकी मुलगी असें समजून प्रत्यक्ष आईबापांपेक्षांही अधिक जपत असे. यद्यपि आईच्या प्रेमाचा जिव्हाळा कांहीं निराळा आहे; तथापि 'माय मरो आणि मावशी उरो' असें जें ह्मणतात तें कांहीं खोटें नव्हे. माझ्या मावशीनें माझें कोणत्याही प्रकारें कमी पडूं दिलें नाहीं. मावशीच्या येथें मी बरीच प्रौढ झालें. अद्यापि माझ्या लग्नाची तयारी झाली नव्हती; पण त्यागोष्टी माझ्या मावशीच्या व तिच्या नवऱ्याच्या मनांत घोळूं लागल्या होत्या. अशा संधीस एकेदिवशीं अकस्मात् कोणी एक ऋषि आमच्या मावशीच्या येथें प्राप्त झाला. 'कांहीं दिवस आपल्याला येथें रहायचें आहे,' असें सांगून तो तेथें राहिला. तेव्हां त्याची सेवाचाकरी करण्याच्या कामावर मावशीनें माझी योजना केली होती. आई नाहीं, बाप नाहीं, बिचारी पोर अनाथ आहे; अद्याप तिचें पुष्कळ व्हायचें आहे. तेव्हां या सत्पुरुषाच्या कृपेनें कांहीं तरी हिचें कल्याण होईल असें समजून मावशीनें मुद्दाम माझी योजना केली होती. जशी पूर्वी कुंतीनें दुर्वासऋषीची आराधना केली होती; तशी मीं मोठ्या यत्नानें व शांतपणानें त्या ऋषीची मनापासून सेवा केली, व तिच्यायोगानें तोही प्रसन्न झाला. जातेवेळीं त्याणें 'तुला उत्तम पति प्राप्त होईल;' ह्मणून मला आशीर्वाद दिला व त्याच्या वचनाप्रमाणेंच मला आपण चांगले पति मिळालां. तेव्हां तात्पर्य इतकेंच कीं; धर्म आचरण केल्यानें याप्रमाणें कल्याण प्राप्त होतें. मला आपल्या आईबापांसहवर्तमान राज्याची प्राप्ति होऊन पूर्वजन्माचेंदेखील स्मरण राहिलें, हा सर्व धर्माचरणाचा प्रभाव!"

राणी तारादत्ता हिणें याप्रमाणें सांगितलेली कथा श्रवण करून धर्माविषयीं ज्याचा अद्वितीय आदर आहे, असा राजा कलिंगदत्त

तिला ह्मणाला, "प्रिये, तूं सांगितलेंस तें खरें आहे. उत्तमप्रकारें धर्म थोडासा आचरण केला; तरी त्यापासून मोठें फळ प्राप्त होतें. यासंबंधानें मला एक प्राचीन सात ब्राह्मणांची कथा आठवली आहे; ती तुला सांगतों ऐक. **विदर्भ** देशांत **कुंडिन** नांवाच्या नगरांत पूर्वी **स्वामिदत्त** नांवाचा एक मोठा विद्वान् ब्राह्मण रहात होता. तो निरनिराळ्या विद्या शिष्यांला पढवून लोकांवर मोठे उपकार करीत होता. त्याचा सारा दिवस स्नानसंध्या व विद्यार्थ्यांना पढविणें यांतच जात असे. त्याच्याजवळ निरनिराळ्या ठिकाणांहून आलेले सात ब्राह्मणांचे तरुण मुलगे अध्ययन करीत होते. तो त्या शिष्यांला आपल्या पुत्रांप्रमाणें वागवून त्यांला पढवीत असे.

अशा स्थितींत फार दिवस आवर्षण पडल्यामुळें, त्यादेशांत चहूंकडे भयंकर दुष्काळ पडला. **स्वामिदत्त** इतर कांहींच व्यवसाय करीत नव्हता. लोक स्वसंतोषानें जें कांहीं देतील त्यावर त्याचा निर्वाह चालला होता. दुर्भिक्ष पडल्यामुळें ज्याला त्याला आपला व आपल्या कुटुंबाचाच निर्वाह करण्याची फिकीर लागल्यामुळें; बिचाऱ्या **स्वामिदत्ताचा** परामर्श कोण घेतो? प्रत्येक मनुष्य स्वार्थाविषयीं तत्पर असतो स्वस्थतेच्या वेळीं साधूसंत, विद्वान् गोरगरीब, यांचा परामर्श घेण्याविषयीं लोकांची प्रवृत्ति होते; पण दुष्काळासारख्या भयंकर प्रसंगांत कोण कोणास विचारतो? अर्थात् **स्वामिदत्त** व त्याचे शिष्य यांचा निर्वाह चालणें कठीण पडूं लागलें.

**स्वामिदत्ताचा** सासरा मोठा पैसेवाला होता. त्याच्याघरीं गाई, ह्मशी वगैरे दुभत्याची समृद्धी असून दाणागोटाही पुष्कळ होता. **स्वामिदत्त** अयाचितवृत्तीनें वागत होता. तो कोणाजवळही कसलीच याचना ह्मणून मुळींच करीत नव्हता. तरी दुर्भिक्षामुळें दोनदोन तीनतीन दिवस फांके पडूं लागल्याकारणानें ; त्याला तो आपला नियम सोडावा लागला. स्वतः आपल्याविषयीं तो विशेष काळजी क-

रीत नव्हता; पण बिचाऱ्या गरीब विद्यार्थींना थंडा फराळ करण्याचा प्रसंग आलेला पाहून त्याला फार वाईट वाटलें. त्याणें आपल्या सासऱ्याकडून एक गाय मागून आणण्याकरतां आपल्या सातही शिष्यांला सासुरवाडीस पाठविलें. सासऱ्याचें घर **कुंडिनपुरा**पासून फार दूर, ह्मणजे **महाराष्ट्र** देशांत होतें. गुरूची आज्ञा घेऊन शिष्य मोठ्या जलदीनें **स्वामिदत्ता**च्या सासऱ्याच्या घरीं पोंहचलें. त्यांना वाटेंत खाण्यापिण्यास कांहीं मिळालें नव्हतें. ज्यांचे प्राण डोळ्यांत आले आहेत असे ते सातही शिष्य **स्वामिदत्ता**च्या सासऱ्याजवळ जाऊन त्याणीं गुरूच्या आज्ञेवरून 'जांवईबुवांनीं एक दुभती गाय मागितली आहे;' असें त्याला सांगितलें.

सासऱ्याच्या घरीं कांहीं कमी नव्हतें. जांवईबुवा कधीं कांहीं मागणारे नसून त्यांणीं मुद्दाम गाय मागायला पाठविली ह्मणून सासऱ्यानें आपल्याघरीं सर्वांत उत्तम व पुष्कळ दूध देणारी अशी जी गाय होती; ती त्या सात असामींच्या हवालीं केली. खरोखर त्या सासऱ्यानें गाय देण्यापूर्वीं भुकेनें व्याकुळ झालेल्या त्या शिष्यांला थोडें तरी अन्न दिलें पाहिजे होतें; पण त्या गोष्टीचें त्याला स्मरण राहिलें नाहीं. कदाचित् त्याणें कृपणत्वामुळें मुद्दाम तिकडे दुर्लक्ष्य केलें नसेल असेंही ह्मणवत नाहीं. कारण चहूंकडे दुष्काळ पडला असल्यामुळें चारापाण्याची टंचाई असणें साहजिकच आहे. व तशा स्थितींत घरांत असलेल्या गुरांचे हाल पाहवत नाहींत, ह्मणून त्यानें गाय दिली असावी. एवढी मोठी गाय दिली असून शिष्यांला एकवेळ जेवायला घालण्याचें त्याला काय कठीण होतें? असें कदाचित् कोणास वाटेल; पण तशा प्रसंगीं धान्याचा एक कणदेखील मोठा मौल्यवान् वाटतो. मग एक नव्हे दोन नव्हे, सात-असामींला जेवायला घालायचें व तेंही कित्येक दिवस अन्नावांचून व्याकुळ झालेल्यांस! तेव्हां ही गोष्ट **स्वामिदत्ता**च्या सासऱ्यानें मुद्दाम टाळली नसेल असे मुळींच ह्मणतां येत नाहीं. जांवईबुवा मागताहेत

( एकाअर्थी त्यांच्यावर उपकार केलासा झाला व एका जनावराची
ास्था लागली, असें समजून गाय शिष्यांच्या हवालीं करून, सास-
ानें त्यांची रवानगी केली !

बिचारे शिष्य क्षुधेनें व्याकुळ झाले होते; तरी गाय घेऊन मुकाट्या-
ते तेथून मागें परतले. जातांना वाटेंत त्यांना उपास काढावे लागले
ते; तरी गुरुजींच्या सासुरवाडींत पोंचतांच, पोटभर जेवायला मिळेल
शी त्यांना बळकट आशा होती. पण परत येतेवेळीं आशा ठेवण्यास
ांहीं मार्गच राहिला नव्हता. गुरुजींच्या घरीं बहुतकरून उपास-
राचाच प्रसंग आहे हें त्यांना माहितच होतें. व त्यांतूनही पल्ला
ार दूरचा. आणखी कित्येक दिवस मार्गक्रमण करावें तेव्हां गुरु-
ींचें घर मिळणार. वाटेंत जेवणाखाणाची कोठेंच कांहीं सोय नाहीं.
ंगलांत फळें व मुळें मिळण्याची मुष्कील. तेथें जेवणाचें नांव तरी
कशास पाहिजे ? अशी स्थिती असल्यावरून त्यांचें धैर्य खचलें.

मनुष्यमात्र स्वभावतःच वाईट कर्म आचरण करण्याविषयीं प्रवृत्त
होत असतो असें नाहीं. तसे कांहीं दुष्ट लोक असतील कीं; जे
जन्मतःच कुकर्माचरण करण्याविषयीं तत्पर. पण एकंदरींत प्रसंगानें
मनुष्याच्या आचरणांत फरक पडतो. धर्मिष्ठ असलेला मनुष्यदेखील
प्रसंगीं अधर्म करण्याविषयीं प्रवृत्त होतो, याबद्दल त्याचा निरुपाय
आहे. **स्वामिदत्ता**चे शिष्य सदाचारी असून गुर्वाज्ञेप्रमाणें वर्तन करणारे
होते. पण यावेळीं त्यांच्यावर मोठा विलक्षण प्रसंग आला होता,
यामुळें त्यांच्या बुद्धीला विपर्यास घडला. ते ह्मणाले, " आमच्या गुरु-
जींचें घर तर येथून फार दूर आहे. भुकेनें आमचे प्राण चालले आहेत.
जिकडे जावें तिकडे अन्न अतिशय दुर्लभ झालें आहे. आह्मी आतां
अर्ध्या वाटेवर येऊन पोंचलों आहों. शरीर अशक्त झाल्यामुळें पाऊल
पुढें पडत नाहीं. तेव्हां आतां अन्नावांचून आमचे प्राण जाण्याचा
प्रसंग आला आहे, यांत कांहीं संशय नाहीं. आमचे प्राण गेले तर

जावोत; पण बिचारी ही गाय आमच्या बरोबर मरेल! या प्रदेशांत चारा नाहीं, पाणी नाहीं, व कोणी मनुष्यही नाहीं; यामुळें ही मेल्यावांचून राहणार नाहीं. तेव्हां असें झालें तर यापासून आमच्या गुरुजींचा कोणता अर्थ सिद्ध होणार आहे? गाईपरी गाय नाहीं; व शिष्यांपरी शिष्यही नाहींत असें मात्र होणार! याकरतां दोहोंतून एकाचा कां होईना, बचाव करून गुरुजींचा थोडा तरी कार्यभाग साधावा. यावेळीं गाय आणि आह्मी या उभयतांनीं एकमेकांस शरीर अर्पण करून बचाव केला पाहिजे. आपापलया मांसावांचून दुसरा कांहींच खाण्याचा पदार्थ नाहीं! आतां आमचें मांस आह्मी या गाईला दिलें तर ती तें खाणार नाहीं. व कदाचित् तिणें खाल्लें तरी गुरुजींच्याजवळ तिला नेऊन कोण पोंचाविणार? तेव्हां एकंदरींत आपला नाश करून घेऊन या गाईचा बचाव होण्यासारखा नाहीं. याकरतां या गाईच्या शरीराचा नाश करून आपण आपला बचाव करून घेतला पाहिजे! हिच्या मांसानें आमची तृप्ती होईल; व क्षुधेची शांति झाल्यामुळें आह्मी पुनः गुरुजींच्या सेवेंत हाजर होऊं, याकरतां यागाईला मारून हिच्या मांसानें आपल्या प्राणांचा बचाव करून, राहिलेलें मांस गुरूला देऊन त्यांचेही प्राण वाचवावे! वस्तुतः हें कर्म फार अयोग्य आहे; पण हा आपत्काल आहे. अशावेळीं कोणत्याही रितीनें प्राण वांचविणें हेंच मुख्य कर्तव्य आहे!"

दुर्धर प्रसंगानें ज्यांचें मन कठोर केलें आहे, अशा त्या सातही शिष्यांनीं वर सांगितल्याप्रमाणें आपआपल्यांत विचार करून, त्या गाईवर प्रयोग केला. व शास्त्रोक्त विधीनें गोसव यज्ञाची कल्पना करून त्यांणीं तिचा वध केला. आणि यथाविधि देवांला व पितरांला तिचें मांस अर्पण करून स्वतः आपण त्यांणीं यथेच्छ भक्षण केलें! व जें मांस बाकी राहिलें होतें, तें घेऊन गुरुजींच्या जवळ प्राप्त झाले. स्वामिदत्तानें त्यांला कशाकरितां पाठविलें होतें, तें वर सांगितलेंच आहे. शिष्यांनीं झालेली

सर्व हकीकत मुळापासून गुरूला निवेदन केली. वस्तुतः यावेळीं त्यांनीं मोठा अपराध केला होता. एक तर गाईसारख्या अवध्य प्राण्याचा वध केला, व अभक्ष्य मानलेलें तिचें मांस भक्षण केलें, आणि गुरूच्या आज्ञेवांचून तिला मारलें! असे एकाहून एक अपराध त्यांणीं केले होते; तरी घडलेली हकीकत त्यांणीं खरी निवेदन केली. व त्यांच्यावर तसा दुर्धर प्रसंग होता; या गोष्टींचा विचार करून **स्वामिदत्तानें** त्यांच्यावर राग न करतां उलट संतोषच प्रदर्शित केला.

इकडे दुष्काळाचें स्वरूप भयंकर असल्यामुळें दिवसेंदिवस अन्न फारच दुर्मिळ होत चाललें होतें. शिष्यांनी गाईचें मांस आणलें होतें त्यावर चार दोन दिवस त्यांचा निर्वाह झाला; पण पुढें कांहीं न मिळाल्यामुळें, क्षुधेनें तळमळत ते सातही शिष्य लौकरच मरण पावले! थोड्या अंतराने **स्वामिदत्तही** परलोकवासी झाला. वस्तुतः त्यांणीं जें कर्म केलें होतें; त्याप्रमाणें त्यांला परलोकांत फार मोठी शिक्षा झाली पाहिजे होती. पण गाईचा वध केला तरी देव आणि पितर यांच्या उद्देशानें केला असून त्यांणीं तो आपत्कालीं केला होता, व आपल्या गुरूजवळ सत्य भाषण केलें होतें, यामुळें ते सातही शिष्य नरकास न जातां पूर्वजातींचें स्मरण करणारे असे पुनः मृत्युलोकीं जन्म धारण करून स्वधर्माचरणानें उत्तम लोकाला गेले!"

---

१ हीच कथा हरिवंशांत सांगितलेली आहे. तेथें कांहींसा फरक आहे. 'भरद्वाज नांवाच्या ऋषीचे सात शिष्य होते व ते गुरूच्या गाई राखण्यास अरण्यांत गेले असतां तेथें क्षुधेनें व्याकुळ झाल्यामुळें त्यांणीं त्यांतल्या एका गाईचा पितरांच्या उद्देशानें वध केला,' असें सांगितलेलें असून, 'नंतर ते दशार्ण देशांत सात व्याध झाले, तेथून दुसऱ्या जन्मांत कालंजर पर्वतावर हरीण झाले, शरद्वीप नामक प्रदेशांत चक्रवाक पक्षी झाले, नंतर मानससरोवरांत हंस झाले. तेथून कुरुक्षेत्रांत ब्राह्मणाचें जन्म धारण करून ते उत्तम गतीस गेले,' असें सांगितलें आहे. 'प्रत्येक जन्मांत त्यांना पूर्वजन्माचें स्मरण होतें. व गोवधासारखें निंद्य कर्म केलें; तरी तें पितरांच्या व देवांच्या उद्देशानें केल्यामुळें त्यांस उत्तम गति प्राप्त झाली,' असें वर्णन केलें आहे. श्राद्धांत—

अशी कथा सांगून राजा कलिंगदत्त ह्मणाला, "शुद्धसंकल्परूप उदकानें सेचन केलेलें पुण्याचें बीज लहानसें असलें तरी त्याचा विस्तार होऊन, उत्तम शेतकऱ्याला शेतांत पेरलेल्या थोड्याशा बियाचें जसें मोठें फल प्राप्त होतें, तसें फळ मिळतें. पण तेंच पुण्यबीज दुष्टसंकल्प-रूप वाईट उदकानें सेचन केलें असतां दूषित होऊन अनिष्ट फळ दे-णारें होतें. यासंबंधानें तुला आणखीही एक कथा सांगतों ती श्रवण कर.

पूर्वीं गंगातीरीं निराहार राहून दोन मनुष्य तप करीत होते. त्यांत एक ब्राह्मण होता व दुसरा जातीनें चाण्डाल होता. दोघांनीही आपला इष्ट हेतू सिद्ध होईपर्यंत कडकडीत निराहार करण्याचा संकल्प केला होता. पण कांहीं दिवसांनीं त्यांपैकीं ब्राह्मणाचें मन फिरलें. भुकेनें पोटांत आकांत उठल्यामुळें तिची शांति करावी असें त्याच्या मनांत आलें; तरी जवळ खाण्यासारखें कांहीं नव्हतें. कोळीलोक जाळीं घालून तेथें मासे मारण्याचा उद्योग करीत होते व त्यांतलेच मासे ते खुशाल खातहीं होते. त्यांच्याकडे पाहून त्या अविचारी ब्राह्मणाच्या जिभेस पाणी सुटलें! तो ह्मणाला, "अहो! हे रांडलेक कोळी या जगांत मोठे धन्य आहेत असें वाटतें. कारण या बेऱ्यांला प्रतिदिवशीं ताजेताजे मासे यथेच्छ खायाला मिळतात, तेव्हां यापेक्षां आणखी दुसरी चैन ती कसली पाहिजे!"

याप्रमाणें तो जातीचा ब्राह्मण असूनही त्याच्या मनांत वाईट विचार आले; पण त्याच्याच जवळ असलेल्या चाण्डाळाला त्या कोळ्यांचें कृत्य पाहून फारफार वाईट वाटलें. तो ह्मणाला, "अरे या दुष्ट कोळ्यांला

---

"सप्त व्याधा दशार्णेषु मृगाः कालांजरे गिरौ ।
चक्रवाकाः शरद्वीपे हंसाः सरसि मानसे ॥
तेऽपि जाताः कुरुक्षेत्रे ब्राह्मणा वेदपारगाः ।
प्रस्थिता दीर्घमध्वानं यूयं किमवसीदथ" ॥

असे जे दोन श्लोक ह्मणतात ते यांच्याच संबंधानें आहेत.

धिःक्कार असो ! हे बेटे हिंसक जनावरासारखे केवळ आपल्या पोटाला आग लावण्याकरतां असंख्य प्राण्यांचा घात करताहेत. तेव्हां आपण याठिकाणीं राहून या दुष्टांचीं तोंडें पहावीं; हें योग्य नाहीं. पण करायचें काय? गंगेच्या तीरावर तर आपल्याला राहिलेंच पाहिजे. व जेथें जावें तेथें या कोळ्यांचा उपद्रव असायचाच ! याकरतां आपण आपले डोळे झांकून बसावें ह्मणजे झालें." असा विचार करून तो चांडाल डोळे झांकून स्वस्थांतःकरणानें तप करीत बसला !

त्या दोघांनींही निराहार करून गंगेंत प्राणत्याग करण्याचा संकल्प केला होता. हळूहळू क्षुधेच्या असह्य वेदनेनें त्यांचे प्राण प्रस्थान ठेवण्याच्या तयारींत आलेच होते. व त्याप्रमाणें लौकरच त्या दोघांचेही प्राण गेले. तेव्हां त्यांपैकीं ब्राह्मणाचें शरीर गंगेवर तरंगत तरंगत तडीस लागलें. तेथें कुत्र्यांनीं तें फाडून खाल्लें. व त्या चांडालाचें शरिर पाण्यांतच सडून गेलें. नंतर त्या उभयतांच्याही मनाची स्थिती जशी होती; तदनुसार त्यांला फल प्राप्त झालें. तो अविचारी ब्राह्मण तेथेंच कोळ्यांच्या घरीं जन्मास आला! कारण कोळ्यांच्या कृत्यावर त्याचें मन थोडेंसें आसक्त झालें होतें. याप्रमाणें त्याचें जन्म हीनकुलांत झालें; तरी गंगेच्या उदकांत देहत्याग केल्यामुळें त्या पुण्याच्या प्रभावानें त्याला पूर्वजातीचें स्मरण राहिलें होतें.

तो चांडालही त्याच ठिकाणीं गंगेच्या काठीं एका राजाच्या घरीं जन्मास आला, व त्यालाही पूर्वजन्माचें चांगलें स्मरण होतें. त्याचें अंतःकरण चंचल नव्हतें यामुळें तो या जन्मांत मोठा धैर्यशाली व दयाळू असाच झाला होता. याप्रमाणें पूर्वजन्माचें स्मरण करणारे ते दोघेही जन्मास आल्यावर; त्यांतला एक अर्थात् ब्राह्मण पूर्वींच्या आपल्या योग्यतेची आठवण करून पदोपदीं दुःखित होत होता. व दुसरा अर्थात् चांडाल पूर्वी आपण किती हीन होतों, व सांप्रत आपली योग्यता काय झाली आहे; याची आठवण करून मोठा आनंद मानीत होता."

ही कथा सांगून राजा **कलिंगदत्त** ह्मणाला, "याप्रमाणें धर्मरूप वृक्षाचें मूळ अर्थात् मन हें ज्याचें शुद्ध असेल, त्याचा तो धर्म उत्तमप्रकारें फलद्रूप होतो. व ज्याचें मन अशुद्ध असेल त्याला त्या ब्राह्मणासारखें वाईट फल प्राप्त होतें. नीट विचार करून पहा कीं, त्या ब्राह्मणानें व चांडालानें सारखेंच धर्माचरण केलें होतें. उभयतांचें अनशनव्रत अगदीं कडकडीत होतें. तरी ब्राह्मणाचें मन अपवित्र झालें असून चाण्डालाचें मन पवित्र होतें. ह्मणून त्यांला तदनुसार फलें प्राप्त झाली. तात्पर्य मनाची शुद्धता असल्यावांचून कितीही धर्माचरण केलें तरी तें फलद्रूप होत नाहीं."

याप्रमाणें राजानें निरनिराळ्या दोन कथा सांगितल्या; तथापि आपल्या चित्तांतील भाव आणखीही व्यक्त करून दाखवावा असें त्याच्या मनांत असल्यावरून, **कलिंगदत्त तारादत्तेला** पुनः ह्मणाला, "प्रिये, कोणतेंही कर्म असो तें आपल्या सत्वाहून अधिक असलें ह्मणजे अवश्यमेव उत्तम फल देणारें होतें. संपत्ति नेहमीं सत्वाकडे धांवत असते. याविषयीं मी तुला एक विचित्र कथा सांगतों ती श्रवण कर. **अवंति** देशांत, त्रैलोक्यांत प्रसिद्ध अशी **उज्जयिनी** नांवाची मोठी नगरी आहे. जेथें भगवान् **शंकर महाकाल** या नांवानें नेहमीं वास्तव्य करीत आहे. अशी ती, शुभ्र अशा उंच उंच महालांच्या योगानें, त्या **महाकालाची** सेवा करण्याकरतां प्राप्त झालेलीं, जणूं काय हीं **कैलास** पर्वताचीं शिखरेंच आहेत अशी दिसते. तेथें सार्वभौम पदवीचा उपभोग करणारा, हजारों मोठमोठ्या शूर पुरुषांनीं भरलेलें ज्याचें असंख्य सैन्य आहे, असा यथार्थ नांव धारण करणारा, **विक्रमसिंह** नांवाचा राजा राज्य करीत होता. शत्रुरूपी मृग ज्या राजसिंहाची गर्जना श्रवण करून कधींही त्याच्या सन्मुख उभे रहात नसत. या पृथ्वीवर राजा **विक्रमसिंहाला** प्रतिपक्षी असा दुसरा कोणीच राहिला नसल्यामुळें लढाई करून आपलें भुजबल दाखविण्याचा प्रसंग त्याला मुळींच मिळेनासा झाला! त्यामुळें

आपलीं शस्त्रास्त्रें व बाहुबल याविषयीं तिरस्कार उत्पन्न होऊन तो फार खिन्न झाला. 'तो घरचेवर आपलें हें मोठें सैन्य असून काय उपयोगी ? हें भुजबल तरी केवळ निरर्थकच आहे!' असें ह्मणत असे.

एकेदिवशीं कांहीं गोष्टींचा प्रसंग निघाल्यावरून **अमरगुप्त** नांवाच्या, त्याचा अभिप्राय जाणणाऱ्या प्रधानानें राजाला एक कथा सांगितली. तो ह्मणाला, "महाराज, बाहुबलाच्या गर्वानें व शस्त्रास्त्रविद्येच्या मदानें उन्मत्त होऊन, आपल्याला कोणी तरी शत्रू उत्पन्न व्हावा अशी इच्छा करणें, हें चांगलें नाहीं. त्याणें कदाचित् मोठमोठे अनर्थदेखील सहज घडून येतात. याविषयीं मी एक प्राचीन दृष्टांत सांगतों. दैत्यांचा राजा **बलि** याचा **बाणासुर** नांवाचा ज्येष्ठ पुत्र होता. त्याला एक हजार हात होते. अप्रतिम बाहुबलाच्या योगानें त्याला सर्व जग अगदीं तुच्छ झालें होतें. तो **शंकरा**चा मोठा भक्त होता. व त्याच्या प्रसादानेंच त्याला ऐवढें मोठे महत्त्व प्राप्त झालें होतें.

बाहूंची खाज जिरण्याचा प्रसंग न आल्यामुळें त्या **बाणासुरा**च्या अंगांत रक्त मुसमुसत होतें. कोणी तरी आपल्याला सामनेवाला भेटेल. व आपण त्याच्याशीं यथेच्छ लढाई करूं अशी त्याची फार इच्छा होती; पण ती पूर्ण होण्याचा योग लौकर आला नाहीं. तेव्हां मदोन्मत्त झालेल्या **बाणासुरानें शंकरा**ची प्रार्थना करून 'आपल्याशीं सामना करणारा असा कोणी तरी वीर भेटावा'; असा वर मागितला! भगवान् **शंकरा**ची त्याच्यावर कृपा होती, तरी त्याची खाज जिरावी असें त्याच्याही मनांत आलें. व त्याणें 'लौकरच तुझा भुजकंडू शांत करणारा योद्धा तुला भेटेल' असा वर दिला.

वस्तुतः याला वर ह्मणण्यापेक्षां शाप ह्मटलें असतां साजेल; कारण ज्यांत त्याचा पराभव व्हायचा तो वर कसला? असो. त्या **बाणासुरा**चें **उषा** नांवाची अत्यंत रूपवती व मोठी चतुर कन्या होती. एके दिवशीं तिचा, स्वप्नांत **श्रीकृष्णा**चा नातु **अनिरुद्ध** याच्याशीं समागम घडला

तेव्हां तिच्या समाधानार्थ **चित्रलेखा** नांवाची तिची प्रिय मैत्रीण होती तिणें आकाशमार्गानें **अनिरुद्धाला बाणाची** नगरी जी **शोणितपुर** तेथें नेला. व **उषेच्या** महालांत गुप्तपणें **अनिरुद्धाशीं** तिचा विवाह लावला. कांहीं दिवसांनीं ही गोष्ट **बाणासुराच्या** कानावर आली. तेव्हां त्याणें एकटा सांपडलेल्या त्या **अनिरुद्धाला** रागानें कैदेंत टाकलें.

इकडे हें वर्त्तमान भगवान् **श्रीकृष्णाला** समजलें. तेव्हां सर्वयादवांसहवर्त्तमान **कृष्णानें बाणावर** स्वारी केली. उभयतांचा मोठा भयंकर युद्धप्रसंग सुरू झाला. भुजबलानें उन्मत्त झालेला **बाणासुर** स्वतः **कृष्णाशीं** सामना करायला आला. तेव्हां **कृष्णानें बाणाचे** हजार हात हेंच एक मोठें जंगल, त्याचा अगदीं सप्पा उडवला! एकामागून एक असे बाण सोडून **कृष्णानें** त्याचे सर्व हात तोडून **बाणासुराला** अगदीं लुला करून टाकला! तेव्हां अर्थात् जसा ज्वर अंगांतून उतरून गेला ह्मणजे ज्वरित मनुष्य विकळ होतो, तसा मदरूपी ज्वर उतरल्यामुळें **बाणासुर** अगदीं विकळ झाला. तेव्हां **शंकरानें** मध्यें पडून त्याचे प्राण वांचविले. व त्याचे चार हात अजरामर होतील असें **कृष्णानें** त्याला आश्वासन दिलें."

ही कथा सांगून **अमरगुप्त** ह्मणाला, "महाराज, याकरतां आपणही युद्धाचा प्रसंग येत नाहीं ह्मणून असंतुष्ट होऊं नका. शत्रू उत्पन्न होणें हें अशुभच आहे. तेव्हां त्याची मुद्दाम इच्छा करणें हें कांहीं चांगलें नव्हे. आतां हें खरें आहे कीं; आपण शस्त्रास्त्रविद्येंत प्रवीण आहां व आपलें सामर्थ्यही मोठें आहे, तेव्हां तें कोठें तरी दाखवलें पाहिजे; पण याकरतां शत्रूचीच इच्छा केली पाहिजे असें नाहीं. आपल्याला जर भुजबल दाखवायचें असलें तर एखाद्या मोठ्या अरण्यांत जाऊन तेथें शिकार करावी ह्मणजे झालें. शिकारींत शस्त्रास्त्रविद्या किंवा भुजबल दाखविण्याची उत्तम सवड असते. राजांनीं शिकार

खेळावी असें जें सांगितलें आहे; त्याचा उद्देश फार निराळा अ
शिकारीच्या निमित्तानें व्यायाम होऊन शरीर कसावें ह्मणूनच ती
ळावी असें सांगितलें आहे. ज्यांणीं विशेष कसरत केलेली नसते
राजे युद्धमार्गांत फारसे वर्णनीय होत नाहींत. अरण्यांत राहणारे सिं
वाघ इत्यादि हिंसक पशू सर्व प्राणिमात्रांचा क्षय करून हें जग अ
र्दीं ओसाड करण्याची इच्छा करीत असतात! अतएव ते जगाचे श
आहेत असें ह्मटलें पाहिजे. तेव्हां अर्थात् राजांला ते वध्य आहेत व ह
णूनच त्यांनीं शिकार करावी असें शास्त्रकारांनीं सांगितलें आहे. त
शिकारीचा देखील नाद विशेष असणें हें चांगलें नव्हे. केवळ शिका
रीच्या नादीं लागल्यामुळें **पांडु** इत्यादि राजे नाश पावल्याचें इतिह
सांत प्रसिद्ध आहे. याकरतां मृगया करायची झाली तरी ती नियमित
रीतीनेंच केली पाहिजे."

मोठा चतुर व स्पष्टवक्ता राजा **विक्रमसिंहाचा** प्रधान **अमरगु**
यार्णे याप्राणें आपल्या धन्याला अप्रिय पण हितकारक असा बोध केला

---

१ युधिष्ठिरादिकांचा पिता पांडुराजा हा मोठा बलाढ्य असून शस्त्रास्त्रविद्येंत निपुण होता. त्याणें दिग्विजय करून पृथ्वीवरील सर्व राजांला पादाक्रांत केलें. व नंतर आपल्याला कोणी प्रतिपक्षी नाहीं; असें पाहून कुंती आणि माद्री यानांवाच्या दोघी स्त्रियांबरोबर घेऊन तो अरण्यांत शिकार करीत फिरत होता. त्याचीं कित्येक वर्षे शिकारींत गेलीं. एकेदिवशीं त्याणें कोणीएक ऋषी हरिणाचें रूप धारण करून हरिणीसहवर्त्तमान विषयसुखाचा उपभोग करीत असतां; त्याच्यावर बाण मारला. तेव्हां त्या ऋषीनें आपलें पूर्वरूप प्रकट करून—'मी स्त्रीसंगसुखाचा अनुभव करीत असतां विनाकारण तूं माझा वध केलास. तस्मात् तुलाही अशीच अवस्था प्राप्त होईल; ह्मणजे स्त्रीसंग करीत असतां तुझा प्राण जाईल.' असा शाप दिला. याप्रमाणें शाप झाल्यामुळें राजानें त्या दिवसापासून स्त्रीसंग अगदीं वर्ज्य केला होता, पण जणूं काय मृत्यूनेंच त्याची प्रेरणा केली, असा राजा ऋषीचा शाप झालेला माहीत असूनही एकेदिवशीं माद्री नांवाच्या आपल्या धाकट्या स्त्रीवर बलात्कार करून तिच्याशीं रममाण झाला व त्यामुळें; तत्काल ऋषिशापानें त्याचा देहांत झाला. अशी कथा महाभारताच्या आदिपर्वांत विस्तार पूर्वक वर्णन केली आहे.

राजेलोकांना व विशेषतः उन्मत्त झालेल्यांना आपल्या जवळच्या कोणी मनुष्यानें त्यांच्या इच्छेविरुद्ध कांहीं सांगितलें तर तें खपत नाहीं. त्याप्रमाणें **विक्रमसिंहाला अमरगुप्ताच्या** सांगण्याचा राग यावा. पण राजानें तें त्याचें हितकारक भाषण लक्ष्यपूर्वक ऐकून घेतलें. व हा सांगतो ही गोष्ट आपल्या कल्याणाची आहे, असें समजून त्याणें त्याचें गौरव केलें; इतकेंच नव्हे; तर आपला मदही अंमळ जिरविला. व 'तूं सांगितलेंस तें खरें आहे. आपण तसेंच करतों' असें सांगून दुसऱ्या दिवशीं त्याणें शिकारीला जाण्याची तयारी केली. बरोबर शेंकडों रान कादणारे लोक घेतले. हत्ती, घोडे, पायदळ वगैरे फौज घेतली. मोठमोठे शिकारी कुत्रे घेतले व श्वापदांला धरण्याचीं जाळीं घेतलेले लोक पुष्कळ बरोबर घेऊन; जणुं काय आपल्या त्या परिवार-रूप जाळ्यानें दशदिशांला वेढून टाकित आहे, असा तो राजा शिका-रीला निघाला. ज्याच्याबरोबर चालणारे पारधीलोक आनंदाच्या गर्जे-नेनें आकाश भरून सोडित होते, अशा मोठ्या थाटानें राजाची स्वारी सावकाश सावकाश जंगलाकडे निघाली.

स्वतः राजा **विक्रमसिंह** एका मोठ्या हत्तीवर बसला होता. व त्याच्या सभोंवतीं कोणी घोड्यावर कोणी उंटावर बसलेले अनेक वीर चालले होते. राजाला जातांना वाटेंत एक ओसाड देऊळ लागलें. व त्या देवळांत दोन पुरुष कांहीं बोलत असलेले त्याच्या दृष्टीस पडले. दुरून त्यांला पाहून, ते कोण आहेत त्यांचा शोध करावा असें राजाच्या मनांत आलें; तरी शिकारीकडे मन वेधलें असल्यामुळें तो तसाच पुढें निघून गेला. अरण्यांत गेल्यावर; ज्यांच्या अंगांत तरवारी घुसल्या आहेत; असे मोठेमोठे वाघ त्याणें जमिनीवर लोळायला लावले. गर्जना करणाऱ्या सिंहांचीं मस्तकें तोडून त्याला मोठा संतोष झाला. जणुं काय आपल्या पराक्रमाची बियेंच अशीं हत्तीला मारून त्यांच्या गंडस्थळांतली मोत्यें आपल्या पंजांत धरणाऱ्या सिंहाला मारल्यामुळें तीं

ज्यांच्या नखांतून खालीं पडून जिकडेतिकडे विखरलीं आहेत, अशा त्या मोत्यांनीं राजानें तो अरण्याचा प्रदेश भरून सोडला. वांकड्या दृष्टीनें पाहणारे हरीण हळूच सोडलेल्या राजाच्या सरळ बाणानें जागच्या जागीं स्थिरता पावले.

याप्रमाणें राजानें अनेक लहानमोठ्या श्वापदांचा संहार करून बहुतवेळ शिकार केल्यामुळें ज्याला विशेष श्रम झाला आहे; असा राजा **विक्रमसिंह** धनुष्यावर चढविलेली दोरी सैल करून मोठ्या आनंदानें पुनः **उज्जयिनी** नगरींत प्रवेश करता झाला. अरण्यांत जातेवेळीं ज्या देवळांत त्याला दोघे मनुष्य दृष्टीस पडले होते. व ज्यांच्याविषयीं त्याला जिज्ञासा उत्पन्न झाली होती; ते त्याच देवळांत परत येतेवेळीं देखील राजाला दिसले. त्यांला पाहून—'हे कोण आहेत? व इतका वेळपर्यंत हे कसली मसलत करीत आहेत याचा शोध करावा असें त्याच्या मनांत आलें. बहुतकरून हे कोणीतरी दुसऱ्या राजाचे हेर असावे. व हे कांहीं तरी गूढ मसलत करीत आहेत?' असें समजून राजानें आपल्या बरोबरच्या चोपदाराला पाठवून त्या दोघांही पुरुषांला कैद करून—त्यावेळीं विशेष चौकशी करण्याची कांहीं सवड नसल्यामुळें तसेच—राजवाड्यांत नेऊन प्रतिबंधांत ठेवले. व आपण आपल्या महालांत जाऊन श्रमपरिहारार्थ स्नान, भोजन, प्राशन, वगैरे करून त्याणें शिकारीचा प्रकार कसा काय झाला तो सविस्तर आपल्या मित्रांला निवेदन केला. व ती रात्र मोठ्या आनंदांत घालविली.

त्याणें ज्या दोघां पुरुषांला कैद करून ठेविलें होतें, ते रात्रभर तसेच कैदेंत होते. दुसरेदिवशीं राजा स्नानसंध्या आटपून कचेरींत आला तेव्हां त्याणें त्या दोघां कैद्यांला आपल्या समोर आणविलें. 'व तुमची खरी हकीकत काय आहे? तुह्मी कोण आहां? व फार वेळ तुह्मी कसली मसलत करीत होतां? तें खरें सांगा. नाहींपेक्षां तुमचा शिरच्छेद करीन' असें सांगितलें.

तें ऐकून भयानें थरथर कांपत असलेल्या त्या दोघांनीं राजाजवळ अभय मागून घेतलें व त्यांतला एक तरुण पुरुष राजाला आपली हकीकत सांगूं लागला. तो ह्मणाला, "सरकार, झालेला वृत्तांत खराखरा काय आहे तो मी आपल्या चरणांपाशीं निवेदन करतों. ह्या आपल्या राजधानींतच **करभक** नांवाचा एक ब्राह्मण राहत होता. वस्तुतः तो ब्राह्मण असल्यामुळें त्याणें आपल्या जातीला उचित असा शांत दांत व विद्वान् पुत्र व्हावा अशी इच्छा करावी; पण काय असेल तें कोणास ठाऊक? त्याला मोठा शूर व विद्वान् पुत्र असावा अशी उत्कट इच्छा झाली व त्याप्रमाणें त्याणें भक्तिपूर्वक **अग्नीचें** आराधन केलें. तेव्हां **अग्नीच्या** कृपेनें त्या वेदवेत्त्या ब्राह्मणाला मी पुत्र उत्पन्न झालों. लहानपणीं मला माझ्या बापानें विद्या शिकविण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला; पण दुर्दैवानें मी प्रौढ होण्यापूर्वींच माझा पिता परलोकवासी झाला. व त्याच्या बरोबरच माझी आईही लोकांतरास गेली. मला बापानें बरेंच शिक्षण दिलें होतें. तरी अल्पवयांतच कोणी शास्ता नाहींसा झाल्यामुळें, वाईट लोकांची संगत लागून मी हळूहळू आपला मार्ग सोडला! लवकरच मी कुमार्गाला लागलों. जुगाऱ्यांची संगति लागून मला जुगाराचें व्यसन लागलें. व आपल्या ब्राह्मणधर्माप्रमाणें वेदविद्येचा अभ्यास करण्याचें सोडून शस्त्रविद्येकडे माझें मन वेधलें. उघडच आहे, लहानपणीं मुलांना आईबापांचा दाब नसेल तर तें त्यांचें बालपण उच्छृंखल झाल्यावांचून कसें राहील? असो. याप्रमाणें भलत्याच मार्गाचें आचरण करून वर्त्तन करणारा मी जेव्हां प्रौढ झालों; तेव्हां फारच मदोन्मत्त झालों. मला आपल्या बाहुबलाचा व शस्त्रविद्येचा अतिशय गर्व झाला. ज्यालात्याला मी अगदीं तुच्छ मानीत असें. एकेदिवशीं मी एका मोठ्या अरण्यांत जाऊन तेथें बाण सोडण्याच्या कामांत आपली तयारी किती आहे; तिचा अजमास पहात होतों.

मी बाण सोडण्याच्या नादांत निमग्न झालों आहे; अशा संधीस

जिचा नुकताच विवाह झाला आहे अशी एक वधू आपल्या पतीसह एका रथावर बसून वऱ्हाडी मंडळीसहवर्त्तमान त्या वाटेनें चालली होती. इतक्यांत ज्यानें आपल्या पायांतला सांखळदंड तोडला आहे, असा एक मस्त झालेला हत्ती अकस्मात् कोठूनसा तेथें येऊन पोंचला! व दुर्दैवानें तो त्या नवऱ्या मुलीवरच चालून आला! प्रत्येकाला आपल्या प्राणांची काळजी ही मुख्य असते. त्या बिचाऱ्या तरुण मुलीवर त्या विशाळ व उन्मत्त झालेल्या प्राण्यानें हल्ला केला, तेव्हां बरोबरच्या लोकांनीं तिला त्या संकटांतून सोडविण्याचा प्रयत्न करणें अवश्य होतें. पण भयभीत झालेल्या त्या लोकांनीं त्या अनाथ मुलीला तशीच सोडून धूम पळ काढला! प्रत्यक्ष तिचा पती तिच्याबरोबर होता; पण तो देखील गांडू मनुष्यासारखा पळत सुटला!

मी तेथें जवळच होतों. ती तरुण मुलगी तशा संकटांत पडली, हें पाहून माझें मन अस्वस्थ झालें. आणि—'अरेरे !! या भेकड लोकांनीं या बिचारीला अशा संकटांत सोडून पलायन केलें! आतां ही गरीब काय करील? काय होईल तें होवो; पण या अनाथ स्त्रीला या संकटापासून आपण राखली पाहिजे. आपत्तींत पडलेल्या मनुष्याचें ज्याच्याकडून रक्षण होत नाहीं अशा निःसत्व पुरुपाचे प्राण किंवा त्याचें बळ असून तरी काय उपयोग?' असा विचार करून मी मोठ्यानें गर्जना करून त्या हत्तीच्या अंगावर धांवलों. तेव्हां माझी गर्जना ऐकून—त्या अबलेवर हल्ला करणें—ही गोष्ट लाजिरवाणी आहे असें समजूनच कीं काय—तिला सोडून तो हत्ती माझ्या अंगावर धांवला. मी त्या हत्तीला बोलविलें तेव्हां, हा आपल्याला सोडविण्याकरतां आला आहे असें समजून जिचा माझ्यावर किंचित् अनुराग झाला आहे, अशा त्या स्त्रीनें भयचकित होऊन आपल्या टपोऱ्या डोळ्यांनीं अवलोकन केलाहोत्साता मी तेथून एकसारखा पळत सुटलों. अर्थात् तो तुफान झालेला हत्तीही माझ्या पाठीमागून धांवत आला. त्या हत्तीला याप्रमाणें दूरवर

घेऊन मी त्याच्या तडाक्यांतून सुटण्याविषयीं युक्ति केली. ती अशी कीं, पानांनीं भरगच्च अशी एक झाडाची मोठी खांदी तेथें मोडून पडली होती तेव्हां हत्तीचा डोळा चुकवून मी त्या फांदींत दडलों. त्या वाटेनें लपत लपत त्या विशाळ प्राण्याच्या दृष्टीं न पडतां; मी युक्तीनें दाट झाडींत रिघून दुसऱ्या वाटेनें परत ती स्त्री ज्याठिकाणीं उभी होती, तेथें पुन्हां प्राप्त झालों !

इकडे मी त्या फांदींत लपलों आहें असें समजून हत्तीनें तुडवून तुडवून तिचा चुराडा करून टाकला. व इतक्यांत एक हत्तीण त्याच्या दृष्टीस पडली तेव्हां तिच्या पाठीस लागून तो तसाच पुढें गेला. मी त्या स्त्रीजवळ आलों, त्यावेळीं ती हत्तीच्या भयांतून सुटली होती. तरी तिच्या उरांत धडकी बसल्यामुळें अगदीं अस्वस्थ झाली होती. मीं तिचें समाधान केलें व भिऊं नको असें सांगून 'तुझ्या शरीराला कांहीं इजा झाली आहे काय?' ह्मणून विचारलें. तेव्हां ती अंमळ स्थिर होऊन माझ्याकडे प्रेमभरित दृष्टीनें पाहूं लागली. यावेळीं तिला दुःख आणि आनंद हे दोन्ही विकार बरोबरच उत्पन्न झाले होते. मी तिला कुशल विचारल्या वरून ती ह्मणाली, "शूरपुरुषा, माझें काय कुशल विचारतोस! आईबापांनीं मला एका गांडू मनुष्याला दिलें. मी या अशा संकटांत पडलें असून जो म्याड निर्लज्जपणें मला सोडून निघून गेला ! असो. जें झालें तें झालें; पण माझ्या सुदैवानें तुला कांहीं इजा झाली नाहीं हें एक माझें मोठें भाग्य ह्मणायचें! जो संकटकाळीं आपल्या स्त्रीचें रक्षण करीत नाहीं; तो नवरा कसला! आणि मी तरी त्याची बायको कसली ? ज्यापेक्षां तूं माझे प्राण वांचविलेस त्यापेक्षां आतां तूंच माझा पति आहेस. याकरतां तूं खुशाल माझ्या मागून ये. मी सवड पाहून तुझ्या सहवर्त्तमान कोठें तरी खुशाल निघून जाईन! तो पहा माझा नवरा आपल्या बरोबरच्या मंडळीसह इकडे येत आहे. हत्ती येथून गेला, असें समजल्यावरून स्वारी आतां इकडे आली असावी. तो आला

तरी कांहीं हरकत नाहीं. तूं खुशाल माझ्या मागून ये. अंमव
सवड मिळतांच आपण उभयतां कोठें तरी पळून जाऊं."

याप्रमाणें त्या स्त्रीनें सांगितलें. तेव्हां माझें मन तिच्यावर आसक्त
झाल्यामुळें मींही तिचें सांगणें मान्य केलें. 'ही स्त्री सुरूप आहे हिं
आपला आत्मा मला अर्पण केला आहे. तरी कशी झाली तरी ही दुस
ऱ्याची बायको आहे. तेव्हां हिला घेऊन काय करायचें आहे?' हे वि
चार माझ्या मनांत आले पाहिजे होते. व वस्तुतः धैर्याचा मार्ग हा
होता; पण तो तारुण्याच्या समोर कसा टिकणार? तारुण्याच्या जोरा
त्याला एकीकडे सारून, त्या स्त्रीच्या सांगण्याकडे मनाला अनुकू
केलें! असो, माझ्या मनांत याप्रमाणें विचार चालले आहेत इतक्यां
तिचा नवरा व त्याच्याबरोबरची मंडळी तिच्याजवळ येऊन पोंचल
वस्तुतः त्या निर्लज्ज तिच्या नवऱ्याला तशा संकटांत तिला सोडू
आपण पळून गेलों याची कांहीं तरी शरम वाटली पाहिजे होती; प
तशा गांडू मनुष्याला लाज कोठून असणार? तो पुन्हां मोठ्या दिमाका
आपल्या नवरेपणाचा तोरा मिरवून तिला घेऊन निघाला!

स्त्री आणि पुरुष उभयतांचें मन एक असल्यावर कोणतीही गो
अशक्य नाहीं. ती तरुण स्त्री आपल्या नवऱ्याबरोबर चालली होत
पण तिचें मन माझ्याजवळ होतें. मी तिच्या मागून आडरस्त्यानें ि
घालों. ज्याठिकाणीं त्यांचा मुक्काम होई तेथें कांहीं तरी निमित्त करू
ती मला भेटत होती. व फराळाचे जिन्नस आणि जेवणाचे पदार्थ वगै
कोणाला नकळत ती मला आणून देत असे. तिनें दिलेल्या पदार्थां
निर्वाह करून मी तिच्या बरोबरच्या लोकांला न समजूं देतां फार
पर्यंत तिच्याबरोबर गेलों. ती जरी आपल्या नवऱ्याबरोबर होती त
तो तिच्या मनांतून उतरून गेला होता. यामुळें तिणें त्याला आपल
अंगाला मुळींच हात लावूं दिला नाहीं. 'हत्तीच्या भयानें मी
डलें व त्याणें मला फार त्रास दिला यामुळें माझें सर्वांग दुखत आहे

असें सांगून तिणें नवऱ्याला मुळींच आपल्याला शिवूं दिलें नाहीं. उघडच आहे, नुकतेंच जिचें प्रेम आपल्यावर बसत आहे अशा स्त्रीविषयीं निष्काळजीपणा दाखवून ज्याणें तिचें मन विरस केलें असेल त्या पुरुषाला ती स्त्री दुखविलेल्या नागिणीप्रमाणें कांहींतरी अपकार केल्यावांचून कधींही राहणार नाहीं. असो.

याप्रमाणें आह्मी मार्गक्रमण करीत करीत त्या स्त्रीच्या नवऱ्याच्या गांवीं अर्थात **लोहनगर** नांवाच्या शहरांत येऊन पोंचलों. त्या स्त्री नवरा हा जातीचा वाणी असून त्याचा व्यापारधंदा फार मोठा हो त्याच शहरांत रहात होता. वाटेंत मला तिच्याबरोबर चाल पण शहरांत पोंचल्यावर तसें करण्याची सवड नव्हती, व आपल्या नवऱ्याबरोबर गेलेंच पाहिजे होतें. शहरांत प्रवेश तिणें मला खाणाखुणा करून कांहीं सुचविलें, व तें मी समजलों. ती सर्व मंडळी थेट शहरांत शिरली. व मी नगराच्या ब एक मोठें देवालय होतें तेथें राहिलों. त्या गांवांत माझा एक ब्राह्मण मित्र रहात असून त्या देवळांतच त्याची मला सहज गांठ पडली. वस्तुतः त्याच्याशीं ह्मणजे माझी फारशी मित्रता होती असें नाहीं. बऱ्याच दिवसांपूर्वी त्याचीआमची एकेठिकाणीं भेट झाली होती. व क्षणभर आह्मी कांहीं बोलत बसलों होतों, एवढाच काय तो त्याच्याशीं माझा परिचय.

त्या गृहस्थाशीं माझी यावेळीं जी भेट झाली होती; ती अगदीं नवीच असें ह्मटलें तरी चालेल. आणि तशा नव्या भेटीच्या प्रसंगीं आपलें हितगुज कोणालाही सांगणें योग्य नाहीं. तथापि आह्मां उभयतांचा तत्काळ एकमेकांवर इतका कांहीं विश्वास बसला कीं; तो कसा बसला, याचें मला मोठेंच नवल वाटलें. खरें विचाराल, तर माझा स्वभाव मोठा संशयी आहे. मी आपल्या मनांतली गोष्ट सहसा उघड करून दाखविणारा नव्हें; पण त्या ब्राह्मणाजवळ माझ्या मनाची वृत्ति तशी

राहिली नाहीं. कांहीं जन्मांतरींचा त्याचा माझा ऋणानुबंध असून उभयतांच्याही मनाला त्याची ओळख पटली असावी. याशिवाय तसें होण्याला दुसरें कांहींच कारण नव्हतें. असो.

आह्मी उभयतां एकेठिकाणीं गोष्टी करीत बसलों तेव्हां सहज निघतां निघतां माझ्या सर्व गोष्टी मीं त्याला सांगितल्या. वस्तुतः माझा तेथें जाण्याचा उद्देश व पुढें जें कार्य मीं करायचें मनांत आणिलें होतें तें ऱ्याला सांगण्यासारखें नव्हतें; तरी मीं त्याच्याजवळ सर्व सांगितलें. तें ऐकून तो ह्मणाला, "मित्रा, तूं स्वस्थ ऐस. ज्या कामाकरतां आला आहेस; तें सिद्ध होण्याविषयीं एक चांगला उपाय ानें तुझें काम फत्ते झाल्यावांचून राहणार नाहीं."

र यावेळीं माझी स्थिती कांहीं चमत्कारिक झाली होती. स्त्रीच्या वर्तनावरून ती सर्वस्वीं माझ्यावर फिदा झाली हे, व बोलल्याप्रमाणें ती करील अशी माझी खात्री होती; तथापि आकाशांत असणाऱ्या पक्ष्यांच्या लोभानें जमिनीवर त्यांच्या मागून धांवत असणाऱ्या पारध्यासारखी माझी अवस्था होती. ह्मणजे ती माझी प्रियकरीण आपल्या भर्त्याच्या घरीं खुशाल पोंचली व मी तिच्या नादानें इतका दूर आलों असून त्या देवळांत निराधार बसलों होतों! तिणें पुष्कळ सांगितलें होतें; तरी स्त्रियांचा काय भरंवसा? ती जेव्हां माझ्या ताब्यांत येईल; तेव्हांच माझें कायतें चालणार. येऱ्हवीं तिच्या घरीं जाण्याचीदेखील माझी छाती नव्हती. तरी मी आपला तिच्यावर भरंवसा ठेवून खुशाल मनांत मांडे खात होतों! वाटेंत असतांना तिचें दर्शन तरी होत होतें; पण घरीं पोंचल्यावर तेंदेखील दुर्लभ झालें होतें. तेव्हां आतां काय करावें याची मला फिकीर होती. अशा संधीस त्या मित्रानें कांहीं उपाय आहे; असें सांगितल्यावरून मला मोठी उमेद आली. व कोणता उपाय आहे तो मला सांग असें मीं त्याला ह्मटलें. तेव्हां तो ह्मणाला, "अरे तूं जिच्या नादीं

लागून येथें आला आहेस; तिचें येथें हें प्रथमच येणें असल्यामुळें मला तिची ओळख नाहीं; पण तिचा भर्त्ता व इतर सासरची मंडळी हीं मला चांगलीं ठाऊक आहेत. तिच्या भर्त्याची एक बहीण आहे; व ती येथेंच एका वाण्याला दिली आहे. तुझ्याआमच्यासारख्या अनाथांवर ती चांगली उपकार करणारी आहे! माझ्याशीं तिचा बराच परिचय असून तीही येथून जाण्याविषयीं प्रयत्न करीत आहे. तरी हावेळपर्यंत मीं तिच्या ह्मणण्याकडे विशेष लक्ष्य दिलें नव्हतें. आतां याकामीं तूं एक मला जोडीदार मिळालास. तेव्हां मी त्याविषयीं विशेष प्रयत्न करतों. आह्मा उभयतांचाही हेतू एकच आहे. ती तिची नणंद वरचेवर माझ्याकडे येत असते. तिच्या साह्यानें तुझा हेतू खास सिद्ध होईल असें मला वाटतें."

असें सांगून तो ब्राह्मण माझा निरोप घेऊन तेथून निघाला. माझ्याजवळ खाण्यापिण्याची कांहींच तयारी नव्हती. ही अडचण जाणून त्या ब्राह्मणानें मला आपल्या घराकडून पुष्कळ पदार्थ पाठविले. तो दिवस इकडेतिकडे फिरून मोठ्या संकटानें मीं कसातरी घालविला. त्या माझ्या मित्रानें रात्रीं पुन्हां भेटण्याचा संकेत केला होता. संध्याकाळ होतांच माझ्या माशुकाची नणंद त्याच्या घरीं त्याला भेटली. तेव्हां त्याणें तिला जें कांहीं सांगायचें होतें तें सांगितलें. त्याचवेळीं माझा हेतू पूर्ण होण्याची सवड नव्हती. ह्मणून 'दुसऱ्या दिवशीं आपण तुझ्या मित्राचें काम करतें;' असें सांगून ती परत आपल्या घरीं गेली. नंतर तो माझा मित्र लौकरलौकर माझ्याकडे येऊन, त्याणें झालेली सर्व हकीकत मला कळविली.

विरहावस्थेंत एकेक घटका युगासारखी वाटते. मी तर फारच आतुर झालों होतों. व आजच्याआज आपला हेतू पूर्ण होईल, अशी मला मोठी उमेद होती; पण तो मित्र आला तेव्हां अर्थात सर्व निकाल झाला. तथापि दुसऱ्या दिवशीं आपला मनोरथ पूर्ण होईल त्या

उमेदीवर मीं धैर्य धरलें. व त्या मित्रासह इकडच्यातिकडच्या गोष्टी बोलत कशीतरी ती रात्र घालविली.

प्रातःकाल होतांच माझा मित्र आपल्या घरीं निघून गेला. व त्याणें माझ्या जेवणाची व्यवस्था केली. त्याच दिवशीं माझ्या माशुकाच्या नणंदेनें तिची भेट घेऊन तिला सर्व हकीकत कळविली. वस्तुतः भावजया नणंदेला वैरिणीसारख्या समजतात. व बहुतकरून त्यांचा तसा विरोधही असतो. पण त्या दोघींचें समानशील असल्यामुळें एका क्षणांत चांगलें सख्य जमलें. दोघींचाही उद्देश एकच असल्यामुळें त्यांणीं परस्परांत कांहीं पडदा ठेवला नाहीं! नणंदेनें भावजईला, व भावजईनें नणंदेला परस्परांचें सर्व गुह्य वर्तमान निवेदन केलें. व त्या दोघींनींही ज्यादेवळांत मी उतरलों होतों त्याच ठिकाणीं माझी व माझ्या मित्राची भेट घेण्याचा संकेत केला..

ह्या सर्व गोष्टी दिवसा झाल्या. त्यांच्या संकेताची वेळ रात्रीची होती. मी जसा उत्कंठित झालों होतों; तसाच माझा तो मित्रही उत्कंठितच होता. आह्मी उभयतां एकेक पळ मोजीत त्या देवळांत बसलों होतों. अशा संधीस हळूहळू सूर्यप्रकाशाचा अस्त होऊन अंधकाराचें साम्राज्य पसरूं लागलें. जिकडेतिकडे सामसूम होऊन लोक आपापल्या घरीं जाऊं लागले. ती चतुर्दशीची रात्र होती. माझ्या प्रीतिपात्राच्या नणंदेनें—'तूं प्रथमच विवाह करून आला आहेस तेव्हां आपल्या बायकोसहवर्त्तमान देवीची पूजा कर.' असें आपल्या भावाला सांगून त्यादिवशीं रात्रीं त्या दंपत्याला पूजेच्या निमित्तानें देवळांत आणण्याचा बेत केला होता.

मी ज्या देवळांत उतरलों होतों तें देऊळ देवीचेंच होतें. व त्याच ठिकाणीं तें दंपत्य पूजा करायला येणार होतें. नणंदेनें माझ्या त्या मित्राला स्त्रीवेष घेऊन हुबेहुब आपली भावजय बनण्यास सांगितलें होतें. त्याप्रमाणें संध्याकाळ होतांच माझ्या मित्रानें माझ्या माशुकासारखा हुबे-

हुब वेष घेऊन माझ्यासहवर्तमान तो गुपचूप देवळांत येऊन बसला. सुमारें प्रहररात्र होऊन गेली. अशा समयास माझी प्रिया, तिचा पति व त्याची बहीण हीं तिन्ही माणसें त्या देवळांत येऊन पोंचलीं. त्यांच्याबरोबर आणखी कांहीं लोक होते; पण ते बाहेरच राहिले. आह्मी उभयतांनीं त्या देवळांतल्या पुजाऱ्याला अनुकूळ करून घेऊन ती मंडळी येण्यापूर्वींच देवीच्या मूर्त्तीच्या आड दडून बसण्याची तजवीज केली होती. पुजाऱ्याचें काय! त्याच्या हातावर चांगली दक्षिणा पडतांच त्याणें आह्मांस अनुकूळ असेंच वर्तन केलें!

माझी ती वल्लभा व तिचा नवरा या उभयतांनीं देवीची यथासांग पूजा केली. तेव्हां आतां हा गृहस्थ प्रदक्षिणा घालायला येईल तर सगळी मसलत फसेल याचें आह्मा दोघांला भय पडलें होतें; पण पुजारी अनुकूळ असल्यामुळें त्याणें आपल्या भोंवतींच प्रदक्षिणा घालायला लावून तो उपचार परिपूर्ण केला. पूजा आटोपल्यावर त्या दंपत्याच्या संबंधानें पुजारिबुवांनीं देवीची प्रार्थना करून त्याला आशीर्वाद व तीर्थप्रसाद दिला. तेव्हां तीं उभयतां परत जाण्यास निघालीं. त्या संधीस नणदेनें इषारा केल्यावरून माझा मित्र चटकन् पुढें झाला व ती माझी प्रिया माझ्याजवळ येऊन बसली. त्याणें स्त्रीवेष हुबेहुब घेतला-असल्यामुळें तिच्या नवऱ्याला कांहीं समजलें नाहीं! तो ही आपली बायकोच आहे, असें समजून माझ्या मित्रासह आपल्या घरीं गेला!

इकडे मी, ती माझी प्रिया प्राप्त झाल्यामुळें परम आनंदित होत्साता तिला घेऊन तत्काल तेथून निघालों. व हळूहळू तिच्यासहवर्तमान इकडे उज्जयिनीस येण्याची वाट धरिली. तिकडे माझ्या मित्राची हृदयवल्लभा, अर्थात माझ्या माषुकाची नणंद, त्याला आपल्या भावजयीचा वेष देऊन भावाच्या घरीं घेऊन गेली. तिचा भाऊ नुकतेंच लग्न करून घरीं आला होता. तेव्हां त्या संबंधानें घरांत जिकडेतिकडे उत्सव चालला होता. तिनें ही नववधू आहे व फार लाजाळू आहे अशीं कांहीं

निमित्तें करून स्त्रीवेष घेतलेल्या माझ्या मित्राला मंडळींत विशेषसा सामील होऊं दिला नाहीं. व जेवण खाण वगैरे आटपल्यावर युक्तीनें आपल्या भावाच्या महालांत त्याला पाठवून देऊन रुसवारुसवीखालीं कांहीं वेळ काढण्यास सांगितलें. त्याप्रमाणें त्याणें त्या मूर्खवाण्याचा, आपल्या अंगाला स्पर्श न होऊं देतां युक्तीनें सरासरी त्याची निरवानिरव करून मध्यरात्रीच्या सुमारास, घरांतली सर्व मंडळी जिकडेतिकडे बेहोष निजली आहे. असें पाहून उभयतांनीं पूर्वी संकेत करून ठेवला होता; त्याप्रमाणें त्या आपल्या माशुकासह तेथून प्रयाण केलें! ते उभयतां तत्काल नगराच्या बाहेर गेले. हावेळपर्यंत मी माझा मित्र ह्मणून जो सांगितला; तो हाच माझा जोडीदार. त्याणें त्या प्रियेला वेषांतर दिलें व आपण घेतलेला स्त्रीवेष टाकून लपतछपत युक्तीप्रयुक्तीनें या उज्जयिनीकडे पलायन केलें.

याचा आणि माझा पूर्वी संकेत झालाच होता. त्याप्रमाणें हा आपल्या प्रियेला घेऊन येथें येऊन मला भेटला. याप्रमाणें आह्मी उभयतांनीं, तारुण्यानें मुसमुसत असलेल्या अशा दोघी बायका मिळविल्या. त्या नणंद आणि भावजई दोघीही अगदीं एक विचारानें वागत असून आह्मांवर त्यांचा अत्यंत अनुराग आहे. आतां आपण आह्मी त्या देवळांत कसली मसलत करीत होतों; असें विचारलें, त्याचें उत्तर सांगायचें राहिलें आहे. हावेळपर्यंत मी आपलीच कथा सांगितली. स्त्री ह्मटली ह्मणजे ती एक द्रव्यच आहे. ती दुसऱ्याची असली ह्मणजे आपल्याला नेहमीं शंका बाळगावी लागते. आह्मी उभयतांनींही परक्याचें स्त्रीरूपी धन हरण केलें आहे; यामुळें आह्मी दोघेही फार साशंक आहोंत. उघडच आहे, ज्यांणीं मनास वाटेल त्याप्रमाणें साहस केलें आहे; अशा कोणा पुरुषाचें मन विश्वस्त राहील! आह्मांजवळ तीं दोन स्त्रीरत्नें असून, त्यांशिवाय पुष्कळ द्रव्यही आहे. तेव्हां आतां कोणत्या ठिकाणीं अथवा कोणाच्या घरीं रहावें? याचा आह्मांस मोठा विचार पडला

आहे. व त्याबद्दलच आह्मी त्या देवळांत बसून मसलत करीत होतों. इतक्यांत महाराजांची आह्मांवर नजर गेली. व आह्मी कोणाचेतरी हेर आहों; असें समजून सरकारांनीं आह्मांस कैद करून आणलें. व आज आमची हकीकत विचारली. याच्यापुढें काय झालें तें सरकाराला माहितच आहे. एकंदरींत आमची खरी हकीकत काय होती; ती आह्मीं महाराजांच्या पायांजवळ निवेदन केली आहे. यावर निग्रह किंवा अनुग्रह जें काय करायचें असेल; तें करण्याविषयीं सरकार समर्थ आहेत."

याप्रमाणें त्या ब्राह्मणानें सांगितलेली हकीकत ऐकून, राजा **विक्रमसिंह** त्यांला ह्मणाला, "साहसी पुरुष हो, तुह्मी खरोखर मोठे अपराधी आहां व त्याबद्दल तुह्मांला शिक्षा करणें योग्य आहे; तथापि तुह्मीं जे अचाट कृत्य केलें व खरी हकीकत माझ्याजवळ निवेदन केली, त्याच्या योगानें मी तुह्मांवर प्रसन्न झालों आहें. खरोखर तुह्मी अपराधी असतांही मी तुमच्या अपराधाची क्षमा करतों. माझ्याकडून तुह्मास अभय मिळालेंच आहे. आतां तुह्मी खुशाल या नगरांत इच्छेप्रमाणें पाहिजे त्याठिकाणीं रहा. तुह्मांला कोणाचेंही भय नाहीं. राहण्याच्या जाग्याविषयीं तुह्मांला मोठा विचार पडला आहे; तर मीच तुह्माला राहण्यास घर देतों. तेथें तुह्मी निःशंकपणें रहा. व तुह्मी उभयतांही आश्रय देण्यास पात्र आहां ह्मणून मी तुह्मांला नोकऱ्या देतों. व तुमचा निर्वाह चालेल; असें तुह्मांला वेतनही नेमून देतों. माझ्याजवळ इमानेंइतबारें रहा. मात्र एकवेळ तुह्मीं जें साहस केलें त्याची मीं क्षमा केली; ह्मणून पुनः तसलें कृत्य करूं नका."

असें सांगून राजानें त्या दोघांलाही सांगितल्याप्रमाणें राहण्यास घर व नोकऱ्या दिल्या. तेव्हां ते आपापल्या मायुकांसह मोठ्या आनंदांत तेथें राहूं लागले." ही कथा सांगून राजा **कलिंगदत्त तारादत्ते**ला ह्मणाला, "प्रिये, कोणतेंही कर्म असेना कां; जो पुरुष साहस-

पूर्वक त्याचें आचरण करतो, त्याला **लक्ष्मी** अवश्य प्राप्त होते. बलवा- न् व सत्त्वशील अशा पुरुषांवर राजेलोक सहज प्रसन्न होतात. या जन्मांतलें असो किंवा जन्मांतरांतलें असो. आपण जें कर्म केलें **असेल** तदनुसार—मनुष्य असो, किंवा देव असो, अथवा दैत्य असो कोणीही असला, तरी त्याला चांगलेंवाईट फल प्राप्त होतच असतें. तेव्हां यावरून, आकाशांतून खालीं पडलेली जी ज्वाला तुझ्या उदरांत प्रविष्ट झाली असें तूं स्वप्नांत पाहिलेंस; ती कोणातरी स्वर्गांतून भ्रष्ट झालेल्या प्राण्याची जीवकला असावी यांत कांहीं संशय नाहीं." याप्रमाणें आपला भर्त्ता राजा **कलिंगदत्त** याणें कर्माचें माहात्म्य सांगितलें; तें श्रवण करून गर्भिणी असलेली राणी **तारादत्ता** फार आनंद पावती झाली.

मोठा भाग्यशाली राजा **कलिंगदत्त** याची पट्टराणी **तारादत्ता** हिचा गर्भ दिवसेंदिवस वाढत गेल्यामुळें ती अशक्त झाली. तिच्या अंगावर पांडुरकीची छाया पडली. अंगांत अतिशय आळस उत्पन्न झाला. लवकरच चंद्रलेखा जींत उदय पावणार आहे अशा पूर्वदिशे- सारखी त्या राणीची स्थिती झाली. प्रसूतीचा काल अगदीं जवळ आला असल्यामुळें तिचें तोंड पांढरें फटिक झालें. डोळ्यांतील बाहुल्या फारच चंचल झाल्या. लौकरच नऊ महिने पूर्ण झाल्यावरून ती प्रसूत झाली. तिच्या गर्भांत स्वर्गांतून शापभ्रष्ट झालेल्या अप्स- रेनें प्रवेश केला होता; हें पूर्वीं सांगितलेंच आहे. अर्थात अप्रतिम रूपवती अशी कन्या उत्पन्न झाली. जग उत्पन्न करणाऱ्या **ब्रह्मदेवानें** सर्व सौंदर्याचें जणुं काय एकच स्थान ह्मणून घडविलें आहे, अशा त्या मुलीच्या अप्रतिम रूपाच्या तेजानें—अशी सुंदर मुलगी झाली. तो मुलगा कां झाला नाहीं! असें जाणून राजावर विशेष स्नेह करणारे ह्मणूनच कीं काय,—त्या बाळंतघरांत लावलेले दिवे निस्तेज दिसूं लागले!

त्या मुलीचा पिता राजा कालिंगदत्त, तिचें अप्रतिम तेज पाहून फार चकित झाला. तरी अशी सुंदर मुलगी झाली त्यापेक्षां मुलगा झाला असता तर फार चांगलें झालें असतें, असें त्याच्या मनांत आलें! व त्यामुळें हावेळपर्यंत पुत्र होईल; ह्मणून त्याणें जी इच्छा केली होती; ती विफल झाल्याकारणानें तो खिन्न झाला. वस्तुतः, अशी तेजस्विनी आहे तेव्हां ही मुलगी कोणीतरी दिव्यस्त्री असेल, असें त्याच्या मनांत आलें होतें. तरी मनापासून पुत्रेच्छा विशेष असल्यामुळें, त्याला त्या मुलीविषयीं संतोष वाटला नाहीं. तो मनांत ह्मणाला, चिंतेचें आणि शोकाचें केवळ निधान, अशी ही मुलगी कोठें! आणि प्रत्यक्ष मूर्त्तिमान् आनंद असा पुत्र कोठें! असो, दैवापुढें आपला काय इलाज चालणार आहे!

राजा असंतुष्ट झाला होता, तरी त्याणें त्यामुलीचे जातकर्मादि संस्कार करावयाचे ते केले. राणी तारादत्ता गरोदर होती तोंपर्यंत तो मोठ्या आनंदांत होता; पण आतां मुलगी झाल्यामुळें; अगदीं निराश होऊन त्याला घरांत चैन पडेनासें झालें. तेव्हां कशीतरी मनाची करमणूक करावी ह्मणून खिन्न झालेला राजा राजवाड्यांतून निघून शहराबाहेर जैनलोकांचे मोठमोठे विहार होते तेथें गेला.

संसारी मनुष्याला प्रपंचांत बरेवाईट असे अनेक प्रसंग नेहमीं येतच असतात. व त्याच्यायोगानें कधीं हर्ष, कधीं विषाद, कधीं औदासिन्य, असे अनेक प्रकारचे मनोविकार उत्पन्न होतात. सार्वकाळ सुखच मिळेल; असें कधींही होत नाहीं. कांहीं गोष्टींनीं आनंद झाला ह्मणजे तो वेळ क्षणासारखा केव्हांच निघून जातो; पण दुःख प्राप्त झालें ह्मणजे एकेक पळ युगासारखें वाटतें! अशावेळीं सत्पुरुषांचा समागम, व तत्त्वविचारांचें श्रवण; यांसारखें दुसरें कोणतेंही मनाला शांति देणारें नाहीं. ह्मणूनच राजा मुद्दाम विहारांत गेला. संसाराची दगदग सोडून पारमार्थिक विचार करणारे लोकच तशा ठिकाणीं राह-

याचे. अर्थात् तेथें गेलें असतां अस्वस्थ झालेल्या मनाची शांति होईल, असें राजाच्या मनांत आलें होतें.

राजानें एका विहारांत प्रवेश केला. तेथें आसमतांत पुष्कळ लोक बसलेले असून मध्यें एका उंच आसनावर एक जति बसला आहे व तो धर्माचें रहस्य निरूपण करीत आहे, असें पाहून राजा तेथें जाऊन बसला. त्या जतीनें पुढें सांगितल्याप्रमाणें धर्माचें निरूपण केलें. तो श्रोत्यांना उद्देशून ह्मणाला, "अहो, खरें ह्मणाल तर या संसारांत आपल्याजवळ जें कांहीं असेल तें, अर्थात् द्रव्य, ज्याला त्याची विशेष अपेक्षा असेल त्याला दान करणें हेंच अत्यंत मोठें तप आहे. जो द्रव्यदान करतो तो प्राणांचें दान करतो असें ह्मटलें पाहिजे. कारण द्रव्यावांचून प्राणांचें रक्षण मुळींच होत नाहीं. द्रव्यदानाचें इतकें माहात्म्य आहे ह्मणूनच आपला परमपूज्य आचार्य भगवान् बुद्ध याणें दयाळू होऊन लोकोपयोगाकरतां प्रत्यक्ष आपला आत्मादेखील देऊन टाकला ! तेव्हां या तुच्छ अशा द्रव्याची काय कथा आहे? भगवान् बुद्धानें तसें मोठें धैर्य धारण केलें, व तप आचरण करून वासनेचा क्षय केला, आणि या संसारासंबंधीं कोणत्याही वस्तूवर इच्छा ठेवली नाहीं ह्मणूनच त्याला दिव्य विज्ञान प्राप्त झालें. व त्याच्यायोगानें तो मोठा सर्वज्ञ झाला. फार काय सांगावें ! आपल्या शरीराला धरून इतर सर्व वस्तूंवर निराश होऊन शहाण्या मनुष्यानें प्राणिमात्राचें हित करावें. असें केल्यानें त्याला उत्तम अनुभव प्राप्त होऊन, सर्वज्ञता मिळते. आतां याविषयीं दृष्टांताकरतां मी एक प्राचीन इतिहास सांगतों तो श्रवण करा.

पूर्वी कोणी एक विश्वसेन नांवाचा मोठा प्रबल राजा होता. त्याला अनुक्रमानें, अत्यंत रूपवती अशा एकामागून एक सात मुली झाल्या. राजा विश्वसेन पुत्रांपेक्षांही त्यांला विशेष मानून त्यांचें लालन-पालन करीत होता. तथापि लहानपणापासूनच त्यांच्या मनाची स्थि-

ती कांहीं चमत्कारिक होती. बाप इतके लाड करीत होता; तरी त्यांला त्याचा संतोष वाटत नव्हता. त्यांच्या मनांत वैराग्य उत्पन्न झालें होतें. घरांत राहण्यापासून चित्ताचा एकप्रकारें क्षोभ होतो; ह्मणून अगदीं अल्पवयांतच त्यांणीं बापाच्या घराचा त्याग करून स्मशानाचा आश्रय केला. बापाला त्यांचें तें करणें योग्य वाटलें नाहीं; ह्मणून 'मुलीनों, तुह्मी असें कां करतां?' ह्मणून राजा विश्वसेनानें प्रश्न केला. तेव्हां त्या ह्मणाल्या, "बाबा, तुमच्याकडून आमचें कांहींच न्यून पडलें नाहीं; पण आह्माला तुमचें तें ऐश्वर्य, व थाटमाट पाहून, मुळींच समाधान वाटत नाहीं. कारण हें सारें जग केवळ निःसार आहे. त्यांतूनही हें शरीर अगदींच असार आहे. त्यांतूनही आपल्याला इष्ट असेल त्याचा समागम झाल्यामुळें जें सुख प्राप्त होतें, तेंतर अगदींच खोटें आहे. स्वप्नांतलें राज्य आणि तें सुख यांत कांहींच अंतर नाहीं. वास्तविक पुसाल तर दुसऱ्याचें हित करणें; हेंच कायतें या असार संसारांत सारभूत आहे. आमच्या हातून दुसऱ्याचें काय हित होणार आहे? तेव्हां हें शरीर अर्पण करून त्याच्यायोगानें तरी प्राणिमात्राचें हित करावें असा आह्मी निश्चय केला आहे. जिवंत असतांच हें शरीर ह्या स्मशानांत सोडून जावें; असें आह्मांस वाटतें. कारण, बिचारीं श्वापदं याचें मांस यथेच्छ खाऊन तृप्ततरी होतील. आणि तेणेंकरून ह्या निरुपयोगी देहाचा कांहींतरी उपयोग झाला असें होईल! यद्यपि हें शरीर फार सुंदर दिसत आहे; तथापि परोपकाराच्या कामीं याचा उपयोग झाला नाहीं; तर, तें ठेवून काय करायचें आहे! वस्तुतः बाह्यात्कारें हें शरीर फार रमणीय दिसत आहे; पण, नीट विवेचन करून पाहिलें असतां यांत तसें कांहींच नाहीं. याविषयीं आह्मी एक लहानशी कथा सांगतों ती ऐकावी.

पूर्वी कोणी एक राजपुत्र लहानपणींच ह्या संसाराची असारता जाणून ऐहिक विषयांविषयीं अत्यंत निरीच्छ झाला. व त्याणें पारमा-

थिक साधन करण्याकरतां ऐन तारुण्याच्या बहरांतच संन्यास घेतला. तो केवळ क्षुधेच्या शांतीपुरतेंच अन्न संपादन करण्याकरतां कांहीं नियमित घरीं भिक्षा मागून त्यावर आपला निर्वाह करीत असे. एके-दिवशीं तो भिक्षेकरतां एका सावकाराच्या घरांत शिरला. यावेळीं घरांतल्या पुरुषमंडळींपैकीं कोणीही तेथें नव्हतें. सावकाराची तरुण व सुस्वरूप स्त्री बाहेरच्या ओट्यावर उभी होती. ह्या तेजस्वी संन्याशाला पाहतांच तिच्या मनाची स्थिती फार विलक्षण झाली. यद्यपि त्या राजपुत्रानें संन्यास घेतला होता, व त्याच्या अंगांवर एक लहान-भगव्या छाटीवांचून दुसरें कांहीं नव्हतें. हातांत एक भिक्षापात्र, तेंही भोपळ्याचें! कौपीन, कृष्णाजिन व कमंडलु एवढेंच काय तें त्याच्याजवळ होतें; तथापि त्याचें नैसर्गिक उत्तम स्वरूप नाहींसें झालें नव्हतें. आधींच तो राजपुत्र त्यांतूनही स्वरूपानें उत्तम असून तारुण्याच्या ऐन बहरांत आलेला होता. यामुळें त्यानें तो भिकारी वेष घेतला होता; तरी, नागरिक स्त्रियांच्या प्रेमकटाक्षांला पात्र होण्या-सारखाच तो दिसत होता. असो.

त्या कमलपत्राक्षाला पाहून त्याच्या मनमोहक आकृतीनें जिचें मन हरण केलें आहे, अशी ती सावकाराची स्त्री त्याला ह्मणाली, "हाय, हाय! अहो, असे सुंदर, आणि असे तरुण, असून तुह्मी ह्या वयांत हें असलें भिकार व्रत कशाकरतां धारण केलें? तुमचें शरीरच सांगत आहे कीं, मी गर्भश्रीमंतींत वाढलें आहे. असें असून तुह्माला ही अशी वाईट बुद्धी कां झाली? ह्या तुमच्या विशाल नेत्रांनीं ज्या स्त्रीचें अवलोकन केलें नसेल, तिलाच धन्य ह्मटली पाहिजे. कारण, हे जिच्यावर पडतील ती माझ्यासारखी तळमळल्यावांचून राहणार नाहीं!"

याप्रमाणें त्या स्त्रीनें मोहक भाषण केलें; पण तें ऐकून त्या राजपुत्राच्या वृत्तींत कांहींच फेरबदल झाला नाहीं. कारण, तो दुःखाकष्टानें विरक्त होऊन संन्याशी झाला नव्हता. सर्व प्रकारची अनुकूलता

असतांही केवळ या विषयसुखाचा परिणाम वाईट आहे, असें समजूनच त्याणें त्याचा त्याग केला होता. तेव्हां सावकाराच्या स्त्रीचे प्रेमकटाक्ष किंवा तिचें हळहळणें हें त्याच्या मनाला कसें क्षोभ उत्पन्न करील? असो, राजपुत्रानें तिच्या भाषणांतला एवढाच सारांश घेतला कीं, आपले डोळे हिला फार चांगले वाटले आहेत व त्यांला मोहित होऊन ही अशी हळहळत आहे, तर ते ठेवून काय करायचे आहेत! असा विचार करून त्याणें तत्काल आपल्या वाढलेल्या नखांनीं उजवा डोळा उपटून काढला. व तो रक्तबंबाळ झालेला डोळा तळहातावर घेऊन सावकाराच्या स्त्रीला ह्मणाला, "आई, पहा हें असलें वाईट आहे. ज्याला तूं मोहक व चांगला असें मानतेस त्यांत खरोखर चांगलें असें कांहींच नाहीं. हें घाणेरडें मांस आणि रक्त दिसतें आहे. इतकेंही असून जर तुला हा प्रिय वाटत असेल तर खुशाल घे. ह्या एका डोळ्यावरून दुसराही अशाच प्रकारचा आहे हें तुझ्या लक्षांत येईल. यावरून आतां तूंच सांग कीं यांत रम्य तें काय आहे!"

त्या सात राजकन्या बापाला ह्मणाल्या, "बाबा, हें त्या तरुण संन्याशाचें भाषण ऐकून; व त्याणें डोळा उपटण्याचें जें साहस केलें तें पाहून ती काममोहित झालेली सावकाराची स्त्री फारच खिन्न झाली. व एक डोळा उपटला तसाच हा आणखी दुसराही उपटतो कीं काय, याचें तिला मोठें भय वाटलें. आपण याची तशी तारीफ केली ह्मणून याणें हें साहस केलें, या गोष्टीचें तिला फारच वाईट वाटलें. ती डोळ्यांत दुःखाश्रू आणून ह्मणाली, "हायहाय! माझ्या हातून फार वाईट झालें. जळ्ली ती माझी जीभ मुळींच हालली नसती तर बरें झालें असतें! तुह्मी आपला डोळा उपटलात याला मी कारण झालें, याचें मला फार वाईट वाटतें."

याप्रमाणें ती स्त्री फार दुःखित झाली; असें पाहून तो तरुण संन्याशी ह्मणाला, "मातोश्रि, तुह्मी अशा कष्टी होऊं नका. हा माझा डोळा

उपटला गेला, हा तुह्मीं मजवर उपकारच केला असें मी समजतों. या संबंधानें तुह्मांला एक प्राचीन उदाहरण सांगतों तें ऐका. पूर्वी भागीरथीच्या किनाऱ्यावर एका सुंदर उपवनांत एक संन्याशी रहात होता. जणूं काय त्याचें वैराग्य कसोटीला लावण्याकरतांच तो संन्याशी तेथें तप करीत असतां; दैवयोगानें कोणी एक राजा आपल्या जनानखान्यांतील अनेक उत्तम स्त्रियांसहवर्त्तमान स्वेच्छ क्रीडा करण्याकरतां तेथें सहज प्राप्त झाला. राजानें यथेच्छ मदिरा प्राशन करून पुष्कळ वेळपर्यंत त्याठिकाणीं क्रीडा केली. पुनः मद्यप्राशन करून बहुतवेळ जलक्रीडा केली. नंतर श्रान्त झाल्यामुळें तो नदीच्या तीरावर एका शीतळ छायेच्या जागीं सुस्त निजला.

राजाला गाढ झोंप लागली आहे, असें पाहून, सभोंवतीं असलेल्या त्याच्या स्त्रिया कौतुकानें इकडेतिकडे संचार करूं लागल्या. स्त्रियांच्या अंगीं चपलता ही अगदीं स्वाभाविक असते. त्याप्रमाणें चहूंकडे फिरतां फिरतां त्या संन्याशाची बाग त्यांणीं पाहिली. व तेथें काय आहे; तें अवलोकन करावें ह्मणून कौतुकानें त्या बागेंत शिरल्या. तेथें स्वैच्छ फिरत असतां एका ठिकाणीं पानांनीं केलेल्या लहानशा झोंपड्यांत तो मुनि समाधि चढवून अगदीं निश्चल बसल्याचें त्यांच्या दृष्टीस पडलें. त्या खेलाडू स्त्रियांला त्या संन्याशाची मुद्रा पाहून तें एक मोठें कौतुकच वाटलें. ह्मणून त्या त्याच्या सभोंवतीं कोंडाळें करून बसल्या. व हा असा कां बसला आहे? हा कोण आहे! याविषयीं आपापल्यात कांहीं तर्क चालवूं लागल्या.

इकडे मद्याच्या धुंदींत निजलेल्या राजाचा कांहींवेळानें कैफ उतरला, व तो सावध होऊन आसमंतात् पाहतो तों, त्याच्या स्त्रिया तेथें कोठें दिसल्या नाहींत. स्त्रिया कोठें गेल्या; ह्मणून त्यांच्या शोधाकरतां राजा चहूंकडे धुंदीत धुंदीत सहज त्या मुनीच्या पर्णकुटिकेंत येऊन पोंहचला. तेथें पाहतों तों आपल्या स्त्रिया त्या ऋषीच्या भोंवतीं वेढा

देऊन बसल्या आहेत! वस्तुतः त्या स्त्रिया केवळ कौतुकानेंच तेथें बसल्या- होत्या. त्यांच्या मनांत हावेळपर्यंत कांहीं पापवासना आली नव्हती. व तो संन्याशी तर समाधींतच होता. त्याला आपल्या सभोंवतीं कोणी बसलें आहे हें मुळींच ठाऊक नव्हतें. तेव्हां राजाला त्यांत राग येण्या- सारखें कांहीं कारण नव्हतें. पण, विषयासक्त झालेला असून मद्यानें ज्याचा विवेक नष्ट झाला आहे, अशा राजाला तें पाहून फार राग आला! व आपल्या स्त्रिया आपल्याला सोडून याच्याकडे लक्ष्य लावून बसल्या आहेत, असें समजून त्याला त्या ऋषीविषयीं मोठी ईर्षा उत्पन्न झाली. अर्थात् त्याणें आपली तरवार उपसून त्या बिचाऱ्या शांत व निरूपद्रवी संन्याशावर तत्काल वार केला! हर, हर, हा केवढा अविचारीपणा! पण त्याबद्दल त्या मूर्ख राजाला तरी काय दोष द्यावा! ऐश्वर्य, ईर्षा, निर्द- यता, छाकटेपणा, आणि अविचारीपणा यांतून एकेकाच्या योगानेंदेखील मोठमोठे अनर्थ व्हायचे, मग हे पांच अग्नि एकत्र मिळाल्यावर रा- जाच्या हातून तसें कर्म झालें यांत काय आश्चर्य आहे! असो.

त्या अविवेकी पुरुषानें त्या संन्याशावर प्रहार करून आपल्या स्त्रि- यांला दरडावून तेथून उठण्यास सांगितलें. व त्याही बिचाऱ्या भयभीत होऊन उठल्या. त्यांसहवर्त्तमान तो परत स्वस्थानीं निघून गेला. तो मुनि समाधिस्थ असल्यामुळें राजानें तरवारीचा वार केला; तरी त्याचें त्याला भान नव्हतें. सुदैवानें त्याच्या शरीराचे दोन तुकडे झाले नाहींत तरी जखम मोठी झाल्यामुळें त्याच्या अंगांतून रक्ताचा पाट वाहूं लागला होता. लौकरच समाधि उतरून तो पूर्व स्थितीवर आला, व त्याणें ती अवस्था पाहिली. तथापि विवेकानें मनाला स्थीर करून, त्याणें त्याबद्दल कांहींच विषाद मानला नाहीं. वस्तुतः तो यावेळीं राजाला शापून भस्म करण्यासदेखील समर्थ होता. पण, त्याणें आपलें मन मुळींच उच्छृं- खल होऊं दिलें नाहीं. ही त्याची विलक्षण शांतता पाहून; तेथें एक देवता प्रगट होऊन त्या ऋषीला ह्मणाली, "हे महात्म्या, ज्या पापिष्ठानें

विनाकारण तुझ्या शरीरावर प्रहार केला; त्याचा सूड घ्यावा असें माझ्या मनांत आहे. तूं अनुमोदन देशील तर मी त्या चांडाळाला आपल्या सामर्थ्यानें आतांच ठार मारून टाकतें."

हें त्या देवतेचें भाषण श्रवण करून तो शांत संन्याशी तिला ह्मणाला, "देवी, कृपा कर. असें मनांत आणूं नकोस. तो राजा धर्माच्या कामांत माझा मोठा साह्यकर्त्ता झाला आहे. त्याणें माझें कांहींच अप्रिय केलें नाहीं. त्याच्या कृपेनें मला क्षमा प्राप्त झाली. नाहींतर ह्यावेळपर्यंत मला तिचा लाभ झाला नसता. जर त्याणें माझ्यावर असा प्रहार केला नसता; तर मीं कोणावर क्षमा केली असती ? कारण, तसें करण्याला जागाच नव्हती. ती त्याणें प्राप्त करून दिली. यांत त्याणें माझें अप्रिय केलें कीं; त्याणें मजवर अनुग्रह केला, याचा तूंच विचार कर. विचारी पुरुषानें ह्या नश्वर शरीराकरतां कोप करण्यांत काय अर्थ आहे ? व तो कां करावा ? प्रिय आणि अप्रिय या दोहोंवरही साम्य ठेवावें. व सर्वांची क्षमा करावी. ब्रह्मपद जें ह्मणतात; तें दुसरें कांहीं नाहीं. क्षमा हीच ब्रह्मपद आहे."

ह्याप्रमाणें त्या प्रशांत मुनीचें भाषण श्रवण करून त्यादेवतेला फार समाधान वाटलें. आधींच त्याच्या तपानें ती संतुष्ट झाली होती. त्यांतही त्याची शांति पाहून तिला फारच संतोष झाला. त्याच्या भाषणावर आणखी कांहीं न बोलतां आपल्या दिव्य प्रभावानें त्याच्या अंगावर झालेला वार नाहींसा करून देवता तेथल्या तेथेंच अदृश्य झाली.'

याप्रमाणें कथा सांगून तो तरुण संन्याशी दुःखित झालेल्या सावकाराच्या स्त्रीला ह्मणाला, "आई, त्या ऋषीला जसा तो राजा उपकारी वाटून तो त्याच्यावर रुष्ट झाला नाहीं. तसाच डोळा उपटण्याला तूं कारण झाल्यामुळें मी, तूं आपल्यावर उपकार करणारी आहेस; असें समजून तुझ्यावर प्रसन्न झालों आहें. तूं यायोगानें माझ्या तपाची वृद्धीच केलीस, असें मीं मानतों. हे नश्वर व मोहक विषय पाहून मनाला

क्षोभ करणारा असा हा एक डोळा नाहींसा झाला हें फार चांगलें झालें. असाच दुसराही नष्ट होईल तर मला विशेष संतोष वाटेल!" असें बोलून तो दुसरा डोळा उपटण्याचा प्रयत्न करूं लागला. तें पाहतांच, सावकाराच्या स्त्रीनें त्याचे पाय घट्ट धरले व तसें न करण्याविषयीं आग्रहपूर्वक त्याची प्रार्थना केली. वस्तुतः ती कामवश होऊन त्याच्यावर साभिलाष झाली होती; पण त्याची स्थीर वृत्ति पाहून तिला आपलीच आपल्याला लाज वाटली. व तत्काल शुद्ध अंतःकरणानें तिणें त्याच्याजवळ क्षमा मागितली. तेव्हां तिचें समाधान करून, अत्यंत सुंदर अशाही आपल्या शरिरावर आस्था न ठेवणारा असा तो तरुण राजपुत्र सिद्धी प्राप्त होण्याकरितां, जेथें मनुष्याचें कधीं दर्शनदेखील होणार नाहीं; अशा गहन अरण्यांत जाता झाला."

याप्रमाणें उदाहरण सांगून त्या सातही राजकन्या पित्याला ह्मणाल्या, "बाबा, हें शरीर अद्याप तरुण आहे; फार मनोहर दिसतें; व निरोगी आहे; तथापि, आज नाहीं उद्यां, कधींतरी याचा नाश होणार आहे; तेव्हां त्याच्यावर इतकी आस्था ठेवण्यांत काय अर्थ आहे! याचा प्राणिमात्राच्या उपकाराकडे उपयोग करणें हेंच शहाण्या मनुष्याचें कर्तव्य आहे. याकरतां आह्मीं, स्वभावतःच सुखाचें स्थान अशा या स्मशानांत राहून प्राणिमात्राच्या उपयोगाकरितां हें शरीर येथें ठेवावें; असा निश्चय केला आहे. ज्यापेक्षां हें क्षणिक आहे; त्यापेक्षां आज नाहीं तर उद्यां आपण याचा योग्य उपयोग करूं असें ह्मणतां येत नाहीं. मनांत येतांच तत्काळ तसें केलें पाहिजे. अतएव आपण आमच्या ह्या चांगल्या विचाराच्या आड न येतां आह्मावर अनुग्रह करावा."

त्या मुलींनीं याप्रमाणें मोठ्या प्रौढ व अगदीं यथार्थ अशा ज्या गोष्टी सांगितल्या; त्या श्रवण करून त्यांचा पिता थक्क झाला. त्याला त्यावर एक चकारशब्ददेखील काढण्यास सवड नाहींशी झाली. यावेळीं त्या सात मुलींबरोबर पुष्कळ परिवार होता. त्यांनीं त्यांचें भाषण

ऐकून—जरी तो त्यांचा व्यवसाय त्यांना पसंत नव्हता तरी—त्यावर कांहींच भाषण केलें नाहीं. इकडे त्या सातही बहिणींनीं आपला पिता राजा **विश्वसेन** व इतर आप्त संबंधी वगैरे लोकांचा स्नेहपूर्वक निरोप घेतला, आणि त्या स्मशानांत परोपकारार्थ देहत्याग करण्याकरितां एका ओळीनें पवित्र आसनें घालून त्यांणीं प्रायोपवेश[1] केला! लौकरच स्मशानांत संचार करणाऱ्या क्रूर श्वापदांनीं त्यांच्या त्या सुंदर शरिरांचे लचके तोडून केवळ हाडांवांचून बाकी पार नाहींसें केलें. अर्थात् आपल्या शरिराचा परोपकाराच्या कामीं उपयोग करून; त्या सातही बहिणी उत्तम सिद्धीला प्राप्त झाल्या."

याप्रमाणें धर्माचें व्याख्यान करणाऱ्या त्या जतीनें उदाहरणाकरतां सात राजकन्यांची कथा सांगून; तो श्रोत्यांला उद्देशून ह्मणाला, "सज्जनहो, बुद्धिवान् मनुष्यांची त्या सात राजकन्यांप्रमाणें प्रत्यक्ष आपल्या शरिरावरदेखील ममता असत नाहीं. मग, पुत्र, स्त्रिया, आप्त, संबंधी, घरदार इत्यादि, गवतासारखा केवळ तुच्छ असा जो परिवार त्याच्यावर कोठून असेल! तात्पर्य इतकेंच कीं ह्या दृश्य जगांतील सर्व वस्तू नश्वर आहेत. तेव्हां त्यांच्यावर ममता धारण न करतां अविनाशी अशा आपल्या आत्म्याकडे लक्ष्य ठेवणें हेंच मुख्य आहे."

राजा **कलिंगदत्त** उद्विग्न होऊन मठांत गेला होता, व तो धर्मोपदेशकाचें व्याख्यान ऐकत बसला होता; हें वर सांगितलेंच आहे. वस्तुतः तो उपदेश श्रवण करून त्याचें मन शांत झालें पाहिजे होतें; पण तसें कांहीं झालें नाहीं. उघडच आहे, अग्नी हा जाळण्यास समर्थ आहे; पण, तो जर एखाद्या दगडावर पडला तर आपोआपच नाहींसा होतो. कारण, तेथें जाळण्यासारखें कांहीं द्रव्यच नाहीं, तेव्हां त्याचा काय इलाज चालणार? असो. राजानें तो सारा दिवस त्या

१ एका विवक्षित ठिकाणीं केवळ मरण येण्याकरतांच बसायचें व मध्यंतरीं कांहीं झालें तरी उठायचें नाहीं; असा संकल्प करून बसणें; याला प्रायोपवेश असें म्हणतात.

मठांत धर्मचर्चा श्रवण करण्यांत घालविला. आणि सायंकाळ होतांच पुनः आपल्या वाड्यांत निघून गेला. मठांत होता तोंपर्यंत त्याचें मन शांत झालें नव्हतें; तथापि, पुत्र झाला नाहीं ; या दुःखाचा त्याला तेवढा-वेळतरी अंमळ विसर पडला होता. पण परत घरीं येतांच पुनः त्या दुःखाचा उद्भव झाला. तो अगदीं दीन व उदास होऊन आपल्या महालांत एकांतीं शोक करीत बसला. राजा दुःखित व अस्वस्थ झाल्यामुळें राजवाड्यांतलि सर्व मंडळी व प्रधान वगैरे कामदार-लोक फारच कष्टी झाले. केवळ मुलगी झाली, येवढ्याच कारणावरून राजानें असा शोक करावा ; हें त्यांला योग्य वाटलें नाहीं. पण, तसें म्हणावें कोणी ! बोलूनचालून त्याच्या कृपाकटाक्षांवर सर्वांचें जिणें असल्यामुळें प्रधानादिकांची पुढें जाण्याची छाती झाली नाहीं.

याप्रमाणें जिकडेतिकडे सर्व लोक स्तब्ध व दुःखित झालेले पाहून त्यांत एक वृद्ध गृहस्थ होता, तो पुढें सरसावला. हा मोठा विद्वान् ब्राह्मण असून प्रतिष्ठित होता. ब्राह्मणाच्या अंगीं हवें तें बोलण्याचें धैर्य विशेष असतें. वाणी हीच काय तें त्यांचें शस्त्र. अर्थात् ते त्याचा बराच स्पष्टपणें उपयोग करतात. असो. तो वृद्ध ब्राह्मण राजाच्या जवळ जाऊन त्याला ह्मणाला, "राजन् केवळ कन्यारत्न झालें येवढ्याबद्दलच असा शोकाकुल कां झालास ? तुला ठाऊक नाहीं काय ? कीं, गुणवती कन्या पुत्रापेक्षांही उत्तम होतात. व त्यांच्यापासून इहपरलोकीं कल्याण प्राप्त होतें. नीट विचार करून पहा कीं; राजाला जे पुत्र होतात ते जन्मतचः राज्याविषयीं कामुक असतात. खरें ह्मटलें तर तुमच्यासारख्या राजांनीं पुत्रांची इच्छा मुळींच करूं नये. कारण ते मर्कटासारखे निर्दय होऊन राज्याकरतां प्रत्यक्ष आपल्या बापालाच खाऊन टाकतात ! केवळ राज्यलोभानें पित्याला कैदेंत ठेवणारे; किंवा त्याला वनवासास धाडणारे व त्याचा वध करणारे असे राजपुत्र प्राचीन इतिहासांत थोडेथोडके उपलब्ध आहेत कां ? बरें मुलगी ही केवळ वाईट असें ह्मटलें तर कुंति-

भोज[1] राजा ययाति[2] इत्यादि मोठमोठे राजे केवळ आपल्या मुलींच्या उत्तम गुणांनींच मोठमोठ्या संकटांतून पार पडले असल्याचें तुला माहीत नाहीं काय ? याशिवाय कन्यादानाचें जें उत्तम फल आहे तें; पुत्रांपासून ह्या लोकीं किंवा परलोकींदेखील कोठून प्राप्त होणार आहे ? खरोखर तें फल फारच श्रेष्ठ आहे. याविषयीं मी तुला सुलोचनेची कथा सांगतों; ती ध्यान देऊन श्रवण कर.

पूर्वी चित्रकूट नांवाच्या पर्वतावर सुषेण नांवाचा तरुण राजा

---

१ पांडवांची आई कुंती नामक होती हें प्रसिद्धच आहे. तिच्या पित्याचें नांव कुंतिभोज लहानपणीं ती आपल्या बापाच्या घरीं असतां; दुर्वासऋषि मुद्दाम तिच्या पित्याचा छल करण्याकरतां ह्मणून त्याच्या घरीं आला होता. व त्याच्याहातून आपली सेवा यथासांग झाली नाहीं तर त्याला शाप द्यावा, असा त्याचा हेतू होता. पण कुंतीनें त्या तसल्या आगजाळ्या ऋषीची सेवा इतकी उत्तम केली कीं, तिच्यायोगानें तो अत्यंत प्रसन्न होऊन कुंतीला व राजाला वर देऊन गेला ! या कथेचा पूर्वीही उल्लेख झाला आहे.

२ राजा ययाति आपल्या मोठ्या पुण्याच्या प्रभावानें स्वर्गलोकीं गेला होता. त्याचें तें तेज इंद्राला सहन झालें नाहीं. त्याणें कसे तरी करून याला खालीं पाडावा असा निश्चय केला. एकेदिवशीं राजा सभेंत बसला असतां इंद्रानें—'राजा ययाते, तुझे पुण्य येथें बसलेल्या कोणत्या पुरुषाच्या बरोबरीचें आहे तें सांग ? ' असा प्रश्न केला. तेव्हां—'येथें बसलेल्यांपैकीं माझ्या बरोबरीचा पुण्यवान् एकही नाहीं,' असें राजाच्या तोंडातून निघालें. तें ऐकून इंद्राला फार आनंद झाला. 'तूं येथील सर्वांचा अपमान केलास; त्यायोगानें तुझ्या पुण्याचा क्षय झाला. तेव्हां आतां खालीं पड,' असें सांगून इंद्रानें आपल्या दूतांस राजाला मृत्युलोकीं पाडण्यास सांगितलें ! राजा ह्मणाला, 'बरें, तसें झालें तरी कांहीं चिंता नाहीं; पण, मी खालीं पडेन तो सज्जनाच्या समाजांत माझें पतन होईल, येवढें तरी करा.' ही राजाची विनंती मान्य करून देवदूताकरवीं इंद्रानें त्याला खालीं ढकलून दिला. तो गंगायमुना नदीच्या संगमावर शिबि, अष्टक इत्यादि चौघे राजे जेथें यज्ञ करीत होते, तेथें पतन पावला. त्याणें भूमीला स्पर्श केला नव्हता अशा स्थितींत त्याची कन्या तेथें प्राप्त झाली. अष्टक, शिबि वगैरे चौघे राजे हे तिचे पुत्र, अर्थात् राजा ययातीचे दौहित्र होते. त्या मुलीनें आपल्या पुत्रांला हा तुमचा आजोबा आहे असें सांगून आपल्या पुण्यानें त्याला परत स्वर्गावर चढविण्यास सांगितलें. व त्याप्रमाणें त्या चौघांनींही आपापलें पुण्य देऊन राजा ययातीला पुन: स्वर्गलोकांत पोंचविला ! ही कथा महाभारतांत वनपर्वांत सांगितली आहे.

होता. शंकरानें कामाला जाळला, ह्मणून त्याच्या ईर्ष्येनें, ब्रह्मदेवानें ह्या एक दुसरा कामच उत्पन्न केला कीं काय; असा तो राजा फार सुंदर होता. त्याणें आपल्या राजधानीचें मुख्य स्थान चित्रकूटच केलें होतें. त्या विस्तीर्ण पर्वताच्या पायथ्याशीं पुष्कळ पाण्याचे झरे वहात होते. व जमीनही फार चांगली होती. तेव्हां तेथें बाग केली तर उत्तम होईल असें समजून राजानें तेथें एक विस्तीर्ण उपवन तयार केलें. राजेलोकांचा स्वभाव लहरी असतो. एकदां एका गोष्टीकडे त्यांचें लक्ष्य लागलें ह्मणजे ते, आपलें सर्व सामर्थ्य तिकडे खर्च करण्याविषयीं मागेंपुढें पहात नाहींत. राजा सुषेणाचें त्या बागेकडे चित्त विशेष लागलें होतें. त्याणें अतोनात खर्च करून ती बाग इतकी सुंदर तयार केली कीं; तिच्या पुढें देवांचें नंदनोद्यानदेखील अगदीं फिक्कें पडलें ! राजानें त्या बागेच्या मध्यभागीं एक सुंदर तळी तयार केली होती. तींत कमळें प्रफुल्लित असत. त्यावरून लक्ष्मीच्या हातांतल्या लीलाकमलांचें, ती तळी हें एक स्थानच आहे कीं काय; असें वाटत होतें. जिला रत्नखचित पायऱ्या लावल्या आहेत अशा त्या तळीच्या कांठीं बसून राजा एकटाच पुष्कळवेळ आपल्या मनाची कर्मणूक करीत असे. राजा सुषेणाला त्याच्या मनाजोगती व अनुरूप अशी स्त्री नसल्यामुळें तो सचिंत होता. वस्तुतः तशा रमणीय स्थलीं कांतेसह संचार करणें योग्य होतें; तरी निरुपायास्तव तो एकटाच त्या बागेंत क्रीडा करीत असे. राज्यकारभाराचीं कामें आटपलीं; ह्मणजे त्याणें त्या बागेंत जाऊन मनाची कर्मणूक करीत असावें असा त्याचा नित्यक्रम चालला होता.

एकेदिवशीं राजा आपल्या उपवनांत संचार करीत असतां त्यावरून आकाशमार्गानें रंभा नांवाची अप्सरा सहज जात होती. ती किन्नरांच्या भवनांतून, विश्रांति घेण्याकरितां भूलोकाची शोभा अवलोकन करीतकरीत स्वर्गाकडे चालली होती. बगीच्यांत एकटाच संचार करणाऱ्या, प्रफुल्लित फुलबागेंत विहार करणाऱ्या वसंताप्रमाणें, राजा-

ला अवलोकन करून अप्सरा चकित होत्साती एकाएकीं तेथेंच थबकली. यावेळीं राजा **सुषेण**, जींत अनेक सुंदर कमलें प्रफुल्लित झालीं आहेत, अशा तळीच्या कांठीं बसला होता. त्याचें तें सुंदर रूप अवलोकन करून **रंभा** मनांत ह्मणाली, हा पुरुष कोण असावा बरें? प्रत्यक्ष **चंद्र**च असेल हा! पण **चंद्रा**ची शोभा सार्वकाळ एकसारखी राहणारी नाहीं. तिला क्षय आणि वृद्धी आहे. आणि याची कांतीतर सारखी आहे. तेव्हां हा **चंद्र** नसावा. कदाचित् पुष्पधन्वा जो **मदन** तो फुलें नेण्याकरतां येथें आला असावा. पण असें ह्मणावें तर त्यामदनाबरोबर त्याची सहचारिणी **रति** असायची, तीतर येथें कोठें दिसत नाहीं. तेव्हां याला **काम** तरी कसें ह्मणावें? हा कोणीही असो; सौंदर्याच्या संबंधानें आजपर्यंत या जगांत जे प्रसिद्धीस आले आहेत, त्या सर्वांच्या वरचढ असा हा कोणी तरी निराळाच असावा असें वाटतें. मी पुष्कळ प्रयत्न केला तरी माझी दृष्टी याच्यावरून चळत नाहीं. व याच्याजवळ गेलेलें मनही परत येत नाहीं! तेव्हां पुढें जाऊन तरी काय उपयोग? जेथें मन आणि दृष्टी आसक्त झालीं आहेत त्यालाच हें शरीरही अर्पण केलें पाहिजे. त्याशिवाय गती नाहीं. असा विचार करून त्याच्याविषयीं अनेक प्रकारचे तर्क करणारी **रंभा**, मनुष्याचें रूप धारण करून, राजा **सुषेणा**च्या जवळ प्राप्त झाली. बागेंत तो एकटाच संचार करीत असतां अकस्मात् ती दिव्यस्त्री **रंभा** त्याच्यापुढें प्रकट झाली, तेव्हां राजाला अतिशय विस्मय वाटला. तो मनांत ह्मणाला, ही अप्रतिम रूपवती कोण आहे हें कांहीं समजत नाहीं. लक्ष्यपूर्वक पाहून ह्मणाला, ही मनुष्य तर नव्हेच यांत कांहीं संशय नको. कारण हिचे पाय जमिनीला लागलेले नाहींत. व पापण्या झांकणें व उघडणें हा डोळ्यांचा व्यापार मुळींच होत नाहीं. तेव्हां या लक्षणांवरून ही कोणी तरी दिव्य स्त्री आहे, यांत संशय नाहीं. ही कोठली? कोण? व कोणाची? हें विचारून घ्यावें असें माझ्या मनांत आलें आहे; पण एकाअर्थी तसें

करूं नये असेंही वाटतें. कारण ही कोणत्या हेतूनें व कशारितीनें आली आहे; हें आपल्याला ठाऊक नाहीं. मी आधीं चौकशी केली आणि तिला त्या गोष्टी सांगायच्या नसल्या ह्मणजे ती कदाचित् मुकाल्यांनीं चालती होईल. कांहीं कारणानें मनुष्यांशीं सहवास ठेवणाऱ्या दिव्य स्त्रियांला, आपली खरी हकीकत दुसऱ्याला कळविणें हें इष्ट वाटत नाहीं. तेव्हां ती कोणीही असेना बापडी! तिच्या नांवागांवाशीं आपल्याला काय करायचें आहे? ती आपल्यावर प्रेमकटाक्ष फेंकीत आहे, त्यांला आपण मुकाल्यांनीं पात्र व्हावें ह्मणजे झालें! असा विचार करून राजा चकित होऊन तिच्याकडे अवलोकन करीत उभा राहिला. इतक्यांत तीही त्याच्या जवळ आली.

राजा कांहीं बोलत नाहीं असें पाहून रंभेनें प्रेमपूर्वक त्याच्याशीं भाषणाला आरंभ केला. बोलतां बोलतां अगदीं जवळ येऊन उभ
यतांनीं एकमेकांचे हातही धरले. व लौकरच रंभे
गनाचा लाभ दिला! आणि कांहीं विशेष संके
त्याच्या सहवासांत राहण्याची आपली इच्छा
विचारतां! ज्या वस्तूच्या लाभाविषयीं दैवशाली
कधीं कल्पनादेखील आली नव्हती. ती घे ह्मण
झाल्यावर त्याला किती आनंद झाला असेल
येईल? असो. राजानें कांहींवेळ रंभेसहव
सायंकाळीं तिला आपल्या महालांत नेली. व
राहिली असती, तिच्यापेक्षांही तिची विशेष
दिवसपर्यंत तो तिच्या सहवर्तमान अनेक
उपभोग घेत होता. तीही त्याच्यावर इत
पुढें तिला स्वर्गाचीदेखील आठवण झाली
मनुष्याला प्रेम जितकें रमवितें तितकी ज

रंभेची एक यक्षिण परम मैत्रीण हे

तरी प्रिय करावें ह्मणून तिणें एकेदिवशीं राजा सुषेणाच्या बागेंत सो- न्याची वृष्टी केली! जिकडे पहावें तिकडे सोनेंच सोनें करून सो- डलें. मेरुपर्वताचीं शिखरें जशीं चकचकित दिसतात तसें त्याबागेंती- ल कृत्रिम क्रीडापर्वत सुवर्णमय दिसूं लागले. तें पाहून राजाला फार आनंद झाला. आधींच तो मोठा संपन्न होता. त्यांतून ही सोन्याची वृष्टि झाल्यामुळें कुबेराशीं स्पर्धा करण्यासारखें त्याचें ऐश्वर्य झालें. एवढें मोठें ऐश्वर्य व रंभेसारखी उत्तम स्त्री, या दोहोंची प्राप्ती झाल्यावर कोण मनुष्य आपल्याला धन्य मानणार नाहीं! राजा सुषे- ण अप्सरेसहवर्त्तमान मृत्युलोकीं असतांही स्वर्गसुखाचा अनुभव घेऊं लागला. लौकरच त्याची प्रिया रंभा गर्भार होऊन उत्तम योगा- वर प्रसूत होऊन तिला कन्या झाली. उत्तम खाणींत जें रत्न उत्पन्न होतें तें तसेंच असायचें. प्रत्यक्ष रंभेचीच कन्या ती, तिच्या रूपाची व ...गा कोणाला कशी येईल?

...प्रियपत्नीचा सुखानें प्रसव झाला म्हणून आनंदित ...ला दुःखाचा अनुभव घेण्याचा प्रसंग आला. ...ख असो, बहुत करून त्याचा परिणाम दुःखांत ...हीं. त्याप्रमाणें राजा सुषेणावरही, आजपर्यंत ...नुभवलें; त्याबद्दल आतां दुःखाचा अनुभव घे- ... रंभा इतकेदिवस त्याच्याजवळ येऊन रा- ... कारण होतें. देवता विनाकारण मनुष्यलो- ... तिला शाप झाला होता ह्मणून ती इतके ... हिली होती. प्रसूत होतांच शाप सरेल असा ... जाला ह्मणाली, "महाराज, मी शापामुळें

---

...मोठें चमत्कारिक केलें आहे. पृथ्वीच्या मध्य- ..., तिच्या मध्यबिंदूवर मेरु नांवाचा मोठा पर्वत ...रा सोन्याचा आहे असें त्यांचें मत आहे!

येथें प्राप्त झालें होतें. आपल्या सहवासांत माझे इतके दिवस अत्यंत सुखानें गेले. जरी मी मृत्युलोकांत होतें; तरी मला येथें स्वर्गापेक्षांही अधिक आनंद वाटत होता. प्रसूत होई तोंपर्यंतच मी यालोकीं रहावें असा नियम असल्यावरून आतां माझा शाप सरला. व मी आपल्या स्थानीं परत जाण्यास तयार झालें आहें. हावेळपर्यंत मी स्वतःची आपल्याला कांहीं विशेष माहिती सांगितली नाहीं. मी स्वर्गलोकांत राहणारी **रंभा** नांवाची अप्सरा आहें. आह्मी कधीं कधीं शापादिकांच्या निमित्तानें भूलोकीं येतों; पण त्याचा अवधि बहुतकरून प्रसूतिकालापर्यंत असतो. बाळंत होतांच मुलाचा त्याग करून स्वर्गलोकीं जाण्याचा आह्मा अप्सरांचा संप्रदायच आहे. तर आपण याबद्दल मला बोल लावूं नये. ह्या मुलीचें आपण उत्तमप्रकारें रक्षण करावें. मला पुरतें ठाऊक आहे कीं; आपली माझ्यावर अतिशय प्रीति आहे व तीमुळें यावेळीं आपल्याला माझा वियोग असह्य होऊन फार दुःख होणार आहे; पण त्याविषयीं माझा निरुपाय आहे. मला तर आतां गेलेंच पाहिजे. तथापि, स्वर्गलोकांत आपणां उभयतांचा समागम होईल. हें अगदीं खचित आहे, व तो योग या मुलीचें लग्न होईल, त्यावेळीं घडून येणार आहे."

असें भाषण करून ती श्रेष्ठ अप्सरा राजाला सोडून जाण्याच्या संबंधानें फार दुःखित झाली होती. तरी देवांची मर्यादा राखण्याकरतां; प्रीतिपूर्वक राजाचा निरोप घेऊन तेथल्या तेथेंच अदृश्य झाली. राजाला तिचें भाषण ऐकून इतकें दुःख झालें होतें कीं; त्याचा गळा दाटून आल्यामुळें त्याच्या तोंडावाटें एक शब्ददेखील निघाला नाहीं. आपली प्राणप्रिया एकाएकींच गुप्त झाल्यामुळें तो अगदीं निरुत्साह झाला. एखाद्या उंच पर्वतावरून खालीं ढकलून द्यावें, त्याप्रमाणें त्याची अवस्था झाली. त्या अप्सरेच्या सहवासानें तो हावेळपर्यंत सुखाच्या शेवटच्या पायरीवर विहार करीत होता. तो आतां एकाएकीं धाडकन् खालीं दुःखांत पतन पावला. प्रियेचा वियोग असह्य झाल्यावरून त्याणें प्राणत्याग करण्याच

निश्चय केला. यद्यपि 'मुलीचें लग्न होतांच आपणा उभयतांचा पुनः समागम होईल,' असें **रंभेनें** आश्वासन दिलें होतें. तथापि राजाला यावेळीं त्याचा फारसा खरेपणा वाटला नाहीं. मरणाच्या तयारींत आहे असें पाहून दुःखित झालेल्या त्याच्या प्रधानमंडळीनें राजाचें अनेक प्रकारें समाधान करण्याचा प्रयत्न केला.

प्रधान ह्मणाले, "महाराज, आपण असे उदास होऊं नका. **विश्वामित्राला** **मेनका** सोडून गेली व तिची पुनः भेट होईल; अशी त्याला बिलकूल आशा नव्हती. तथापि, त्याणें आपल्या मनाचें समाधान केलें नाहीं का? ज्या **शकुंतलेला** प्रसवून **मेनका स्वर्गलोकाला** निघून गेली. तिच्यावर प्रेम ठेवून **विश्वामित्रानें** वियोगाचें दुःख सहन केलें. आपल्याला तर पुनः समागम होण्याची आशा आहे. असें असून आपण जिवावर उदार झालां हें योग्य नाहीं." इत्यादिप्रकारें अनेक प्राचीन इतिहास वगैरे सांगून सचिवांनीं राजाचें समाधान केलें.. तेव्हां हळूहळू त्याणें धैर्य धरलें व त्या मुलीच्या रक्षणाकडे विशेष लक्ष्य लावलें. **रंभेचा** पुनः समागम होण्याविषयीं ही मुलगीच कारण आहे, असें तो समजला.

ती मुलगी सर्वांगसुंदर होती. तिचे नेत्र तर फारच पाणीदार होते. ह्मणून राजानें तिचें **सुलोचना** असें नांव ठेविलें. तो प्रेमपूर्वक तिचें लालनपालन करीत असतां ती कन्या लौकरच बालपणाचें अतिक्रमण करून तारुण्यावस्थेंत प्राप्त झाली. तेव्हां राजाच्या मनांत तिच्या विवाहाची काळजी उत्पन्न झाली. व तो योग अनायासें घडून आला. एकेदिवशीं **कश्यप** गोत्रांत उत्पन्न झालेला **वत्स** नांवाचा ऋषि स्वेच्छेनें फिरतफिरत राजाच्या येथें प्राप्त झाला. तेथें बापाजवळ बसलेल्या **सुलोचनेला** अवलोकन करून त्याचें मन तिच्यावर आसक्त झालें. तो मुनि तपाचा केवळ राशि होता, व त्याणें इंद्रियांचा जय केला होता. तरी, ती राजकन्या दृष्टीस पडतांच मोहित होऊन; तो लौकरच तिच्या प्रेमरसाचा आस्वाद घेऊं लागला. तो तिची तारीफ करीत होत्साता मनांत ह्मणा-

ला; अहाहा ! हिचें रूप फारच सुंदर आहे. इतकेंच नव्हे; तर मनुष्य-लोकांत अशी लावण्यवती कशी उत्पन्न झाली याचें आश्चर्य उत्पन्न करणारें आहे. हिला पाहून माझें चित्त विवेकानें कितीही मागें ओढलें तरी अगदीं अनावर झालें आहे. काय पाहिजे तें होवो; पण ही माझी बायको झालीच पाहिजे. तसें न होईल तर माझ्या एवढ्या तपाचें फल तें मला दुसरें कोणतें प्राप्त होणार आहे ?

आपल्या मनांत याप्रमाणें विचार करणारा तो तरुण ऋषि राजकन्या **सुलोचना** हिणें अवलोकन केला. ज्याच्यावर धूर नाहीं अशा रसरशीत अग्नीसारखें त्याचें तेज पाहून तिलाही तो दर्शनीय वाटला. ज्यानें हातांत रुद्राक्षाची माळ घेतली आहे. व कमंडलु धारण केला आहे. तेजानें उग्र पण एरवीं शांत असून दर्शनीय अशा त्या ऋषीला अवलोकन करून **सुलोचने**च्या मनांत त्याच्याविषयीं प्रेम उत्पन्न झालें व ती आपल्या मनांत हा कोण असावा ? याविषयीं तर्क करूं लागली. शिष्टांच्या संप्रदायाप्रमाणें त्या तपस्वी अतिथीला नमस्कार कर, असें बापानें सांगितल्यावरून आपल्या नेत्रकमलांची माळ जणूं काय त्याला वरण्याकरतांच त्याच्या अंगावर फेंकणारी; ती सुंदरी हळूच पुढें येऊन, अंतःकरण साभिलाप असल्यामुळें जिचें शरीर अंमळ जड झालें आहे अशी होत्साती त्या ऋषीला नमस्कार करिती झाली. व त्याणेंही तिला 'तुला चांगला पति प्राप्त होवो!' असा आशीर्वाद दिला. देवदैत्यांला ज्यांची आज्ञा उल्लंघन करण्याचें सामर्थ्य होत नाहीं अशा **काम**देवाचा आज्ञाधारक झालेल्या त्या **वत्स** ऋषीनें तोंडावाटें आशीर्वाद काढला तो फारच जड स्वरानें निघाला.

ऋषीचें चित्त ठिकाणावर नसल्यामुळें तो बराचवेळ तटस्थ बसला होता. नंतर मनाचें अंमळ समाधान करून राजानें केलेल्या कुशलप्रश्नाचें त्याणें उत्तर दिलें. व नंतर उभयतांच्या कांहीं गोष्टी झाल्या. अशा तपोनिधीचा कांहीं दिवस तरी सहवास व्हावा ह्मणून राजानें

तशा अर्थाची विनंती केली. व **सुलोचने**कडे अंतःकरण वेधल्यामुळें ऋषीला त्याच्या घरीं राहणें इष्ट होतें, ह्मणून त्यानेंही ती मान्य केली. प्रत्यहीं कांहीं निमित्त करून **सुलोचने**च्या प्रेमकटाक्षांला पात्र होण्याविषयीं त्या ऋषीचा एकसारखा प्रयत्न चालला होता. तिच्याजवळ आपल्याला वरण्याविषयीं गोष्ट काढावी असें ऋषीच्या मनांत वरचेवर येत होतें. पण ती बापाच्या अधीन आहे; असें समजून त्याणें तसें केलें नाहीं. व राजाला तुझी कन्या दे असें ह्मणावें; तर तो कदाचित् नाहीं ह्मणेल तर आपला अपमान होईल, ह्मणून त्याच्याजवळही गोष्ट काढण्यास त्याला संकोच वाटूं लागला. क्षणोक्षणीं **कामराजा**नें तीक्ष्ण बाणांचा प्रहार करण्याचा क्रम चालू ठेवल्यामुळें तो विलक्षण फिकिरींत पडला असतां लौकरच त्याला संधी मिळाली.

एकेदिवशीं राजा बरोबर नसतां **सुलोचना** एकटीच त्याला कांहीं वस्तू देण्याकरतां **वत्स**ऋषीजवळ आली. ही संधी पाहून असामान्य अशा तिच्या रूपानें मोहित झालेल्या ऋषीनें लज्जेला अंमळ एका बाजूला ठेवून तिला आपला हेतू कळविला. तीही त्याच्यावर आसक्तहृदय झाली होती. तरी लज्जावश होऊन मान खालीं घालून तिणें ऋषीचें भाषण शांतपणें ऐकून घेतलें. आणि त्याला ह्मणाली, "महाराज, जर खरोखरीच आपली अशी इच्छा असेल; व जर त्यांत थट्टेचा भाग कांहींच नसेल; तर माझें दान करण्याचा अधिकारी माझा पिता आहे. त्याच्याकडे आपण माझ्याबद्दल मागणें करावें; ह्मणजे आपला हेतू पूर्ण होईल."

हें ऐकून **वत्स**ऋषीला फार संतोष झाला. व यावरून ती आपल्याला वरण्यास तयार आहे, अशीही त्याच्या मनाची खात्री झाली. नंतर कांहीं वेळानें राजा त्याच्या दर्शनाला प्राप्त झाला. तेव्हां त्याणें **सुलोचने**विषयीं त्याच्याजवळ मागणें केलें. यद्यपि बोलून चालून तो तपोवनांत राहणारा ऋषि होता. राजकन्येला

सुखाचा उपभोग मिळण्यासारखें ऐश्वर्य त्याच्याजवळ नव्हतें; तथापि त्याचें उत्तम स्वरूप, तारुण्य, विद्वत्ता आणि तपरूप मोठें ऐश्वर्य हें पाहून राजाला, त्याला आपला जांवई करून घेणें योग्य वाटलें. तो त्याचा मोठा सत्कार करून ह्मणाला, "महाराज, मी आपल्या आज्ञेबाहेर नाहीं. **रंभा** नांवाच्या अप्सरेच्या पोटीं ही मला कन्या झाली आहे. हिचा विवाह केल्यानें स्वर्ग लोकांत माझा त्या अप्सरेशीं पुनः समागम होणार असें तिणेंच स्वर्गास जातेवेळीं मला सांगितलें आहे. तेव्हां ही गोष्ट कशी होईल? तें कृपा करून आपण सांगा ह्मणजे मी आपल्या हेतूप्रमाणें करतों."

राजानें हें एक कोडेंच घातल्यासारखें केलें; तें ऐकून **वत्स**ऋषि क्षणभर विचार करून मनांत ह्मणाला, यानें जरी उघड सांगितलें नाहीं; तरी स्वर्ग लोकांत पुण्यावांचून कसें जातां येईल? व याच्या पदरीं तितका पुण्याचा सांठा नसेल व जांवयाच्या पुण्यानें याला स्वर्गास जाण्यास मिळेल असें असावें. कारण अशाप्रकारच्या गोष्टी पूर्वीं झाल्या आहेत. **मेनके**पासून उत्पन्न झालेली **प्रमद्वरा** ही सर्पदंशानें मरणोन्मुख झाली. तेव्हां **रुरु** नांवाच्या ऋषीनें आपल्या आयुष्याचें अर्धे देऊन तिला जीवंत केलें, व नंतर तिच्याशीं विवाह केला. तसेंच **त्रिशंकु** राजाला **विश्वामित्रा**नें आपलें पुण्य देऊन परत स्वर्गांत नेला नाहीं का? तेव्हां या राजाला स्वर्गलोकीं नेणें हें मोठेंसें अगाध नाहीं' असा विचार करून **वत्स**ऋषि राजा **सुषेणा**ला ह्मणाला, "कांहीं चिंता नाहीं. माझ्या तपा-

---

१ ही कथा पूर्वीं आली आहे.

२ सूर्यवंशांत त्रिशंकु नांवाचा राजा झाला होता. वसिष्ठमुनि हे सूर्यवंशीय राजांचे कुलपुरोहित असून विश्वामित्र आणि वसिष्ठ या दोघांचें भांडण लागले होतें. त्रिशंकु हा वसिष्ठाचा शिष्य असतांही कांहीं कारणावरून त्याला त्यानें शाप दिला. तेव्हां विश्वामित्रानें त्याचा पक्ष घेऊन त्याला स्वर्गास नेलें. तेथें देवांनीं त्याला खालीं ढकलून दिलें. तेव्हां विश्वामित्रानें त्याला पुनरपि वर चढविलें असून तो अद्यापि अधांतरींच आहे असें ह्मणतात. ही कथा हरिवंशांत सविस्तर सांगितली आहे.

च्या सामर्थ्यानें तुझा हेतू पूर्ण होईल!" असें बोलून हस्तपाद प्रक्षालन करून देवतांला उद्देशून ह्मणाला, "हे देवहो! माझ्या तपानें हा राजा शरीरासहवर्त्तमान स्वर्गास जावो! व याला **रंभे**चा समागम घडो!"

याप्रमाणें **वत्स**ऋषीनें मोठ्यानें ह्मटलें; त्यावेळीं राजवाड्यांतील सर्व लोक आसमंतात् ऐकत असतां 'तूं ह्मटलेंस; त्याप्रमाणें होईल.' अशी आकाशवाणी झाली. ती श्रवण करून राजाला फार आनंद झाला. त्याणें तत्काल आपल्या मुलीच्या लग्नाची तयारी करून तो **कश्यप**गोत्रोत्पन्न **वत्स**ऋषि याला यथाविधि आपली कन्या **सुलोचना** अर्पण केली, आणि जांवई व मुलगी उभयतांचा निरोप घेऊन राजा मोठ्या आनंदानें तत्काल स्वर्गास निघून गेला. जरी त्याचें शरीर मर्त्य होतें; तरी तपाच्या बळानें त्याला दिव्यत्व प्राप्त झालें. व **इंद्रानें** जिला आज्ञा दिली आहे अशा दिव्य प्रभावाच्या **रंभे**सहवर्त्तमान तो तेथें यथेच्छ रममाण झाला." ही कथा सांगून तो वृद्ध ब्राम्हण राजा **कलिंगदत्ता**ला ह्मणाला, "महाराज, याप्रमाणें **सुषेण** राजा कन्येच्या योगानें कृतार्थ झाला. आपल्यासारख्या मोठ्यांच्या येथें जन्मास येणाऱ्या मुली अशा तशा असायच्या नाहींत. ज्यांच्या पदरीं मोठें पुण्य असेल, त्याच अशा मोठ्या घरीं जन्मास येणार. मला असें वाटतें कीं; आपली मुलगी कोणी तरी देवता असून शापादिकांच्या निमित्तानें ती आपल्या घरीं जन्मास आली असावी. तेव्हां मुलगी झाली ह्मणून आपण शोक करूं नये."

हें त्या वृद्ध ब्राह्मणाचें भाषण ऐकून राजा **कलिंगदत्ता**चें समाधान झालें, व त्याणें शोकाचा त्याग केला. त्या ब्राह्मणानें ज्या गोष्टी सांगितल्या; त्यांवरून राजाला फार संतोष झाला. व हा ह्मणतो त्याप्रमाणें कदाचित् मुलीच्या योगानेंच आपलें कल्याण होणार असेल, असें त्याला वाटलें, नेत्रांला आनंद देणाऱ्या नूतन उदय पावलेल्या चंद्रकलेप्रमाणें सुंदर दिसणाऱ्या त्या मुलीचें राजानें **कलिंगसेना** असें नांव ठेवलें. मातापितरांनीं जिचें प्रेमपूर्वक लालनपालन केलें आहे अशी

ती मुलगी क्रमाक्रमानें वाढत गेली. राजानें आपल्या मुलीबरोबर खेळण्याकरतां, तिच्या बरोबरीच्या आणखी कित्येक मुली तिच्या सख्या करून दिल्या होत्या. क्रीडा हेंच ज्याचें उदक आहे; अशा बाल्यरूप समुद्राची केवळ लहरीच अशी **कलिंगसेना** गच्चीवर, घरांत, उपवनांत आंगणांत जेथें पाहिजे तेथें आपल्या सख्यांसहवर्त्तमान क्रीडा करीत असे. मुलगी झाली, हें पाहून राजा **कलिंगदत्ताचें** मन प्रथम विरस झालें होतें. तरी नंतर त्याचें तिच्यावर इतकें प्रेम जडलें कीं, पुत्रापेक्षांही त्याला ती अधिक प्रिय वाटूं लागली.

**कलिंगसेना** यावेळीं बरीच प्रौढ झाली होती. एकेदिवशीं ती सख्यांसहवर्त्तमान गच्चीवर खेळत असतां; आकाशमार्गानें **मयासुराची** कन्या **सोमप्रभा** जात होती तिची **कलिंगसेनेवर** सहज दृष्टी गेली. मोठमोठ्या जितेंद्रिय व मुलींच्यादेखील मनाला मोह उत्पन्न करणारें असें **कलिंगसेनेचें** अप्रतिम रूप पाहून **सोमप्रभा** चकित होऊन तेथेंच उभी राहिली. व तिच्याविषयीं प्रीतियुक्त होत्साती मनांत ह्मणाली, ही अशी सुंदर कन्या कोण असावी बरें ? ही चंद्राची मूर्ती ह्मणावी तर हिला दिवसां प्रकाश कोठून असेल ? रति ह्मणावी तर हिचा सहचर **काम** कोठें आहे ? मला वाटतें ही कन्यकाच असावी. या राजाच्या गृहांत शापामुळें स्वर्गांतून भ्रष्ट झालेली ही कोणीतरी दिव्य स्त्री असेल; व अन्यजन्मांत हिच्याशीं माझें विशेष सख्य होतें असें वाटतें. कारण हिला पाहतांच एकदम स्नेहाकुल झालेलें माझें मन जन्मांतराचा संबंध अगदीं उघड करून सांगत आहे. असें आहे त्यापेक्षां आपण स्वयमेव हिची भेट घेऊन हिला आपली मैत्रीण करावी. असा विचार करून ती थाटामाटानें आपण खालीं उतरली. पोरस्वभावामुळें कदाचित् हिला भय वाटेल, ह्मणून **सोमप्रभेनें**, तिच्या विश्वासाकरतां मनुष्याच्या मुलीचें रूप धारण केलें; आणि ती तिच्या नकळत हळूच आकाशांतून त्या गच्चीवर उतरून **कलिंगसेनेच्या** जवळ गेली.

तिला पाहतांच **कलिंगसेने**लाही मोठें आश्चर्य वाटलें. ती ह्मणाली, "बरें झालें. दैवानें अद्भुत रूपवती अशी ही कोणी तरी राजकन्या माझ्याजवळ आली आहे. आणि ती आपल्याला मैत्रीण करून घेण्यास योग्य आहे. असा विचार करून ती तत्काल उठून अंमळ पुढें गेली आणि **सोमप्रभे**ला तिणें प्रेमपूर्वक आलिंगन दिलें. नंतर तिचा हात धरून तिला आपल्याजवळ बसवून घेतली आणि तिचें नांव व कुळगोत्र वगैरे समजून घेण्याकरतां तिला प्रश्न केला. **सोमप्रभे**ला एकदम सगळ्या गोष्टी सांगायच्या नव्हत्या ह्मणून ती ह्मणाली, "अंमळ थांब. मी माझी सर्व हकीकत तुला निवेदन करीन." नंतर इतर अनेक गोष्टींवर त्यांचें बोलणें झालें. व त्या दोघींनीं परस्परांचे हात धरून पक्की मैत्री केली.

नंतर बोलतां बोलतां **सोमप्रभेनें कलिंगसेने**च्या लग्नाची गोष्ट काढली व त्या संबंधानें ती ह्मणाली, "सखे, तूं राजकन्या आहेस. तेव्हां तुझें कोणातरी राजपुत्राशींच लग्न होणार यांत कांहीं संशय नाहीं. पण खरें विचारशील; तर देवब्राह्मणांच्या साक्षीनें नुस्तें लग्न लागलें ह्मणून त्याचा फारसा उपयोग नाहीं. स्त्रीपुरुषांची पक्की मैत्रीच जमली पाहिजे. आणि तरच त्यापासून उभयतांला सुख होतें. पण तुला मी खात्रीपूर्वक सांगतें; राजपुत्र हे बहुतकरून बायकांविषयीं मोठे बेपर्वा असतात. सारावेळ ते आपल्याच तोऱ्यांत वागतात. आधीं त्यांच्यांशीं सख्य होणें फार कठीण आणि कदाचित् झालें; तरी तें केव्हां मोडेल याचा कांहीं नियम नाहीं. थोडेंसें कोठें कांहीं चुकलें कीं लगेंच त्यांची मर्जी गेलीच. त्यांच्या रागाला फारसें कारण लागत नांही. इतरांची गोष्ट घटकाभर असूं दे; पण बायका तर सर्वस्वी आपल्या नवऱ्यावर अवलंबून असतात. नवऱ्याच्या मनांतून त्या उतरल्या तर त्यांचे हाल कुत्रादेखील खात नाहीं. या गोष्टी मनांत आणिल्या ह्मणजे मला तुझ्याविषयीं मोठी काळजी वाटते. राजपुत्र

किती अविचारी असतात ! व थोड्याशा कारणावरून ते कसे रागावतात ! याविषयीं तुला मी एका राजपुत्राची आणि सावकारपुत्राची गोष्ट सांगतें ती श्रवणकर.

पूर्वी **पुष्करावती** नांवाच्या नगरींत **गुहसेन** नामक राजा होता. त्याला एकच पुत्र झाला होता. तो जन्मापासून मोठा रागिष्ठ, मोठा गर्विष्ठ व फार साहसी होता. राजाला एकुलता एक मुलगा असल्यामुळें तो, आपला पुत्र **चंद्रसेन** यानें बरें अथवा वाईट कांही केलें तरी तें मुकाट्यानें सहन करीत होता. त्याच नगरींत **ब्रह्मदत्त** नामक एक सावकाराचा पुत्र होता. तोही आपल्या बापाचा एकुलता एक असून मोठा आवडता होता. त्याच्या घरीं ऐश्वर्य इतकें विपुळ होतें कीं; केवळ राज्याधिकारावांचून **चंद्रसेनाची** आणि त्याची अगदीं बरोबरी होती. एकेदिवशीं सहज उभयतांची गांठ पडली. रूप वय व ऐश्वर्य यांच्या योगानें उभयतांचें साम्य असल्यामुळें लवकरच त्या दोघांची विशेष मैत्री जमली. ती इतकी कीं; ते, एकमेकांनीं एकमेकांला पाहिल्यावांचून क्षणभरदेखील राहूं शकत नसत. मैत्री जमण्याला कांहीं पूर्वजन्माचा संस्कार कारण असला ह्मणजे मग मुळींच वेळ लागत नाहीं. अल्पकाळांत परस्परांवर प्रेम बसतें. **चंद्रसेना**ची आणि **ब्रम्हदत्ताची** अशीच कांहीं जन्मांतरीय संबंधानें दोस्ती जमली. व त्या दिवसापासून तो **ब्रह्मदत्ताला** सोडून जेवण, खाण विहार वगैरे कोणतीही गोष्ट करीत नाहींसा झाला.

पुढें कांहींदिवसांनीं राजपुत्राच्या लग्नाचा निश्चय झाला. **अहिच्छत्र** नामक नगरीच्या राजाच्या मुलीशीं विवाह ठरल्यावरून बापाची आज्ञा घेऊन **चंद्रसेन**, आपला प्रियमित्र **ब्रह्मदत्त** यासहवर्तमान मोठ्या थाटानें लग्नास जाण्यास निघाला. यावेळीं दोघेही जिवलग मित्र शृंगारलेल्या मोठ्या हत्तीवर अंबारींत एकमेकांच्या मांडीला मांडी लावून बसले होते. बरोबर जाणते जाणते नोकर–चाकर फौज

फांटा वगैरे पुष्कळ परिवार होता. ते मार्गक्रमण करीत असतां, **इक्षुमती** नांवाच्या नदीच्या कांठीं पोंहचले. व सायंकाळ झाल्यावरून तेथेंच त्यांणीं मुक्काम केला. नंतर जेवणखाण वगैरे आटोपलें. इतक्यांत चंद्रोदय झाला. तेव्हां राजपुत्राची तबियत खूष झाल्यावरून त्याणें यथेच्छ मद्यप्राशन केलें. व दोघेही मित्र एकाच बिछान्यावर गोष्टी सांगत पडले होते. झोंप लवकर येईना; ह्मणून **चंद्रसेनानें,** एक ह्मातारी दाई त्याच्याबरोबर आली होती, तिला गोष्टी सांगण्यास सांगितलें. तिणें एक कथा सांगितली. व नंतर राजपुत्राला गोष्ट सांगण्याविषयीं तिणें आग्रह केला. तेव्हां **चंद्रसेना**नेंही एक कथा सांगण्यास प्रारंभ केला.

यावेळीं तो कैफाच्या धुंदींत होता. कथेला आरंभ करून ती थोडीशी सांगितली. इतक्यांत त्याचा तेथल्यातेथें डोळा लागला. तेव्हां त्या दाईनें त्याला विशेष आग्रह केला नाहीं, व लवकरच तिलाही झोंपेनें धेरलें. सावकारपुत्र **ब्रह्मदत्त** याणें बेताबातानेंच प्राशन केलें होतें. यामुळें तो चांगला सावध होता. व कांहीं विचार त्याच्या मनांत घोळत असल्यामुळें बराचवेळ त्याचा डोळा लागला नाहीं. यावेळीं बरोबरची सर्व मंडळी जिकडे तिकडे घोरत पडली होती. असें असतां आकाशांत बायकांचें कांहीं बोलणें चाललें आहे, असा **ब्रम्हदत्ता**ला भास झाला. ह्मणून तो लक्ष्यपूर्वक त्यांचा संवाद ऐकत बसला.

कोणीं कांहीं अपूर्व कथा सांगितली असतां देवता अदृश्यरूपानें ती ऐकत असतात. त्याप्रमाणें **चंद्रसेनानें** ज्या कथेला आरंभ केला होता, ती ऐकण्यास देवता आकाशांत उभ्या राहिल्या होत्या. कथेची सुरवात करून मध्येंच त्याणें बंद केली, यामुळें देवतांचा मनोभंग झाला. व त्या रागावून आपापसांत बोलूं लागल्या. त्यांतली एक ह्मणाली, "अगे, तुह्मी ऐकतां आहां का? ह्या मेल्यानें (**चंद्रसेनानें**)

कथा आरंभून ती पुरी न करतां मध्येंच हा बेपर्वाईने झोंपी गेला. ह्मणून मी याला शाप देतें. "उद्यां सकाळीं वाटेंत याला एक हार दृष्टीस पडेल. व तो जर हा उचलून घेऊन आपल्या गळ्यांत घालील तर तो गळ्यास लागतांच हा तत्क्षणीं मरण पावेल !" असें बोलून ती उगीच राहिली. तों दुसरी देवता ह्मणाली, "तूं सांगितलेल्या मृत्यूपासून जर हा पार पडला; तर पुढें याच्या एक आंम्रवृक्ष दृष्टीस पडेल. त्याचीं फळें जर हा खाईल; तर तत्काल याचा प्राणान्त होईल !" तिसरी ह्मणाली, "जर ह्याही संकटांतून हा मुक्त होईल; तर विवाहाकरतां ज्या घरांत हा प्रवेश करील, तेंच याच्या अंगावर पडून हा मरून जाईल !" नंतर चौथी ह्मणाली, "कदाचित् हाही त्याचा मृत्यू टळला तर रात्रीं जेव्हां हा आपल्या स्त्रीच्या महालांत जाईल; तेव्हां याला शंभरवेळ शिंका येतील. व प्रत्येकवेळीं 'जिवंत रहा.' असें जर कोणी याला न ह्मणेल तर हा मृत्यूच्या अधीन होईल ! आणि हे आह्मीं दिलेले शाप ऐकून जर कोणी याला ती गोष्ट सांगेल; तर त्यालाही मरण येईल !" असें बोलून त्या देवता तेथून निघून गेल्या.

राजपुत्र व इतर मंडळी सुस्त निजली असल्यामुळें, देवतांनीं दिलेले शाप दुसऱ्या कोणालाही ऐकूं आले नाहींत. एकटा **ब्रम्हदत्त** जागा होता. त्याणें मात्र ऐकले. राजपुत्रावर त्याचा अगदीं निष्कृत्रिम स्नेह होता. देवतांनीं दिलेले भयंकर शाप श्रवण करून तो अगदीं घाबरला. नंतर मन स्थिर करून आपल्याशींच ह्मणाला, सहज कौतुकानें कथा सांगण्यास आरंभ केला, आणि ती मध्येंच सोडली, तर सांगणाऱ्यावर रागावून, गुप्त रितीनें कथा ऐकायला आलेल्या देवता जर असे शाप देतात, तर मग कसा परिणाम लागेल ! आतां हा राजपुत्र त्यांच्या शापाप्रमाणें मरण पावला तर मी जिवंत राहून काय उपयोग ? बरें, ही शापाची गोष्ट याला सांगावी तर माझ्याही प्राणावर बेतणार. न सांगावी तर हकनाक हा माझा मित्र मरणार. तेव्हां आतां या संकटांत करावें

तरी काय ? कांहीं असो, आपण याला तर ही गोष्ट सागूं नयेच; पण पुढें येणारे प्रसंग टाळण्याविषयीं मात्र जपून असावें. हा माझा प्राणासारखा प्रिय मित्र युक्तीनेंच मला रक्षण केला पाहिजे.

असा विचार करून **ब्रह्मदत्तानें** युक्तीनें **चंद्रसेनाचें** रक्षण करण्याचा निश्चय केला. पुढें प्राप्त होणाऱ्या संकटाविषयीं अनेक प्रकारच्या कल्पना त्याच्या मनांत घोळत असल्यामुळें; त्या साऱ्या रात्रींत त्याचा डोळ्याला डोळा लागला नाहीं. मोठ्या संकटानें ती रात्र कशीतरी काढून, रात्रीं झालेल्या गोष्टीच्या संबंधानें कोणास कांहीं न कळवितां प्रातःकालीं त्याणें आपल्या मित्रासह पुढें प्रयाण केलें. आपल्यावर कोणतें संकट येणार आहे; याचें **चंद्रसेना**ला कांहींच वर्तमान ठाऊक नव्हतें. ह्मणून तो नित्याप्रमाणें मोठ्या आनंदांत **ब्रम्हदत्ता**शीं गोष्टी करीत चालला होता. जातां जातां वाटेंत अकस्मात् त्याला एक मोठा सुंदर हार दृष्टीस पडला. तो पाहतांच हत्ती उभा करून **चंद्रसेन** तो हार घेऊं लागला. तेव्हां त्याचा निषेध करून **ब्रम्हदत्त** ह्मणाला, "अंमळ थांब. मी काय सांगतों तें ऐकून घे. हा हार तूं घेऊं नकोस. ही कांहीं तरी माया असेल. तसें नसतें तर शेंकडों सैनिक या वाटेनें पुढें गेले त्यांला हा दिसला नसता कां? केवळ तुझ्या एकट्याच्याच दृष्टीस पडला, तेव्हां यांत कांहींतरी जादू आहे असें वाटतें."

**चंद्रसेना**चा **ब्रम्हदत्ता**वर पूर्ण विश्वास होता. त्याणें सांगितलेली गोष्ट त्याला खरी वाटली. व हार घेण्याचा नाद सोडून तो पुढें गेला. आणखी कांहीं मार्ग क्रमण केला; तों अगदीं रस्त्यावर फळांनीं ओथंबलेला एक सुंदर आंब्याचा वृक्ष त्याला दिसला. त्याचीं तीं पिंवळींजर्द फळें खावीं असें **चंद्रसेना**च्या मनांत आलें; पण पुन्हां **ब्रम्हदत्तानें** नको ह्मणून पूर्वीप्रमाणेंच त्याची समजूत केल्यावरून हट्ट न धरतां तो पुढें निघाला. यावेळीं **ब्रम्हदत्तानें** आंबे खाऊं दिले नाहींत याचें त्याला फार वाईट वाटलें; पण तो उघडपणें त्याबद्दल कांहीं बोलला नाहीं.

असो, याप्रमाणें मार्गे चालत चालत सायंकाळीं तो आपल्या सासुरवाडीस पोंचला. त्याच दिवशीं लग्नाचा मुहूर्त ठरविलेला होता. **चंद्रसेन** तेथें पोंचतांच विवाहाकरतां जो मंडप तयार केला होता, त्यांत सासरा त्याला घेऊन जाऊं लागला. व तोही निःशंकपणें त्यांत प्रवेश करण्यास तयार झाला. इतक्यांत **ब्रम्हदत्तानें** हात धरून त्याला बाहेर ओढला. **चंद्रसेन** बाहेर आला तों कड्दिशीं अवाज होऊन तो मंडप एकाएकीं कोसळून पडला ! हा चमत्कार पाहिल्यावरून **ब्रम्हदत्तानें** हावेळपर्यंत ज्या ज्या गोष्टी करण्याविषयीं त्याला मनाई केली होती, त्याचा **चंद्रसेना**ला चांगलाच अनुभव आला. लग्नाकरतां ह्मणून मुद्दाम आलों असून त्या करतांच तयार केलेल्या मंडपांत जाण्याविषयीं हरकत केली, तेव्हां **चंद्रसेना**ला त्याचा अतिशय राग आला होता. व इतर मंडळीलाही त्याचा तो शुद्ध मूर्खपणा आहे असें वाटलें; पण मंडप कोसळून पडला; तेव्हां **चंद्रसेना**ची खात्री झाली. व तो **ब्रम्हदत्ता**ला मिठी मारून ह्मणाला, "आज तूं मला वाचविलेंस !"

नंतर दुसऱ्या जाग्यांत लग्नाची तयारी होऊन तो विधि उरकला. रात्रीं नववधूसहवर्त्तमान **चंद्रसेन** आपल्या महालांत गेला. आज यावेळीं त्याच्यावर शेवटची मृत्यूची पाळी येणार होती. ती टाळावी ह्मणून राजपुत्र महालांत जाण्यापूर्वी कोणाच्या नकळत **ब्रह्मदत्त** आंत जाऊन पलंगाखालीं दडून बसला. **चंद्रसेन** आंत आल्यावर स्त्रीसहवर्तमान विलास करण्यांत त्याचा बराच वेळ गेला. व उभयतां पलंगावर येऊन बसलीं. तेथें बसतांच त्याला शिंका येण्यास आरंभ झाला. प्रत्येकवेळीं पलंगाखालीं बसलेला **ब्रम्हदत्त** 'शतं जीव' असें ह्मणत होता. शंभर शिंका पुऱ्या होतांच तो आतां आपला मित्र शापांतून मुक्त झाला; असें समजून मोठ्या आनंदानें **ब्रम्हदत्त** **चंद्रसेना**च्या देखत पलंगाखालून बाहेर निघाला. वस्तुतः यावेळीं तो तशा गुप्त ठिकाणीं दडून बसला होता तो कशाकरतां? या गोष्टीचा व

त्याच्या आजपर्यंतच्या वर्तनाचा विचार केला पाहिजे होता; पण तसें कांहीं न करतां राजपुत्र तत्काल ईर्षेच्या स्वाधीन झाला. व त्यामुळें त्याला स्नेहाचें अगदीं विस्मरण झालें. 'हा बेटा माझ्या महालांत दडून बसला; तेव्हां याचा कांहीं तरी वाईट हेतू होता,' असें त्याच्या मनांत आलें! 'हा आपल्या बायकोशीं विलास करीत आहे, तेव्हां यावेळीं बोलण्याचा समय नाहीं,' असें पाहून **ब्रह्मदत्त** मुकाट्यानें जात होता. पण तीच गोष्ट त्या अविचारी राजपुत्राला विशेष राग येण्यास कारण झाली! अशा एकान्तस्थलीं तो येऊन बसला, हा त्याणें आपला अपमान केला; व बेपर्वाईनें तसाच बाहेर निघून जात आहे, असेंही त्याला वाटलें. तात्पर्य गैर समजुतीनें तत्काल त्याणें पाहऱ्यावरच्या लोकांना हुकूम केला. तो ह्मणाला, "अरे, पाहतां काय? हा चांडाल मी एकांतीं असतां माझ्या जनानखान्यांत शिरला, या करतां याला बांधून ठेवा. सकाळीं योग्य शिक्षा देण्याची व्यवस्था करूं!"

याप्रमाणें हुकूम होतांच पाहरेवाल्यांनीं तत्काल त्याच्या मुसक्या बांधल्या. व रात्रभर त्याला तसाच तेथें प्रतिबंधांत ठेवला. इतकें झालें तरी **ब्रम्हदत्त** निराश झाला नव्हता. आतां याणें अविचारानें आपल्यास प्रतिबंधांत ठेविलें; तरी, सकाळीं हा कांहींतरी योग्य विचार करील, अशी त्याला उमेद होती; पण तिचा कांहीं उपयोग झाला नाहीं. प्रातःकाल होतांच 'रात्रीं कैद केलेल्या अपराध्याचें काय करायचें?' ह्मणून पाहरेकऱ्यांच्या अधिकाऱ्यानें येऊन विचारिलें. तेव्हां **चंद्रसेनानें** 'आतांच्या आतां त्याचें डोकें उडवावें,' असा हुकूम केला, **ब्रम्हदत्ताची** आणि त्याची दृष्टादृष्टदेखील झाली नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें हुकूम होतांच बिचाऱ्या निरपराधी **ब्रह्मदत्ताला** वधस्थानीं नेलें, व मांगांनीं त्याला आपल्या देवाचें नांव घ्यायला सांगून, 'शांतपणें मर' असें सांगितलें. वस्तुतः आतां वांचण्याची कांहीं आशा नव्हती; तरी आपल्या मित्राला ( **चंद्रसेनाला** ) एकवेळ समजून सांगावें, असें

त्याच्या मनांत होतें. ह्मणून त्याणें मांगांचें पुष्कळ आर्जव केलें. तो ह्मणाला, "अरे, मी मरणाविषयीं भ्यालों नाहीं; आज नाहीं केव्हां तरी मरायचें आहेच. जन्मास आलेल्या प्राण्याला कांहीं केलें तरी तें कांहीं सुटायचें नाहीं, पण मरण्यापूर्वी माझ्या प्रियमित्राची एकवेळ भेट घ्यावी; अशी एक इच्छा आहे. स्वतः मला त्याच्याजवळ कांहीं मागावयाचें नाहीं; तर त्याच्या हिताची एक गोष्ट त्याला सांगायची आहे. ती किती अगत्याची आहे, हें माझ्यानें तुह्मांला उघड करून सांगवत नाहीं. तें मीच त्याला समक्ष सांगेन."

**ब्रम्हदत्ता**ची काकळूत येण्यासारखी विनंती ऐकून, ते मांग आपापसांत ह्मणाले, "कां होईना? हा एकवेळ राजपुत्राला भेटेना बापडा. आमचें काय जातें. आतांच याला मारायचा तो आणखी कांहीं वेळानें मारतां येईल." असा विचार करून ते **ब्रम्हदत्ता**चा हेतू **चंद्रसेना**ला कळविण्यास गेले. मांगांनीं **ब्रम्हदत्ता**चा निरोप सांगितला; तेव्हां **चंद्रसेना**च्या जवळ त्याच्याबरोबर आलेले जाणतेजाणते लोक बसले होते; त्यांणीं पुष्कळ समजुतीच्या गोष्टी सांगितल्या व कसेंही करून त्याचें काय ह्मणणें आहे तें एकवेळ ऐकून घ्यावें. व मग त्याला पाहिजे तर मारावें, असें आग्रहपूर्वक सांगितलें. तेव्हां **चंद्रसेना**नें **ब्रम्हदत्ता**ला आपल्याकडे आणण्यास हुकूम दिला. मांगांनीं **ब्रम्हदत्ता**ला **चंद्रसेना**-जवळ आणला; तेव्हां त्याणें मागच्या रात्रीं घडलेला सर्व वृत्तांत त्याला सांगितला. 'आमचें बोलणें राजपुत्राला कोणीं सांगेल तर तोही मरेल.' असा देवतांनीं शाप दिला होता; पण आतां त्याचें भय बाळगण्याचें कारण राहिलें नव्हतें. त्यांणीं राजपुत्राला जो शाप दिला होता तो यावेळीं भोगून पुरा झाला होता. भोगण्यापूर्वीं त्याला सांगू नये, असेंच देवतांच्या बोलण्याचें तात्पर्य होतें. ह्मणून **ब्रम्हदत्ता**नें ती हकीकत सांगितली. **चंद्रसेना**ला त्याचें सांगणें खरें वाटलें नसतें; पण मंडप विनाकरण पडला हें त्याणें प्रत्यक्ष पाहिलें होतें. ह्मणून त्याला

आपल्या मित्रानें सांगितलेली हकीकत खरी वाटली. व त्याणें मोठ्या युक्तीनें आपल्याला प्राणसंकाटांतून वांचविलें, याबद्दल तो त्याचा फार आभारी झाला. असो, याप्रमाणें **ब्रह्मदत्ता**वर आलेलें अरिष्ट टळलें. व राजपुत्र **चंद्रसेन** त्या प्रिय मित्रासह कांहींदिवस तेथें राहून सासऱ्यानें केलेल्या आदरसत्कारानें संतुष्ट होत्साता आपल्या पत्नीसहवर्तमान पुनः स्वगृहीं प्राप्त झाला."

ही कथा सांगून **सोमप्रभा कलिंगसेने**ला ह्मणाली, "सखे, राजपुत्र याप्रमाणें उच्छृंखल होतात. त्यांच्या यथेच्छ वर्तनाच्या आड कोणी आलें; तर तें त्यांला बिलकूल खपत नाहीं. उलट ते त्याचाच घात करण्याविषयीं प्रवृत्त होतात. एखाद्या मस्त झालेल्या हत्तीप्रमाणें, त्यांला हिताच्या गोष्टी सांगण्याचा प्रयत्न केला; तर त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. **वेताळ** आणि **राजपुत्र** या दोघांशीं मैत्री करणें फार कठीण आहे. ते हंसत हंसत दुसऱ्याचे प्राण घेतात! ह्मणून मी ह्मणतें कीं हे राजकन्ये, तूं अशा उन्मत्त राजपुत्रांवर विश्वास ठेवूं नकोस. व माझ्याशीं जी तुझी मैत्री झाली आहे तिच्यांत कधींही अंतर पाडूं नकोस."

याप्रमाणें गच्चीवर स्वेच्छ बसून गोष्टी करीत असलेली **कलिंगसेना**, **सोमप्रभेनें** सांगितलेली कथा श्रवण करून, स्नेहपूर्वक तिला ह्मणाली, "गडे, खरें विचारशील तर राजपुत्र हे पिशाच आहेत. त्यांना राजपुत्र असें कधींही मानतां येणार नाहीं. कारण, पिशाचाला कार्याकार्यविचार नसतो; व दुसऱ्यानें त्याची समजूत काढण्याचा प्रयत्न केला; तरी त्याची समजूत होत नाहीं. या राजपुत्रांचीही तशीच स्थिती आहे. पिशाच कसे दुर्बोध असतात; याविषयीं मला एक कथा आठवली ती तुला सांगतें.

**यज्ञस्थल** नांवाच्या अग्रहारांत पूर्वी एक ब्राह्मण रहात होता. तो फारच दारिद्री होता. घरांत जळण काटूक वगैरे पाहिजे होतें तें

देखील विकत घेण्याचें त्याला सामर्थ्य नव्हतें. ह्मणून तो स्वतः अरण्यांत जाऊन लांकडें आणीत असे. एकेदिवशीं तो एका झाडाची ढापी तोडीत असतां, दुर्दैवानें ती ढापी त्याला सांवरतां आली नाहीं. ती जोरानें त्याच्या मांडीवर ओझरती पडली. व तिच्या योगानें त्याला मोठी जखम झाली. त्याबरोबर रक्ताची धार वाहूं लागली. व लौकरच तो बिचारा ब्राह्मण तेथें मूर्छित होऊन पडला. यावेळीं त्याच्याबरोबर दुसरें कोणीच नव्हतें. मांडींतून पुष्कळ रक्त गेल्यामुळें तो फारवेळ तसाच बेशुद्ध पडला होता. नंतर सुदैवानें दुसरा एक लांकूडतोड्या तेथें प्राप्त झाला. व त्याला दया येऊन, त्याणें आपल्या सोबत्यांच्या साह्यानें ब्राह्मणाला त्याच्या घरीं नेला. नवऱ्याची ती अवस्था पाहून त्याची बायको फार विव्हळ झाली. तिणें लवकरलवकर त्याची मांडी धुऊन पुसून साफ केली. व जखम भरून येण्याकरतां त्यावर पट्टी बांधली. त्या पट्टीनें कांहीं उपयोग झाला नाहीं. तेव्हां शेजारीं-पाजारीं असणाऱ्या आणखी पुष्कळ लोकांनीं आपापल्यापरी अनेक उपचार करून पाहिले. तथापि दिवसानुदिवस त्याचा तो व्रण खोलच होत गेला, व शेवटीं शिरेपर्यंत जाऊन पोंचला.

बहूत दिवस दुःख भोगलें; अनेक औषधउपचार केले तरी कांहीं गुण येत नाहीं असें पाहून ब्राह्मणाला आपल्या जिवाचा कंटाळा आला. त्याणें प्राणत्याग करून त्या दुःखाचा शेवट करण्याचा निश्चय केला. अशा संधीस त्याचा एक लहानपणींचा मित्र त्याच्या समाचाराला आला. तेव्हां, त्याणें एकांतीं त्याला आपला हेतू कळविला. तें ऐकून तो मित्र ह्मणाला, "गड्या, **यज्ञदत्त**नांवाचा माझा एक तुझ्यासारखाच मित्र आहे. तो फार दिवस अनेकप्रकारच्या रोगांनीं व दारिद्र्यानें अतिशय पिडला होता. शेवटीं त्याणें एक पिशाचाचें साधन केलें. त्याच्यायोगानें त्याला पुष्कळ द्रव्य प्राप्त झालें. व क्लेशमुक्त होऊन तो सांप्रत मोठा सुखी झाला आहे. त्याणें तें पिशाचसाधन मलाही सांगितलें आहे. तूं जर

तें पिशाचसाधन करशील; तर या दुःखांतून पार पडशील. पिशाच प्रसन्न झालें; म्हणजे तें, ही तुझी जखम बरी करील." असें सांगून त्या ब्राह्मणानें पीडित झालेल्या त्या आपल्या मित्राला पिशाचसाधनाचा मंत्र सांगितला. व त्याच्या क्रियेच्या संबंधानें तो म्हणाला, "पहांटेच्या प्रहर-रात्रीं उठून नग्न होऊन शेंडी मोकळी सोडावी; व चूळ न भरतां दोन हातांच्या दोन मुठींत जितके तांदूळ राहतील तेवढे घ्यावे. आणि मन्त्राचा जप करीत चव्हाट्यावर जाऊन; तेथें ते तांदूळ ठेवावे. आणि मागें न पाहतां मुकाट्यानें परत घरीं यावें. पिशाच प्रसन्न होईतोंपर्यंत प्रतिदिवशीं असें करीत जा. ज्यावेळीं पिशाच प्रसन्न होईल त्यावेळीं तें आपण होऊन तुला 'तुझा व्याधी मी दूर करतों' असें सांगेल. त्याणें असें ह्मटलें ह्मणजे तूं आभारपूर्वक त्याचें सांगणें मान्य कर. ह्मणजे तें तुझा व्याधिपरिहार करण्याविषयीं यत्न करील."

याप्रमाणें पिशाचसाधनाची क्रिया वगैरे सांगून, तो त्याचा मित्र निघून गेला. इकडे या ब्राह्मणानें त्याणें सांगितल्याप्रमाणें साधन करण्यास आरंभ केला. तेव्हां लवकरच पिशाचानें प्रत्यक्ष दर्शन देऊन त्याचा व्रण बरा करण्याचें कबूल केलें. व त्याप्रमाणें हिमाचलावर जाऊन तेथील दिव्य औषधी आणून त्या ब्राह्मणाची जखम त्याणें बरी केली. ब्राह्मणानें पुष्कळक दिवस त्या व्रणाची पीडा भोगली होती. पिशाचानें अल्प काळांत त्यापासून मुक्त केलें, हें पाहून त्याला फार आनंद झाला. तेव्हां त्याची तारीफ करून ब्राह्मण आभार प्रदर्शित करूं लागला. तों दुसरें एक लचांड त्याच्या पाठीस लागलें. ब्राह्मणाचा व्रण बरा होईपर्यंत पिशाचाला काम होतें. तो बरा झाल्यामुळें काम नाहींसें झालें, तेव्हां पिशाच त्याला ह्मणाला, "भटजीमहाराज, आतां दुसरा कोठला तरी व्रण लवकर मला दाखवा. ह्मणजे तो बरा करण्याच्या प्रयत्नास लागेन. असें न होईल तर मी कांहींतरी अनर्थ उत्पन्न करीन! किंवा तुला मारूनदेखील टाकीन!" हें ऐकतांच भटजीबुवांच्या तोंडचें पाणी पळालें. त्याला

व्रण कोठला द्यावा? याची मोठी पंचाईत पडली. बरें, नाहीं ह्मणून सांगितलें तर हा आतांच खाऊन टाकील. तेव्हां कांहींतरी युक्ति काढावी; ह्मणून ब्राह्मणानें—'आजपासून सात दिवसांनीं तुला दुसरा व्रण देतों. तोंपर्यंत मला सोड,' असा त्याच्याजवळ वायदा केला. व पिशाचानेंही तो कबूल करून त्या बिचाऱ्याला सोडला."

येथपर्यंत कथा सागून **कलिंगसेना** उगीच राहिली. तेव्हां **सोमप्रभेनें** पुढें सांगण्याविषयीं फार आग्रह केला. तिच्या आग्रहाला मान देऊन **कलिंगसेना** ह्मणाली, "बाई, पुढची कथा फारच विलक्षण आहे. मला ती सांगायला लाज वाटते. आणि तुलातरी ऐकून काय करायचें आहे?" **कलिंगसेनेनें** याप्रमाणें सांगितलें; तरी **सोमप्रभेनें** फारच हट्ट घेतला. तेव्हां **कलिंगसेना** पुनः ह्मणाली, "बरें, बाई, तुझा आग्रहच असला तर सांगतें. पूर्वीं सांगितल्याप्रमाणें तो ब्राह्मण सात दिवसांचा वायदा करून पिशाचाच्या हातांतून त्यावेळीं सुटला; पण आतां त्याला व्रण कोठला द्यावा? याची त्याला मोठी फिकीर लागली. बोलल्याप्रमाणें व्रण न दिला तर पिशाच आपल्याला खाऊन टाकील, याची त्याला मोठी भीती पडली होती. त्या ब्राह्मणाची एक तरुण मुलगी घरांत होती. ती मोठी चतुर होती. बाप कोणत्या फिकिरींत पडला आहे, हें त्याच्याकडून समजून घेऊन ती त्याला ह्मणाली, "बाबा, तुह्मी कांहीं काळजी करूं नका. त्या मेल्या भुताला मी चांगलें फसवतें. तुह्मी त्याला सांगा कीं; माझ्या मुलीला नाडीव्रण झाला आहे तो तूं बरा कर." ब्राह्मणाला आपल्या मुलीच्या शहाणपणाविषयीं खात्री होती. तिणें असें सांगितलें तें ऐकून तो पिशाचाजवळ गेला. व तिनें सांगितल्याप्रमाणें सांगून त्याला आपल्या घरीं घेऊन आला. आणि मुलीची भेट करून दिली.

ती मुलगी मोठी धीट होती. ती पिशाचाला एका खोलींत घेऊन गेली. व तेथें उजवा कान दाखवून—'हा व्रण बरा कर,' असें तिणें त्याला

सांगितलें. बोलूनचालून पिशाचच तें, त्याला तितकी अक्कल कोठून असेल! त्याणें तिचें बोलणें खरें मानून तऱ्हतऱ्हेचे लेप व अनेकप्रकारच्या गोळ्या वगैरे प्रतिदिवशीं निरनिराळे उपचार चालवले. पण तो ईश्वरदत्त व्रण मिटविण्याचें त्या पिशाचाला कोठून सामर्थ्य येईल! याप्रमाणें पुष्कळ दिवस त्याणें खूप मेहनत करून अनेक उपचार केले; तरी तो व्रण भरून आला नाहीं. तेव्हां, हा कां भरून येत नाहीं? तें पाहण्याकरतां तिचें मस्तक आपल्या मांडीवर ठेवून पिशाच बारीक दृष्टीनें केलेल्या उपचारापासून कांहीं गुण आहे, किंवा नाहीं तें पाहूं लागलें. तों त्याच्याजवळच दुसरें एकद्वार (नाकाचें) दृष्टीस पडलें. तें पाहतांच पिशाचाची छाती दडपून गेली. तें ह्मणालें, "अबब! अरे, हा काय अनर्थ! मी इतके दिवस सारखे उपचार करीत असून एक व्रण भरून आला नाहीं; तों हे बेटे दुसरे दोन निर्माण झाले! 'संकटकालीं अनर्थ वृद्धिंगत होतात,' अशी जी ह्मण आहे ती कांहीं खोटी नाहीं. ज्यापासून लोक उत्पन्न होतात. व ज्याच्या योगानेंच लय पावतात, असें हें विस्तृत जणूं संसारद्वारच, झांकण्याचें कोणाचें सामर्थ्य आहे!" असा विचार करून त्याणें तो प्रयत्न करण्याचा सोडला. पण त्याच्या पोटांत दुसरी एक धास्ती उत्पन्न झाली. 'दुसरा व्रण न देशील तर खाऊन टाकीन' असें त्यानें ब्राह्मणाला भय घातलें होतें. त्याप्रमाणें दुसरा व्रण दिला असून तो आपल्या हातून बरा झाला नाहीं. तेव्हां ब्राह्मण उलट आपल्या छातीवर बसेल. व कदाचित् तो आपल्याला बांधून टाकील अशी शंका आल्यावरून तें वेडें भूत तेथून नाहींसें झालें!"

याप्रमाणें कथा सांगून **कलिंगसेना** ह्मणाली, "चतुर कन्येनें त्या पिशाचाला याप्रमाणें फसवून आपल्या बापाला संकटांतून मुक्त केलें. नंतर रोगमुक्त झालेला तो ब्राह्मण सुखानें वास्तव्य करता झाला. तेव्हां, पिशाचें अशा प्रकारचीं मूर्ख असतात. अज्ञानी राजपुत्रही त्या पिशाचांसारखेच आहेत. ते जरी आपल्याला वश झाले; तरी केव्हां अन-

थीला कारण होतील, याचा नेम नाहीं. ह्मणून त्यांला मोठ्या शहाणपणानें आंवरून धरलें पाहिजे. मोठमोठ्या कुळांत आईबापांच्या लाडक्या अशा पुष्कळ राजकन्या झाल्या आहेत; पण त्या तशा मूर्ख व मैत्री विसरणाऱ्या असल्याचें, आपण कधीं ऐकलें नाहीं. याकरतां मी तुला असें सांगतें कीं; गडे, तूं माझ्या सख्याविषयीं भलतीच कल्पना मनांत आणू नकोस."

याप्रमाणें **कलिंगसेने**च्या मुखानें चमत्कारिक कथा श्रवण करून **सोमप्रभेनें** हास्ययुक्त मधुर भाषण करून आपला संतोष प्रदर्शित केला. ती प्रेमपूर्वक **कलिंगसेने**ला ह्मणाली, "सखे, बाई आतां संध्याकाळ होत आला. येथून साठ योजनें ( २४० कोस ) माझें घर दूर आहे. मी येथें फारवेळ बसलें. आतां येतें. मला तुझा निरोप असूं दे." हें ऐकून, पुनः येण्याविषयीं **सोमप्रभेचें** वचन घेऊन, **कलिंगसेनेनें** मोठ्या संकटानें तिला निरोप दिला. तेव्हां क्षणभर विस्मित होत्साती **सोमप्रभा** तत्काळ आकाशांत निघून गेली. व तिचें तें अलौकिक सामर्थ्य पाहून तिच्याविषयीं अनेक तर्क करीत, व मोठें आश्चर्य करीत; **कलिंगसेना** आपल्या सख्यांसहवर्तमान घरांत गेली. तिचें त्या **सोमप्रभे**कडे एकसारखें लक्ष्य लागलें होतें. 'ही कोणी सिद्धकन्या, अथवा कोणी अप्सरा, अथवा विद्याधरी, अथवा कोणी तरी दिव्यस्त्री असावी, यांत संशय नाहीं. कारण तसें नसतें तर, आकाशमार्गानें तिला संचार करतां आला नसता. दिव्य स्त्रिया मनुष्यस्त्रियांसहवर्तमान कधीं कधीं विलक्षण मैत्री करतात. पूर्वी **पृथुराजा**च्या मुलीशीं **अरुंधतीनें** स्नेह केला नव्हता काय? व तिच्या करतां **पृथूनें** मागितल्यावरून स्वर्गापासून **कामधेनु** आणून **अरुंधतीनें** त्याला दिली नव्हती का? व स्वर्गापासून भ्रष्ट झालेला राजा **पृथू** त्या **कामधेनूचें** दूध प्राशन करून परत स्वर्गाला गेला नाहीं काय? त्याच **कामधेनू**पासून पृथ्वीवर अनेक गाई उत्पन्न झाल्या, असेंही लोक सांगतात. तेव्हां एकंदरींत या दिव्य स्त्रीच्या

मैत्रीनें मी धन्य झालें आहें. कांहीं पूर्वजन्मींचें माझें पुण्य होतें ; ह्मणून ही अलौकिक स्त्री मला मैत्रीण भेटली. ही कोणाची कोण ? हें मला अद्याप कांहीं माहीत नाहीं; पण उद्यां ती आली, ह्मणजे मी तिच्याजवळ सगळें विचारून घेईन.' राजतनया **कलिंगसेना** इत्यादि प्रकारचे मनोरथ करीत **सोमप्रभेच्या** भेटीविषयीं उत्सुक होत्साती ती रात्र घालविती झाली. व तिकडे **सोमप्रभा**ही अशाच प्रकारचे कांहीं मनोरथ करीत रात्र अतिक्रमण करिती झाली.

दुसरे दिवशीं प्रातःकाल होतांच **कलिंगसेना** उत्सुक होऊन **सोमप्रभेची** वाट पहात बसली. इकडे **सोमप्रभेनें** लांकडांच्या अनेक कळसूत्री बाहुल्या एका करंडींत घालून सखीच्या विनोदाकरतां आपल्या बरोबर घेतल्या. व आकाशमार्गानें ती **कलिंगसेना** ज्या ठिकाणीं बसली होती तेथें उतरली. प्रियमैत्रीण आली, हें पाहतांच जिचे डोळे आनंदाश्रूंनीं भरून आले आहेत, अशी **कलिंगसेना** तत्काल समोर गेली. व तिला प्रेमपूर्वक मिठी मारून आपल्या जवळ आणून बसविली. नंतर कुशलप्रश्न करून **कलिंगसेना** तिला ह्मणाली, "सखे, तुझ्या मुखरूपी पूर्ण चंद्राचें दर्शन न झाल्यामुळें केवळ अंधकारमय अशी, गेली त्रियामा शतयामेसारखी मोठ्या संकटानें गेली. यावरून तुझा आणि माझा जन्मांतरींचा संबंध कोणता असावा बरें ! कीं, ज्याचा हा परिणाम दिसत आहे. वर्षानुवर्ष ज्यांच्यांशीं माझी मैत्री, त्यांच्यांविषयींदेखील मला असें कधींच वाटलें नाहीं. तुझीतर

---

१ 'याम' हें प्रहराचें नांव आहे. दिवस आणि रात्र यांत चार चार प्रहर होतात; पण रात्रीला 'त्रियामा' अर्थात् तीन प्रहराची, असें म्हणतात. याचें कारण असें कीं, सायंकालचा अर्धा प्रहर व पहांटेचा अर्धा प्रहर मिळून एक प्रहर संध्याकालांत गणला जातो. अर्थात् बाकी तीनच प्रहर राहतात. 'त्रियामा असून शतयामा वाटली' म्हणजे रात्र तीन प्रहरांची असून शंभर प्रहरांची आहे; असें वाटलें. दुःखितावस्थेंत वेळ सरतां सरत नाहीं. सोमप्रभेच्या वियोगानें अंतःकरण अस्वस्थ झाल्यामुळें; रात्र मोठी वाटली, असें तात्पर्य.

कालचीच प्रथमची भेट. इतक्या अल्पकाळांत स्नेहानुबंध इतका दृढ झाला याचें कारण मलातर कांहीं समजत नाहीं. तुला ठाऊक असेल तर सांग."

**कलिंगसेनेचें** हें भाषण ऐकून **सोमप्रभा** ह्मणाली, "गडे, राजपुत्रि, माझें इतकें कांहीं ज्ञान नाहीं. मला पूर्वजन्मींची आठवण नाहीं. हें ह्मणजे मलाच समजत नाहीं असें नाहीं. मोठे मोठे ऋषि देखील याविषयीं अजाणते असतात. आतां हें खरें आहे कीं, कित्येक आपलें पूर्वजन्मांतलें वृत्त उत्तमप्रकारें जाणतात; पण तशा मुनींची योग्यता फारच मोठी असें ह्मटलें पाहिजे. जे आत्मतत्त्व जाणणारे असतील त्यांनाच अशा गोष्टींचें ज्ञान व्हायचें. मी आपली साधारण तुमच्यांतलीच आहें. मला कांहीं अलौकिक गोष्टी समजतात, असें मुळींच नाहीं."

**सोमप्रभेनें** याप्रमाणें सांगून आपल्या सखीचें समाधान केलें. नंतर प्रेमपूर्वक तिच्यावर पूर्ण विश्वास ठेवून, **कलिंगसेना** मोठ्या कौतुकानें तिला एकांतीं नेऊन ह्मणाली, "सखे, मी काल तुला प्रश्न केला होता. त्याचें तूं त्यावेळीं उत्तर दिलें नाहींस. त्यावेळीं आणखी बऱ्याच माझ्या सख्या तेथें बसल्या होत्या ह्मणून मीही तुला आग्रह केला नाहीं; पण आतां येथें दुसरें कोणी नाहीं. तेव्हां आपली खरी हकीकत काय असेल ती सांग? देवांत निरनिराळे अनेक भेद आहेत. त्यांपैकीं कोणत्या देवजातीच्या पित्याच्या पोटीं जन्म धारण करून, गरगरीत वाटोळ्या उत्तम मुक्ताफलानें जसा समुद्राचा तो प्रदेश अलंकृत करावा, तसा तूं कोणाचा वंश शोभविला आहेस? तसेंच लोकांच्या कानांला अमृतासारखें गोड लागणारें तुझें नांव काय, तेंही मला सांग? आणि तूं ही करंडी कशा करतां आणली आहेस? आणि तींत कोणती वस्तू आहे, तें मला समजण्याची इच्छा आहे?"

याप्रमाणें प्रेमपूर्वक **कलिंगसेनेनें** विचारलें; तें श्रवण करून **सोमप्रभा** अनुक्रमानें तिच्या सर्व प्रश्नांचीं उत्तरें सांगूं लागली. ती

ह्मणाली, "त्रैलोक्यांत प्रख्यात असा **मय** नांवाचा मोठा असुर आहे. **कृष्णानें** त्याला संकटांतून मुक्त केलें. तेव्हांपासून त्यानें आपला असुरपणा सोडून **कृष्णाचे** पाय धरले आहेत. त्याणें त्याला अभय दिलें. तेव्हां **मयासुरानें इंद्राला** एक उत्तम प्रकारची सभा तयार करून दिली. यावरून तो देवांच्या पक्षाला मिळाला असें समजून दैत्य त्याच्यावर फार संतापले. व त्याचा नाश करण्याविषयीं प्रयत्न करूं लागले. तेव्हां त्यांच्या भयानें **मयासुरानें विंध्य** पर्वताच्या खोऱ्यांत आपल्या मायेच्या सामर्थ्यानें एक मोठें भुयार तयार केलें, व त्यांत मोठा सुंदर महाल बांधला. मोठमोठ्या दैत्यांलाही तें स्थळ अगदीं अगम्य झालें. त्याठिकाणीं आश्चर्यकारक अशा अनेक कृती त्यानें केल्या. व तो सांप्रत तेथें गुप्तठिकाणीं रहात असतो. त्याच्या आह्मी दोघी मुली

---

१ अर्जुनानें खांडववन अग्नीला दिलें हें प्रसिद्धच आहे. जेव्हां तो तें जाळूं लागला, तेव्हां तेथील असंख्य प्राणी जळून खाक झाले. व जे कोणी बाहेर पळून जाण्याचा प्रयत्न करीत त्यांला मारून अर्जुन अग्नीला अर्पण करीत होता. मयासुरही त्याच खांडववनांत रहात होता. तो पळून जाऊं लागला. तेव्हां, अर्जुनानें त्याला घेरला. व त्याला अग्नींत टाकायचा, त्यावेळीं त्याणें काकुळती येऊन प्रार्थना केल्यावरून कृष्णानें त्याला सोडवून घेतलें. त्यादिवसापासून अर्जुनाची आणि त्याची विशेष दोस्ती झाली. व दैत्यजातीचें उग्र वर्त्तन सोडून मी शांतपणानें वागेन असें मयासुरानें कृष्णाजवळ कबूल केलें. अशी कथा महाभारतांत आदिपर्वाच्या शेवटीं वर्णन केली आहे.

२ जसा देवांचा सुतार विश्वकर्मा तसाच दैत्यांचा सुतार मय, असें प्राचीन ग्रंथांत वर्णन केलें आहे. विश्वकर्म्यापेक्षांही, मयाचें कौशल्य विशेष होतें, असें वर्णन करतात. येथें मुळांत मयासुरानें इंद्राला सभा करून दिली, असें ह्मटलें आहे; पण तें बरोबर नाहीं असें वाटतें. कारण इंद्राची सुधर्मा नामक सभा विश्वकर्म्यानें उत्पन्न केली असल्याचें प्राचीन अनेक ग्रंथांत वर्णन केलें आहे. व मयासुराची आणि कृष्णाची भेट झाली, ही गोष्ट अलीकडची आहे. इंद्र होऊन किती वर्षे झालीं कोणास ठाऊक! तेव्हां त्याची सभा या पूर्वीची असली पाहिजे. अर्जुनाचें प्रिय करण्याकरतां व त्यानें जीवदान दिलें ते उपकार फेडण्याकरतां कृष्णाच्या व धर्मराजाच्या संमतीनें मयासुरानें युधिष्ठिराला सभा करून दिली. व तिला मयसभा ह्मणत होते. असें महाभारतांत सभापर्वांत वर्णन केलें आहे, तें विशेष संगतवार दिसतें.

आहोंत. अद्यापपर्यंत आह्मीं ब्रह्मचर्य धारण केलें होतें. मी धाकटी आहें. माझ्या थोरल्या बहिणीचें नांव **स्वयंप्रभा**. ती बापाच्या घरींच आहे. माझें नांव **सोमप्रभा. नलकूबर** नामक **कुबेराच्या** पुत्राशीं नुकताच माझा विवाह झाला आहे. माझ्या बापानें मला अनेकप्रकारचीं यंत्रें व माया शिकविल्या आहेत. तुझ्या करमणुकीकरतां आज मीं कांहीं यंत्रें आणलीं असून तीं या करंडींत आहेत. आतां क्षणभर तुला त्यांचा काय चमत्कार आहे तो दाखवितें."

असें सांगून **सोमप्रभेनें** ती करंडी उघडली. व तींतून यंत्रमय, मोठ्या आश्चर्यकारक अशा अनेक बाहुल्या बाहेर काढल्या. त्यांतल्या एका बाहुलीची कळ दाबतांच ती मोठ्या वेगानें आकाशांत उडून गेली. तिला **सोमप्रभेनें**—'फुलांचा हार घेऊन ये,' असें सांगितलें होतें. त्याप्रमाणें कांहीं वेळानेंती एक सुंदर हार घेऊन आली. नंतर दुसऱ्या बाहुलीची कळ दाबून **सोमप्रभेनें** तिला पाणी आणावयास सांगितलें. त्याप्रमाणें ती पाणी घेऊन आली. एकीला नाचावयास सांगितलें, ती नाचूं लागली. दुसरी, गोष्टी सांगूं लागली! तात्पर्य, **सोमप्रभेनें** जिलाजिला जेंजें काम सांगितलें; तेंतें तिणेंतिणें तत्काल केलें. हा आश्चर्यकारक खेळ, **कलिंगसेना** अगदीं चकित होऊन पहात होती. कांहीं वेळानें खेळ पुरा करून **सोमप्रभेनें** त्या सर्व बाहुल्या पुनः करंडींत भरल्या. व चांगल्या सुरक्षित ठिकाणीं बंदोबस्तानें ठेवावयास लावल्या. आणि ती **कलिंगसेनेला** ह्मणाली, "गडे, मला पुष्कळ वेळ झाला. घराकडे (नवरा) वाट पहात असतील. तेव्हां मला आतां गेलें पाहिजे." असें सांगून ती जाण्यास निघाली.

**कलिंगसेना** तिचा वियोग सहन करण्यास असमर्थ होती. तरी ती आपल्या नवऱ्याचया ताब्यांत आहे. तेव्हां आग्रह करणें ठीक नाहीं, असें समजून **सोमप्रभेला** तिनें निरोप दिला, व तीही तत्काल आकाशमार्गानें आपल्या घरीं गेली. इकडे तिनें जो खेळ दाखविला होता; तो

पाहून **कलिंगसेना** इतकी आश्चर्यचकित झाली होती कीं तिची त्या दिवशीं तहान व भूकदेखील नाहींशी झाली! ती आनंदांत तो सारा दिवस उपोषितच राहिली होती. एकाएकीं कांहीं कारण नसतां मुलगीनें कांहीं खाल्लें नाहीं, प्याली नाहीं, हें पाहून तिच्या आईला दुसरीच शंका आली. तिला असें वाटलें कीं, हिला कांहींतरी विकार झाला आहे; त्यायोगानें हिची भूक नाहींशी झाली असावी. असें समजून तिणें—**आनंदवर्धन** नामक जो त्यांचा राजवैद्य होता, त्याला बोलावून **कलिंगसेने**ची प्रकृति पाहण्यास सांगितलें. त्याणें नाडी पाहिली तों रोग असल्याचें त्याला दिसून आलें नाहीं. तो म्हणाला, "हिला रोगबीग मुळींच नाहीं. कांहीं कारणानें हिला मोठा आनंद झाला असावा. व त्यामुळें हिची भूक नाहींशी झाली असावी. त्यांत रोगाचा कांहीं संबंध नाहीं. हिचे डोळे टवटवीत आहेत, तोंड हंसरें दिसतें आहे, यावरून मी सांगतों हें तुमच्याही लक्ष्यांत येईल."

वैद्यानें असें सांगितलें तें तिच्या आईलाही खरें वाटलें. तिनें तिला एकान्तीं नेऊन—'असा अतिशय आनंद होण्याचें कारण काय?' असें विचारलें, तेव्हां **कलिंगसेनेनें सोमप्रभे**ची भेट झाल्यापासून हावेळपर्यंत घडलेला सर्व वृत्तांत तिला सांगितला. तो ऐकून चांगल्या मोठ्या कुळांतल्या व चतुर मुलीशीं सख्यसंबंध झाला; हें ऐकून तिच्या आईला फार संतोष वाटला. व तिणें त्याबद्दल मुलीचें अभिनंदन केलें. मग तिणें आणखी कांहीं गोष्टी काढून तिचा तो आनंद अंमळ कमी केला. व विशेष आग्रह करून तिला जेवायला लावलें. मग **सोमप्रभे**च्या भेटीविषयीं उत्कंठित अशा स्थितींत **कलिंगसेनेनें** राहिलेला दिवस व ती रात्र कशीतरी घालविली.

नंतर दुसऱ्या दिवशीं पुनः **सोमप्रभा** आपल्या मैत्रिणीच्या भेटीस आली. व तिच्या संबंधाच्या बऱ्याच गोष्टी झाल्या. त्यांत—'आपणां उभयतांची मैत्री झाल्याचें वर्तमान आपण आपल्या आईला कळविलें' असें

**कलिंगसेनेनें** तिला सांगितलें. तेव्हां तिला एकान्तीं नेऊन **सोमप्रभा** हळूच ह्मणाली, "गडे **कलिंगसेने**, मी काल तुझ्याशीं आपलें सख्य झाल्याची हकीकत घरांत ( नवऱ्याला ) कळविली. व प्रतिदिवशीं तुझ्या भेटीस येण्याविषयीं त्यांच्याकडे आज्ञा मागितली. तेही समजूतदारच आहेत. त्यांणीं त्याबद्दल कांहीं शंका न घेतां; मला तत्काल आज्ञा दिली. याप्रमाणें मीं तुझ्या भेटीविषयीं परवानगी घेऊन ठेविली आहे. तेव्हां तूंही आपल्या आईबापांची आज्ञा घे. ह्मणजे तूं माझ्याबरोबर यथेच्छ निःशंकपणें विहार करशील. पहा तुला कसें वाटतें तें!"

**कलिंगसेनेला** हें पाहिजेच होतें. ती ह्मणाली, "माझ्या मनांत होतें तेंच तूं सांगितलेंस. तर चल आतां तुला मी आपल्या आईकडे घेऊन जातें." असें बोलून ती **सोमप्रभेचा** हात धरून तिला आपल्या आईकडे घेऊन गेली. यावेळीं तिचा पिता राजा **कलिंगदत्तही** तेथेंच बसला होता. व **कलिंगसेनेच्याच** संबंधाच्या त्यांच्या कांहीं गोष्टी चालल्या होत्या. इतक्यांत **सोमप्रभेसहवर्तमान कलिंगसेना** तेथें गेली. व तिणें **सोमप्रभेचें** नांव, तिचें कुळ, वगैरे सांगून आई आणि बाप यांला तिची भेट करून दिली. राजा **कलिंगदत्त** व राणी **तारादत्ता** या उभयतांनीं **सोमप्रभेचें** सप्रेम गौरव केलें. व आपल्या मुलीशीं झालेल्या सख्यसंबंधाविषयीं विशेष आनंद प्रदर्शित केला. तिची—प्रौढ, कुलीन आणि चतुर स्त्रीला साजेल अशी आकृति पाहूनच संतुष्ट झालेले ते दोघे स्त्रीपुरुष सत्कारपूर्वक त्या दैत्यकन्येला ह्मणाले, "बाई, तुझाआमचा कांहीं नात्याचा संबंध नाहीं. तरी ज्यापेक्षां तूं वयानें लहान आहेस, व आमच्या या **कलिंगसेनेची** मैत्रीण झाली आहेस. तेव्हां तूं आह्मांस मुलीसारखीच आहेस. तुला सांगायचें ह्मणून इतकेंच कीं; ही **कलिंगसेना** आह्मीं तुझ्या हातांत सोंपवली आहे. तेव्हां तुह्मी दोघीही इच्छेप्रमाणें खुशाल विहार करा. तुझ्याकडून कोणतीही अयोग्य गोष्ट होणार नाहीं, अशी आमची पुरी खातरी आहे. व ह्मणू-

नच या **कलिंगसेने**ला मोकळीक देण्याविषयीं आह्मांस कांहीं धास्ती वाटत नाहीं."

हें त्या उभयतांचें भाषण ऐकून **सोमप्रभे**ला फार समाधान वाटलें. तिणें आपल्या मातापितरांप्रमाणें त्यां दोघांला मान देऊन त्यांची आज्ञा घेतली. व ती **कलिंगसेने**ला बरोबर घेऊन, तेथून निघून राजा **कलिंगदत्तानें** एक विश्रांतिस्थान केलें होतें, तेथें आली. येतेवेळीं तिनें बाहूल्यांची करंडी आपल्या बरोबर आणिली. तें स्थान अगदीं निवांत असून मोठें रमणीय होतें. त्या दोघीही मैत्रिणी तेथें यथेच्छ विहार करूं लागल्या. नंतर, **सोमप्रभेनें** ती करंडी उघडून त्यांतून एक यंत्रमय यक्षाची बाहुली काढिली. व तिची कळ दाबून त्याला **बुद्धाच्या** पूजेचें साहित्य आणावयास सांगितलें. तेव्हां तो यक्ष तत्काल आकाशांत उडून फार दूर गेला. व तेथून मोतीं, रत्नें, सुवर्णमय कमलें वगैरे अनेक उत्तम वस्तू घेऊन आला. नंतर मंदिरासहवर्तमान अनेक **बुद्धीच्या** मूर्ति त्या यक्षानें उत्पन्न केल्या. व प्रथम आणलेल्या साहित्यानें त्यांची यथायोग्य पूजा केली.

**सोमप्रभेनें** हा जो एक चमत्कारिक देखावा उत्पन्न केला. तो पाहून **कलिंगसेने**ला फारच आश्चर्य वाटलें. व तिनें त्या मैत्रिणीच्या संमतीनें तें पाहण्याकरितां आपल्या आईबापांला तेथें बोलाविलें. त्या उभयतांलाही तो चमत्कार पाहून फारच अचंबा वाटला. तेव्हां राजा **कलिंगदत्तानें** 'हा काय चमत्कार आहे?' ह्मणून प्रश्न केल्यावरून **सोमप्रभा** ह्मणालीः—"महाराज, हीं अनेकप्रकारचीं मायेनें निर्माण केलेलीं यंत्रें आहेत. व यांत विलक्षण प्रकारचें कौशल आहे. हीं पूर्वीं माझ्या पित्यानें उत्पन्न केलीं. जसें पंचभूतात्मक हें जगत् एकप्रकारचें यंत्र आहे; तशाच प्रकारचीं हींही यंत्रें आहेत. यांची निरनिराळी माहिती सांगतें ती ऐका. हें एक यंत्र पृथ्वीप्रधान आहे, ह्मणजे यांत पृथ्वीचा अंश विशेष आहे. हें सोडलें ह्मणजे दारें वगैरे बंद होतात, आणि चमत्कार असा आहे कीं;

या यंत्रानें दारें लागलीं, ह्मणजे तीं दुसऱ्या कशानेंही उघडलीं जात नाहींत! जेव्हां हें यंत्र परत घ्यावें, तेव्हांच तीं उघडणार. तसेंच हें दुसरें उदकप्रधान यंत्र आहे. याच्यायोगानें पाहिजे तो आकार घेतां येतो, व तो सजीव असल्यासारखा दिसतो. हें तिसरें यंत्र तेजोमय आहे. यापासून तेजाच्या ज्वाळा निघतात. हें चवथें वायुयंत्र आहे. याच्यायोगानें चलनवलन व गमनागमन इत्यादि क्रिया होतात. हें पांचवें आकाशप्रधान यंत्र आहे. याच्यायोगानें भाषण व्यक्त होतें. हीं पांच यंत्रें माझ्या तातानें मला दिलीं; पण या सर्वांचें रक्षण आणि या सर्वांपासून अथवा इतर कोणापासूनही उपद्रव झाला असतां त्यांपासून रक्षण करणारें असें अमृतमय जें चक्रयंत्र आहे; तें फक्त आमच्या बाबांला मात्र ठाऊक आहे. त्यांच्यावांचून दुसऱ्या कोणालाच तें माहीत नाहीं."

**सोमप्रभेनें** याप्रमाणें त्या यंत्रांची विशेष माहिती सांगितली, व तें तिचें सांगणें राजा, राणी व **कालिंगसेना** यांला खरेंही वाटलें. नंतर आपला भाव व्यक्त करण्याविषयीं राजा कांहीं बोलणार, इतक्यांत दोनप्रहर झाल्याची सूचना करणाऱ्या शंखाचा नाद ऐकूं आला. तेव्हां आपल्याला व **कलिंगसेनेला** भोजन द्यावें अशी **सोमप्रभेनें** राजाला विनंती केली. तेव्हां त्याच्या हुकुमानें तेथें जेवणाचीं ताटें सेवकांनीं आणिलीं. राजा, राणी, **कलिंगसेना** व **सोमप्रभा** या चौघांनीं तेथेंच मोठ्या आनंदांत इकडच्या तिकडच्या गोष्टी करीत भोजन केलें. नंतर **सोमप्रभेनें कलिंगसेनेला** आपल्या बरोबर घेऊन जाण्याविषयीं राजाची आज्ञा घेतली. व तत्काल यंत्रमय विमान उत्पन्न करून दोघी सख्यांसहवर्तमान **कलिंगसेनेला** विमानांत बसवून **सोमप्रभा** तेथून निघून गेली. व त्या तिच्या विलक्षण सामर्थ्याच्या अवलोकनानें चकित झालेलीं राजा व राणी हीं उभयतां परत आपल्या महालांत गेलीं.

इकडे **कलिंगसेनेला** घेऊन **सोमप्रभा** आकाशमार्गानें आपल्या

थोरल्या बहिणीला भेटण्याकरतां बापाच्या घरीं गेली. ती क्षणमात्रानें विंध्यपर्वतावरील खोऱ्यांत पोंचली. व तेथून तिचें विमान संकुचित होऊन एका मोठ्या विवरांत शिरलें. तें मयासुरानें उत्पन्न केलेल्या वाड्यांत पोंचलें. नंतर, कलिंगसेनेला आपल्या हातीं धरून सोमप्रभा तिला आपली वडील बहीण स्वयंप्रभा हिच्याजवळ घेऊन गेली. जिनें जटांचा मुकुट धारण केला आहे; व जिच्या गळ्यांत मोठी लांब अक्षमाला आहे; जी उत्तमप्रकारचें सफेत वस्त्र नेसली आहे; अशी कडकडीत ब्रह्मचर्यव्रत धारण केलेली हास्यमुख प्रत्यक्ष पार्वतीच कीं काय ? अशी दिसणारी; विषयांचा उपभोग हाच कोणी एक सर्प, त्याच्या तोंडांतून सुटावें ह्मणून जिणें उग्र तपश्चर्या आरंभिली आहे; अशा त्या स्वयंप्रभेला पाहतांच कलिंगसेनेला तिच्याविषयीं मोठा पूज्यभाव उत्पन्न झाला. सोमप्रभेनें तिचें नांव, कूळ वगैरे सांगून तिची व आपल्या बहिणीची भेट करून दिली. तिच्या तेजानें दिपून गेलेली व भक्तीनें नम्र झालेली कलिंगसेना स्वयंप्रभेच्या पायांवर मस्तक ठेवून हात जोडून पुढें उभी राहिली. तेव्हां स्वयंप्रभेनें तिला आपल्या मांडीवर बसवून लाडक्या बहिणीप्रमाणें प्रेमपूर्वक तिचें लालन केलें. व उत्तम उत्तम फळें व अमृतासारखें स्वच्छ उदक तिला दिलें. तें पाहून सोमप्रभा ह्मणाली, "सखे कलिंगसेने, हीं फळें तूं खा. यांचा प्रभाव फार मोठा आहे. हीं खाल्लीं ह्मणजे तुला म्हातारपण कधींही प्राप्त व्हायचें नाहीं. व जरेनें या तुझ्या सुंदर रूपाचा मुळींच बिघाड व्हायचा नाहीं ! बर्फाच्या योगानें जसें कमल विद्रूप होतें, तसा वार्धक्याच्या योगानें सुंदर रूपाचा बिघाड होतो. आणि असे कांहीं दिव्य उपाय न केले तर, अनुक्रमानें जरा मनुष्याला ग्रासल्यावांचून रहातच नाहीं. तेव्हां तसें न व्हावें ह्मणूनच मी तुला मुद्दाम येथें आणलें. तुझामाझा स्नेह आहे; त्याप्रमाणें जशी माझी स्थिति आहे तशीच तुझी असली पाहिजे. नाहींतर स्नेह असून काय उपयोग ?"

सोमप्रभेनें असें सांगितलें तें ऐकून राजकन्या कलिंगसेना हिणें मनांत कांहीं संशय न धरतां; तीं फळें यथेच्छ खाल्लीं. दिव्यच फळें तीं! तीं तिच्या पोटांत जातांच अमृतरसानें स्नान घातल्याप्रमाणें कलिंगसेनेला वाटलें. नंतर सोमप्रभेसहवर्तमान ती समोरच्या बागेंत संचार करूं लागली. तेथें, ज्यांत सोन्याचीं कमळें आहेत अशा लहान लहान तळ्या, अमृतासारख्या गोड फळांचे उत्तम वृक्ष, चित्रविचित्र सोनेरी रंगांचे अनेक पक्षी, रत्नखचित मोठमोठे खांब, जेथें भिंत नाहीं तेथें भिंतीचा भ्रम होत असून जेथें खरोखर ती आहे तेथें मुळींच आहे असें वाटत नाहीं अशा प्रकारचीं स्थळें, आणि जलाशय असून तेथें स्थल आहे असें वाटावें व स्थल आहे तेथें जलाशय आहे असें वाटावें, असे मयासुरानें मायेनें निर्माण केलेले अनेक चमत्कार कलिंगसेननें पाहिले. व त्यावरून हा एक दुसरा लोकच आहे असें तिला वाटलें. ज्याठिकाणीं पूर्वीं सीतेचा शोध करायला निघालेले वानर शिरले होते, व पुष्कळ दिवसांनीं स्वयंप्रभेच्या प्रसादानें ज्यांला बाहेर निघतां आलें, अशा त्या विवरांत कलिंगसेनेला एकाहून एक आश्चर्यकारक असे अनेक प्रकार दृष्टीस पडले. नंतर तें अद्भुत नगर यथेच्छ अवलोकन करून विस्मित झालेली, व तीं दिव्य फळें खाल्ल्यामुळें जरा येण्याचें जिचें भय गेलें आहे, अशा कलिंगसेनेकडून स्वयंप्रभेचा निरोप घेववून सोमप्रभा तिच्या सहवर्तमान पुनः त्या यंत्रमय विमानांत बसून परत तक्षशिला नगरींत कलिंगसेनेच्या आईबापांजवळ प्राप्त झाली. व तिला त्यांच्या अधीन करून त्यांचा निरोप घेऊन सोमप्रभा आपल्या भर्त्याकडे निघून गेली.

इकडे, आईबापांनीं मोठ्या कौतुकानें —'मुली, आज काय काय चमत्कार पाहिलेस?' म्हणून कलिंगसेनेला विचारल्यावरून तिनें तेथून

---

१ सीतेचा शोध करायला निघालेले वानर फिरत फिरत या स्वयंप्रभेच्या विवरांत प्राप्त झाले होते, ही कथा रामायणांत किष्किंधाकांडांत सविस्तर वर्णन केली आहे.

गेल्यापासून परत येईतोंवर ज्या ज्या गोष्टी घडल्या; त्या सर्व इत्थंभूत त्यांना सांगितल्या. बाकी जो तिणें चमत्कार वर्णन केला, तो ऐकून त्यांना मोठें आश्चर्य वाटलेंच; पण, आपली मुलगी जरेच्या भयापासून मुक्त झाली, हें ऐकून त्यांना अतिशय आनंद झाला. व **सोमप्रभेनें** आपल्यावर हा मोठा अनुग्रह केला असें समजून राजा **कालिंगदत्त** व राणी **तारादत्ता** उभयतांही **सोमप्रभेचे** फार आभारी झाले. याप्रमाणें प्रतिदिवशीं **सोमप्रभा कालिंगसेनेला** आपल्याबरोबर कोठेंतरी फिरायला घेऊन जात असे. व प्रत्येक खेपेस कांहींतरी नवे नवे चमत्कार तिला दाखवीत असे. असा नित्य क्रम चालला होता. एकेदिवशीं **सोमप्रभा** बोलतां बोलतां सहज **कलिंगसेनेला** ह्मणाली, "गडे, मला आतां तुझी मैत्री हळूहळू कमी करीत गेलें पाहिजे. कारण तूं आतां उपवर झाली आहेस. लवकरच तुझें लग्न होईल. आणि मग तूं आपल्या भर्त्याच्या घरीं जाशील. तेथें माझें कोठून येणें होणार ? व असा यथेच्छ विहार करायाला तरी कोठून मिळणार ? असें सांगितलें आहे कीं; आपल्या मैत्रिणीच्या नवऱ्याकडे डोळे वर करून पाहूं देखील नये. व कदाचित् तो आग्रह करूं लागला तरी त्याच्या सहवासांत मुळींच राहूं नये ! याशिवाय तूं सासरीं गेलीस ह्मणजे तेथले सोहाळे कांहीं निराळेच आहेत. सासुरवासापुढें सुनेला आपला जीवदेखील नकोसा होतो. जशी लांडगी शेळीचें मांस तोडतोडून खाते; तशी सासू सुनेचे लचके तोडते! या सासुरवासाच्या संबंधानें मला **कीर्तिसेनेची** कथा आठवली ती तुला सांगतें.

पूर्वी **पाटलिपुत्र** नांवाच्या शहरांत, द्रव्यवानांत परमश्रेष्ठ यथार्थ नांव धारण करणारा **धनपालित** नांवाचा एक सावकार होता. त्याला **कीर्त्तिसेना** नांवाची मुलगी होती. ती रूपानें अप्रतिम असून एकुलती एक असल्यामुळें आईबापांला प्राणांपेक्षांही अधिक प्रिय वाटत होती. ती कन्या बापाला इतकी प्रिय होती; तरी ती प्रौढ झाल्यावर त्याला

तिचा वियोग सहन करावा लागला. उघडच आहे कन्या झटली झणजे तें दुसऱ्याचें धन. आईबापांनीं लालन-पालन करून लहानाची थोर करावी; एवढेंच काय तें त्यांचें काम. प्रौढ झाली कीं, तिला दुसऱ्याची धन केली पाहिजे! त्याप्रमाणें **धनपालितानें मगध**देशांत मोठा संपन्न **देवसेन** नांवाचा एक तरुण सावकार, रूपगुणादिकांनीं आपल्या मुली-जोगता आहे, असें पाहून **कीर्तिसेना** त्याला दिली. तो **देवसेन** मोठा सज्जन होता. त्याच्यापासून **कीर्तिसेने**ला काडीभरदेखील कधीं त्रास झाला नाहीं; पण त्याची आई फार दुष्ट होती. **देवसेना**चा बाप लहानपणींच वारला होता. यामुळें घरची मालकी तिच्या कडेसच होती. **कीर्तिसेना** ही मोठी सुशील मुलगी होती. व उभयतां नवरा-बायकोंच्या स्वभावाला पटल्यामुळें त्यांचें परस्परांवर निःसीम प्रेम होतें. द्वाष्ट स्वभावाच्या आईला मुलाचें आणि सुनेचें जमलेलें सहन होत नाहीं. **देवसेन** आपल्या बायकोवर फार प्रेम करतो, हें पाहून ती दुष्ट आई सुनेवर उभी जळत होती. उघडच आहे; सुनेचें आणि मुलाचें ऐक्य झालें; झणजे आपलें कांहीं चालणार नाहीं, अशी तिला भीति पडली होती. **देवसेना**च्या परोक्ष ती **कीर्तिसेने**ला पुष्कळ घालून-पाडून बोलत असे; पण त्या सुशील सुनेनें—'आपली सासू असें करते' झणून नवऱ्याजवळ कधीं एक अक्षरदेखील काढलें नाहीं. खरोखर दुष्ट सासूचा जाच सहन करून राहणाऱ्या सुनेचें जिणें मोठें कष्टकारक आहे. असो.

याप्रमाणें सासू जाच करीत होती, तरी **कीर्तिसेनेनें** मुकाट्यानें तें सर्व सहन करून नवऱ्याकडे पाहून ती त्यांतल्या त्यांत आनंदानें दिवस घालवीत होती. पण लवकरच तिला ती गोष्ट उघड करणें भाग पडलें. **देवसेन** कांहीं व्यापाराच्या निमित्तानें **वलभी**नामक नगरीला जाण्यास प्रवृत्त झाला. 'आजपर्यंत—नवरा प्रत्यक्ष घरीं असतांना देखील—सासू आपल्याला असा त्रास देत होती! तेव्हां आतां पती देशांतरास

गेल्यावर ती आपली धडगत लावणार नाहीं; अशी **कीर्तिसेने**च्या मनाची खातरी झाल्यावरून तिणें, आपल्याला बरोबर नेण्याविषयीं **देवसेना**ला गळ घातली; पण, त्याला तशी सवड नव्हती. परदेशांत बायकोला नेणें हें मोठें धोक्याचें असून तसें केलें तर आईलाही फार वाईट वाटेल, ह्मणून त्याणें बायकोचें ह्मणणें मान्य केलें नाहीं. तो बिचारा सरळमनाचा होता. त्याला आपल्या आईचें कवटाळ मुळींच माहीत नव्हतें. त्याणें बरोबर नेण्याविषयीं अगदीं निराशा केली; तेव्हां, **कीर्तिसेना** डोळ्यांत पाणी आणून ह्मणाली, "आर्यपुत्रा, मी अशी भलताच हट्ट घेणारी नाहीं. परदेशांत मला नेण्याची आपल्याला सवड नाहीं, हें मीही जाणतें; पण, येथें राहून माझा परिणाम लागायचा नाहीं. इतके दिवस मीं या गोष्टी आपल्याला सांगितल्या नाहींत ; पण, आतां सांगणें भाग पडलें. मी येथें राहण्याविषयीं नाकबूल असण्याचें कारण दुसरें कांहीं नाहीं. या तुमच्या मातोश्रीबाई मला फारच जाच करतात. आपण येथें असतांना या मला अशा गांजतात; तेव्हां आपण दूर-देशीं गेल्यावर माझे किती हाल करतील याचा आपणच विचार करा!"

असें सांगून **कीर्तिसेना** रडूं लागली. तेव्हां **देवसेना**नें तिचें समाधान केलें. आईचें हें कृत्य ऐकून, तो भांबावल्यासारखा झाला. जशी त्याची आईवर भक्ती होती; तशीच बायकोवरही विशेष प्रीति होती. बायको खोटें सांगेल असें त्याला वाटेना; पण याबद्दल आईला कांहीं बोलावें हेंही त्याला योग्य वाटेना. अशी त्याची चमत्कारिक स्थिती झाली. नंतर आईला दोन गोष्टी समजून सांगाव्या असा विचार करून तो तिच्याजवळ गेला. आणि तिला नमस्कार करून ह्मणाला, "आई, मी तर आतां निघालोंच. ही (**कीर्तिसेना**) मी तुझ्या हातीं सोंपविली आहे. हिच्याविषयीं कठोरपणा करूं नकोस. ही चांगल्या कुलीन व श्रीमंताची मुलगी आहे. एखादें काम तिच्या हातून न झालें तरी कांहीं अडचण नाहीं. आपल्या घरांत चाकरमाणसांला कांहीं

कमी गेलें आहे का? " **देवसेना**ला आईचें कपट माहीत नसल्यामुळें हावेळपर्यंत त्यानें असें कधींच भाषण केलें नव्हतें. आज तो कांहीं निराळ्या प्रकारचें बोलला. तें ऐकून त्याला आपलें कौटिल्य समजू नये; ह्मणून ती **कीर्तिसेने**ला तेथें बोलावून डोळे वटारून, **देवसेना**ला ह्मणाली, "अरे, तूं असें कां सांगतोस? आणि मीं असें काय केलें आहे? या तुझ्या बायकोला मी कांहीं जाच केला असला तर विचार." **कीर्त्ति-सेने**ला ह्मणाली, "कां? सांगत नाहींस कां? मीं काय तुला मारली; कीं हाटली; कीं उपाशी ठेवली; कीं काय केलें तें सांगून दे." बिचारी ती कुलीन **कीर्त्तिसेना** त्या राक्षसीपुढें काय बोलणार? ती मान खालीं घालून मुकाट्यानें एका बाजूला उभी राहिली. तेव्हां, ती **देवसेना**ला ह्मणाली, "बाबा, माझें कांहीं गेलें नाहीं; पण या तुझ्या बायकोचीं लक्षणें कांहीं चांगलीं दिसत नाहींत. माझें काय आहे! तूं मुलगा आणि ती सून. दोघेंही मला सारखींच आहांत. माझ्या काय आणखी दहा पांच सुना आहेत का लेकी आहेत? माझें रे काय? बरें वाईट जें काय कराल तें तुमचे तुह्मी भोगाल. एकुलता एक तूं मुलगा असून ही माझी लाडकी सून. हिला मी कसा बरं जाच करीन? असें असून, ही जेव्हां तुला नाहींनाहीं तें सांगते; तेव्हां, हिच्या मनांत घर फोडायचें आहे; आणखी दुसरें कांहीं नाहीं!"

त्या कौटाळ्या आईनें असें भाषण केलें तें ऐकून, **देवसेना**चें अंमळ समाधान झालें. उघडच आहे. अगदीं खोटीं असून प्रेमळ दिसणारीं अशीं आईचीं बोलणीं ऐकून कोण फसणार नाहीं! **कीर्त्तिसेनेनें** सासूबाईचें तें ममताळू बोलणें लक्ष्यपूर्वक ऐकलें. व त्यावरून आपल्या नवऱ्याचें समाधान झालें, असें दिसल्यावरून ती मनांत फार दुःखित झाली, व तिला सासूच्या बोलण्याचें फार हसूं येऊं लागलें. तरी, **देवसेना**जवळ पुनः तिणें त्यासंबंधानें एक अक्षरंद्खील काढलें नाहीं. दैवांत काय लिहिलें असेल तें होईल, असें ह्मणून ती स्वस्थ बसली. इकडे **देवसेना**ची निघण्याची अगदीं तयारी झाली होती. दुसरे दिवशीं पहांटे बायकोचा

ेमपूर्वक निरोप घेऊन व आईला नमस्कार करून तो तेथून निघाला याच्या आईला मुलग्याची काय ती खेट होती. तो निघून जातांच स ाळें राज्य तिच्या हातांत आलें. तेव्हां सुनेचा पुरता दावा साधावा अस तेणें पक्का निश्चयच केला.

बिचारी महापतिव्रता **कीर्तिसेना** पतिविरहानें दुःखित झाली होती ी वरचेवर घरधनी सुखरूपपणें परत घरीं कधीं येतील, याची काळजी करीत होती. विरहाच्या क्लेशानें अशक्त झाली होती. अशा स्थितींत तेची सासू—अथवा दावेदारीण ह्मटलें तरी चालेल–हिणें तिचा छळवाद करण्यास आरंभ केला. त्यांचें घराणें मोठें श्रीमान् होतें. त्याप्रमाणें **कीर्तिसेने**च्या दासी व तिच्या सासूच्या तैनातींत असलेल्या दासी नेरनिराळ्या होत्या. सासूनें हळूंहळूं **कीर्तिसेने**च्या दासी तिच्या चाकरींतून काढून आपल्याकडे घेतल्या. तिच्या सासूची अत्यंत विश्वासूक अशी एक बटीक होती. पुढें कसें काय करायचें याचा ति च्याशीं निश्चय करून सासूनें त्या बटकीला आपली मसलत सर्व सांगून ठेवली. **कीर्तिसेने**ला वेळेवर जेवण नाहीं, तिचें लुगडें धुण्याल दासी नाहीं, अशी तिची स्थिती झाली. घरांतल्या कोणत्याही माण साला तिणें काम सांगितलें; तर तें कोणीं ऐकेनासें झालें. उघडच आहे, **कीर्तिसेना** ही जरी घरची मालकीण होती; तरी यावेळीं ति च्याकडे कांहीं अधिकार नव्हता. एखाद्या चाकराला ठेवणें अगर काढून टाकणें हा अखत्यार तिच्या सासूचा होता. व तिणें सक्त मनाई केली होती. तेव्हां बिचाऱ्या **कीर्तिसेने**चें काम कोण ऐकतो ! असो

एकेदिवशीं सासूनें **कीर्तिसेने**ला, मथवून ठेवलेल्या आपल्या दासी करवीं एकाबाजूस खोलींत बोलवून आणविलें. व कांहीं निमित्त करून तिच्यावर खूप संतापली. रागारागानें—"टाक माझें लुगडें. तुझ्या बापाचें ताह्मी कांहीं लागत नाहीं. चालली उंची उंची लुगडीं नेसायला तुझ्यासारख्या बटकुराला एवढ्या मोठ्या किंमतीची लुगडीं कशाल

पाहिजेत?"—असें बोलून तिणें तिचें लुगडें फेडून घेतलें! आणि—
"सटवे, माझ्या मुलाला निराळा करूं पाहतेस काय?" असें बोलून तिची वेणी धरून लाथांबुक्यांखालीं तिला खूप जर्जर केली! तिच्या आंगाचे चावे घेतले; नखांनीं तिला ओरबडली; सारांश सासू व तिची बटीक दोघींनीं मिळून तिला मरेमरेतों मारलें. आणि नंतर दाणे वगैरे सांठविण्याचें एक भुयार होतें, त्यांत तिला कोंडून ठेविलें. तेथून कदाचित् ती पळून जाईल; ह्मणून मजबूत कड्या, कुलपें लावून बंदोबस्त केला! त्या भुयारांत ज्या वस्तू पूर्वीं ठेविलेल्या होत्या त्या सर्व काढून तें आधींच रिकामें करून ठेविलें होतें. सासूच्या मनांत **कीर्तिसेने**ला तिचे हालहाल करून मारायची होती असें वाटतें. कारण एकदम जीव घ्यायचा असता तर तिणें तसें कधींच केलें असतें. भुयारांत कोंडून ठेवल्यावर प्रतिदिवशीं सायंकाळीं ती चांडाळीण सुनेला भाताची अर्धी मूद व लोटकेंभर पाणी एवढें देत असे. तिचा असा विचार होता कीं; 'आपला मुलगा दूर प्रवासाला गेला आहे. तो यायला पुष्कळ दिवस लागतील. तोंपर्यंत हिचे असे हाल झाले, ह्मणजे ही आपोआप मरेल. नंतर आपण —सून कोणा जाराचा हात धरून घरांतून निघून गेली, अशी वार्त्ता पिकवून लोकांचें समाधान करावें! मुलगा आला ह्मणजे त्यालाही अर्थात् तें खरें वाटेल. ह्मणजे आपलें काम बेमालूम होईल;' पण त्या सासूच्या दुर्दैवानें तिचा तो हेतू पूर्ण झाला नाहीं. असो.

वर सांगितल्याप्रमाणें भुयारांत कोंडलेली; जिनें आजपर्यंत अत्यंत सुखांत दिवस काढलेले; कोणत्याही प्रकारची ददात भोगण्याचा जिला कधीं संस्कार नाहीं; अशी ती साध्वी **कीर्तिसेना** दुःखानें रडत होत्साती दैवाला उद्देशून ह्मणाली, "हायरे देवा!! श्रीमंत नवरा मिळाला; मोठ्या प्रसिद्ध कुलांत जन्मास आलें; सौभाग्य अनुकूल; सदाचरणानें वागलें; असें असूनही सासूबाईच्या प्रसादानें मला अशी विपत्ति प्राप्त व्हावी ना? मुलगी जन्मास येणें या गोष्टीची आप्तसंबंधी निंदा करतात, व तिच्या-

बद्दल खेद मानतात तो याचकरतां ! कोठें सासूचा जाच; कोठें नणंदेचा त्रास; कोठें नवऱ्याचें दारिद्र्य; कोठें त्याचा वाईट स्वभाव; अशा कांहींना कांहीं तरी निमित्तानें मुलीला दुःख हें भोगावें लागतेंच. व तें पाहून आप्तसंबंधी हळहळतात. विचार करून पाहिला तर माझ्या आईबापांनीं मला सुख लागावें ह्मणून उत्तम स्थळ पाहून दिली; पण माझें नशीब फुटकें. येथें ही सासू माझी दावेदारीण कां व्हावी ! असो. कपाळीं आलेलें भोगलें पाहिजे !"

अशा अनेकप्रकारें शोक करीत **कीर्त्तिसेना**, आपली त्या भुयारांतून सुटका कशी होईल ? याविषयीं विचार करीत होती. इतक्यांत दैवानें तिच्यावर कृपादृष्टी केली. ज्याठिकाणीं तिला कोंडून ठेवली होती; त्याठिकाणीं नेहमीं उपयोगांत न येणाऱ्या अशा पुष्कळ वस्तूंची अडगळ पूर्वीं पडलेली होती. जरी सासूनें त्यांतलें सर्व सामान काढलें होतें. तरी, नजरचुकीनें कांहीं राहिलें होतें, व त्यांतच एक कुदळ होती. मनुष्यावर कोणताही बिकट प्रसंग आला, ह्मणजे त्याला त्यांतून सुटण्याची युक्तीही सुचते. सासूनें, जणूं काय सुनेला आपली अवस्था प्रत्यक्ष दिसावी ह्मणूनच, त्या भुयारांत एक पणती पेटवून ठेवली होती. तिचा प्रकाश मिणमिणीत होता; तरी त्याच्या योगानें **कीर्तिसेने**ला ती कुदळ दिसली. ती पाहतांच तिला फार आनंद झाला. तें भुयार ह्मणजे त्या घराचा एक तळमजलाच होता. **कीर्त्तिसेनेनें** अंदाजानें आपली निजण्याची खोली कोणत्या भागांत आहे, ती शोधून काढली, व कुदळीच्या साह्यानें हळूंहळूं खणून तिणें त्या तळघरांतून थेट आपल्या खोलींत जातां येईल असें एक आपल्या डोक्यावरच्या जमिनीला भोंक पाडलें! तशा त्या संकट कालीं तिला कुदळ मिळाली ती केवळ तिच्या मनांतलें दुःखशल्य काढून टाकण्याचें साधनच मिळालें, असें म्हटलें पाहिजे.

आरपार भोंक पडतांच **कीर्तिसेना** हळूंच त्यांतून युक्तीनें वर आ-

पल्या निजायच्या खोलींत आली. व त्या भोंकावर बिछान्यांच्या वळकट्या वगैरे टाकून तिणें तें झांकून टाकलें. तिचीं वस्त्रें, दागदागिने वगैरे चिजवस्त त्या खोलींतच होती. सासूनें खोलीच्या दाराला बाहेरून कुलूप लावलें होतें. तरी त्याला एकदोन खिडक्या होत्या, व खिडक्यांच्या दारांला आंतून कड्या लावल्या होत्या. अर्थात् **कीर्तिसेनेला** बाहेर निघून जाण्यास चांगली सवड होती. तिणें आपल्याला वाटेंत कांहीं उपयोगीं पडतील अशीं वस्त्रें व दागदागीने बरोबर घेतले, आणि कोणाला नकळत ती अपरात्रीं घरांतून बाहेर पडली, व तशीच एकदम नगराच्या बाहेर गेली. यावेळीं पहाट होत आली होती; यामुळें गस्तवाल्यांनीं वगैरे तिला हरकत केली नाहीं. गांवाच्या बाहेर गेल्यावर ती एका झाडाखालीं जाऊन बसली. व आतां पुढें कोठें जावें ? व काय करावें ? याचा विचार करूं लागली. ती आपल्याशींच ह्मणाली, सांप्रतच्या ह्या अशा स्थितींत उगीच भटकतां उपयोगीं नाहीं. स्त्रियांला सासर किंवा माहेर हीं दोनच ठिकाणें निर्भय आहेत. तूर्त सासर तर आपल्याला सुटलेंच. आतां माहेरीं गेलें तर कांहीं हरकत नाहीं; पण, या रीतीनें तेथेंही जाणें योग्य नाहीं. काय झालें ? कां आलीस ? कशी आलीस ? म्हणून लोकांनीं विचारलें, तर त्यांनां काय सांगावें ? बरें, झालेली हकीगत सर्व सांगावी; तर त्यांना ती खरी वाटेल किंवा नाहीं कोण जाणे ! घरांत कोणत्याही प्रकारची ददात नाहीं, सासूची एकुलती एक सून, असें असून तिणें असें केलें ह्मणून मीं सांगितलें तरी त्यांना तें खरें कसें वाटेल ? तेव्हां आतां दुसरातिसरा विचार करून कांहीं उपयोग नाहीं. यावेळीं आपण मोठ्या सावधपणानें व युक्तीनें नवऱ्याजवळ जावें, हेंच योग्य आहे. कारण, इहलोकीं अथवा परलोकीं साध्वी स्त्रियांला पतीवांचून अन्य गती नाहीं !

असा विचार करून तिणें **देवसेनाकडे** जाण्याचा निश्चय केला. **स्त्रीवेषानें** आपण गेलें, तर, वाटेंत कोणी तरी उपद्रव केल्यावांचून रा-

ह्मणार नाहीं. उघडच आहे; तरणीताठी असून सुस्वरूप व एकटी आणि प्रवासांत असलेली, अशा स्त्रीवर दुर्जन हल्ला केल्यावांचून कसे राहतील! ह्मणून **कीर्तिसेनेनें** राजपुत्राचा वेष घेतला. तिणें घरांतून निघण्यापूर्वीच हा बेत करून ठेवला होता. व त्या वेषाला शोभतील असे दागीने व वस्त्रें तिणें बरोबर आणिलीं होतीं. हातांत कडींतोडे; गळ्यांत कंठी; आंगरखा पागोटें वगैरे घालून तिणें हुबेहुब राजपुत्राचा वेष घेतला. व आपलें नेसलेलें लुगडें होतें, तें एका भिकाऱ्याला देऊन टाकलें. आणि तशीच पुढें चालती झाली. सुमारें दोनप्रहर दिवस येईपर्यंत चालून तिणें एका गावांत मुक्काम केला. तो गांव बराच मोठा होता. तेथें मोठमोठे पेढीवाले, व्यापारी लोक रहात असत. **कीर्तिसेने**च्या मनांत तेथें कोणाची तरी सोबत मिळेल तर पहावी; असा विचार होता. ह्मणून तिणें त्यादिवशीं आपल्या जवळचा लहानसा एक दागीना मोडून एका गरीब ब्राह्मणाच्या घरीं शिधासामग्री नेऊन दिली. व तेथें जेवणखाण करविलें. श्रमपरिहार होण्याकरितां थोडी झोंप घेऊन ती तिसऱ्या-प्रहरीं बाजार पेठेंत गेली.

**कीर्तिसेनेनें** राजपुत्राचा वेष घेतला होता तो अगदीं बेमालूम होता. तिचा चेहरा सुंदर असून पाणीदार होता. उंची कपडे व मौल्यवान् अलंकार अंगावर धारण केले असल्यामुळें; हा कोणीतरी गर्भश्रीमान् मोठ्या सरदाराचा अथवा राजाचा पुत्र असेल असें सहज कोणालाही वाटत होतें. **कीर्तिसेना** चहूंकडे पहात व **वलभी**शहराला कोणी मोठा व्यापारी जाणारा आहे काय? याचा शोध करीत चालली होती. तों तिला, **समुद्रसेन** नांवाच्या सावकाराचा त्या शहरांत मोठा व्यापार असून तो कांहीं कामाकरितां लवकरच तिकडे जाणार आहे, असें समजलें. तेव्हा ती त्याच्या पेढीचा शोध करीत चालली असतां लवकरच **समुद्रसेन** नांवाच्या सावकाराच्या पेढीजवळ येऊन पोंचली. त्याच्या आकृतीवरून व मोठ्या डामडौलावरून, तो संभावित असून मोठा

व्यापारी असेल असें तिला वाटलें. तेव्हां आपल्याला पाहिजे आहे तें साहाय्य कदाचित् याच्याकडून मिळेल तर पहावें, असा विचार करून ती त्याच्या पेढीच्या अगदीं जवळ गेली. तिला पाहतांच—हा कोणी मोठा मनुष्य आपल्याला भेटायला आला आहे; असें समजून **समुद्रसेनानें** आदरपूर्वक तिला वर घेऊन आपल्याजवळ लोडाशीं बसवून घेतलें. आणि मोठ्या नम्रपणानें कुशलप्रश्न करून—'आपण कोठले? कोण? कशाकरतां आला? काय हेतू आहे?' वगैरे विचारलें.

**कीर्तिसेना** स्त्री होती; तरी तिणें यावेळीं पुरुषाचा वेष घेतला होता. आणि **कीर्तिसेना** हें आपलें स्त्रीलिंगी नांव सोडून **कीर्तिसेन** असें पुरुषवाचक नांव धारण केलें होतें. ह्मणून आह्मीही थोडा वेळ त्याच नांवानें तिचा निर्देश करतों. **कीर्तिसेन समुद्रसेना**ला ह्मणाला,' 'शेटजि, आपण विचारलें तें सांगण्यास कांहीं हरकत नाहीं; पण ती दुःखकारक हकीकत तोंडावाटें बाहेर काढण्यास फार खेद व लाज वाटते. तथापि, आपण स्नेहपूर्वक विचारलें, तेव्हां त्यांतलें थोडेंसें सांगतों. माझें नांव **कीर्तिसेन**. मी एका राजाचा पुत्र आहें. मला माझ्या भावाबंदांनीं फसवून देशोधडीस लावलें आहे. ह्मणून निरुपायास्तव मला स्वदेशत्याग करावा लागला. मी आतां **वलभी** नगरीला जाण्यास निघालों आहें. तेथें माझे कांहीं आप्तसंबंधी आहेत. काल अनुकूल होईपर्यंत कांहीं दिवस तेथें घालवून मी पुढची तयारी करणार आहें. मी असें ऐकलें आहे कीं, **वलभी** नगरींत आपला मोठा व्यापार असून सांप्रत आपण तेथें जाण्याच्या तयारींत आहां. हें वर्तमान खरें असलें तर मला आपल्याकडे एक गोष्ट मागावयाची आहे. व ती आपण द्याल अशी माझी पूर्ण आशा आहे."

**कीर्तिसेनाचें**, कांहींसें दीनवाणें; पण गंभीर व प्रौढ भाषण श्रवण करून **समुद्रसेनाचा**, प्रथमच त्याच्याविषयीं जो चांगला ग्रह झाला होता; तो अधिक मजबूत झाला. तो मोठ्या नम्रतेनें हात जोडून व त्याच्या

अवस्थेबद्दल आपल्याला दुःख झालें आहे, असें दाखवून ह्मणाला, "महाराज, आपल्या आकृतीवरून व बोलण्याचालण्यावरून, आपण जी हकीकत सांगितली ती अक्षरशः खरी असेल यांत कांहीं संशय नाहीं. दुर्दैवानें आपल्यावर असा प्रसंग आला हें ऐकून मला फार वाईट वाटतें; पण उपयोग काय ? आमच्यासारख्या बनियांच्या हातून आपल्याला काय साहाय्य होणार आहे ! तें असो; पण, आपण जी गोष्ट सांगणार ह्मणाला; ती काय ती आज्ञा करावी. वलभी शहरांत माझी पेढी आहे. व तेथें जाण्याकरतां मी उद्यांच पहांटे येथून निघणार आहें. माझ्या हातून आपली कांहीं सेवाचाकरी होण्यासारखी असेल तर मी खरोखर त्यांत कांहीं कसर करणार नाहीं."

हें ऐकून कीर्तिसेन ह्मणाला, "शेटजि, आपण माझ्याविषयीं इतकें अगत्य दाखविलें; याबद्दल मी आपला आभारी आहें. मला आपल्याजवळ द्रव्य अथवा दुसरें कांहींएक मागावयाचें नाहीं. मला गरज ह्मणून काय ती एवढ्याचीच आहे कीं, माझ्याजवळ गाडी, घोडा वगैरे कांहीं वाहन नाहीं. बरोबर कोणी नोकरचाकर नाहीं, व तशाप्रकारचा परिवार मिळविण्याची यावेळीं माझी इच्छाही नाहीं. ह्मणून आपल्याकडे माझें मागणें ह्मणून इतकेंच कीं आपण जाणार असाल तर मला आपल्याबरोबर वलभीशहरापर्यंत घेऊन चला. त्यासंबंधानें आपल्याला जो कांहीं खर्च येईल; तो मी खुशाल देईन. उभयतां बोलतचालत आनंदानें तेथपर्यंत जाऊं, एवढी सोय आपण कराल; तर मला मोठें साहाय्य केल्यासारखें होईल."

कीर्तिसेनाचें हें भाषण समुद्रसेनाला मान्य झालें. त्याणें त्याला आपल्याबरोबर घेऊन जाण्याचें वचन दिलें. व त्याप्रमाणें संध्याकाळीं त्याला तो आपल्याच घरीं घेऊन गेला. जेवणखाण वगैरे सर्व एकाच ठिकाणीं झालें; पण रात्रीं निजण्याला मात्र कीर्तिसेनानें एक स्वतंत्र खोली मागून घेतली. कारण घेतलेल्या सोंगाची बतावणी करण्याविषयीं

त्याला एकसारखें जपलें पाहिजे होतें. असो. पहाट होतांच **समुद्रसेनानें** निघण्याची तयारी केली. व **कीर्तिसेना**सहवर्तमान तो तेथून पुढें निघाला. त्याणें **कीर्तिसेनाकरतां** एक स्वतंत्र गाडी केली होती. केव्हां केव्हां ते दोघेही एकाच गाडींत बसत; पण **कीर्तिसेन** आपल्या सोंगाचा बोजवारा न उडावा; ह्मणून होतां होईल तों त्याच्याशीं निकट संबंध ठेवण्याची टाळाटाळ करीत असे. **समुद्रसेनाला कीर्तिसेनाच्या** राजपुत्रत्वाविषयीं कांहीं एक संशय आला नव्हता! तो त्याला मोठ्या बहुमानानें व अगत्यानें वागवीत होता. याप्रमाणें जातां जातां त्यांणीं कित्येक मुक्काम अतिक्रमण केले. व सपाट आणि भरवस्तीचा प्रदेश मागें टाकून ते एका जंगलाच्या तोंडाशीं येऊन पोंचले. त्याबरोबर बिचारा **कीर्तिसेन**ही, लवकरच प्राप्त होणाऱ्या आपत्तीच्या दरवाज्यांत आला!

**समुद्रसेना**बरोबर नोकरचाकर वगैरे बरीच मंडळी होती. कांहीं हत्यारबंद शिपाईदेखील होते. आतां पुढें चालावयाचा मार्ग दाट झाडीचा असून तेथें चोराचिलटांचा उपद्रव फार असल्यामुळें **समुद्रसेनानें** आपल्या बरोबरच्या लोकांना सक्त ताकीद दिली. व मोठ्या हुषारीनें व बंदोबस्तानें मार्ग क्रमण करूं लागले. ती वाट खरोखरच मोठ्या धोक्याची होती. बरोबर पैसाअडका घेऊन एकटादुकटा मनुष्य त्या वाटेनें मुळींच जात नव्हता. **समुद्रसेना**जवळ रोकड व माल पुष्कळ होता; पण बरोबर बंदोबस्त चांगला असल्यावरून त्याणें त्या वाटेनें जाण्याचें मनांत आणलें. त्या झाडीच्या प्रदेशांत शिरल्यावर एक मुक्काम त्याचा सुरक्षित पार पडला. दुसऱ्या दिवशीं रात्रीं 'कालच्या सारखेच आपण बिनधोक राहूं' असें त्यांला वाटलें होते. पण दुर्दैवानें त्याच रात्रीं त्यांच्यावर संकट ओढवणार होतें! संध्याकाळीं ज्या ठिकाणीं मुक्काम केला त्याठिकाणीं डेरे राहुट्या वगैरे लावण्याची तयारी चालली आहे. कांहीं लोक सामान उतरीत आहेत. कांहीं उतरलेलें सामान व्यवस्थेनें लावताहेत. **समुद्रसेन व कीर्तिसेन** आपापल्या गाड्यांवरून उतरून

जंगलाची शोभा पहात इकडे तिकडे फिरताहेत. इतक्यांत—जणूं काय, मृत्यूची दूतीच अशी भालू मोठ्यानें ओरडली. तो तिचा भयंकर शब्द ऐकून सर्व लोक उद्विग्न झाले. व्यापारी लोकांचा—शकून, प्रश्न इत्यादिकांवर विशेष भरंवसा असतो. व त्यांची त्यांना माहितीही असते. भालू आपल्या तळावर येऊन ओरडली हा अपशकून आहे, व याव-रून कांहीं तरी दगा होणार; असें त्यांला वाटल्यावरून त्यांची एकच धांदल उडाली. तेथें त्यांला आपला बचाव करण्याचें दुसरें कांहीं सा-धन नव्हतें. पळून जावें तर जिकडेतिकडे चोरांचें भय व तशांतून बरोबर आणलेला एवढा माल त्यांच्यानें कसा सोडवेल. तेव्हां येथल्या येथेंच राहून चोरांपासून आपला बचाव करण्याकरितां सर्वांनीं तरवारी, भाले, बरच्या, जंबिये, वगैरे जीं त्यांच्याबरोबर आयुधें होतीं; तीं हातांत घेतलीं. व स्वार, शिपाई जे आणले होते त्यांना सभोंवतीं उभे करून, **समुद्रसेन** व त्याचे मेहते वगैरे इतर व्यापारी लोक मध्यें उभे राहिले. **कीर्तिसेना**लाही त्यांणीं आपल्यांत घेतलें असतें; पण ती त्यांचीं गडबड पाहून तो आधींच तेथून निसटून एका बाजूला जाऊन उभा राहिला. **समुद्रसेना**ला त्याच्याविषयीं फार कळकळ होती; पण प्रत्ये-काला आपल्या जिवाची काळजी लागल्यामुळें कोण कोणाची चवकशी करतो! तशांतून अंधाराचें साम्राज्य चहूंकडे पसरत चाललें होतें.

**कीर्तिसेना**ला त्यांच्या त्या समाजांत मिळणें इष्ट वाटलें नाहीं. त्यांच्यावर कांहीं तरी मोठें संकट येणार व त्यांत आपलाही चुराडा होणार असें वाटल्यावरून तो एका बाजूस राहून मनांत विचार करूं लागला. त्याला यावेळीं फारच वाईट वाटलें. तो ह्मणाला, हाय हाय !! कपाळफुटक्या मनुष्याचें कर्म परंपरेनें वाढत जातें. त्याच्यावर एका मागून एक अरिष्टें चालून येतच असतात. पहा, माझ्यावर सासूनें जी आपत्ति आणली तिचें फळ मला येथेंदेखील प्राप्त झालें. जणूं काय प्रत्यक्ष मृत्यूच अशा सासूच्या रागानें प्रथम मला गट्ट केलें होतें.

नंतर गर्भवासासारख्या भुयारांत मला रहावें लागलें. सुदैवानें मी तेथून निघालें; आणि येथपर्यंत येऊन पोंचलें. तों आतां पुन्हां, जीव जातो कीं राहतो यासंकटांत पडलें! हे चोर आसपास शोधूं लागले तर मी सहज त्यांच्या हातीं सांपडेन. आणि त्यांनीं जर मला येथें मारून टाकलें तर घराकडे माझी दावेदारीण (सासू) 'कोणा जाराचा हात धरून कोठें तरी निघून गेली,' असें माझ्या पतीला सांगितल्यावांचून कधींही राहणार नाहीं. खरें ह्मटलें तर माझ्या हातून तसें कांहीं न होतां सासूनें हवें तें ह्मटलें ह्मणून माझें काय गेलें! पण तें ऐकून माझ्या पतीच्या मनाला जें दुःख होईल; तें परलोकींदेखील मला जाणवल्यावांचून राहणार नाहीं. बरें कदाचित् चोरांनीं मला मारलें नाहीं. आणि मी स्त्री आहें; असें त्यांना समजलें—आणि माझीं वस्त्रें त्यांणीं हरण केलीं ह्मणजे ते समजणारच.—तर जिवंत राहण्यापेक्षां मृत्यू आलेला बरा. स्त्री असें समजतांच ते मला भ्रष्ट केल्यावांचून राहणार नाहींत. ह्मणजे आजन्मपर्यंत केलेलें सर्व मातींत पडलें. तेव्हां यावेळीं कोणत्याही रितीनें मी आपलें आपणच रक्षण करून घेतलें पाहिजे. हा **समुद्रसेन** माझा साहाय्यकर्ता आहे. व त्याचे मजवर मोठे उपकार आहेत. तेव्हां अशा आपत्कालीं त्याला सोडूं नये. जी त्याची वाट तीच आपली वाट असें करणें योग्य आहे; तथापि त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं. जरी तो मला राजपुत्र समजत आहे, व जरी मी **कीर्तिसेन** असें नांव घेतलें आहे, व माझा वेषही शूर राजपुत्राला शोभण्यासारखा आहे; तरी मी बायको मनुष्य आहें. बोलून चालून अबला. मी त्याचें काय साहाय्य करणार ! येथें शस्त्राशीं प्रसंग आहे. मीं आपल्या कंबरेला ही तरवार लटकावली आहे. पण ती धरतात कशी हें कोणास ठाऊक? तेव्हां त्यांच्या लोभाला गुंतून मी पुढें गेलें तर मरून जाईन. किंवा माझी विटंबना होईल. यावांचून दुसरा कांहींच उपयोग नाहीं. याकरतां आपण आपलाच बचाव करावा हें बरें.

असा विचार करून **कीर्तिसेन** एका झाडाच्या आड उभा राहिला. उघडच आहे. स्नेह्यासंबंधिकांपेक्षां स्त्रियांनीं पतिव्रताधर्मावर विशेष लक्ष्य ठेवणें हें त्यांचें कर्तव्यच आहे. **कीर्तिसेन** झाडाच्या आड उभा राहिला होता. तरी ती जागा धोक्याचीच आहे असें त्याला वाटत होतें. अंधार गुडुप असल्यामुळें डोळ्यांत बोट घातलें तरी दिसत नव्हतें. त्यांतलें त्यांत त्याणें त्याच झाडाचा बुंधा चांचपून पाहिला; तों तो वृक्ष मोठा विशाळ असून त्याच्या खोडाला एक मोठी ढोल असल्याचें त्याला समजलें. तेव्हां **कीर्तिसेना,** मनांत आपल्या पतीच्या समागमाची उत्कट इच्छा ठेवून त्या ढोलींत बसली. व तेथलाच थोडासा पाचोळा त्या ढोलीच्या तोंडाशीं ओढून घेऊन त्याणें आपल्याला झांकून घेतलें. इतकें होईपर्यंत बरीच रात्र झाली. इकडे **समुद्रसे**नाला, त्याणें मानलेला राजपुत्र **कीर्तिसेन** याच्याविषयीं मोठी काळजी लागली होती. जरी यावेळीं त्याच्या प्राणावर व द्रव्यावर बेतली होती; तरी तो स्नेहाला स्मरून **कीर्तिसेना**ची आठवण करीत होता. इतक्यांत चोरांचा हल्ला झाला. घोड्यावर बसलेले, दिसण्यांत मोठे क्रूर, वर्णानें काळे ढुस्स, हत्यारबंद असे शेंकडों चोर त्यांच्यावर आले. **समुद्रसेना**बरोबर बरेच लोक होते; तरी त्या राक्षसांपुढें त्यांचा कांहीं इलाज चालला नाहीं. त्यांणीं एकदम कापाकापी सुरू केली. **समुद्रसेन** व त्याच्या बरोबरचे झाडून सारे लोक यांना फार करून त्या चांडालांनीं ठार केलें व त्यांचे कांहीं होतें नव्हतें तें चटसारें लुटून नेलें.

**कीर्तिसेना** यावेळीं सुरक्षित ठिकाणीं बसली होती. तरी तिच्या जिवांत जीव नव्हता. चोरांनीं मारलेल्या लोकांचा आक्रोश व तरवारींची चकमक वगैरे पाहून तिचा प्राण गेला नाहीं; याला कारण केवळ तिचें दैवच होय. तिला इकडे चाललेला तो भयंकर प्रसंग अंधारामुळें दिसत नव्हता; तरी तरवारींचें तेज तिचे डोळे दिपविण्यास पुरें होतें. असो. वाण्यांची कत्तल उडवून चोर तेथून निघून गेले. मनुष्यांची गड-

बड बंद होऊन, प्रेतें खाण्यास जमलेल्या श्वापदांचे भयंकर आवाज सुरू झाले. व इतक्यांत अंधकार सरून जगाला प्रकाश करणाऱ्या व त्याबरोबरच **कीर्तिसेने**ला अंमळ हुषारी देणाऱ्या **चंद्रा**चा उदय झाला. यावेळीं पहांटेची प्रहर रात्र राहिली होती. **कीर्तिसेने**ला ढोलींतून बाहेर यावेंसें वाटलें. तरी श्वापदांच्या भयानें ती तेथेंच दबून राहिली. कांहीं वेळानें रात्र सरून सूर्याचा प्रकाश दिसूं लागला. तेव्हां, पुष्कळ मांस भक्षण करून तृप्त झालीं ह्मणूनच कीं काय, श्वापदेंही तेथून आपापल्या ठिकाणीं गेलीं. नंतर **कीर्तिसेना** ढोलीच्या दाराशीं लावलेला पाचोळा पलीकडे सारून बाहेर आली. तिला तो व्यापाऱ्यांचा तळ केवळ स्मशानासारखा भयंकर व किळसवाणा वाटल्यावरून ती तेथून बऱ्याच अंतरावर दूर गेली. तेथें एका शिळेवर बसून, ज्याणें तिला साह्य केलें होतें त्या **समुद्रसेना**च्या शोचनीय मृत्यूबद्दल दुःख करून व त्याला अश्रूदकाचे अंजली देऊन ती त्याच्या स्नेहऋणापासून मुक्त झाली.

तिला **वलभी** नगरीला जायचें होतें. तरी, त्याची वाट कोणती हें तर असोच; पण ती दिशा देखील तिला माहीत नव्हती. तथापि याठिकाणीं अंमळ देखील उभें राहून उपयोग नाहीं. समोर दिसेल त्या रस्त्यानें चालतें व्हावें. मग तो कोठें पोंचेल तेथें पोंचेल, असा विचार करून ती झपाट्यानें चालूं लागली. वाटेंत तिला एक वाघ आडवा आला. पण, त्या बिचाऱ्यानें तिला कांहींच उपद्रव दिला नाहीं. उघडच आहे. नवऱ्यावर निष्ठा ठेवून वागणाऱ्या व आपलें पातिव्रत्य नष्ट होऊं न देणाऱ्या स्त्रियांला सिंह, व्याघ्र इत्यादि भयंकर श्वापदेंदेखील उपद्रव करूं शकत नाहींत! अशा स्त्रियांला आपत्कालीं प्रत्यक्ष देवताच साह्य करीत असतात. असो. दोन प्रहरपर्यंत **कीर्तिसेना** आपल्याकडून मोठ्या त्वरेनें चालली होती. रात्रीं जो भयंकर प्रसंग तिणें पाहिला होता, त्यानें तिच्या उरांत धडकी भरली होती. **समुद्रसेनानें** आपल्याला साहाय्य केलें असून; आपल्या हातून त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. याचें तिला वाईट वाटत होतें. 'माझ्या-

सारख्या दुर्दैवी स्त्रीला त्याणें बरोबर घेतलें ह्मणूनच त्याचा असा घात झाला, असें समजून ती हळहळत होती. आतां पुढें कोठें जावें? आपण या संकटांतून पार कसें पडूं? व पतीची भेट कशी होईल? याची तिला काळजी लागली होती. कधीं चालण्याचा अभ्यास नसतां कांट्याकुट्यांतून दूर चालत गेल्यामुळें तिला अतिशय श्रम झाले होते. अशा अनेक रीतीनें यावेळीं ती पीडली होती. नंतर—काय होईल तें होवो, थोडावेळ विश्रांति घ्यावीच, असा विचार करून ती एका झाडाखालीं बसली. इतक्यांत अकस्मात् तेथें एक ऋषि प्राप्त झाला.

**कीर्तिसेनेनें** पुरुषाचा वेष घेतला होता; तरी त्याणें तिला ओळखलें. व प्रथमच—'बाई, तूं कोठून आलीस? व कोठें जाणार?' ह्मणून प्रश्न केला. तेव्हां तिला त्याचें मोठें नवल वाटलें. त्याच्या तेजावरून व त्याणें एकदम आपल्याला ओळखलें यावरून, हा कोणी तरी मोठा तपस्वी ऋषि आहे असें समजून; तिणें त्याला भक्तिपूर्वक नमस्कार केला. व आपली हकीकत थोडक्यांत निवेदन केली. ती ऐकून त्याणें तिचें समाधान केलें. व आपल्या कमंडलूंतलें पाणी तिला प्यायला देऊन **वलभीनगरास** जाण्याचा मार्ग दाखविला. व 'भर्त्याचा समागम होऊन सर्व दुःखापासून मुक्त होशील' असा आशीर्वाद देऊन तिला वाटेस लावली. त्या ऋषीच्या आज्ञेप्रमाणें **कीर्तिसेना** चालूं लागली. व मागें वळून तो ऋषि आहे कीं गेला ह्मणून पाहतें तों, तो कोठें दिसेनासा झाला. तेव्हां हा प्रत्यक्ष ईश्वरच आपल्यावर अनुग्रह करण्याकरतां आला असावा; असें समजून ती, त्याणें दाखविलेल्या वाटेनें तडक पुढें निघाली.

चालतां चालतां भगवान् सूर्यनारायण अस्ताचलावर आरूढ झाला. त्याचे किरण चहूंकडे फांकले. जणूं काय—'एक रात्रभर वाट पहा' असें तिला सांगून तो लवकरच अदृश्य झाला. जवळपास गांवशींव वगैरे कांहीं एक नव्हतें. **कीर्तिसेनेला** त्या जंगलांतच ती

रात्र काढली पाहिजे होती. आतां पुढें चालण्याची सवड नाहीं, असा विचार करून तिणें पूर्वरात्रीप्रमाणेंच एका मोठ्या झाडाची ढोल पाहून तींत बसण्याचा निश्चय केला. व तेथें जवळच एक लांकडांचा मोठा ओंडका पडलेला होता, तो उचलून आणून ढोलीच्या जवळ ठेवला. आणि आपण आंत बसून युक्तीनें तो ओंडका तिच्या तोंडाशीं ओढून घेतला. लवकरच जिकडेतिकडे काळोख पडून; रात्रीचें भयंकर स्वरूप पसरलें. जंगली किड्यांचा व अनेक श्वापदांचा भयंकर शब्द तिच्या कानांवर आदळूं लागला. तरी तशा ठिकाणीं देखील ती न घाबरतां मोठ्या धैर्यानें स्वस्थ बसली!

सुमारें मध्यरात्र उलटून गेली आहे, व चंद्रोदय होण्याचा समय झाला आहे; तशा दुःखकारक स्थितींतदेखील अंमळ तिला विश्रांती देण्याकरतां आलेल्या निद्रेचें व मनांत घोळत असलेल्या चिंतेचें कडाक्याचें भांडण चाललें आहे; निद्रा तिला आपल्या ताब्यांत घेण्याचा प्रयत्न करीत आहे, व चिंता तिला दूर झुगारून देत आहे; अशा स्थितींत प्रथम भय व नंतर सुखसाधनाचा मार्ग सुचविणारी एक राक्षसी आपल्या पोरांबाळांसहवर्तमान तेथें प्राप्त झाली. ढोलीच्या दाराशीं लांकूड बसाविलें होतें; तरी त्याच्या फटींतून राक्षसी व तिची संतति **कीर्तिसेने**च्या दृष्टीस पडली. मग काय विचारतां? बोलून चालून राक्षसीच ती. तिचें तें अक्राळविक्राळ रूप व भेसूर चेहरा पाहतांच बिचारी **कीर्तिसेना** जागच्याजागीं विरल्यासारखी झाली. चिंतेच्या आणि झोंपेच्या झगड्यांत झोंप विजयी होण्याचा समय आला होता. पण, राक्षसीचें दर्शन साह्यकारी झाल्यामुळें झोंपेला दूर पिटाळून लावून चिंता सर्वस्वीं **कीर्तिसेने**ची मालकीण झाली. असो.

**कीर्तिसेना** एकसारखी दृष्टी लावून त्या राक्षसीच्या हालचालींवर लक्ष्य ठेवून बसली होती. 'ही बाई कदाचित् आपल्याला शोधून काढील. किंवा हिचीं पोरें सहज लीलेनें हें लांकूड काढतील, तर मी

हिच्या तोंडांत पडेन, अशी कीर्तिसेनेला मोठी धास्ती होती. पण, सुदैवानें तसा प्रसंग आला नाहीं. राक्षसी कांहींवेळ इकडेतिकडे फिरून एकदम झाडावर चढली. व तिच्या मागून तिचीं पोरेंही वर गेलीं. तेव्हां कीर्तिसेनेचा जीव अंमळ खालीं बसला. वर गेल्यावर तीं पोरें राक्षसीला ह्मणालीं, "आई, आम्हाला कांहीं तरी खाऊ दे. फार भूक लागली आहे." हें ऐकून राक्षसी मुलांना कुरवाळून ह्मणाली, "बाबानों, यावेळीं माझ्याजवळ कांहीं नाहींरे! आज मी मोठ्या मसणवटींत जाऊन शोधून पाहिलें; पण तेथेंदेखील कांहीं एक मिळालें नाहीं. मी पुष्कळ डाकिनींजवळ याचना केली; पण त्या सटव्यांनीं मला थोडादेखील अंश दिला नाहीं. तेव्हां मला फार वाईट वाटलें, ह्मणून मीं भैरवा[1]जवळ जाऊन त्याला मागितलें. त्या आमच्या राजानें माझें नांव, गांव विचारून घेतलें. आणि तो मला ह्मणाला, "तुझें नांव भयंकरी ना? अग, तूं तर मोठी कुलीन आहेस. प्रत्यक्ष खरदूषणां[2]च्या वंशांतली आहेस. तेव्हां तुला कांहीं तरी चांगलेंसें भक्ष्य दिलें पाहिजे. पण काय करूं? यावेळीं तर माझ्याजवळ कांहीं नाहीं. तरी तुला सांगतों तसें कर. येथून जवळच वसुदत्त नांवाचें शहर आहे. तेथें मोठा धर्मिष्ठ वसुदत्त या नांवाचाच राजा आहे. जो या सर्व जंगली प्रदेशांचा अधिपति असून सर्वांपासून करभार घेत आहे. व चोराचा उत्तम बंदोबस्त करीत आहे. कांहीं दिवसांपूर्वी तो अरण्यांत मृगया करायला गेला होता. तेथें फारवेळ शिकार करतांकरतां श्रमला व एका झाडाखालीं बसला. तेथेंच त्याला झोंप लागली. त्या संधीस त्याला नकळत एक घोण हळूंच त्याच्या कानांत शिरली. ती थेट मस्तकांत जाऊन

---

१ डाकिनी, भैरव इत्यादि हे भुतांपैकींच आहेत. भैरव हा भुतांचा राजा असून स्मशानावर त्याचा मुख्य अधिकार असतो, अशी प्राचीन लोकांची समजूत आहे.

२ खर आणि दूषण या नांवाचे दोघे राक्षस रावणाचे बंधू होते, असें रामायणांत सांगितलें आहे. ( वाल्मिकीय रामायण अरण्यकाण्ड पहा. )

बसली. या गोष्टीला बरेच दिवस झाले असून राजाला तें कांहीं समजलें नाहीं.

अलीकडे त्या घोणेला पुष्कळ पोरें झालीं आहेत. व तीं त्या राजाच्या मस्तकांत फिरत असून त्यांणीं त्याचा मगज खाऊन फस्त केल्यामुळें; त्याला मोठी व्यथा होत आहे. सांप्रत तो केवळ अस्थिचर्म राहिला आहे. पुष्कळ वैद्यांनीं औषधोपचार केले, पण अद्याप रोगाचें निदानच कोणाला कळलें नाहीं! आणखी थोडक्याच दिवसांत, त्याला कोणी योग्य उपाय न करील तर, तो खास मेल्यावांचून राहणार नाहीं. तो मेला ह्मणजे त्याचें मांस तूं खुशाल भक्षण कर. त्याच्यासारख्या पवित्र व मोठ्या राजाचें मांस खाल्लेंस ह्मणजे सहामहिनेपर्यंत तुझी तृप्ति होईल!"[1]

राक्षसी पोरांनां ह्मणाली, "भैरवानें माझ्याकरतां असा विभाग काढून ठेवला आहे. पण, तो राजा मरेल किंवा नाहीं, याचा संशयच आहे. जर एखादा चांडाळ वैद्य भेटला; आणि त्याणें करायचा तो उपचार केला; तर तो राजा कसा मरणार? कदाचित् तसें न झालें तरी तो मरण्याला कांहीं दिवस लागतील, हें अगदीं खचित आहे. तेव्हां बाळांनों, मी काय करूं बरें? एव्हां कोठला खाऊ आणून देऊं."

राक्षसीनें झाडावर आपल्या मुलांला जें सांगितलें, तें कीर्तिसेनेनें सर्व ऐकलें. व आपल्याला कांहीं उपाय कोणी सांगेल; तर आपण त्या राजाला वांचवावें, असेंही तिला वाटलें. पण, असल्या भयंकर रोगावर उपाय कसा होणार? असें तिच्या मनांत आलें आहे; तों तिची

---

१ राक्षसांचा मुख्य आहार काय तो मनुष्याचें मांस हें प्रसिद्धच आहे. जसें एखादें उत्तम पक्वान्न खालें, ह्मणजे मनुष्याला लवकर भूक लागत नाहीं. तसें राक्षसाला एखादा तपस्वी, ऋषि, राजा किंवा एकंदरींत मनुष्य ज्याला आपल्यांत श्रेष्ठ मानीत असतील, त्याचें मांस हें एक उत्तम पक्वान्नच होय! व तें खाल्ल्यानें त्याची तृप्ति होऊन त्याला लवकर भूक लागत नाहीं, असा यांतला भावार्थ असावा.

चिंता दूर झाली. ती अशी. राक्षसीनें राजाला रोग झाल्याचें सांगितलें तें ऐकून तिचीं मुलें तिला ह्मणालीं,—"पण कायग आई, अग, तो राजा मरणोन्मुख झाला असून आतां त्याच्या रोगावर उपाय चालेल ह्मणतेस? आणि तो वांचेल असें तुला वाटतें ? तसला विलक्षण रोग केवढाही मोठा वैद्य आला ह्मणून त्याच्यानें कसा दूर होणार ?"

हें ऐकून—केवळ **कीर्तिसेने**चा भाग्योदय करण्याकरितांच कीं काय; ती राक्षसी आपल्या मुलांना ह्मणाली, —"पोरांनों, अरे, त्या राजाचें आयुष्य सरलें नाहीं. त्याच्या रोगावर तसाच वैद्य मिळाला तर उपाय कां होणार नाहीं? केवळ औषधांनीं तो रोग बरा व्हायचा नाहीं. त्याला दुसरी युक्ति केली पाहिजे. पण मेल्या पोटभरू वैद्यांना तितकी अक्कल कोठून असणार! ते नाहींनाहीं तीं रसायनें, मात्रा आणि काढे देताहेत; पण त्यांनीं काय होणार? त्याच्या डोक्यावर कडकडीत तूप चोळलें, आणि भर दोनप्रहरीं उन्हांत बसवून त्याचें डोकें खूप तापूं दिलें; आणि त्याच्या कानांत एक नळी लावून ती गार पाण्याच्या मडक्यांत सोडली; तर डोकें उन्हानें तापल्यामुळें त्या सगळ्या घोणा तळमळूं लागतील. व त्या नळींतून पाण्याचा थंडावा आला ह्मणजे त्या आपोआप नळीच्या द्वारानें बाहेर येऊन पाण्यांत पडतील. याप्रमाणें त्या बाहेर निघाल्या ह्मणजे तो राजा रोगापासून मुक्त होईल. पण ह्या गोष्टी कशाला पाहिजेत? रांडलेक वैद्यांनीं सात जन्म खटपट केली तरी त्यांना ही युक्ती मुळींच सुचायची नाहीं! तेव्हां तो खाऊ तुह्मांला मिळायचा नाहीं, असें नाहीं. पण, कांहीं दिवस लागतील इतकेंच काय तें. तुह्मी कांहीं काळजी करूं नका."

असें बोलून राक्षसी उगीच राहिली. तिकडे खालीं ढोलींत बसलेली **कीर्तिसेना** मनांत ह्मणाली,—"देवा, माझ्यावर कृपा कर. माझ्याकरतां नाहीं, तर त्या राजाकरता तरी मला या संकटांतून पार पाड. जर मी यांतून पार पडेन; तर या राक्षसीनें जी युक्ती सांगितली आहे

त्या युक्तीनें खरोखर त्या राजाला वांचवीन. तो राजा या जंगलाच्या पलीकडे जवळच राहत असेल. बहुतकरून व्यापारी लोकांना हाच रस्ता सोईचा असावा असें वाटतें. **वलभी**नगरीला जाणारे येणारे व्यापारी **वसुदत्तपुरा**वरूनच येत जात असतील. बिचारा नुकताच स्वर्गाला गेलेला; माझा साह्यकर्ता **समुद्रसेन** याणें मला असेंच सांगितलें होतें. तसें नसतें तर, तो मुद्दाम ह्या जंगलांतून कशाला निघाला असता! दुसऱ्या वाटेनें व्यापारी लोक गेले तर त्या प्रदेशांचे राजे त्यांच्याकडून फार जबर कर घेतात. आणि **वसुदत्त** राजा अगदीं थोडा कर घेतो. ह्मणून व्यापारी लोक याच वाटेनें जातात. तेव्हां माझा भर्त्ताही याच मार्गानें येईल. या करतां या जंगलाच्या पलीकडे असणाऱ्या **वसुदत्त-पुरांत** जाऊन, त्या राजाला रोगापासून मुक्त करून आपण तेथेंच, नवरा येण्याची वाट पाहत रहावें."

याप्रमाणें विचार करीत असलेली **कीर्तिसेना** उजाडण्याची वाट पहात होती. तिनें मोठ्या संकटानें ती रात्र घालविली. पहाटेची वेळ होतांच राक्षसी आपल्या पोरांसहवर्तमान तेथून निघून गेली. ती गेली हें पाहून **कीर्तिसेने**चा जीव स्वस्थ झाला. लवकरच **सूर्योदय** होऊन जिकडेतिकडे त्याचे कोमल किरण फांकले. तेव्हां **कीर्ति-सेना** त्या ढोलींतून बाहेर निघून पुढें चालूं लागली. पुरुषाचा वेष घेऊन तिणें बाह्यात्कारें खूप ऐट केली होती. त्या दिवशीं तिसरा प्रहर पर्यंत ती एकसारखी चालत होती; तरी वाटेंत तिला एकदेखील मनुष्य भे-टला नाहीं. ती जात होती तो **वसुदत्तपुरा**लाच जाण्याचा रस्ता होता; तरी तिला त्याची माहिती नव्हती. व वाटेंत कोणी सांगणाराही भे-टला नाहीं, यामुळें ती संशयांत पडली होती. तरी, तशीच मार्गाक्र-मण करीत होती. चालतां चालतां श्रमल्यामुळें ती अपराण्हकालीं एका झाडाखालीं अंमळ विसावा घेत बसली होती. इतक्यांत एक गवळी तिला भेटला. तो जातीचा गवळी होता; तरी त्याच्या आकारावरून तो चांगल्या

मनुष्य असेल असें कीर्तिसेनेला वाटलें. व त्यालाही तिचा नैसर्गिक नाजूकपणा व मार्ग चालण्याच्या श्रमानें तिला आलेला थकवा हें पाहून तिच्याविषयीं कांहींशी दया आली. कीर्तिसेना त्याला हाक मारून ह्मणाली,—"बाबा, हा कोणचा प्रदेश आहे? आणि ही वाट कोणीकडे जाते? तें कृपाकरूना सांग."

हें ऐकून गवळी ह्मणाला,—"हें वसुदत्त महाराजांचें राज्य आहे. हा रस्ता थेट वसुदत्तपुराला जात आहे. हें पहा तें शहर येथून जवळच दिसत आहे. आमचे महाराज मोठे उदार व धर्मनिष्ठ आहेत. तुमच्यासारख्या वाटसरूंचा ते चांगला परामर्श घेतात. पण काय करावें! आतांशीं त्यांची प्रकृति अगदीं बिघडली आहे. त्यांना एक असा कांहीं विलक्षण रोग झाला आहे कीं; त्यावर कांहींच औषध लागू होत नाहीं. आणि त्यानें सांप्रत ते अगदीं अत्यावस्थ आहेत."

राजा वसुदत्त हा फारच लोकप्रिय असल्यामुळें त्याच्या राज्यांत राहणारे सर्व लोक त्याच्याविषयीं विशेष काळजी वहात होते. कीर्तिसेनेनें राजाची हकीकत विचारली नव्हती; तरी गवळ्यानें ती तिला आपण होऊन सांगितली. कारण, न जाणों; सहज कोणी एखादा उपचार करणारा भेटला, व त्याच्यायोगानें राजाला गुण पडला तर कोणास ठाऊक! असें त्याच्या मनांत आलें. त्याणें सांगितलेली हकीकत ऐकून कीर्तिसेना गवळ्याला ह्मणाली,—"बाबा, काय सांगूं, मला जर कोणी तुझ्या त्या राजाजवळ नेईल; तर मी त्याला हटकून बरा करीन. त्याचा रोग घालविण्याचा उपाय मला ठाऊक आहे! पण तेथपर्यंत मला नेणार कोण!"

हें ऐकून त्या गवळ्याला कांहींसें समाधान वाटलें. तो ह्मणाला,—"मी त्या शहरांतच जात आहें. दरबारांत माझी कांहीं ओळखदेख नाहीं. आणि आपल्यासारख्या गरिबाला तेथें विचारतो कोण? पण, राजवाड्याच्या दरवाज्यावर पहारा करणाऱ्या शिपायांच्या जमादाराची आणि

माझी चांगली ओळख आहे. त्याच्या द्वारानें तुमचा राजापर्यंत प्रवेश होण्याविषयीं मी खटपट करून पाहतों. आणि ती साधेल असेंही वाटतें. तर तुम्ही माझ्याबरोबर या. म्हणजे मी तेथपर्यंत तुम्हाला नेतों."

कीर्तिसेनेच्या मनांत तसें होणें इष्टच होतें. तिणें त्या गवळ्याचें सांगणें मान्य केलें. व त्याच्याबरोबर शहरांत जाण्यास निघाली. वसुदत्तपुर तेथून जवळच होतें. व तो गवळी माहितगार असल्यामुळें त्यानें जवळची वाट काढून दोन घटकेंत, पुरुषाचा वेष धारण करणाऱ्या कीर्तिसेनेला राजवाड्याच्या दरवाज्यांत आणून उभी केली. तिला अंमळ तेथें विसावा घेण्यास सांगून त्याणें आपल्या ओळखीच्या जमादाराची भेट घेतली. व कीर्तिसेनेनें काय सांगितलें होतें, तें त्याला कळविलें. जमादारानें गवळ्याची विनंती मान्य करून राजाच्या जवळच्या चोपदाराला कळविलें. व त्याला बरोबर घेऊन कीर्तिसेना जेथें बसली होती, तेथें ते तिघेही आले. कीर्तिसेनेच्या चेहऱ्यावरूनच गवळ्याच्या सांगण्याविषयीं जमादार व चोपदार यांला कांहींसा विश्वास वाटला. व त्याणीं तिचें गौरव करून तिला राजाजवळ नेली. आंत गेल्यावर राजा ज्याठिकाणीं विव्हळ होऊन पडला होता; त्याच्या बाहेरच्या बाजूला कीर्तिसेनेला बसवून चोपदार राजाजवळ गेला. व त्याणें त्याच्याबद्दल विनंती केली. राजानें हुकूम देतांच तो तिला त्याच्याजवळ घेऊन गेला. कीर्तिसेना यावेळीं पुरुष बनली होती. तिणें मोठ्या अदबीनें राजाला मुजरा केला. तिला पाहतांच—याच्या हातून कांहीं तरी योग्य उपचार होईल, असें आपोआप राजाला वाटलें. वस्तुतः कीर्तिसेनेविषयीं त्याला कांहींच माहिती नव्हती! पण अंतरात्मा हा, हित आणि अहित हें आपल्या आपणच जाणत असतो. तात्पर्य राजाचा तिच्यावर एकदम विश्वास बसला. तो तिला म्हणाला,—"काय असेल तें असो; पण तुम्हांला पाहतांच तुमच्या हातून मी बरा होईन असें मला वाटतें. जर तुम्ही माझा हा रोग घालवाल; तर मी

आपल्या राज्याचें अर्ध तुह्माला देईन. काल रात्रीं मला स्वप्न पडलें, आणि त्यांत असें दिसलें कीं; माझ्या पाठीवर काळें कांबळें होतें, तें एका स्त्रीनें काढून घेतलें. त्यावरून माझा निश्चय झाला आहे कीं; तुमच्या हातून माझा रोग जाईल."

रोगानें आर्त झालेल्या राजाचें हें भाषण ऐकून; **कीर्तिसेना** ह्मणाली,—"महाराज, ईश्वर करो आणि आपल्याला जसें वाटतें आहे तसेंच होवो! मी आपल्याकडून करायचा तो यत्न करून पाहीन. व त्याणें रोग जाईल अशी माझी खातरी आहे. मग पुढें परमेश्वराची काय मर्जी असेल ती खरी! आज तर आतां उपचार करण्याची वेळ राहिली नाहीं. दिवस बहुतकरून गेल्यासारखाच आहे. उद्यां खचित मी आपला रोगपरिहार करीन. महाराज, आपण धैर्य सोडूं नका. आज मी थोडासा उपाय सांगतों; तो करून बघा, ह्मणजे आपल्याला रात्रीं झोंप लागेल."

असें सांगून **कीर्तिसेनेनें** राजाला बराच धीर दिला. व त्यालाही तिच्याविषयीं मोठी उमेद वाटली. नंतर तिणें राजाच्या मस्तकावर गाईचें तूप चोळायला लावलें. तेणेंकरून त्याला त्या रात्रीं थोडीशी झोंप लागली. व अर्थात् त्याचें इवळणेंही बंद झालें. तें पाहून जवळचे सर्व लोक **कीर्तिसेने**ची फारच तारीफ करूं लागले. कारण राजाला आज कित्येक दिवस झोंप मुळींच नव्हती. ती आज लागली याचें त्यांना मोठेंच आश्चर्य वाटलें. ते ह्मणाले,—"कांहीं मोठ्या पुण्याचा उदय होऊन वैद्याच्या रूपानें हा कोणी तरी देवच येथें आला आहे. नाहीं तर असा तात्कालिक गुण कोठून प्राप्त झाला असता?"

राजवाड्यांतील सर्व लोक **कीर्तिसेने**ला वैद्यबुवाच ह्मणूं लागले. राजाला झोंप आली हें पाहून त्याची राणी त्या वैद्यबुवांची मोठी आभारी झाली. मग काय विचारतां? वैद्यबुवा कोठें बसतील, कोठें उठतील, काय खातील? याकडे सर्वांचें लक्ष्य लागलें. स्वतः राणीसाहेब वैद्य-

बुवांची बरदास्त ठेवूं लागल्या. व त्यांच्याकरतां एक स्वतंत्र महाल योजून दिला. तेथें दासदासी वगैरे नेमून वैद्यबुवांची त्यांत स्थापना केली. सर्व लोकांना—ती रात्र कधीं सरेल, व वैद्यबुवा उपचार करून राजाला कधीं बरा करतील, असें झालें होतें. त्याप्रमाणें एकदांची रात्र सरली. गेल्या रात्रीं चांगली झोंप लागल्यामुळें राजाला बरीच हुषारी वाटली. प्रातःकाल होतांच वैद्यबुवांला राजाकडे नेण्याकरतां स्वतः राणीसाहेब आल्या. तेव्हां **कीर्तिसेनेनें**, दोनप्रहर होईपर्यंत दम धरण्यास सांगितलें. त्याप्रमाणें दोनप्रहरची वेळ होत आली. तेव्हां **कीर्तिसेनेनें** राजाला कडकडीत उन्हांत नेऊन बसविला. व त्याच्या डोक्यावर गाईचें तूप खूप चोळलें, आणि कानाला बारीक नळी लावून ती गार पाण्याच्या भांड्यांत सोडली, त्याच्या योगानें त्याच्या मस्तकांत असलेल्या घोणा भराभर नळीच्या वाटेनें पाण्याच्या भांड्यांत उतरल्या. याप्रमाणें एकामागून एक अशा कित्येक घोणा बाहेर आल्या असून आतां कांहीं शिल्लक नसेल असें वाटल्यावर राजाला आंत नेला. व त्याचा मगज थंड होण्याकरतां उपचार सुरू केले. नंतर थोडक्याच वेळानें राजाची प्रकृती हुषार झाली. एकामागून एक ते प्राणी राजाच्या मस्तकांतून पाण्याच्या भांड्यांत पडलेले पाहून सर्वांला मोठा अचंबा वाटला. **कीर्तिसेनेनें** राजा चांगला हुषार होई तों पर्यंत त्याला त्या घोणा मुळींच दाखविल्या नाहींत. कारण त्या पाहून कदाचित् त्याच्या मनाला धक्का बसेल, असें तिला वाटलें. तो चांगला स्वस्थ झाल्यावर **कीर्तिसेनेनें** त्याला ते प्राणी दाखविले. तेव्हां त्याला मोठी किळस आली. व आपलें हें पुनर्जन्म झालें; असें समजून तो मोठा आनंदित झाला.

नंतर त्याणें रोगापासून मुक्त झाल्याबद्दल आनंदप्रदर्शनार्थ मोठा उत्सव केला. व मंगलस्नान करून, देव ब्राह्मण इत्यादिकांची पूजा करून, **कीर्तिसेने**ची एखाद्या देवासारखी पूजा केली. व त्याचवेळीं पूर्वी कबूल केल्याप्रमाणें अर्धें राज्य देऊं लागला. पण **कीर्तिसेनेनें**

आग्रहपूर्वक तें नको; ह्मणून सांगितलें. वैद्यबुवांवर एकट्या राजानेंच सुवर्णवृष्टि केली; असें नाहीं. त्याची राणी, प्रधान, शहरांतील शेट सावकार वगैरे सर्व लोकांनीं **कीर्तिसेने**वर सुवर्णवृष्टि केली. ज्याला त्याला—'आपल्या राजाचे यानें प्राण वांचविले, तेव्हां याचा आपण सत्कार केला पाहिजे,' असें वाटलें. **कीर्तिसेने**च्या पुढें यावेळीं ने वस्त्रालंकारादिकांचे ढीग पडले होते, त्यांला तिणें केवळ स्पर्शमात्र केला. आणि तें सर्व राजाच्या हवालीं केलें. ती ह्मणाली,—"महाराज, आपल्या जवळ ही माझी ठेव असूंद्या. मी कांहीं दिवस येथेंच राहणार आहें. जातेवेळीं कदाचित् घेऊन जाईन."

राजानें हें तिचें सांगणें मान्य केलें. व **कीर्तिसेना** आपल्या भर्त्याची वाट पहात तेथेंच राहिली. राजवाड्यांतील व शहरांतील लहानथोर सर्व लोक तिचा अतिशय सन्मान करीत होते. राजा व राणी हीं उभयतां तर तिचा शब्द झेलण्याविषयीं अगदीं तत्पर असत. याप्रमाणें वैद्यबुवा बनलेल्या **कीर्तिसेने**ची शहरांत जिकडेतिकडे मानमान्यता व तारीफ चालली होती. असा असाध्य रोग बरा केला तेव्हां लोकांना हा एक **धन्वंतरी**च आहे असें वाटलें. व त्यावरून पुष्कळ रोगी तिच्याकडे येण्याचा प्रयत्न करूं लागले; पण वैद्यबुवांला आपलें बिंग काय आहे तें माहीत होतें. तिणें राजा व त्याच्या जवळची मंडळी यांला अगदीं स्पष्ट सांगून ठेवलें कीं,—"आपण आतां दुसऱ्या कोणालाही बिलकूल औषधोपचार करणार नाहीं. व माझ्याकडे कोणीही रोग्यानें येतां कामा नये. मी फक्त राजाला वांचविण्याकरतांच हा प्रयत्न केला. बाकी दुसऱ्या कोणालाही माझ्याकडून कांहीं साह्य मिळायचें नाहीं." **कीर्तिसेने**नें असें जेव्हां निक्षून सांगितलें, तेव्हां लोकांचा निरुपाय झाला. नाहीं तर पुष्कळ रोगी तिच्याकडे आले असते. तिणें मोठ्या शहाणपणानें घेतलेल्या सोंगाचा बोज राखून तेथें बरेच दिवस काढले. '**वलभी** शहराकडून कोणी व्यापारी-

लोक या वाटेनें येतील; तर त्यांच्याबद्दल आपल्याला खबर द्यावी,' अशी तिणें राजाला सांगून व्यवस्था करून ठेविली होती. जे कोणी व्यापारीलोक त्या वाटेनें येतजात असत; त्यांचें तेथें उतरण्याचें नियमित स्थळ होतें. व शहरचा कोतवाल त्यांची नांवानिशी वगैरे टिपून घेत असे. राजानें कोतवालाला हुकूम दिल्यावरून वलभीनगराहून जे जे व्यापारी त्या वाटेनें आले; त्यांच्याबद्दल कोतवालानें वैद्यबुवांकडे वर्दी देण्याचा क्रम ठेविला होता. याप्रमाणें बरेच दिवस गेल्यावर; एकेदिवशीं '**देवसेन** नांवाचा सावकार **वलभी**कडून आज येथें आला आहे,' असें कोतवालानें वैद्यबुवांला कळविलें. तें ऐकून **कीर्तिसेने**ला फार आनंद झाला. तिणें तत्काल कोतवालाला, आपल्यास त्याच्या जवळ घेऊन जाण्याविषयीं सांगितल्यावरून त्याणें, **देवसेन** ज्याठिकाणीं उतरला होता त्याठिकाणीं, पुरुषवेष धारण करणाऱ्या **कीर्तिसेने**ला नेऊन पोंहचविलें. व तिचा हुकूम घेऊन तो परत निघून गेला.

**कीर्तिसेना** पुरुषाचा वेष घेऊन आली असल्यामुळें; **देवसेना**ला प्रथम तिची ओळख पटली नाहीं. राजवाड्यांतला कोणी राजाचा आप्त संबंधी असेल; असें समजून त्याणें **कीर्तिसेने**चा मोठा आदरसत्कार केला. व व्यापारीलोकांच्या सांप्रदायाप्रमाणें मोठ्या नम्रतेनें, येण्याचें कारण विचारिलें. यावेळीं आसपास नोकरचाकर होते, त्यांना बाहेर घालविण्याविषयीं सांगून अगदीं एकांत झाला; तेव्हां **कीर्तिसेनेनें** हळूच आपलें खरें स्वरूप प्रकट केलें. व एकाएकीं त्या प्रियभर्त्याच्या गळ्याला मिठी मारली. हें पाहून **देवसेना**ला किती आनंद झाला असेल त्याचें काय वर्णन करावें! पुरुषाचा वेष धारण करून **कीर्तिसेना** येथें प्राप्त झाली, याचाच त्याला मोठा चमत्कार वाटला. त्या प्रेमळ दंपत्यानें बहुत दिवस अंतरलेला आलिंगनसुखाचा लाभ चिरकाल घेऊन नंतर एकमेकांनीं आपापल्या हकीकतीचें वर्णन केलें. **कीर्तिसेनेनें**, सां-

गितलेली हकीकत ऐकून **देवसेना**ला आपल्या आईच्या कठोरपणाविषयीं खेद व **कीर्तिसेन**च्या चातुर्याविषयीं कौतुक वाटलें. असो.

**कीर्तिसेना** राजवाड्यांतून एकाएकीं निघून आल्यामुळें तिकडे बरीच गडबड उडाली. राजा व राणी यांणीं वैद्यबुवा कोठें गेले? कां गेले? याविषयीं विशेष चौकशी केली. तेव्हां कोतवालानें **देवसेना**च्या बिऱ्हाडीं गेले असल्याचें कळविल्यावरून स्वतः राजा **वसुदत्त देवसेना**च्या बिऱ्हाडीं प्राप्त झाला. हा सर्व चमत्कार पाहून **देवसेना**बरोबर दुसरे कित्येक व्यापारी लोक होते, त्यांना मोठें आश्चर्य वाटलें. ज्या राजाचें केवळ दर्शनदेखील होणें कठीण; तो **देवसेना**च्या बिऱ्हाडीं आला, हें आहे तरी काय? याचें सर्वांला मोठें गूढ पडलें. राजा **वसुदत्त देवसेना**च्या बिऱ्हाडीं येऊन पाहतो तों पूर्वींप्रमाणें वैद्यबुवा नसून वैद्यबाई झाली आहे! व ती लाजेनें एका बाजूला उभी राहिली आहे. हें पाहतांच राजाला फारच आंश्चर्य वाटलें. त्यानें प्रश्न केल्यावरून **कीर्तिसेनेनें देवसेना**समक्ष त्याला इत्थंभूत सर्व हकीकत सांगितली. तेव्हां राजाला मोठाच विस्मय वाटला. व **देवसेना**ला आपल्या आईविषयीं अतिशय तिटकारा उत्पन्न झाला. भर्त्याविषयीं भक्तिभाव हाच कोणी एक रथ त्यावर बसलेल्या व उत्तम शीलरूपी कवचानें रक्षण केलेल्या, धर्म हाच ज्यांचा सारथी आहे, व बुद्धि ही ज्यांची तरवार आहे; अशा साध्वी स्त्रिया जयशाली होतात हें योग्यच आहे.

याप्रमाणें **कीर्तिसेनेचें** हें विचित्र चरित्र ऐकून; सर्व लोक साश्चर्य व आनंदित झाले. राजा **वसुदत्त कीर्तिसेने**ला उद्देशून ह्मणाला,—"आपल्या पतीकरतां क्लेश भोगण्याचें पत्करलेल्या ह्या साध्वीनें, **रामा**ला क्लेश देणारी **सीता**देवी मागें सारली! माझे तर हिनें प्राणच वांचविले आहेत. तेव्हां ही माझी धर्मभगिनी आहे."

याप्रमाणें भाषण करणाऱ्या राजाला **कीर्तिसेना** ह्मणाली,—"महारा-

ज, आपण कृपा करून मला बहीण मानलीत याचा मला फार संतोष वाटतो. प्रेमपूर्वक मला जी आपण देणगी दिली आहे; व इतर लोकांनीं नजर केलेले अलंकार, रत्नें, हत्ती, घोडे वगैरे जें सर्व मीं आपल्याजवळ ठेविलें आहे, तें आतां या माझ्या पतिरायाला द्या. त्याचा अधिकार यांच्याकडेच आहे."

हें ऐकून राजानें तिला आपलें अर्धें राज्य देऊं केलें होतें तें, व इतर चीजवस्त झाडून सारें **देवसेना**ला दिलें. आणि आपल्या अर्ध्या राज्याचा मालक **देवसेन** केला, असें दर्शविण्याकरतां सर्वांदेखत त्याणें त्याच्या डोक्याला मंदिल बांधला. व त्यादिवशीं मोठा उत्सव केला. नंतर राजानें दिलेलें व **देवसेनानें वलभी**नगरांत व्यापार करून मिळविलेलें; मिळून असंख्य द्रव्य घेऊन, आईच्या दुष्टपणाचा ज्याला कंटाळा आला आहे, असा **देवसेन वसुदत्त**पुरांतच राहिला. कारण त्याला जें अर्धें राज्य मिळालें होतें, त्याची व्यवस्था करण्याकरतां; तेथेंच राहणें भाग होतें. दुष्ट सासूच्या जाचांतून मुक्त झालेली; व आपल्या लोकोत्तर चरित्रानें सर्वांला वंद्य झालेली; अशी **कीर्तिसेना**—जणूं काय केलेल्या पुण्याची समृद्धीच देहधारण करून प्राप्त झाली आहे, अशी आपल्या भर्त्याला आनंद देत होत्साती सुखानें राहती झाली. याप्रमाणें, आपल्या मोठ्या सत्त्वानें ज्यांचें रक्षण केलें आहे अशा साध्वी स्त्रिया आपलें आणि आपल्या पतीचेंही कल्याण करतात."

याप्रमाणें कथा सांगून **सोमप्रभा कलिंगसेने**ला ह्मणाली,—"हे राजकन्ये, सुनांला सासूकडून अशाप्रकारचे अनेक त्रास होतात. याकरतां तुला सासर असें मिळावें कीं; जेथें सासू नसेल, व नणंदही नसेल, किंवा असली तर ती द्वाष्ट तरी नसेल; अशी माझी इच्छा आहे." **सोमप्रभेच्या** मुखांतून ही आनंदकारक अद्भुत कथा श्रवण करून **कलिंगसेनेला** फार संतोष झाला. इतक्यांत आरंभिलेली मनोरंजक कथा संपली

आतां कशाला रहावें; ह्मणूनच कीं काय, सूर्य अस्ताला जाण्यास प्रवृत्त झाला आहे असें पाहून– आपल्या पुनर्दर्शनाविषयीं उत्कंठित असलेल्या **कलिंगसेने**ला आलिंगन देऊन **सोमप्रभा** आपल्या घरीं निघून गेली.

**सोमप्रभा** आकाशमार्गानें निघाली तेव्हां तिला पाहण्याकरतां ह्मणून स्नेहानें बद्ध झालेली **कलिंगसेना** आपल्या महालाच्या गच्चीवर गेली. ती तिच्याकडे दृष्टी लावून पहात असतां, लवकरच **सोमप्रभा** दिसे-नाशी झाली. तों इतक्यांत आकाशांतून **मदनवेग** नांवाचा तरूण विद्याधरपति **कलिंगसेने**च्या अगदीं जवळ प्राप्त झाला. कामरूपी गारुड्याचा कुंचाच कीं काय; अशा त्या त्रैलोक्याला मोह करणाऱ्या **कलिंगसेने**चें अत्युत्तम रूप पाहून त्या विद्याधराचें मन क्षुब्ध झालें होतें. तो आपल्याशींच ह्मणाला.–'विद्याधरांच्या स्त्रियांचें तर नांवच नको. आणि अप्सरांची तरी गोष्ट कशाला पाहिजे. मनुष्य असून असें अद्भुत सौंदर्य हिला प्राप्त झालें आहे; तेव्हां हिच्या पुढें त्या सर्व स्त्रिया तुच्छ आहेत. अशी ही अप्रतिम रूपवती कन्या जर माझी भार्या न होईल; तर मग मी जीवंत असून तरी काय उपयोग आहे! पण मी विद्याधर असून मनुष्यकन्येशीं समागम करावा तरी कसा?' याप्रमाणें **मदनवेग** मोठ्या गोंधळांत पडला. नंतर त्याणें **प्रज्ञप्ति** नां-वाच्या विद्येचें ध्यान केलें. ती प्रत्यक्ष रूप धारण करून त्याला ह्मणाली,– "अरे **मदनवेगा**, ही ( **कलिंगसेना** ) खरोखरीच मानुषी नाहीं. ही अप्सरा असून शापानें मृत्युलोकीं आली. व राजा **कलिंगदत्ता**च्या घरीं इणें जन्म घेतला आहे." असें सांगून ती विद्या अदृश्य झाली.

**मदनवेगा**ला ती मानुषी नाहीं, हें समजल्यावरून फार आनंद झाला. दुसऱ्या सर्व विषयांकडून त्याचें मन परावृत्त होऊन त्या **कलिंगसेने**कडे लागलें. कामार्त झालेला तो मनांत ह्मणाला,–'मी हिच्यावर आसक्त झा-लों आहें; पण मला ही कशी प्राप्त होईल? हिला बलात्कारानें हरण कर-ण्याइतकें माझें सामर्थ्य आहे; व मी तसें करीनही; पण मला त्याबद्दल

शाप आहे. व त्यायोगानें मला मृत्यु प्राप्त होणार. तेव्हां आतां हिच्या प्राप्तीकरतां भगवान् **शंकराचें** आराधन करावें. कल्याण होणें हें तपाच्या अधीन आहे. याठिकाणीं आतां दुसरा कांहीं उपाय करणें योग्य नाहीं. असा निश्चय करून तो विद्याधर **कलिंगसेनेशीं** कांहीं भाषण न करतां मुकाट्यानें तेथून निघून गेला. **महादेवाला** प्रसन्न करून घेण्याचा निश्चय करून **ऋषभपर्वता**वर जाऊन त्याणें तपाला आरंभ केला. कांहीं आहार न करतां एका पायावर उभा राहून; तो उग्र तप करूं लागला. त्याच्या तपश्चर्येनें भगवान् **शंकर** लवकरच प्रसन्न होऊन त्याणें त्याला दर्शन दिलें. त्या भगवंताला पाहून भक्तिपूर्वक स्तुती करणाऱ्या, व त्याच्या पायांवर लोळण घेणाऱ्या **मदनवेगाला** भगवान् **शंकर** म्हणाला,–"अरे, तुझ्या मनांत कोणता हेतू आहे तो मी समजलों. जी कन्या तूं इच्छितोस तिचें नांव **कलिंगसेना**. तिच्या सौंदर्याची सर्व भूमंडलावर विशेष ख्याती झाली आहे. ती अद्याप अविवाहितच आहे. तिच्या सौंदर्याला अनुरूप असा वरच कोणी नाहीं. एक **वत्सराज** मात्र तिला अनुरूप आहे. व तो तिची इच्छाही करीत आहे. पण त्याची राणी **वासवदत्ता** हिला कदाचित् वाईट वाटेल; ह्मणून तिचा स्वीकार करण्याविषयीं तो उघडपणें कांहीं बोलत नाहीं. ती **कलिंगसेना**ही **वत्सराजाच्या** रूपाला मोहित झाली आहे. **सोमप्रभे**कडून तिणें त्याची तारीफ ऐकली आहे. तेव्हां आपण होऊन त्याला वरावें अशी तिची इच्छा आहे. तर, जर तुला तीच पाहिजे असेल; तर **वत्सराजाशीं** तिचा विवाह होण्यापूर्वीं लवकर त्या राजाचें रूप धारण करून तूं तिचा स्वीकार कर. व गांधर्वविधीनें तिच्याशीं लग्न लाव. असें करशील तरच ती सुंदरी **कलिंगसेना** तुला मिळेल." **शंकरानें** याप्रमाणें सांगितलें. तें ऐकून आनंदित होत्साता तो **मदनवेग कालकूटपर्वता**वर निघून गेला.

या संधीस, प्रतिदिवशीं प्रातःकाळीं **कलिंगसेने**जवळ येणाऱ्या व सायंकाळीं परत आपल्या घरीं जाणाऱ्या, यंत्राच्या सामर्थ्यानें याप्रमाणें

अनेक येरजाऱ्या करणाऱ्या **सोमप्रभे**सह एकांतीं क्रीडा करीत असले **कालिंगसेना** तिला ह्मणाली,—"गडे, तुला मी कांहीं गोष्ट सांगतें; पण कोणाला कळवूं मात्र नको. माझें लग्न होण्याची तयारी चालली आ मुहूर्ताचा दिवस अगदीं जवळ आला आहे. मला मागण्याकरतां अने राजांनीं दूत पाठविले होते; पण आमच्या बाबांनीं त्या सर्वांला तसेंच प लावलें. **श्रावस्ती**[1] नांवाच्या नगरींत **प्रसेनजित्** नांवाचा जो को राजा आहे, त्याचा दूत परवां आला होता. त्याचा मात्र बाबांनीं आदर वेक सत्कार केला. व त्याच्या संबंधानें माझ्या आईच्या आणि बाबांच कांहीं गोष्टीही झाल्या. त्यावरून मला असें वाटतें कीं; तो रा त्यांणीं मला वर योजला असावा. तो चांगला कुलीन आहे ह्मण माझ्या आईला व बाबांलाही फार संमत आहे. **कौरवपांडवांच** पितामही **अंबा**[2], **अंबालिका**, आणि **अंबिका** ह्या तिघी प्रसिद्ध कन ज्या कुलांत उत्पन्न झाल्या त्याच कुलांत तो राजा **प्रसेनजित्** उत्प झाला आहे असें सांगतात. तेव्हां यावरून त्या **प्रसेनजित्** राजा

---

१ येथें प्रसेनजित् राजाची नगरी श्रावस्ति असें वर्णन केलें आहे. हें न प्राचीन पौराणग्रंथांत फारसें कोठें आढळत नाहीं. बौद्ध लोकांच्या ग्रंथांत मात्र हि नांव पुष्कळ ठिकाणीं आढळतें. बुद्ध हा श्रावस्तींत राहत होता, असें ललितविस इत्यादि बुद्धाच्या चरित्रग्रंथांत वर्णन आढळतें.

२ अंबा इत्यादि तिघी कन्या ह्या काशीच्या राजाच्या मुली होत. भीष्म आपला धाकटा सावत्रबंधू विचित्रवीर्य याला देण्याकरतां त्या तिघींनाही स्वयंवरांत जिंकून आणिल्या होत्या, वडील बहीण अंबा हिनें शाल्वराजाला आपण मनानें वर आहे, असें सांगितल्यावरून भीष्मानें तिला तिकडे जाऊं दिलें. व बाकी दोघी विचि वीर्याला दिल्या, ही कथा महाभारताच्या आदिपर्वांत व उद्योगपर्वांत सविस्तर आ आहे. त्यावरून त्या काशिराजाच्या मुली होत्या, हें उघड आहे. व प्रसेनजित् ज्य कुलांत उत्पन्न झाला त्याच कुलांत त्या उत्पन्न झाल्याचें मूळांत सांगितलें आहे. त्यावरू बौद्ध लोकांनीं काशीलाच श्रावस्ती हें नांव दिलें असावें. व प्रसेनजित् हा काशीचा राजा असावा असें वाटतें. पण पुराणाशीं याचा विरोध येतो. श्रीमद्भागवताच नवव्या स्कंधांत श्रावस्त नांवाचा एक राजा झाला होता त्याणें ती नगरी वसवि ह्मणून तिला श्रावस्ती ह्मणतात, असें सांगितलें आहे.

बाबांनीं मला दिली, असें ठरल्यासारखें झालें आहेसें दिसतें."

हें ऐकून **सोमप्रभे**च्या नेत्रांतून, जणुं काय दुसरा हारच उत्पन्न होत आहे, अशा अश्रुधारा वाहूं लागल्या. तें पाहून, त्या आपल्या सखीला— 'रडण्याचें कारण काय?' ह्मणून **कलिंगसेने**नें विचारलें. तेव्हां **सोमप्रभा** म्हणाली, "गडे **कलिंगसेनें**, मी या पृथ्वीवरील एकून एक राजे पाहिले आहेत. लग्नांत वराचे जे जे गुण पहावयाचे त्यांत—वय, रूप, कुल, शील आणि द्रव्य हीं मुख्यत्वें पाहिलीं पाहिजेत. त्यांतूनही वयाचा प्रथम विचार केला पाहिजे, मग कुलशीलादिक. आतां तूं सांगितलेला **प्रसेनजित्** राजा मीं पाहिला आहे. तो तर पुष्कळ ह्मातारा आहे. उत्तम जाईचें फूल आहे; पण, तें कोमेजलें असलें तर त्याचा काय उपयोग? तसें त्या ह्मातान्याचें कुलशील चांगलें असलें ह्मणून करायचें काय? बर्फासारखा सफेत झालेला तो राजा घेऊन तूं काय करणार! हेमंतऋतूंत जशी कमलिनी शुष्क होते; तशी तूं त्याला वरून दुःखानें सुकून जाशील. तुझ्या तोंडाचें पाणी उतरेल. असें आहे ह्मणून तूं सांगितलेलें ऐकून मला विषाद झाला. हे कल्याणि, **वत्स**देशाचा राजा **उदयन** जर तुझा पति होईल, तर मला फार आनंद होईल. त्याचें रूप, लावण्य, कुल, शौर्य, ऐश्वर्य यांची दुसऱ्या कोणालाच सर यायची नाहीं. या साऱ्या पृथ्वींत त्याच्या बरोबरीचा असा एकही राजा नाहीं. हे कृशोदरि, जर त्याच्याशीं तुझा संबंध होईल तरच **ब्रम्हदेवानें** तुला जी इतकी सुंदर निर्माण केली आहे त्याचें साफल्य होईल." या प्रमाणें **सोमप्रभे**च्या मोठ्या गौळतेच्या वाक्यरूप यंत्रांनीं प्रेरणा केलेलें **कलिंगसेने**चें मन तत्काल **वत्सराजा**जवळ गेलें. नंतर **मयासुरा**ची कन्या **सोमप्रभा** हिला **कलिंगसेना** ह्मणाली, "अगे, तूं **वत्सराज** ह्मणून सांगितलास तो कोण? तो आहे कोठें? व तो कोणत्या वंशांत उत्पन्न झाला आहे? हें मला अंमळ सविस्तर सांग. ज्याचें तूं **उदयन** असें नांव घेतलेंस तें त्याला कसें प्राप्त झालें? तें ऐकावयाची माझी फार इच्छा आहे."

हें ऐकून **सोमप्रभा** ह्मणाली, "सखे ऐक. मी तुला सविस्तर सांगतें. **वत्स** या नांवाचा **पृथ्वी**ला भूषणभूत असा प्रख्यात देश आहे. तेथें इंद्राच्या **अमरावती**सारखी **कौशांबी** नांवाची नगरी आहे. तेथें राहून तो पृथ्वीचें राज्य करतो. ह्मणूनच त्याला **वत्सेश्वर** ह्मणतात. आतां त्याचा वंश तुला सांगतें, तो श्रवण कर. पांच पांडवांतला मध्यम बंधु जो **अर्जुन** त्याचा **अभिमन्यू** नामक पुत्र होता. ज्याणें चक्रव्यूहाचा भेद करून कौरवांच्या सैन्याचा क्षय केला तोच **अभिमन्यू**. त्या पासून **भरत**कुलाचें धारण करणारा **परीक्षित्** नांवाचा राजा झाला. त्यानें **सर्पसत्र** नांवाचा मोठा यज्ञ करून त्यांत असंख्य सर्पांचा नाश केला. **परीक्षित्** राजाला **जनमेजय** नामक पुत्र झाला. त्याला **शतानीक** झाला. वस्तुतः कुलपरंपरागत त्यांची राजधानी **हस्तनापुर** हीच होय; पण कांहीं कारणामुळें **शतानीका**नें **हस्तनापुर** सोडून **कौशांबी** हीच आपली राजधानी केली. देवदैत्यांचें मोठें युद्ध झालें, त्यांत दैत्यांला मारून त्याणें देवांचें पुष्कळ साह्य केलें. पण शेवटीं तो त्याच लढाईंत मारला गेला. नंतर सर्व जगांत ज्याची ख्याती झाली होती असा **सहस्रानीक** नामक **शतानिका**चा पुत्र राजा झाला. **इन्द्रा**नें त्याला रथ पाठविल्यावरून तो **स्वर्ग**लोकांत गेला होता. त्याची **मृगावती** नांवाची राणी होती. तिच्या पोटीं **उदयन** अथवा **वत्सराज** हा जन्मास आला. चंद्रवंशाचें केवळ भूषण व जगाच्या नेत्रांला आनंद देणारा, असा तो राजा सांप्रत **कौशांबी**त राज्य करीत आहे.

त्याला **उदयन** असें नांव पडण्याचें कारण मोठें चमत्कारिक आहे, तें तुला सांगतें. **उदयना**च्या वेळीं त्याची आई गरोदर असतां तिला रक्तानें स्नान करावें असे डोहाळे झाले. आपल्या प्रिय पत्नीचे डोहाळे तर पुरविले पाहिजेत; पण पुष्कळ प्राण्यांची हिंसा केल्यावांचून स्नान करण्यास पुरें इतकें रक्त मिळायचें नाहीं. व तसें करणें ह्मणजे मोठें पाप, असें धर्मात्मा राजा **सहस्रानीक** याला वाटल्यावरून त्यानें आ-

ळत्याच्या रंगानें पाणी लाल करून त्याचा एक कृत्रिम तलाव तयार केला. व त्या तलावांत **मृगावती**ला स्नान करावयास सांगितलें. ती तेथें स्नान करीत असतां आकाशमार्गानें एक मोठा पक्षी जात होता. त्याला हा एक मांसाचा गोळा आहे; असें वाटून त्याणें तिला उचलून नेलें. व **उदय**पर्वतावर नेऊन टाकलें. तेथें ती प्रसूत होऊन हा पुत्र झाला, ह्मणून याचें **उदयन** असें नांव ठेविलें. राजा **सहस्रानीका**ला कांहीं शाप झाला होता. ह्मणून चवदा वर्षे पर्यंत त्याचा आणि त्याच्या राणीचा वियोग झाला. नंतर आपली स्त्री व पुत्र **उदय** पर्वतावर आहेत असें वर्तमान समजल्यावरून राजा **सहस्रानीक** तेथें गेला. व त्याणें पुत्रासहवर्तमान स्त्रीला परत आपल्या घरीं आणली. प्रथम, पुत्राला यौवराज्याचा अभिषेक केला. व नंतर त्याच्या गुणोत्कर्षानें संतुष्ट होत्साता सर्व राज्य त्याला देऊन राजा **सहस्रानीक** परलोकसाधन करण्याकरितां तपोवनास गेला. याप्रमाणें कुलपरंपरागत राज्याचा स्वीकार करून **यौगंधरायण** नांवाच्या मोठ्या बुद्धिमान् प्रधानासह सर्व पृथ्वीचा विजय करून तो राजा **उदयन** सांप्रत राज्याचा उपभोग घेत आहे."

याप्रमाणें **सोमप्रभेनें वत्सराजाचें** चरित्र सांगितलें. तें, आपली सखी **कलिंगसेना** हिला मनापासून आवडलें, व ती लक्ष्यपूर्वक तें ऐकत आहे, असें पाहून **सोमप्रभे**ला मोठा संतोष वाटला. व ती पुनः तिला ह्मणाली, "हे सुंदरि, याप्रमाणें त्या **उदयना**चें चरित्र आहे. तें फारच मोठें आहे. मी तुला त्यांतला सारांश सांगितला. तो **वत्सदे**शाचा राजा आहे ह्मणून त्याला **वत्सराज** ह्मणतात. **पांडवांच्या** कुळांत झाला आहे तेव्हां तो **सोम**वंशीय राजा आहे हें तर प्रसिद्धच आहे. **उदयाचला**वर जन्मास आला. ह्मणून देवांनीं त्याला **उदयन**

---

१ ही कथा पहिल्या भागांत सविस्तर आली आहे ह्मणून आह्मीं येथे फारच संक्षेपानें दिली. या विषयीं भाग पहिला पृष्ठ १५० पासून २१९ पर्यंत पहा.

**असें** नांव ठेवलें. आतां त्याचें रूप कसें आहे ह्मणशील; तर मला वाटत नाहीं कीं; प्रत्यक्ष **मदन** देखील सौंदर्यानें त्याची बरोबरी करूं शकेल. ! गडे, तूं तर त्रैलोक्यांत सुंदर आहेस. तुला तो **वत्सराज** हाच कायतो एक अनुरूप पति आहे. त्याच्या वांचून तुझ्याजोगता दुसरा वर कोणताच नाहीं. इतकेंही असून तुझ्या लावण्याला लुब्ध होऊन तो तुझी इच्छा करीत आहे. तूं त्याला वरण्यास तयार आहेस असें समजेल; तर तो आतांच ती गोष्ट कबूल करील.

याप्रमाणें बाकीचें सर्व ठीक आहे; पण एक मोठी अडचण आहे. **उज्जयिनी**चा राजा **चंडमहासेन** याची कन्या **वासवदत्ता** ही त्याची पट्टराणी आहे. आणि तिच्यावर त्याचें फारच प्रेम आहे. आपल्या आईबापांला एका बाजूस गुंडाळून ठेवून स्वतः तिणेंच त्याला वरला आहे. त्या कामांत **उषा, शकुंतला** इत्यादि पूर्वींच्या स्त्रियांना तिणें मागें टाकलें आहे. **नरवाहनदत्त** नामक तिला एक मोठा तेजस्वी पुत्र झाला आहे. तो पुढें विद्याधरांचा अधिपति होणार असें देवांनीं सांगितलें आहे. **वत्सराजानें** तुझ्याबद्दल स्वतः आपणच मागणी केली असती; पण, तो त्या **वासवदत्ते**ला अंमळ भितो, ह्मणून त्याणें तसें केलें नाहीं. **वासवदत्ते**ला मीं स्वतः पाहिली आहे. ती स्वरूपानें सुंदर आहे; तरी त्या कामांत तुझी बरोबरी करील असें वाटत नाहीं."

याप्रमाणें **सोमप्रभेनें वत्सराजाचें** वर्णन केलें. तें श्रवण करून **कलिंगसेना** फारच उत्कंठित झाली. आधींच ती भर तारुण्यांत आलेली; **काम**देवानें नुकताच तिच्यावर आपला अंमल सुरू केला होता. अशा स्थितींत मनाजोगत्या पुरुषाचा समागम होण्याविषयीं तिला किती उत्कंठा असेल, हें सांगावयासच नको. तशांतून **सोमप्रभेनें वत्सराजाचें** जें वर्णन केलें; तें तिच्या मनाला फारच अस्वस्थ करण्यास कारण झालें. **सोमप्रभेनें** वर्णन करतांना कांहीं तेल्हट मीठ लावून केलें होतें, असें नाहीं. तथापि तें मोठ्या गौळतेनें

केल्यावरून, **कलिंगसेना** विशेष उत्सुक होऊन तिला ह्मणाली, "गडे **सोमप्रभे,** तूं यावेळीं माझ्या मनाला फारच उत्कंठा लावलीस. तूं जें वर्णन केलेंस त्यापेक्षांही तो ( **वत्सराज** ) विशेष गुणवान् आहे; हें मला ठाऊक आहे. **वासवदत्ता** ही त्याची पट्टराणी असून तो तिच्या कह्यांत आहे हें मी ऐकलें आहे. तथापि मला त्याचें कांहीं भय वाटत नाहीं. मला जी मोठी अडचण आहे ती दुसरीच. **वासवदत्ते**सारखीच माझी स्थिती झाली आहे. मी सर्वस्वीं आपल्या आईबापांच्या अधीन आहें. ह्मणून त्यांच्या इच्छेविरुद्ध मला आपल्या मनाप्रमाणें कोणतीही गोष्ट करतां येत नाहीं. तेव्हां माझा हेतू कसा पूर्ण होणार? तूं सर्वज्ञ आहेस, आणि तुझा प्रभावही मोठा विलक्षण आहे. तेव्हां या कामांत तुझ्या वांचून मला दुसरी गति नाहीं. माझ्याबद्दल तुला जें कांहीं करावेंसें वाटेल तें तूं कर!" हें ऐकून **सोमप्रभा** ह्मणाली, "या शिवाय दुसरें असें आहे कीं, या सगळ्या गोष्टी दैवाच्या अधीन आहेत. आईबापांला आपल्या मुलीचें कल्याण व्हावें असेंच वाटतें. व आपल्या मतें ते तशी योजना करतात; पण मुलीचें दैव चांगलें असलें तरच तिला सुख लागतें. नाहींतर आईबापांनीं केलेली योजना एकीकडे राहून तिला दुःखच भोगावें लागतें! याविषयीं मला एक प्राचीन कथा आठवली आहे ती सांगतें ऐक." असें बोलून **कलिंगसेने**ला **सोमप्रभेनें** पुढील कथा सांगितली.

**सोमप्रभा** ह्मणाली, "सखे, **उज्जयिनी** नांवाच्या नगरींत पूर्वी **विक्रमसेन** नामक एक राजा होता. रूपानें अप्रतिम, जणूं काय दुसरी अप्सराच; अशी **तेजस्वती** नांवाची त्याची एक मुलगी होती. राजाचा तिच्यावर फार लोभ होता. ती उपवर झाल्यावर राजानें तिला योग्य पति मिळण्याविषयीं पुष्कळ प्रयत्न केला. मोठमोठ्या नामांकित राजांचे तरुण व रूपसंपन्न राजपुत्र, ती आपल्याला वरील या आशेनें पुष्कळ येऊन गेले; पण **तेजस्वती**ला त्यांतून एक दे-

खील राजपुत्र पसंत पडला नाहीं. एकेदिवशीं ती आपल्या महालाच्या गच्चीवर क्रीडा करीत असतां; समोरच्या रस्त्यानें **वल्लभ** नांवाचा एक पुरुष येत होता, त्याच्यावर तिची दृष्टि गेली. त्या उभयतांचा पूर्वजन्मींचा काय योगायोग होता कोणास ठाऊक? शेंकडों राजपुत्र जिच्या खातरीस उतरले नाहींत. ती **तेजस्वती** तत्काल मोहित होऊन; त्या पुरुषाचा समागम व्हावा अशी इच्छा करूं लागली! लगेंच तिनें जवळ असलेल्या आपल्या एका सखीला आपला अभिप्राय कळवून तिला त्या पुरुषाकडे पाठविली.

राजकन्येची आज्ञा होतांच ती सखी रस्त्यावर जाऊन ऊभी राहिली. आणि खुणेनें तिनें त्या पुरुषाला आपल्याजवळ बोलाविलें. व युक्तीप्रयुक्तीनें राजकन्येचा हेतू त्याला कळविला. खरोखर यावेळीं धैर्यशाली उमदा पुरुष असता; तर त्याला त्या राजकन्येचा निरोप ऐकून फारच आनंद झाला असता; पण तो पुरुष अगदीं सामान्य होता. सखीनें राजकन्येचा हेतू त्याला कळविला तेव्हां तो घाबरल्यासारखा झाला. तो ह्मणाला, "छेः, छेः! माझ्या हातून असें साहस व्हायचें नाहीं. नकोरे बुवा आपल्याला हें लचांड! राजकन्या कोठें आणि आपण गरीब मनुष्य कोठें? आपल्याला हे असले फंद हवेत कशाला! एखादवेळ राजाला ही गोष्ट समजली; तर जिवावर बेतणार. बाई, तूं त्या राजकन्येचा निरोप सांगिलास ही मजवर मोठी मेहरबानी केलीस. तूं आपल्या यजमाननीला सांग कीं; तुह्मीं माझ्यावर प्रेम आहे असें दाखविलें त्याबद्दल मी फार आभारी आहें; पण माझ्यासारख्या गरीबाला त्याचा काय उपयोग? असो, देव तुमचें बरें करो! मी आपला जातों."

हें त्या भित्र्या मनुष्याचें भाषण ऐकून **तेजस्वती**ची सखी **कुमुदिनी** त्याचें समाधान करीत होत्साती ह्मणाली, "अहो, अंमळ उभे रहा. असे घाबरलां कां? असें पहा, ती माझी सखी ( **तेजस्वती** ) महाराजांची एकुलती एक मुलगी आहे. महाराज तिच्या इच्छेच्या आड येणार

नाहींत. तुह्मी त्याबद्दल मुळींच भय बाळगूं नका. तिनें असा निरोप पाठविला आहे; म्हणून तुह्मी त्याचा भलताच अर्थ घेऊं नका. ती जें कांहीं करणार तें यथायोग्यच करील. तो जर तुह्मांला अनुकूल आहे, तर महाराजांचें तुह्मी भय बाळगावयास नको."

ह्या व अन्यरीतीनें **कुमुदिनीनें** त्या पुरुषाचें समाधान करून एकदांचा त्याला राजी केला. व तेथून जवळच एक देवालय होतें, त्यांत त्याला छपून बसावयास सांगितलें. **कुमुदिनी** ह्मणाली, "भल्या गृहस्था, ह्या देवळांत अगदीं एकान्त असतो. येथें रात्रीं कोणी चिटपाखरूं देखील येत नाहीं. तूं येथें बसून राजकन्येच्या येण्याची वाट पहा. मात्र ती आल्याशिवाय दुसरीकडे कोठें जाऊं नकोस ह्मणजे झालें."

याप्राणें **वल्लभाचें** समाधान करून संकेताच्या ठिकाणीं, अर्थात् त्या देवळांत रात्रीं वाट पहात बसण्याचें त्याच्याकडून कबूल करून घेऊन **कुमुदिनी** परत **तेजस्वती**जवळ गेली. व झालेला सर्व वृत्तांत तिनें तिला निवेदन केला. तो ऐकून उत्कंठित झालेली **तेजस्वती** **सूर्या**कडे एकसारखी टक लावून पहात बसली. हा **सूर्य** कधीं एकदांचा अस्तास जाईल; असे तिला झालें होतें. कारण सूर्यास्त झाल्यावर, तिचें मन ज्याच्यावर आसक्त झालें होतें त्या पुरुषाशीं, तिचा समागम होणार होता. असो. याप्रमाणें राजकन्या **तेजस्वती** एकेक पळ मोजीत मोठ्या संकटानें वेळ घालवीत होती; पण ती ज्याच्या करतां इतकी उत्कंठित झाली होती त्याची अवस्था काय झाली; हें तिला मुळींच माहीत नव्हतें ! एखाद्या कपाळकरंट्याला मोठें निधान प्राप्त झालें तरी त्याला त्याचा उपभोग कोठून घडणार ?

**वल्लभ** हा मनुष्य गांवढळ असून भ्याड होता. **कुमुदिनीनें** त्याची समजूत केली; तेव्हां तिच्या आग्रहास्तव त्याणें देवळांत बसण्याचें कबूल केलें; पण लगेंच त्याची बुद्धी पालटली. त्या भेकडाला इतकें धैर्य कोठून येणार. तो संकेताप्रमाणें देवळांत तर बसला नाहींच;

पण न जाणों आपल्यावर एखादें संकट येईल असें समजून तो पाय लंबे करून तेथून पळून गेला! उघडच आहे, बेडकाला—त्याच्या जवळ असली तरी—कमलिनीच्या परागांच्या आस्वादाची गोडी कोठून उत्पन्न होणार! याप्रमाणें तो दुर्दैवी **वल्लभ**, प्राप्त होणारें कन्यारत्न सोडून पळून गेला! पण खरोखरी ज्याला त्याचा लाभ व्हायचा होता तो दुसरा एक दैवशाली पुरुष आयताच तेथें प्राप्त झाला. कोणी एक राजपुत्र **प्रियदर्शन** नांवाचा मनुष्य तेथें सहज आला. त्याचा पिता लहानपणीं परलोकवासी झाल्यामुळें तो अगदीं निराश्रित झाला होता. त्याच्या दायादांनीं त्याचें राज्य बळकावलें होतें. द्रव्य व फौजफांटा वगैरे जवळ कांहीं नसल्यामुळें; दायादांनीं बळकावलेलें आपलें राज्य परत संपादन करण्याचें सामर्थ्य त्याच्या अंगीं नव्हतें. राजा **विक्रमसेना**चा व त्याच्या बापाचा अत्यंत स्नेह होता. तेव्हां **विक्रमसेना**जवळ साह्य मागावें; या हेतूनें **प्रियदर्शन** यावेळीं **उज्जयिनीस** आला होता. बरोबर नोकरचाकर नाहींत, राजपुत्राला योग्य असें वस्त्रपात्र नाहीं, अशा स्थितींत तरी तो निरुपायास्तव तेथें आला होता; तरीं एकदम **विक्रमसेना**ची भेट घेण्यास त्याला मोठा संकोच वाटत होता. दैवयोगानें **तेजस्वतीनें वल्लभा**ला ज्या दिवशीं संकेत दिला होता; त्याच दिवशीं सायंकाळीं राजपुत्र **प्रियदर्शन**ही **उज्जयिनींत** येऊन पोंचला. यावेळीं संध्याकाळ झाला होता. तेव्हां आतां एकदम राजाच्या भेटीस जावें, त्यापेक्षां रात्रीची रात्र कोठेंतरी काढून, सकाळीं राजवाड्यांत जावें, असा त्याणें विचार केला. व निवांत स्थळ पाहतां पाहतां दैवयोगानें, **कुमुदिनीनें वल्लभा**ला ज्या देवळांत राहण्याविषयीं सांगितलें होतें, त्याच देवळांत **प्रियदर्शन** येऊन उतरला!

**प्रियदर्शना**बरोबर परिवार वगैरे कांहींच नव्हता. तो आपल्या दुर्दशेविषयीं दुःख करीत होत्साता, जेथें मनुष्यांचा संचार नाहीं; अशा त्या देवळांत एकटाच एका कोपऱ्यांत निजला. यावेळीं तो असा

दुःखित होता; पण लवकरच त्याला सर्व सुखाचें आगर प्राप्त होणार होतें. तरी त्याला त्याविषयीं कल्पनादेखील सुचली नव्हती. असो. राजकन्या **तेजस्वती** हिणें घटका पळ मोजीत कसा तरी तो दिवस घालविला. रात्र होतांच उत्कंठित झालेली ती; **कुमुदिनी** दासीसहवर्तमान लगबगीनें त्या देवळांत प्राप्त झाली. यावेळीं तेथें जिकडे तिकडे अंधार पडला होता. **तेजस्वतीनें** दिवसां ज्या पुरुषाला संकेत देवविला होता, तो दुर्दैवी पळून गेला हें तिला मुळींच माहीत नव्हतें. आधींच अंधार, त्यांतून ती कामानें अंध झालेली; मग काय विचारतां! देवळांत प्रवेश करतांच तिणें विचार न करतां एकदम त्या राजपुत्राचा हात धरला, व त्याहीं रंगेल्या पुरुषानें, प्रार्थना केल्यावांचून प्राप्त झालेली प्रत्यक्ष लक्ष्मीच कीं काय; अशा त्या **तेजस्वतीचा** मुकाट्यानें स्वीकार केला. नंतर उभयतांनीं तेथल्या तेथें गांधर्व विवाह करून रात्रभर आनंदसमुद्रांत खुशाल क्रीडा केली. पहाटेच्या वेळीं चंद्राचा प्रकाश पडल्यामुळें त्यांला एकमेकांचें स्वरूप दृष्टीस पडलें. **तेजस्वतीनें**, दिवसां आपण ज्या पुरुषाला संकेत दिला होता तो हा नव्हे; असें जाणलें, तथापि त्याबद्दल ती कांहीं बोलली नाहीं. कारण **प्रियदर्शन** हा खरोखरच प्रियदर्शन होता. त्याला पाहून त्या राजकन्येला त्या दुर्दैवी **वल्लभा**चा समागम घडला नाहीं, याविषयीं वाईट तर वाटलें नाहींच; पण उलट अतिशय आनंद झाला. याप्रमाणेंच **प्रियदर्शना**लाही **तेजस्वती**च्या लाभापासून फार संतोष झाला. व आजच्या या शुभ शकुनावरून राजलक्ष्मीचा समागम लवकरच घडेल, अशी त्यानें मनांत गांठ मारली. असो.

**तेजस्वती**ला **प्रियदर्शना**च्या आलिंगनाचें सुख सोडावेंसें वाटत नव्हतें, पण उजाडण्याचा समय जवळ आला व **कुमुदिनीनें** फारच घाई केली; तेव्हां त्या आपल्या हृदयवल्लभाला कडकडून मिठी मारून, पुनः आपला समागम कसा होईल हें त्याला सांगून, व अंतःकरण

त्याच्या जवळ ठेवून, **तेजस्वती कुमुदिनी**सहवर्तमान लवकर लवकर राजवाड्यांत निघून गेली. इकडे राजकन्येचा समागम हीच कोणी एक अमृतवृष्टी तिच्या योगानें ज्याचा दुःखाग्नी शांत झाला आहे, व त्यामुळें ज्याच्या मनाला अत्यंत हुषारी प्राप्त झाली आहे; असा राजपुत्र **प्रियदर्शन**, बाकी राहिलेली रात्र त्याच देवळांत घालविता झाला. प्रातःकाळ होतांच मुखमार्जनादि करून तो राजवाड्यांत गेला. आणि चोपदाराला आपलें नांव सांगून राजा **विक्रमसेन** याच्या भेटीला आपण आलों आहों असें त्याणें कळविलें.

चोपदाराला त्याची ओळख नव्हती; तरी राजा **विक्रमसेन** याणें त्याचें नांव ऐकतांच, हा आपल्या मित्राचा मुलगा आहे; असें समजून त्याणें तत्काळ **प्रियदर्शना**ला आपल्या जवळ नेलें. व त्याला मोठ्या प्रेमानें आपल्याजवळ बसवून घेऊन—'अशी अवस्था होण्याचें कारण काय?' ह्मणून विचारिलें. तेव्हां **प्रियदर्शना**नें झालेली सर्व हकीकत त्याला निवेदन केली, व दायादांपासून राज्य मिळविण्याच्या कामीं त्याचें साह्य मागितलें. **प्रियदर्शना**ची हकीकत ऐकून **विक्रमसेना**ला फार वाईट वाटलें. त्याणें त्याचें समाधान करून आपल्याकडून उत्तम साह्य करण्याचें वचन दिलें. व शत्रूचा पराभव करून आपण तुला राज्यावर बसवितों असें सांगितलें. तेव्हां **प्रियदर्शना**चें मन स्वस्थ झालें. नंतर स्नान, भोजन इत्यादि पुढच्या गोष्टी त्याणें उरकल्या.

**तेजस्वती**चा आणि **प्रियदर्शना**चा गेल्या रात्रीं गुप्तरीतीनें समागम झाला होता; ही गोष्ट **विक्रमसेना**ला माहीत नव्हती. मुलगी मोठी झाली असून तिच्या लग्नाचें अद्याप कोठें जुळलें नाहीं; या काळजींतच तो होता. **प्रियदर्शन** याचें कूळ वगैरे **विक्रमसेना**ला माहीतच होतें. व रूपानेंही तो अप्रतिम होता. यामुळें **तेजस्वती** त्याला द्यावी असें **विक्रमसेना**च्या मनांत यापूर्वींच आलें होतें; पण ह्यावेळपर्यंत त्याचा कोठें थांग नव्हता ह्मणून राजानें तो आपला

हेतू व्यक्त करून दाखविला नव्हता. आज अनायासानें त्याची भेट झाली; तेव्हां आतां आपली मुलगी त्याला द्यावी असा राजाचा मनोदय झाला. व त्याप्रमाणें त्याणें आपल्या प्रधानाला तो हेतू कळविला. तेव्हां प्रधानानेंही त्या गोष्टीला अनुमोदन दिलें.

**तेजस्वती**ला आकस्मिक रितीनें ज्याचा समागम घडला; त्या **प्रियदर्शना**वर तिचें मन फार आसक्त झालें होतें, व तिचा हेतूही वाईट नव्हता. ती आपल्या महालांत जाऊन स्वस्थ बसली नाहीं. तिणें, गेल्या रात्रीं घडलेली इत्थंभूत हकीकत आपल्या आईला कळविली. व राजपुत्र **प्रियदर्शन** यालाच वरण्याविषयीं आपला पक्का निश्चय झाला आहे, असें सांगितलें. तेव्हां राणीनें तें वर्तमान राजाला कळविलें. ती गोष्ट ऐकून राजा **विक्रमसेना**ला मोठा विस्मय वाटला. अनिष्ट गोष्ट व्हावयाची होती; ती एका बाजूस राहून इष्ट होती तीच झाली, याचें त्याला मोठें नवल वाटलें. व त्याणें झालेला प्रकार आपल्या प्रधानाला सांगितला. तो ऐकून त्याच्या मंत्रिमंडळांत एक मोठा बुद्धिवान् वृद्ध मंत्री होता; तो राजाला ह्मणाला, "महाराज, भाग्यशाली पुरुषांचे इष्ट हेतू सिद्ध करून देण्याविषयीं स्वतः त्याला बिलकूल काळजी वाहवी लागत नाहीं. एखादा इमानी सेवक धन्यानें सांगिल्यावांचूनही जसा त्याच्या कार्याविषयीं झटत असतो; तसें दैव हें भाग्यशाली पुरुषांचे हेतू पूर्ण करण्याविषयीं नेहमीं जागृत असतें; याविषयीं मला एक कथा आठवली ती मीं आपल्याला निवेदन करतों.

पूर्वीं **कुंडपुर** नांवाच्या गांवांत **हरिशर्मा** नामक एक ब्राह्मण राहत होता. तो अत्यंत दरिद्री होता. कोठें कांहीं पोटापुरतें मिळवील ह्मणावें; तर अत्यंत मूर्ख असल्यामुळें त्याला कोणी दाराशीं उभादेखील करीत नव्हते. पूर्वजन्मीं केलेल्या दुष्ट कर्माचें फल चांगलें मिळावें ह्मणूनच कीं काय; तशा दरिद्र स्थितींत त्याला खंडीभर पोरें झालीं

होतीं. मध्यान्हकाल मोठा कठीण आहे. लोक निंदा करोत, काय पाहिजे तें करोत; पण पोटाची खळी भरल्यावांचून निर्वाह नाहीं. म्हणून बिचारा **हरिशर्मा** पोरांबाळांसहवर्तमान प्रतिदिवशीं भिक्षा मागून कसा तरी निर्वाह करीत असे. तो ज्या गांवांत रहात होता तें लहानसें खेडें होतें. **हरिशर्म्याच्या** पोरांची संख्या दरसाल वाढत होती; पण तिच्या बरोबर गावांतल्या घरांची संख्या वाढत नव्हती. यामुळें त्याला जी कांहीं भिक्षा मिळे तेवढ्यावर वाढत्या कुटुंबाचा निर्वाह होईनासा झाला. म्हणून कंटाळून तो तेथून निघाला. आणि **कांतिपुर** नांवाच्या एका मोठ्या शहरांत जाऊन तेथें **स्थूलदत्त** नांवाचा एक मोठा सावकार होता, त्याचा, त्याणें आश्रय केला. आपल्या यजमानाच्या वाड्याच्या जवळच एक लहानसें झोंपडें बांधून, तो तेथें राहूं लागला. त्याचे मुलगे **स्थूलदत्ताच्या** घरीं गुरें राखूं लागले. बायको त्याच्या घरीं कामकरीण झाली. व स्वतः **हरिशर्मा** बाहेर कोठें जाणें येणें, कुळांकडील वसूल घेणें, वगैरे कामें करूं लागला.

याप्रमाणें दारिद्र्यानें पिडलेला **हरिशर्मा स्थूलदत्ताच्या** घरीं कामधंदा करून निर्वाह करीत असतां; लवकरच त्याच्या यजमानाच्या येथें लग्नसमारंभ उपस्थित झाला. श्रीमंती असली म्हणजे सोयऱ्याधायऱ्यांचे थवेच्याथवे जमा होत असतात. त्याप्रमाणें **स्थूलदत्ताच्या** येथें पुष्कळ मंडळी जमली. तो समारंभ पाहून **हरिशर्म्याला** व त्याच्या पोरांबाळांला—आतां चार दिवस तूपपोळी गळ्याशीं येई तों यथेच्छ खायला मिळेल, अशी बळकट आशा उत्पन्न झाली. पण दुर्दैवी मनुष्याला जिकडून तिकडून आशाभंग होण्याचेच प्रसंग येत असतात. **स्थूलदत्ताच्या** घरीं शेंकडों मनुष्यें जेवीत होतीं; व अतोनात खर्च होत होता; पण त्या गडबडींत त्या बिचाऱ्या **हरिशर्म्याची** दाद कोण घेतो? पुण्याहवाचन झालें; त्या दिवशीं जी पहिलीच पंगत बसली; त्यावेळीं **हरिशर्मा** व त्याचीं पोरें यांना कोणीं जेवायला

बसा ह्मटलें नाहीं. तेव्हां **हरिशर्मा** मनांत ह्मणाला कीं, ही मोठमोठ्या लोकांची पंगत आहे. तेव्हां हींत आपल्याला बसण्यास मिळालें नाहीं, तरी मागच्या पंक्तींत आपली सोय होईल. असें समजून टावटाव करणाऱ्या पोरांचीही त्याणें तशीच समजूत केली.

हांहां ह्मणतां पहिली पंगत उठली. व लवकरच मागची पंगत-देखील उठली, तरी **हरिशर्म्या**ची कोणीं आठवण केली नाहीं! उघडच आहे, दैवहीनाचा तांब्या समुद्रांत बुडविला; तरी देखील तो रिकामाच राहतो! असो.

याप्रमाणें यजमानाच्या घरीं येथेच्छ जेवायला मिळेल; ह्मणून वाट पहात बसलेल्या **हरिशर्म्या**ला, व त्याच्या पोरांला त्या दिवशीं चकचकित उपोषण घडलें. यजमानाच्या घरीं जेवायला मिळणार ह्मणून **हरिशर्म्या**च्या स्त्रीनें त्यादिवशीं घरांत मुळींच चूल पेटविली नाहीं. सारा दिवस उपोषण घडल्यामुळें; अत्यंत खिन्न झालेला **हरिशर्मा** रात्रीं आपल्या बायकोला ह्मणाला, "अग, काय सांगूं! माझ्या जन्माला धिःक्कार असो! दरिद्री मनुष्याला कोठें मान सन्मान नसतो हें तर खरेंच; पण तो शहाणा असेल तर, दरिद्री असून देखील, प्रतिष्ठेला पात्र होतो. माझ्याजवळ दोन्ही नाहींत. मी दरिद्री तर आहेंच; पण अत्यंत मूर्ख आहें. यामुळें असा माझा फजिता होतो. आज आमच्या यजमानाच्या येथें किती लोक आले; आणि किती जेवले त्याचा मुळींच ठिकाण नाहीं; पण आमचें नशीब पडलें जोरावर. आह्मांला आपलें कडकडीत उपोषण घडलें. तेव्हां एकंदरींत मूर्खपणा हा अपमानाला विशेष कारणीभूत आहे. कांहीं तरी कुचेष्टा केल्यावांचून प्रतिष्ठा वाढत नाहीं; याकरतां मी आपल्या यजमानाजवळ चांगलें वजन पडण्याकरितां एक कपट करतों; त्या कामीं तूं माझें साह्य करणारी हो. वेळ आली ह्मणजे तूं, मी मोठा ज्ञानी आहें असें यजमानाला सांग, ह्मणजे झालें."

याप्रमाणें विचार करून हरिशर्म्यानें, आतां पुढें काय युक्ति करावी; याविषयीं पुष्कळ वेळ विचार केला. तो अगदीं मूर्ख होता, हें तर पूर्वीं सांगितलेंच आहे. तेव्हां आतां पुढें तो जी युक्ति योजणार आहे, ती त्याला कशी सुचली? व अशा युक्ति त्याच्या अंगीं होत्या; तर त्याला मूर्ख तरी कां ह्मणावें? असें कोणासही वाटेल. पण वस्तुतः शहाणा आणि मूर्ख याचा निर्णय करणें, मोठें कठीण आहे. बहुतकरून परिणामावरून त्याचा निर्णय होत असतो. कोणतेंही कार्य—त्याची उत्तम प्रकारें योजना करून केलें तरी तें—खात्रीपूर्वक सिद्ध होतेंच असें नाहीं. व तें न झालें ह्मणजे कर्त्याच्या पदरीं मूर्खपणा आल्याशिवाय रहात नाहीं, व कार्य सिद्ध झाल्यामुळें मूर्खदेखील शहाणे बनतात. तात्पर्य शहाणपण आणि मूर्खपण हें कांहीं नियमित आहे असें नाहीं. प्रत्येक मनुष्याला प्रसंग शहाणा बनवितो. हरिशर्म्यालाही तशीच संधि मिळाली. तो त्या रात्रीं, सर्व लोक जिकडे तिकडे निजले असून सामसूम झालें आहे असें पाहून हळूच स्थूलदत्ताच्या वाड्यांत गेला. आणि तेथें त्याचा जांवई ज्या घोड्यावर बसून आला होता तो घोडा त्याणें हळूच तेथून सोडून दूर एका गुप्त ठिकाणीं नेऊन बांधून ठेविला. आणि परत आपल्या झोंपड्यांत येऊन खुशाल निजला.

इकडे प्रातःकाल होतांच घोड्याची चौकशी झाली. लग्नघरांत जमलेली सर्व मंडळी त्या संबंधानें अनेक प्रकारचे तर्क कुतर्क काढूं लागली. कोणी ह्मणाले, तो घोडा उधळून गेला असेल; कोणी ह्मणाले, त्याला कोणी थट्टेनें दडवून ठेवला असेल; कोणी ह्मणाले, चोरून नेला असेल; अशा अनेकांच्या अनेक कल्पना निघाल्या. शेवटीं एकंदरींत घोडा नाहींसा झाला, हें एक मोठें अशुभ झालें, तेव्हां कसेंही करून घोड्याचा शोध करून आणला पाहिजे; असा सिद्धांत ठरवून मंडळी चोहोंकडे धुंडूं लागली. इतक्यांत पूर्वसंकेताप्रमाणें हरिशर्म्याची बायको तेथें येऊन यजमानाला ह्मणाली, "महाराज, आपण इतकी खटपट

कशाला करतां! माझे घरधनी मोठे ज्ञानी आहेत. त्यांला ज्योतिष, जादू, मंत्र वगैरे पुष्कळ विद्या येतात. त्यांला कां आपण विचारीत नाही? ते अत्तां घोडा आणून देतील!" हें ऐकून **स्थूलदत्ताला** मोठें नवल वाटलें. तो ह्मणाला, "हं हं! एकूण आपल्या **हरिशर्म्याला** ज्योतिष माहीत आहे तर! मला वाटलें होतें; तो आपला असाच ठोंबा आहे ह्मणून. बरें असो. कोण आहेरे तेथें; **हरिशर्म्याला** इकडे बोलावून आणा."

याप्रमाणें **स्थूलदत्ताचा** हुकूम होतांच जवळच्या माणसांनीं **हरिशर्म्याला** बोलावून आणलें. **हरिशर्मा** यावेळीं मुद्दाम आपल्या झोंपड्यांत जाऊन बसला होता. यजमानाकडून बोलावणें आलें तेव्हां—'हः हः धनीसाहेबांला काल माझी आठवण झाली नाहीं. आज घोडा नाहींसा झाला; तेव्हां आठवण झाली! असो. आपलें नशीबच तसें'—असें **स्थूलदत्ताला** ऐकूं येई अशाप्रकारें तो बोलला. गरजवंताला मुठींत नाक घेण्यास संकोच वाटत नाहीं. **हरिशर्म्याचे** उद्गार ऐकून **स्थूलदत्त** ह्मणाला, "बाबा, काल आमच्या हातून चूक झाली खरी. कार्याच्या गडबडींत तुझी आठवणच राहिली नाहीं. असो. झालें तें झालें. त्याच्याबद्दल तूं क्षमा कर. आणि कृपा करून आमचा घोडा कोणीं नेला तें सांग, ह्मणजे झालें."

**हरिशर्म्यानें**, आणलेल्या सोंगाची चांगलीच बतावणी केली. त्याणें कांहीं प्रश्न पाहिल्यासारखें करून दाखविलें. प्रथम बोटें घातलीं. नंतर चारही दिशांकडे बोटें केलीं. मग एक पाटी घेऊन तिच्यावर रेघा ओढल्या. आणि नंतर आपल्याला समजलें; असें दाखवून **स्थूलदत्ताला** ह्मणाला, "महाराज, धनीसाहेब, ऐका. येथून दक्षिणदिशेस चोरांनीं घोडा नेऊन ठेविला आहे. तो अगदीं गुप्त ठिकाणीं आहे. दिवस मावळला, ह्मणजे ते तेथून घोडा घेऊन जाणार. आपल्याला पाहिजे असेल; तर सूर्यास्त होण्याच्या पूर्वीं लवकर तो घोडा घेऊन या. नाहींतर मग तो हातीं लागणें कठीण पडेल!"

हें ऐकतांच **स्थूलदत्ता**ला मोठा आनंद झाला. व त्याणें सांगण्यापूर्वींच जवळची मंडळी दक्षिण दिशेकडे शोधित गेली. व त्यांणीं थोड्याच अवकाशांत घोडा आणला. ज्योतिषीबुवा बनलेल्या **हरिशर्म्यानें** सांगितलें त्याप्रमाणें घोडा मिळाला; तेव्हां सर्वांला अतिशय आनंद झाला. जिकडेतिकडे **हरिशर्म्यां**च्या ज्ञानाची तारीफ सुरू झाली. काल एवढी मोठी जेवणावळ झाली असून; तींत ज्याला एक घासभर अन्न देखील मिळालें नाहीं; त्याच **हरिशर्म्या**ला आज मुख्य पंक्तींत मुख्य आसन मिळालें! जो तो त्याला विशेष मान देऊं लागला. स्वतः **स्थूलदत्ता**ला, असा ज्ञानी मनुष्य आपल्या आश्रयास आहे; याबद्दल मोठी कृतकृत्यता वाटली.

याप्रमाणें कुचेष्टा करून ज्यानें प्रतिष्ठा वाढवून घेतली आहे, असा **हरिशर्मा स्थूलदत्ता**च्या घरीं मोठ्या आदरमानानें रहात असतां लवकरच दुसरा एक प्रसंग प्राप्त झाला. तो असा कीं, त्या देशाचा राजा **वसुमित्र** याच्या वाड्यांत एक मोठी चोरी झाली. उत्तमोत्तम दागिने, वस्त्रें वगैरे मोठ्या किंमतीचा माल कोणीं चोरानें नेला असून पुष्कळ शोध केला; तरी चोराचा पत्ता लागला नाहीं. **हरिशर्मा** हा शकून प्रश्न सांगण्याच्या कामांत मोठा प्रवीण आहे; अशी त्याची चहूंकडे आख्या झालीच होती. चोराचा कांहीं केल्या पत्ता लागत नाहीं. तेव्हां **हरिशर्म्या**ला आणून विचारावें असें कोणीं सांगितल्यावरून; **राजानें** सन्मानपूर्वक त्याला बोलावणें पाठविलें. राजाचे अधिकारी प्रथम **स्थूलदत्ता**कडे आले. व त्याच्या मार्फत त्यांणीं **हरिशर्म्या**ला राजाचा निरोप कळविला. तेव्हां आज दिवस चांगला नाहीं उद्यां येईन, असें करून **हरिशर्म्यानें** एकदोन दिवस काढले, व शेवटीं वरचेवर बोलावणीं येऊं लागलीं तेव्हां निरुपायास्तव राजाकडे गेला.

जरीं लोक त्याला मोठा ज्योतिषी समजत होते तरी आपलें ज्ञान कितीसें आहे; हें स्वतः त्याला माहीतच होतें. एकवेळ कांहीं युक्ती

करून आपण आपली मसलत सिद्ध केली; पण आतां तशाच रितीनें सिद्ध होईल किंवा नाहीं याचा काय नियम ? शास्त्रज्ञानाचा तर गंधदेखील नव्हता. झालें तर युक्तीप्रयुक्तीनें कार्य सिद्ध करायचें; तेव्हां तशी कांहीं सवड मिळण्याची तो वाट पहात होता. राजानें प्रश्न सांगण्याविषयीं वरचेवर आग्रह केला, तरी आज उद्यां करून त्याणें बरेच दिवस टाळाटाळ केली. ज्योतिषीबुवांचें प्रस्थ मोठें असल्यामुळें, व त्यांच्याकडून आपलें कार्य खचीत होणार असा भरंवसा असल्यामुळें, राजानें **हरिशर्म्याला** खुद्द आपल्या वाड्यांतच ठेवून घेतलें होतें. व त्यामुळें त्या ब्राह्मणाला कांहीं युक्ती काढण्यास बरीच सवड मिळाली.

**हरिशर्म्यानें** प्रश्न सांगण्याचें लांबणीवर टाकून राजवाड्यांतील नोकरांचाकरांवर सारखी नजर ठेवली. अशा बंदोबस्ताच्या ठिकाणांतून माल चोरीस गेला, तेव्हां हा चोर बहुतकरून राजवाड्यांतलाच असावा, असें त्याचें अनुमान होतें. व सुदैवानें तेंच खरें झालें. राजवाड्यांत **जिव्हा** नांवाची एक कुळंबीण होती. तिचा भाऊ **सेनक** याणें आणि तिणें मिळून ती चोरी केली होती. जोशीबुवा मोठे ज्ञानी आहेत, व ते चोराला अचूक पकडतात, ही गोष्ट राजवाड्यांतील सर्व नोकरांचाकरांत पसरली होती. तेव्हां 'चोरांच्या मनांत चादण्याचें भय' असायचेंच. **जिव्हा** व तिचा भाऊ हे दोघे चोर, **हरिशर्मा** काय करतो त्याच्यावर एकसारखी नजर ठेवीत होते. एके दिवशीं रात्रीं जोशीबुवा काय करताहेत तें पहावें म्हणून ती बटीक **जिव्हा,** ज्या ठिकाणीं **हरिशर्मा** रहात होता, तेथें येऊन दाराच्या फटीला कान लावून ऐकत उभी राहिली होती.

इकडे आंत दुसराच प्रसंग चालला होता. चोरी कोणीं केली; तें सांगण्याविषयीं राजानें अगदीं निकड लावली होती. व तें समजण्याचा तर कांहीं मार्ग मिळत नव्हता. यामुळें **हरिशर्म्यावर** मोठें संकट

ओढवलें होतें. आतां आपलें सगळें ढोंग उघडकीस येणार, व चहूंक-डून फटफजीती होणार असें समजून **हरिशर्मा** आपल्या जिव्हेची निंदा करूं लागला. तो ह्मणाला, "अग दुष्टे जिव्हे, तूं कशाला उगीच हें ज्ञानाचें ढोंग मातविलेंस? अग जिव्हे, गोड गोड खाण्याच्या इच्छेनें तूं हा काय अनर्थ केलास ? दुष्टे, दुराचारे, आतां तूं जें कर्म केलेंस त्याचें फळ भोग ! आतां येथें तुला मोठी शिक्षा प्राप्त झाल्या-वांचून राहणार नाहीं."

याप्रमाणें उदास झालेला **हरिशर्मा** एकटाच आपल्या जिभेला उद्देशून आंत बोलत होता; पण सुदैवानें त्याचा परिणाम फारच उत्तम-प्रकारचा झाला. दाराशीं कान देऊन उभी राहिलेल्या **जिव्हा** नां-वाच्या बटकीला तें त्याचें बोलणें ऐकून मोठें भय वाटलें. कारण, तिचेंही नांव **जिव्हाच** होतें. 'जोशीबुवांनीं आपलें कर्म ओळखलें, व आतां हे राजाला सांगतील तर आपला शिरश्छेद झाल्यावांचून रहाणार नाहीं. तेव्हां प्राणनाश करून घेण्यापेक्षां जोशीबुवांजवळच आपला अपराध कबूल करावा, ह्मणजे ते कोणत्या तरी रितीनें आप-ला बचाव करतील' असा विचार करून, घाबरी झालेली व भयानें थरथर कांपणारी ती बटीक युक्तीनें दार उघडून आंत आली. व **हरिशर्मा** विचार करित बसला होता, त्याच्या पायांवर तिणें डोकें ठेवलें. आणि हात जोडून ह्मणाली, "बुवामहाराज, आपण जिचें नांव घेतलें ती **जिव्हा** नांवाची बटीक मीच आहें. मीं जी चोरी केली, ती कोणा-ला समजण्यासारखी नव्हती; पण आपण जाणली. असो. आतां माझें रक्षण करा. ह्मणजे झालें. मी तुह्माला शरण आलें आहें. माझ्याहातून होऊं नये ती गोष्ट झाली. फिरून मी असें कधीं करणार नाहीं. मीं जे दागिने चोरले ते ह्या घराच्या मागच्या बाजूला एक डाळिंबीचें झाड आहे; त्याच्या खालीं पुरून ठेवले आहेत. तर आतां आपण मजवर कृपा करा. आणि हा माझा अपराध महाराजांला कळवूं नका.

मी माझ्याकडून आपली कांहीं तरी सेवा करतें," असें बोलून हातांत सोन्याचे गोठ होते ते काढून तिणें **हरिशर्म्या**च्या पायांवर ठेवले. आणि आपलें कृत्य उघडकीस न आणण्याविषयीं पुनः प्रार्थना केली.

**हरिशर्म्या**ला ज्योतिष माहीत नव्हतें; तरी एरव्हीं तो पक्का वस्ताद होता. त्या **जिव्हा** बटकीनें याप्रमाणें प्रार्थना केली; तेव्हां भटजीबुवांस बरेंच अवसान आलें. तो मोठ्या ताठ्यानें तिला ह्मणाला, "बरें बरें, जा. मला सगळें ठाऊक आहे. मी भूत, भविष्य सगळें जाणतों. ज्यापेक्षां अशी हातांपायां पडतेस त्यापेक्षां मी तुझें नांव उघड करीत नाहीं! पण तुझ्याजवळ जें कांहीं असेल तें सगळें तूं मला आणून दिलें पाहिजेस. नाहींतर मी उघड केल्यावांचून राहणार नाहीं. उगीच तुला गरीबाला शिक्षा होईल, ती न व्हावी ह्मणून मी असें करतों. नाहींपेक्षां हा तुझा अपराध फारच मोठा आहे. व त्याबद्दल तुला चांगली शिक्षा झालीच पाहिजे होती. पण असो. एकवेळ माफ करतों."

**हरिशर्म्या**नें याप्रमाणें नांव उघड न करण्याचें आश्वासन दिलें. तेव्हां **जिव्हे**च्या जिवांत जीव आला. ती त्याचे मोठे उपकार मानून व वरचेवर त्याच्या पायांवर लोळण घेऊन तेथून निघून गेली. हा जो आकस्मिक योग आला; त्याबद्दल **हरिशर्म्या**ला मोठें नवल वाटलें. तो दैवाचे मोठे उपकार मानून ह्मणाला, "अहाहा! बा दैवा, तुझा प्रभाव मोठा विलक्षण आहे. तूं जेव्हां अनुकूळ होतेंस; तेव्हां अत्यंत असाध्य असलेल्याही गोष्टी सहज सिद्ध होतात. यावेळीं माझ्यावर कोणतें अरिष्ट आलें होतें, आणि त्यांतून मी कसा पार पडलों, हा मोठा चमत्कार आहे. मी आपल्या जिभेची निंदा करीत होतों. आणि ती ऐकून ती बटकीची **जिव्हा** दासी माझ्या पुढें येऊन उभी राहिली! दुष्कर्म करून तें छपविणारे लोक नेहमीं साशंक असतात, व शंकेनेंच त्यांचें तें कर्म सहज उघडकीस येतें. अरेरे! बिचाऱ्या त्या बटकीनें केलेली चोरी माझ्या देवाच्यानेंदेखील उघडकीस आणवली नसती; पण शंकेनेंच तिचा

घात केला. असो. विचित्र सामर्थ्यवान् अशा दैवाला नमस्कार असो!"

याप्रमाणें अनेकप्रकारचे विचार ज्याच्या मनांत घोळत आहेत, असा **हरिशर्मा** ती रात्र मोठ्या आनंदांत घालविता झाला. सूर्योदय होतांच आपलें नित्यकृत्य आटपून **हरिशर्म्यानें** राजाला सूचना पाठविली. तेव्हां आज जोशीबुवा चोरीचा पत्ता लावून देतील, असें समजून राजेसाहेबांची स्वारी तत्काल तेथें प्राप्त झाली. नंतर राजा, प्रधान इत्यादि मंडळीसह **हरिशर्मा**, ज्या बंगल्यांत तो रहात होता; त्याच्या मागच्या बागेंत चहूंकडे फिरूं लागला. व शोधतां शोधतां त्याला तें डाळिंबीचें झाड मिळालें. तेव्हां 'या झाडाखालीं चोरीचा माल आहे; येथें खणा,' असें सांगितल्यावरून राजानें खणायास लावलें. तों **जिव्हा** नांवाच्या बटकीनें तेथें पुरून ठेवलेले दागिने मिळाले. चोरीस गेलेला बहुतेक विषय तेथें होताच. त्यांतले एकदोन दागिने त्या बटकीनें दुसरीकडे ठेवले होते. यद्यपि ते तिनें **हरिशर्म्या**जवळ आणून देण्याचें कबूल केलें होतें; तथापि कोणाला नकळत ते **हरिशर्म्या**च्या हातीं देण्याची तिला सवड मिळाली नाहीं. राजानें एकेक दागिना तपासून पाहिला तेव्हां त्यांत दोन दागिने नाहींत, असें समजलें. ते दागिने कोठें आहेत? ह्मणून राजानें विचारलें. तेव्हां **हरिशर्मा** ह्मणाला, "महाराज, ते दागिने चोरानें आपल्याजवळ ठेविले आहेत, व तो येथून फरारी झाला आहे. कदाचित् मिळाले तर मिळतील; पण आपण त्यांची आशा सोडा." हें ऐकून—मोठ्या किमतीचा विषय गेला होता तो तर मिळालाच. एकदोन दागिने राहिले ते न मिळाले तरी कांहीं हरकत नाहीं, असें समजून राजानें त्याविषयीं फारसा आग्रह केला नाहीं.

**हरिशर्म्यानें** दागिने मोठ्या चमत्कारिक रितीनें मिळवून दिले हें पाहून राजाला मोठा अचंबा वाटला. तो **हरिशर्म्या**ची फार तारीफ करून ह्मणाला, "महाराज जोशीबुवा, एकंदरींत आपलें ज्ञान अगाध आहे यांत कांहीं संशय नाहीं; पण आपण हें ज्ञान प्राप्त होण्या-

विषयीं कोण कोणत्या शास्त्रांचा अभ्यास केला आहे ? तें कृपा करून सांगाल तर मोठा अनुग्रह होईल."

बिचारा **हरिशर्मा** या प्रश्नाचें उत्तर काय सांगणार ! शास्त्र कशाशीं खातात हें त्याच्या साऱ्या जन्मांत त्याला माहीत नव्हतें. तेव्हां कोणत्या शास्त्राचा अभ्यास केला; असें त्याणें सांगावें ? त्या राजाच्या पदरीं पुष्कळ ज्योतिषी मांत्रिक वगैरे विद्वान् लोक होते. त्यांलाही त्याच्याविषयीं मोठी ईर्ष्या उत्पन्न झाली. त्यांणीं निरनिराळ्या रितीनें **हरिशर्म्याला** प्रश्न केले; पण तो कोणाला काय उत्तर देणार ? शेवटीं **हरिशर्म्याला** शास्त्रांपैकीं गंधदेखील नाहीं, अशी सर्वांची पक्की समजूत झाली. तेव्हां लोक अनेकप्रकारचे कुत्सित आक्षेप काढूं लागले. स्वतः राजालादेखील असें वाटलें कीं, या गृहस्थाला जर शास्त्राचा गंधदेखील नाहीं; तर मनुष्याला अगम्य अशा गोष्टी याला कशा समजल्या ? यावरून असें वाटतें कीं; त्या चोराशीं याणें कांहींतरी संकेत केला असावा. व त्यावरून हा सगळा प्रकार झाला असेल. धूर्त लोकांचे पोटभरण्याचे असेही उद्योग असतात. तेव्हां आतां दुसरी कांहींतरी युक्ति काढून पुनः याची परीक्षा पाहिली पाहिजे. हा ज्ञानी असें आपल्याला ह्मणवून घेतो. तेव्हां हें याचें ज्ञान खरें आहे; किंवा सारें ढोंग आहे हें पाहिलें पाहिजे.

असा विचार करून राजानें प्रधानाच्या कानांत, काय करावयाचें तें सांगितलें. व त्याप्रमाणें त्याणें मातीच्या एका नव्या घागरींत बेडूक घातला, व त्याचें तोंड बांधून **हरिशर्म्यापुढें** आणून ठेविला. नंतर राजा त्याला ह्मणाला, "भटजी महाराज, आपण ज्ञानी तर आहांच, यांत कांहीं संशय नाहीं. पण जर या घागरींत काय आहे; तें आतांच्या आतां सांगाल; तर आमच्या मनाची विशेष खातरी होईल. व मग मी आपली फार मोठी पूजा करीन. पहा, लवकर काय तें सांगा."

याप्रमाणें, **हरिशर्मा** एका संकटांतून पार पडला तों त्याच्यावर

दुसरें एक संकट आलें. आतां मात्र खरोखर आपला विनाशकाल आला, असें **हरिशर्म्याला** वाटलें; पण त्याचें दैव त्याला पुरतें साह्यकारि होतें. तो अतिशय भ्याला होता; पण दैव त्याच्या भयाची निवृत्ति करण्यास हातजोडून तयार होतें. असो. **हरिशर्मा** लहान असतांना त्याच्या बापानें थट्टेनें त्याला **बेडूक** असें नांव ठेवलें होतें. त्याच्या घरचीं माणसें त्याला **बेडूक** ह्मणत असत. दैवानें ज्याची प्रेरणा केली आहे; असा **हरिशर्मा** उद्विग्न होऊन आपल्याला उद्देशून ह्मणाला, "अरे बिचाऱ्या **बेडका,** तूं चांगला आहेस; तूं कोणाचें कांहीं वाईट केलें नाहींस; असें असून सांप्रत तूं पराधीन स्थितींत आहेस, व अशावेळीं ही घागर बलात्कारानें तुझा नाश करण्याविषयीं सिद्ध झाली आहे; असो परमेश्वर तुझें रक्षण करील !"

**हरिशर्म्याचें** वरील भाषण केवळ आपल्याला उद्देशून अन्योक्तीसारखें होतें. घागरींत बेडूक आहे किंवा काय हें त्याला मुळींच माहीत नव्हतें. पण त्याच्या अनुकूळ दैवानें फुला बोलास गांठ पडली. त्यानें बेडकाला उद्देशून भाषण केलें; तें ऐकून राजाला फार आश्चर्य वाटलें. त्याच्या मनांत ज्या कुकल्पना आल्या होत्या, त्या सर्व एकदम नाहींशा झाल्या. तो ह्मणाला, "पाहिलें, हे भडजीबुवा मोठे ज्ञानी आहेत, यांत कांहीं संशय नाहीं. हावेळपर्यंत लोकांनीं उगीच जे तर्क काढले होते; ते सर्व खोटे आहेत. घागरींतला बेडूक देखील यांला समजला. तेव्हां आतां यांच्याविषयीं संशय घेण्यास जागा राहिली नाहीं !" या प्रमाणेंच इतर लोकांचीही पुरती खात्री झाली. घागरीचें तोंड उघडलें. तेव्हां पटकन् बेडूक बाहेर पडला. तो पाहून सर्व लोकांनीं **हरिशर्म्याचा** जयजयकार केला.

नंतर, हें स्वतःच्या प्रातिभेचें ज्ञान आहे, असें मानणारा राजा संतुष्ट होऊन त्याणें हरिशर्म्याला कांहीं गांव जहागीर करून दिले. दास. दासी. वस्त्रें. अलंकार. हत्ती, घोडे वगैरे सर्व सरंजाम देऊन त्यानें

एका क्षणमात्रांत **हरिशर्म्या**ला आपला मांडलिक राजा बनवून सोडलें !"

अशी कथा सांगून तो वृद्ध प्रधान राजा **विक्रमसेना**ला ह्मणाला, "महाराज, सदाचरण करणाऱ्या पुरुषाला दैव अनुकूल होऊन तें याप्रमाणें त्याचे मनोरथ सिद्ध करून देतें. याकरितां हा राजपुत्र **प्रियदर्शन** याची आणि आपल्या कन्येची दैवानें सहज भेट झाली. तेव्हां आपली कन्या **तेजस्वती** ही आतां यालाच द्यावी, हें युक्त आहे."

याप्रमाणें प्रधानाचें भाषण ऐकून **विक्रमसेनानें तेजस्वती**चा **प्रियदर्शनाशीं** यथाविधि विवाह करून दिला. जणूं काय प्रत्यक्ष **लक्ष्मीच** अशी आपली कन्या **प्रियदर्शना**ला देऊन राजानें त्याच्याबरोबर मोठें सैन्य दिलें. व शत्रूचा पराभव करून त्याला पुनः राज्यावर बसविलें. नंतर **तेजस्वती**च्या लाभानें प्राप्त झालेल्या राजलक्ष्मीचा उपभोग घेत होत्साता, दैवशाली **प्रियदर्शन** चिरकाल राज्य करिता झाला."

ही कथा सांगून **सोमप्रभा** ह्मणाली, "गडे **कलिंगसेने**, दैवाचे चमत्कार असे आहेत. त्याच्यायोगानें पाहिजे त्या गोष्टी सिद्ध होत असतात. तेव्हां तुझी आणि **वत्सराजा**ची भेट करून देण्यास दैव असमर्थ होईल; असें वाटत नाहीं. पण इतकें कशाला ? दैव एका बाजूला राहूं दे. मीच ती गोष्ट करण्यास समर्थ आहें. तुझी इच्छा असली तर सांग. **वत्सराजा**कडून मी तुझें पाणिग्रहण करवितें. या कामीं मला दुसऱ्या कोणाचें साह्य नको."

याप्रमाणें एकान्तीं प्रियसखी **सोमप्रभा** हिच्या मुखानें कथा श्रवण करून, व तिणें दिलेलें आश्वासन ऐकून राजकन्या **कलिंगसेना** हिला फार आनंद झाला. **वत्सराजा**चा समागम व्हावा, अशी तिच्या मनांत उत्कट इच्छा उत्पन्न झाली. व तीबरोबरच आईबापांचें जें तिला मोठें भय वाटत होतें, तेंही अंमळ कमी झालें. आपला हेतू **वत्सराजा**ला कसा कळवावा, याची तिला लाज वाटत होती, तीही दूर झाली. व

काय होईल तें होवो; पण **वत्सराजाला** वरल्यावांचून रहावयाचें नाहीं, असा तिनें आपल्या मनांत निश्चय केला. त्या दोघींचें बराच वेळ भाषण चाललें होतें. इतक्यांत सूर्य अस्ताचलावर आरूढ झाला. तेव्हां—'उद्यां प्रभातकालीं मी परत येतें,' असें सांगून मोठ्या आजेवानें **कलिंगसेने**चा निरोप घेऊन, आपल्या मार्गाकडे एकसारखी पहात राहिलेल्या **कलिंगसेने**ला 'येतें' ह्मणून सांगून ती **मयासुराची** कन्या **सोमप्रभा** आकाशमार्गानें आपल्या घराकडे निघून गेली.

वर सांगितल्याप्रमाणें **सोमप्रभा** आपल्या पतीच्या घराकडे निघून गेली. तेव्हां तिच्या विरहानें जिचें अंतःकरण अस्वस्थ झालें आहे; अशा **कलिंगसेने**ला त्या रात्रीं चांगली झोंप लागली नाहीं. त्या दोघींचा एकमेकींवर तसाच अनुराग होता. तथापि **सोमप्रभा** घरीं गेली, ह्मणजे आपल्या पतीसह मोठ्या चैनींत व विलासांत रात्र घालवीत होती. व योग्य पतीचा समागम कसा होईल याविषयीं काळजी करीत असलेली **कलिंगसेना** उदास व अस्वस्थ असत होती. हा प्रकार नित्याचाच होता. तरी या रात्रीं ती फारच बेचैन झाली होती. बहुतवेळ विचार करून तिणें अशा स्थितींत राहून दुःख भोगण्यापेक्षां आपण आपल्याच प्रयत्नानें **वत्सराजाला** वरावा, असा निश्चय केला. प्रातःकाल होतांच तिची जिवलग मैत्रीण **सोमप्रभा** तिच्या भेटीस आली. प्रथम दोघींनी एकमेकीला प्रेमपूर्वक आलिंगन दिलें. नंतर **सोमप्रभे**ला घेऊन **कलिंगसेना** एकान्तस्थलीं जाऊन बसली. इकडच्या तिकडच्या गोष्टी बोलतां बोलतां **कलिंगसेना सोमप्रभे**ला ह्मणाली, "गडे, तूं माझें चांगलें व्हावें ह्मणून फार काळजी घेतेस; पण माझ्या आईबापांनीं कांहीं दुसराच बेत केला आहे; असें काल रात्रीं माझ्या कानांवर आलें. पूर्वीं सांगितलेल्या त्या **प्रसेनजित्** राजाला बाबांनीं मला द्यायची असें ठरविलें आहे. ह्मणून काल रात्रीं माझ्या दाईनें मला येऊन सांगितलें. तूं तर एकदां त्या **प्रसेनजिताचें** वर्णन

केलें होतेंस, त्याची मला आठवण आहे. तूं सांगितलेंस कीं, त्याला आपण पाहिला आहे. व तो म्हातारा आहे. **वत्सराजाच्या स्वरूपाचें** तूं जें वर्णन केलेंस; त्यावरून तो अप्रतिम सुंदर पुरुष माझ्या कर्ण-मार्गानें हृदयांत प्रविष्ट होऊन; त्यानें माझें मन हरण केलें आहे. तेव्हां आतां बाबांनीं जर मला त्या **प्रसेनजिता**ला दिलें, तर माझी काय अवस्था होईल; याची मला मोठी काळजी लागली आहे. याकरितां मी असें ह्मणतें कीं, तूं मला प्रथम **प्रसेनजित्** जेथें असेल तेथें ने. आधीं मी त्याला पाहून घेतें. नंतर मला **वत्सराजा**जवळ ने. या कामांत बाबांची किंवा आईची तरी काय गरज? मी आपल्याच पसंतीनें पतीची निवड करतें, ह्मणजे झालें."

हें ऐकून **वत्सराजा**कडे जाण्याविषयीं अत्यंत उत्कंठित झालेल्या; **कलिंगसेने**ला **सोमप्रभा** ह्मणाली, "ठीक आहे. प्रौढ झालेल्या मुलींनीं योग्य वर निवडण्याच्या कामीं आईबापांची संमति नाहीं घेतली, तरी त्यांत कांहीं अयोग्य आहे असें नाहीं. त्यांणीं भलत्याच नादास मात्र लागूं नये. **वत्सराजा**ला वरण्याविषयीं तूं आईबापांचा विचार न घेतलास; तरी त्यांत कांहीं वावगें नाहीं. या कामीं मी तुला साह्य करण्यास तयार आहें. जर तूं जायचें असें ह्मणतेस; तर आकाशमार्गानें यंत्राच्या साधनांनीं आपण जाऊं या. ह्मणजे लवकर जाऊन पोहचूं. पण तूं, तुला जें जें पाहिजे असेल; तेंतें सर्व साहित्य बरोबर घे. तुझे अत्यंत विश्वासू सेवक असतील त्यांलाही बरोबर घे. कारण, एकवेळ **वत्सराजा**ची आणि तुझी दृष्टादृष्ट झाली; ह्मणजे मग तुझ्यानें परत येववणार नाहीं. मग तुला आईबापांचें दर्शन होणार नाहीं इतकेंच नव्हे; तर तुला त्यांची आठवणदेखील व्हायची नाही! फार काय सांगूं? तो हृदयवल्लभ **वत्सराज** तुला मिळाला; ह्मणजे तूं, फार दूर राहणाऱ्या मलादेखील विसरून जाशील. गडे, **कलिंगसेने**, आतां मी जशी वरचेवर तुला भेटायला येतें; तशी **वत्सराजा**जवळ अस-

तांना मी तुला भेटायला येणार नाहीं. तेव्हां तुला जें कांहीं पाहिजे असेल तें सर्व आतांच बरोबर घे ह्मणजे बरें पडेल."

हें ऐकून **कलिंगसेनेचें** मन अंमळ गोंधळांत पडलें. ती **वत्सराजाचा** समागम होण्याविषयीं फार उत्कंठित झाली होती, तरी **सोमप्रभेचा** वियोग सहन करण्याविषयीं तिची तयारी नव्हती. **वत्सराजाच्या** घरीं आपण येणार नाहीं, असें **सोमप्रभेनें** सांगितल्यावरून ती डोळ्यांत आंसवें आणून तिला ह्मणाली, "गडे, हें तर तूं मोठें विलक्षणच सांगितलेंस. बाई! तुझ्यावांचून मी तेथें क्षणभरदेखील राहण्यास समर्थ होणार नाहीं. तूं तर मला नेहमीं जवळ पाहिजेसच. **वत्सराजा**च्या घरीं जर तूं येणार नसशील, तर मलाही तेथें नेऊं नकोस. त्यालाच इकडे घेऊन ये, ह्मणजे झालें. येथें एकान्तांत खुशाल मी त्याच्या समागमसुखाचा अनुभव घेईन. पूर्वीं आपली सखी **उषा** इच्याकरितां **चित्रलेखेनें श्रीकृष्णाचा** नातू जो **अनिरुद्ध** त्याला युक्तीनें तिच्या महालांत आणून ठेवला नव्हता काय? ही कथा तुला कदाचित् माहीत असेल; तरी मी सांगतें ती ऐकून घे.

पूर्वीं **बाण** नांवाच्या दैत्याची **उषा** नामक कन्या होती. पतीची प्राप्ति व्हावी ह्मणून **उषेनें गौरीचें** आराधन केलें. तेव्हां तिणें—'स्वप्नांत ज्याचा समागम तुला घडेल; तो तुझा पति होईल,' असा तिला वर दिला होता. नंतर कांहीं दिवसांनीं एका रात्रीं **उषेला** स्वप्नांत, देवपुत्रासारखा तेजस्वी अशा एका तरुण पुरुषाचें दर्शन झालें. व गांधर्वविधीनें त्याणें तिचें पाणिग्रहण करून खरोखर तिला भोगही दिला. त्याचें दर्शन व लग्न वगैरे गोष्टी स्वप्नांतल्या होत्या; तरी समागम झाला तो मात्र अगदीं खऱ्यासारखा होता. असो, याप्रमाणें स्वप्नांत पुरुषसमागम होऊन, तत्काल **उषा** जागृत होऊन, स्वप्नांत प्राप्त झालेल्या त्या पतीला पाहूं लागली; पण तो तेथें कोठून दिसणार! संभोग झाल्याचीं लक्षणें मात्र तिच्या अनुभवास आलीं. तेव्हां ह्या

काय चमत्कार आहे ? ह्मणून ती विचार करीत असतां **पार्वतीच्या** वरदानाची तिला आठवण झाली. व त्यामुळें अविवाहित स्थितींत पुरुषसमागम झाला ह्मणून भय व तो पुरुष कोठें दिसत नाहीं ह्मणून खेद, आणि स्वप्नांतल्या पुरुषाचें दर्शन होऊन त्यापासून समागम झाला तो मात्र खरा, हें पाहून विस्मय अशा तीन विकारांनीं तिचें चित्त व्यग्र झालें. आतां त्या पुरुषाचा पुनः समागम कसा होईल ? ह्मणून दुःखित झालेली **उषा** अगदीं व्याकुळ झाली. तेव्हां तिची सखी **चित्रलेखा** जवळ होती. तिणें विचारल्यावरून, **उषेनें** घडलेली इत्थंभूत हकीकत तिला सांगितली.

उषेनें समागम घडलेल्या पुरुषाचें विशेष वर्णन केलें; तथापि त्याचें नांव गांव वगैरे कांहींच तिला माहीत नव्हतें. ह्मणून **चित्रलेखा उषेला** ह्मणाली, "गडे, बाई तूं अशी घाबरी होऊं नकोस. आई **जगदंबेनें** जो तुला वर दिला होता त्याचा हा प्रभाव आहे, यांत कांहीं संशय नाहीं. मीं तुझ्या हृदयवल्लभाला शोधून आणीन; पण त्याच्या कांहीं खाणाखुणा व ठांवाठिकाण याची माहिती मिळाल्यावांचून मीं त्याला शोधावा तरी कोठें ? आतां एक मात्र युक्ति आहे; तूं जर त्याला ओळखून काढीत असशील; तर मी या साऱ्या जगांतले पुरुष ह्मणून जेवढे आहेत तेवढ्यांचीं तुला चित्रें काढून दाखवितें. तूं लक्षपूर्वक पाहून त्यांतून तुझें मन हरण करणारा कोण तो ओळखून काढ; ह्मणजे मी त्याला येथें घेऊन येईन. यावांचून तुझा हेतू पुरविण्याविषयीं दुसरा कांहीं उपाय दिसत नाहीं."

**चित्रलेखेची** ही योजना **उषेला** पसंत पडली. व तिणें चित्रें काढण्यास सांगितल्यावरून; तीं योगेश्वरी **चित्रलेखा** हिणें सर्व जगाचा चित्रपट तयार केला. देव, दैत्य, गंधर्व, यक्ष, मनुष्यें इत्यादि सर्वांचीं तिणें अनुक्रमानें चित्रें काढलीं. व आपली प्रियसखी **उषा** हिला एकेक चित्र दाखवूं लागली. दाखवितां दाखवितां **चित्रलेखेनें** मनुष्यांचीं

चित्रें दाखविण्यास आरंभ केला. ज्याला दाखवावें त्याला नाहीं नाहीं ह्मणतां ह्मणतां, यादवांचें कुळ जेथें काढलें होतें तेथें येऊन पोंचली. **चित्रलेखेनें** प्रथम **वसुदेवाचें** चित्र दाखविलें, तेव्हां तोंडवळ्यावरून **उषेनें** अंमळ लाजल्यासारखें केलें. त्याच्याजवळच **कृष्णाचें** चित्र होतें, त्याला पाहून **उषा** अधिक लाजली. त्याच्याजवळ **प्रद्युम्न** काढला होता, त्याला पाहतांच **उषेनें** मान खालीं घातली. पुढें जेव्हां **अनिरुद्ध** तिला दाखविला तेव्हां तर तिच्या अंगाला कंप सुटून, सात्विक भावाचा उदय झाला. ती तिची अवस्था पाहून—हिचा हृदयवल्लभ **अनिरुद्धच** आहे असें समजण्याविषयीं **चित्रलेखेला** तिला विचारावें लागलें नाहीं. **अनिरुद्धासारख्या** योग्य पतीचा समागम झाला; हें पाहून **चित्रलेखेला** फार आनंद झाला.

ती उषेला ह्मणाली, "गडे, तूं आपल्याला धन्य मान. साक्षात् भगवान् **कृष्णाचा** नातू **अनिरुद्ध** तुला पती प्राप्त झाला, हें फार चांगलें झालें. तो येथून सहा हजार योजनांवर रहात आहे. तरी तुझ्याकरतां मी त्याला आणण्याविषयीं प्रयत्न करीन."

हें ऐकून फारच उत्सुक झालेली **उषा चित्रलेखेच्या** गळ्याला मिठी मारून काकुळती येऊन म्हणाली, "गडे, मी तुला पाहिजेना ? तो कितीही दूर असो. चंदनासारख्या शितल अशा त्याच्या त्या अंगाचा समागम आज मला न घडला; तर भडकलेल्या कामाग्नीनें मी खरोखर जळून गेलें असेंच तूं समज. आज समागम झाला नाहीं; तर खरोखर मी मरून जाईन !"

**उषेचें** हें अत्यंत आतुरतेचें भाषण ऐकून, **चित्रलेखेनें** त्या आपल्या प्रियसखीचें समाधान केलें. व 'तुझा हेतू पुरविण्याकरितां आतांच जातें;' असें सांगून ती तत्काल योगसामर्थ्यानें आकाशांत निघून गेली. व वायुगतीनें अगदीं थोड्या अवकाशांत तिनें **द्वारका** गांठली. समुद्राच्या मध्यभागीं असून मोठमोठ्या अनेक उंच उंच हवेल्यांच्या योगानें जणू

काय; समुद्रांत पुनः **मंथाचल** ( **मंदरपर्वत** ) टाकला आहे असा प्रेक्षकाला भ्रम उत्पन्न करणारी; अशा त्या सुंदर नगरींत **चित्रलेखेनें** चहूंकडे नजर पुरवून **अनिरुद्ध** कोणत्या महालांत आहे, याची ठेहळणी करून ठेविली. आणि अपरात्रीं योगसामर्थ्यानें **चित्रलेखेनें** त्याच्या महालांत प्रवेश केला. **अनिरुद्ध** यावेळीं बेहोष निजला होता. **चित्रलेखेनें** हळूच त्याला जागें केलें. तेव्हां पूर्वीं कधीं न पाहिलेली; व मोठी तेजस्वी अशी ती स्त्री अपरात्रीं आपल्या महालांत आली, याचा त्याला मोठा विस्मय वाटला. तो चकित झाला आहे; असें पाहून **चित्रलेखा** त्याला म्हणाली, "महाभागा, यावेळीं हें माझें येणें तुला आश्चर्य उत्पन्न करण्यासारखेंच आहे. मी तुझी परवानगी न घेतां; अशा भलत्यावेळीं तुझ्या महालांत आलें; इतकेंच नव्हे तर तुझ्या निद्रेचाही भंग केला, हा माझ्याकडून मोठा अपराध झाला आहे. पण असें करण्यांत माझा हेतू कांहीं वाईट नाहीं. मी कशाकरतां आलें; हें तूं लक्ष्यपूर्वक ऐकून घेशील; तर त्यापासून तुला फार संतोषच होईल, यांत कांहीं संशय नाहीं."

**चित्रलेखे**ची ती शांत व गंभीर मुद्रा, व तिचें तें वजनदार भाषण ऐकून **अनिरुद्धा**च्या मनांत तिच्याविषयीं पूज्यभाव उत्पन्न झाला. तो नम्रतापूर्वक तिला ह्मणाला, "छेः छेः, असें भलतेंच बोलू नका. आमचें घर सज्जनाला पाहिजे त्यावेळीं उघडेंच असावयाचें. त्याला वेळाची किंवा काळाची अपेक्षा मुळींच नाहीं. तुह्मी आज मला दर्शन दिलें, हा माझ्यावर मोठा अनुग्रह केला; असें मी समजतों. आतां ज्या कार्याकरितां तुह्मी आलां आहां तें सांगण्यासारखें असेल तर कृपा करून सांगा. माझ्या हातून होण्यासारखा असेल तो प्रयत्न करून तुमचा हेतू मी पूर्ण करीन."

हें त्याचें समयोचित भाषण ऐकून **चित्रलेखा** ह्मणाली, "सांगण्यासारखें ह्मणून काय विचारतोस. तें तुलाच सांगायचें आहे. व त्या-

करतांच मी मुद्दाम येथें आलें आहें. तुझ्यासारख्या उदार व तरुण राजपुत्रानें कोणी प्राणसंकटांत पडलें असलें; तर त्याचा सांभाळ करावा हें योग्य आहे ना? तशांतून केवळ आपल्याकरितांच दुसऱ्याला अनिवार दुःख भोगावें लागत असेल; तर त्याचा परिहार करून त्या मनुष्याला सुखी करावें; हें सज्जनाचें कर्तव्य आहे किंवा नाहीं? याविषयीं तुला विशेष सांगावयास नको. तशांतून सांप्रत तुझ्याकरतां प्राणसंशयांत पडलेला, पुरुष नसून एक अबला आहे. तेव्हां तिला वांचविणें हें तुला अत्यंत आवश्यक आहे."

**अनिरुद्ध** वयांत आला होता; तरी स्त्रियांच्या बोलण्याचें पांचपेंच त्याला फारसे माहीत नव्हते. **चित्रलेखेचें** भाषण ऐकून अंमळ उद्विग्न झाल्यासारखा होऊन; तो तिला ह्मणाला, "काय, माझ्याकरतां? आणि स्त्री प्राणसंशयांत पडली आहे ह्मणतां? तर मग तिला सुखी करणें हें माझें कर्तव्य आहे. सांगा सांगा पाहूं, ती स्त्री कोठली? कोण? आणि माझ्याबद्दल तिच्यावर तसा प्रसंग येण्याचें कारण काय?"

**चित्रलेखा** मोठी खुबीदार भाषण करणारी होती. तिनें प्रथम **अनिरुद्धाला** कांहींसें आपल्या वचनांत गोंवल्यासारखें करून; युक्तीयुक्तीनें आपल्या ह्मणण्याला अनुकूल करून घेण्याचा प्रयत्न केला. ती ह्मणाली, "ज्यापेक्षां तूं त्या दुःखी जनाला दुःखांतून मुक्त करण्यास सिद्ध झाला आहेस; त्यापेक्षां तुला सर्व हकीकत सांगतें. **शोणितपुराचा** राजा **बाणासुर** याची **उषा** नांवाची कन्या आहे. ती माझी अगदीं बाळमैत्रीण आहे. जन्मापासून ती आणि मी एकेच ठिकाणीं लहानांच्या थोर झालों. माझें नांव **चित्रलेखा**. सांप्रत ती माझी सखी तारुण्याच्या बहरांत आली आहे. **कामदेवानें** तिच्या शरीरांत आपलें अधिष्ठान ठेवलें आहे. तथापि अनुरूप पतीचा समागम नसल्यामुळें, ती रात्रंदिवस त्या निर्दय **मदनाच्या** शस्त्रास्त्रांनीं व्याकुळ होते. अशा स्थितींत गेल्या रात्रीं स्वप्नांत तूं तिला समागमाचा लाभ दिलास.

आणि केवळ जिणें आपल्यालाच सर्व तनमन अर्पण केलें आहे, अशा त्या माझ्या प्रिय सखीचें मन चोरून तूं अदृश्य झालास. खरोखर तुझ्यासारख्या थोर उदार व कुलीन पुरुषाला तसें करणें योग्य होतें काय? त्या माझ्या प्रिय सखीचें मन चोरून तिला दुःखाग्नींत होरपळायला लावून; तूं येथें स्वस्थ निजला आहेस, हें खरोखर फार अयोग्य आहे. ती तुझ्या अदर्शनानें इतकी व्याकुळ झाली आहे कीं, आतां केवळ तुझ्या समागमाच्या आशेवरच तिनें प्राण धारण केले आहेत. जर तुझी भेट होत नाहीं असें तिला समजेल; तर तत्क्षणीं ती प्राणांचा त्याग करील! तेव्हां यावर तुला जें कांहीं उचित दिसेल तें कर."

**चित्रलेखे** सारख्या चतुर स्त्रीनें याप्रमाणें खुबीदार भाषण केलें तें ऐकून कोण पुरुष तिच्या ह्मणण्याला अमान्य करणार आहे? **अनिरुद्धानें** तत्काल तिच्या बरोबर येण्याचें कबूल केलें. इतकेंच नव्हे; पण तो अतिशय उत्कंठित झाला. इतकें दूर आपल्याला कसें जातां येईल, याविषयीं त्याच्या मनांत मोठें संकट वाटत होतें; पण **चित्रलेखेनें** त्याचा परिहार केला. ती ह्मणाली, "त्याविषयीं तूं कांहीं काळजी करूं नकोस. मी योगसामर्थ्यानें तुला आतां एका क्षणांत तेथें घेऊन जातें." हें ऐकून **अनिरुद्धाला** फार आनंद झाला. आधींच मनोभव जो **कामदेव** तो त्याच्या मनावर आरूढ झाला होता. व तशांतून **चित्रलेखेनें** आपल्या योगसामर्थ्याचा उपयोग केला. तेव्हां एका क्षणांत तो तिच्या सहवर्तमान **उषेच्या** महालांत येऊन पोंचला.

---

१ ही कथा श्रीमद्भागवताच्या दशम स्कंधाच्या पूर्वार्धात व हरिवंशांत सविस्तर वर्णन केली आहे. तेथें अनिरुद्ध निजला होता, त्याला तसाच चित्रलेखेनें उचलून नेला. व उषेच्या महालांत तो जागा झाला, असें वर्णन केलें आहे. त्यावरून येथें मुळांत सांगितलेल्या कथेशीं थोडासा विरोध येतो. तरी एकंदरींत मुख्य तात्पर्याच्या संबंधानें कांहीं फरक नाहीं. चित्रलेखेनें अनिरुद्धाला नेला ही गोष्ट दोहोंत सारखीच आहे.

ज्याकरितां **उषा** ह्यावेळवर्यंत तळमळत होती, तो तिचा हृदयव-ल्लभ **अनिरुद्ध चित्रलेखेनें** एकाएकीं महालांत आणला. तेव्हां तिच्या आनंदाला पारावार नाहींसा झाला. **चित्रलेखे**चा प्रभाव असाधारण आहे, हें तिला माहीत होतें. व ती आपल्याकरतां पाहिजे ती खटपट करून **अनिरुद्धाला** आणल्यावांचून राहणार नाहीं, अशी तिच्या मनाची खातरी होती; तरी तिचें मन अधीर झालें होतें. काय होईल कोणास ठाऊक? **चित्रलेखा** प्रयत्न करील; पण **अनिरुद्ध** तिच्या सांगण्याला मान देऊन येईल किंवा नाहीं, याविषयीं तिला मोठी काळजी लागली होती. ती आतां समूळ नाहींशीं झाली. त्याची ती मनोहर मूर्ति पाहून **चंद्राच्या** दर्शनानें समुद्राला जशी भरती येते, त्याप्रमाणें तिच्या आनंदाला भरती आली. व समुद्राचें उदक अनावर होऊन जसें वेलेच्या बाहेर जातें, तसा तिचा हर्ष तिच्या शरीरांत मावेनासा झाला. आपली प्रियसखी **चित्रलेखा** हिणें आणून दिलेला मूर्तिमान् केवळ आपला प्राणच, अशा त्या **अनिरुद्धा**सहवर्तमान **उषा** परम आनंदांत सुखाचा उपभोग घेऊं लागली.

तिणें **अनिरुद्धाला** आपल्या महालांत गुप्तपणें ठेवला होता. **चित्रलेखे**वांचून दुसऱ्या कोणालाच त्याच्याविषयीं कांहीं माहीत नव्हतें. तथापि बरेच दिवस पुरुषाचा समागम झाल्यामुळें उषेची अंगकांती कांहीं निराळ्याच प्रकारची झाली. ती गोष्ट तिणें आपल्याकडून छपविली तरी कळल्यावांचून राहिली नाहीं. तिच्या महालावर देखरेख ठेवणाऱ्या लोकांना तिचीं लक्षणें पाहून संशय आला. व तत्काल त्यांणीं आपल्यावर कांहीं अरिष्ट येईल, ह्मणून ती गोष्ट **बाणासुराला** कळविली. प्रत्यक्ष मुलीनें असा अविचार केला; ही गोष्ट ऐकतांच तो अतिशय संतप्त झाला, व तत्काल **उषे**च्या महालांत आला. तों तेथें काय विचारतां? समोर **चित्रलेखा** बसली आहे, व चंदनाच्या उटीनें सुवासित झालेला आपला डावा हात **उषे**च्या खांद्यावर टाकून, तो राजबिंडा

**अनिरुद्ध** फांशांनीं खेळत आहे. हा प्रसंग पाहतांच **बाणासुराच्या** अंगाची लाही झाली. तो अकस्मात् तेथें प्राप्त होतांच **उषेची** व **चित्रलेखेचीही** त्रेधा उडून गेली. **बाणासुरानें उषेची** पुष्कळ निर्भर्त्सना केली आणि तो **अनिरुद्धाच्या** अंगावर धांवला. शूर पुरुषांचें धैर्य मोठें विलक्षण असतें. **बाणासुरासारख्या** कृतान्त काळाच्या मुलीला गुप्तपणें भ्रष्ट केल्याचा मोठा अपराध घडला असून; काळासारखा तो आपल्या अंगावर धांवला; तरी **अनिरुद्ध** मुळींच डगमगला नाहीं. तत्काल त्याणें आपलें धनुष्य हातांत घेतलें, व दंड थोपटून लढाईला उभा राहिला!

**अनिरुद्ध** मोठा पराक्रमी होता; तरी तो एकटा असल्यामुळें पराभूत झाला. **बाणासुरानें** त्याला प्रतिबंधांत ठेवलें. बहुत दिवस पर्यंत हें वर्तमान कोणासच कळलें नाहीं. इकडे **द्वारकेंत** मोठीच गडबड उडाली. **अनिरुद्ध** एकाएकीं नाहींसा झाला. तो कोठें गेला; व त्याचें काय झालें, याविषयीं **कृष्ण, बलराम** इत्यादिकांना मोठी फिकर लागली होती. बरेच दिवस गेले; तरी कांहीं पत्ता लागला नाहीं. शेवटीं **नारद**ऋषीनें, तो **बाणासुराच्या** येथें कैदेंत असल्याचें वर्तमान कळविलें. तेव्हां सर्व यादव फार क्षुब्ध झाले. त्यांणीं प्रथम **बाणासुराला** सामोपचाराचा निरोप पाठविला. व **अनिरुद्धाला** सोडून देण्याविषयीं विनंती केली; पण आपल्या गर्वाचा परिहार करून घ्यावा ह्मणूनच कीं काय ; त्याणें त्याचा कांहींच विचार केला नाहीं. तेव्हां यादवांनीं लढाईची कडेकोट तयारी केली. **कृष्ण, बलराम, सात्यकी** व **अक्रूर** इत्यादि वीर जींत प्रमुख आहेत ; अशी समुद्रासारखी यादवांची सेना **शोणितपुरावर** चढून गेली.

**बाणासुर** हाही मोठा पराक्रमी असून **महादेवाचा** प्रिय भक्त होता. **शंकराच्या** कृपेनें त्याला एक हजार हात प्राप्त झाले होते! एकाच वेळीं तो पांचशें धनुष्यें ओढून तितक्यांनींही बाण सोडीत असे. तेंव्हां दोन हातांचा कसलाही वीर असला तरी त्याच्यानें त्याच्या पुढें

कसा टिकाव धरवणार? अर्थात् **बाणासुराला** सर्व जग निर्वीर झालें होतें. त्याच्या बाहूंला जी खाज सुटली होती; ती घालविण्यास सामनेवाला कोणीच नाहीं असें झालें. तेव्हां त्याणें **शंकराजवळ**—आपल्याला कोणी तरी प्रतियोद्धा मिळावा; ह्मणून प्रार्थना केली. व त्याचा गर्वपरिहार व्हावा ह्मणून—'लवकरच तसा संग्राम होईल' असा **महादेवानेंही** त्याला शाप दिला होता. तो प्रसंग सांप्रत प्राप्त झाला. असो.

**बाणासुरानें** कडेकोट तयारी करून यादवांला लढाई दिली. बहुत दिवस उभयतांचें जंगी युद्ध चाललें होतें. शेवटीं **कृष्णानें बाणासुराला** गांठून, केळीचें वन कापतात त्याप्रमाणें सपासप त्याचे सारे हात छाटून टाकले! तेव्हां भयभीत होऊन; **बाणासुर** संधि साधून पळून गेला. आपल्या भक्ताचें साह्य करावें; म्हणून दयाळू भगवान् **शंकर** भूतगणांसहवर्तमान **कृष्णाशीं** लढाईला आला. तरी एकंदरींत जिकडेतिकडे वाताहतच झाली. शेवटीं **शंकरानें बाणावर** अनुग्रह करण्यास सांगितल्यावरून; **कृष्णानें** त्याला जीवदान दिलें. **प्रल्हादाच्या** वंशांत[1] तो उत्पन्न झाला असल्यामुळें **कृष्णाला** त्याचा वध करावयाचा नव्हताच. त्यांतून **शंकरानेंही** विनंती केली. तेव्हां **बाणासुराचे** अजरामर असे चार हात कायम राहण्याविषयीं **कृष्णानें** वरदान दिलें. नंतर उभयतांचा समेट झाला. **बाणासुरानें** आपली कन्या **उषा** हिचा **अनिरुद्धाशीं** यथाविधि विवाह करून देऊन; अनेक उत्तमोत्तम वस्तु जांवयाला आंदण दिल्या. सर्व यादवांचा यथायोग्य सत्कार केला. व मोठ्या समारंभानें कन्येसहवर्तमान जांवयाची रवानगी केली."

१ विष्णूनें प्रल्हादाच्या रक्षणाकरता नृसिंहावतार धारण केला होता, ही गोष्ट सर्वप्रसिद्धच आहे. हिरण्यकशिपूचा वध केल्यावर नृसिंहानें प्रल्हादावर अनुग्रह केला. त्या वेळीं—मी तुझ्या वंशांतल्या कोणत्याही पुरुषाला मारणार नाहीं, असें भगवंतांनीं वरदान दिल्याचें भागवत पुराणाच्या ७ व्या स्कंधांत सांगितलें आहे. नृसिंह हा विष्णूचा अवतार व श्रीकृष्ण हाही विष्णूचाच अवतार असल्यामुळें नृसिंहानें दिलेलें वरदान कृष्णाला पाळलेंच पाहिजे. बाणासुर हा—प्रल्हादाचा पुत्र विरोचन, त्याचा पुत्र बलि, आणि त्याचा बाण अर्थात् प्रल्हादाचा पणतू होतो, ह्मणून कृष्णानें त्याला मारला नाहीं.

ही कथा सांगून **कलिंगसेना** ह्मणाली, "याप्रमाणें आपल्याच इ-च्छेनें **उषेनें अनिरुद्धाला** आपल्या महालांत आणिलें नाहीं काय? व शेवटीं त्याचा परिणाम चांगला झाला नाहीं काय? तेव्हां मी असें ह्मणतें कीं; जसा **चित्रलेखेनें** उषेचा हेतू पुरविला; तशी तूं माझा हेतू पुरविण्यास समर्थ आहेस. **चित्रलेखे**पेक्षां तुझा प्रभाव कांकणभर अ-धिक आहे. तेव्हां मी सांगतें तसें करशील; तर माझा हेतू पूर्ण होईल. व तुझाही वियोग होणार नाहीं. आतां कसेंही करून **वत्सराजाला** तूं येथें घेऊन ये, इतकेंच माझें तुझ्याजवळ मागणें आहे. दुसरें कांहीं नाहीं."

**कलिंगसेने**ची ही प्रार्थना ऐकून **सोमप्रभा** ह्मणाली, "गडे, **चित्र-लेखे**ची आणि माझी बरोबरी कशी होईल? ती पडली **देवांची स्त्री** अर्थात् अप्सरा. तिचें सामर्थ्य माझ्याहून अधिक. तिणें **अनिरुद्धाला** उचलून आणला; पण माझ्यानें तसें कसें होईल? दुसरें असें आहे कीं; ती अप्सरा असल्यामुळें तिला परपुरुषाला स्पर्श करण्याची मनाई नाहीं. आणि मी तर विवाहित **स्त्री** आहें. मी दुसऱ्या पुरुषाला शिवायचीदेखील नाहीं. तेव्हां माझ्यासारखीच्या हातून तें काम कसें होईल? याकरितां मी तुलाच **वत्सराजा**कडे घेऊन जातें. **वत्स-राजा**कडे जाण्यापूर्वी, तुझ्या आईबापानीं ज्या **प्रसेनजिताला** तुला द्यायची केली आहे, तो तुला दाखवितें. तो तुझी फार इच्छा करीत आहे. तेव्हां आधीं त्याला पाहून घे. तो पसंत पडला; तर चांगलेंच आहे, नाहींपेक्षां पुढें **वत्सराजा**कडे तुला घेऊन जाईन. असें करणें हें मला बरें वाटतें."

**कलिंगसेने**च्या मनांत **प्रसेनजिताला** तर वरायचें नव्हतेंच; पण

---

१ अप्सरा ह्या देवांच्या वेश्या होत. अर्थात् त्यांचा कोणाशी विवाह होत नाहीं. तेव्हां वेश्येला अमका पुरुष स्वकीय व अमका परकीय असें मुळींच नाहीं. ह्मणून कोणत्याही पुरुषाला शिवण्याची त्यांस मनाई नाहीं.

**वत्सराजा**ला मात्र आपल्या महालांत आणून ठेवायचें होतें. तथापि ती गोष्ट **सोमप्रभे**वांचून सिद्ध व्हायची नाहीं. आणि तिणें तर **वत्सराजा**ला आपल्याच्यानें आणवत नाहीं; असें सांगितलें. तेव्हां निरुपायास्तव तिणें **सोमप्रभे**च्याच म्हणण्याला अनुमोदन दिलें. तेव्हां **सोमप्रभेनें** मायामय असें एक वाहन तयार केलें. व त्यांत **कलिंगसेने**ला बरोबर घेऊन **सोमप्रभा** आरूढ झाली. व तत्काळ आकाशमार्गानें तें विमान चालूं लागलें. **कलिंगसेनेनें** यावेळीं आपल्या बरोबर पुष्कळ जवाहीर वगैरे घेतलें होतें. व तिच्या खात्रीचीं अशीं जीं चाकर माणसें होतीं, तींही बरोबर घेतलीं होतीं. अशी तयारी करून आईबापांला न कळवितां ती **सोमप्रभे**बरोबर निघाली. खरोखर यावेळीं त्या मुलीनें हें मोठेंच साहस केलें. बिचारे तिचे मातापितर सर्वस्वीं तिच्यावरच जीव धरून होते. त्यांना रात्रंदिवस काय ती आपल्या मुलीची काळजी होती. असे असतां त्यांला न कळवितां निघून जाणें; व आपल्याकरतां त्यांला तळमळावयास लावणें; हें कुलीन व शाहण्या मुलीला खरोखर फारच अयोग्य. पण **कलिंगसेनेनें** त्याचा मुळींच विचार केला नाहीं! उघडच आहे, एखाद्या हुषार चाबुकस्वारानें उत्तम घोडी भरधांव सोडली असतां; ती उंच सखल, अथवा खांच खळगा, कांटे कुटे अथवा दुसरें कांहींही पुढें असलें; तरी त्याचा विचार न करतां एकदम पुढें धांव टाकते, त्याप्रमाणें **कामरूपी** चाबुकस्वारानें प्रेरणा केलेली स्त्री पुढचा मुळींच विचार करीत नाहीं! असो.

**सोमप्रभेनें** प्रेरणा केलेलें विमान फार थोड्या अवकाशांत **श्रावस्ति** नामक नगरींत येऊन पोंचलें. **प्रसेनजित्** राजाची राजधानी ती हीच होय. योगायोग कांहीं चमत्कारिक असतात. आपण त्या नगरींत गेलों; तरी **प्रसेनजित्** राजा आपल्याला कसा दिसेल? एकदम त्याच्या वाड्यांत जाणें हें कांहीं योग्य नाहीं. जेव्हां तो कधीं बाहेर निघेल; तेव्हां आपल्याला त्याचें दर्शन होणार, आणि याबद्दल किती

वेळ खोळंबा करावा लागेल कोणास ठाऊक! अशा प्रकारची, **सोमप्रभा** व **कलिंगसेना** यांना काळजी पडली होती; पण राजाच्या दर्शनाचा योग सहज घडून आला. तो असा कीं, **सोमप्रभेचें** विमान त्या **श्रावस्ति** नगरीवर जाऊन पोंचण्यास; आणि राजा **प्रसेनजित्** घोड्यावर बसून शिकारी करतां बाहेर निघण्यास; अगदीं गांठ पडली. जरेनें पांढरा फटिक दिसणारा, तो राजा दुरून **सोमप्रभेला** दिसला. 'हा म्हातारा आहे. चला चला. तुह्मी या थेरड्याला घेऊन काय करणार ?' असा निषेधच करीत आहे कीं काय; अशा त्याच्या मस्तकावर ढळत असलेल्या चंवऱ्यांवरून **प्रसेनजित्** राजा तो हाच, असें समजून हंसत हंसत **सोमप्रभा कलिंगसेनेला** ह्मणाली, "सखे, पहा, पहा! हाच तो **प्रसेनजित्** राजा. तुझ्या बापानें तुला द्यायची केली होती, ती यालाच. पहा, कसा चांगला गोजिरवाणा दिसतो आहे तो. मिशांला कलप कसा लावला आहे. गालांवर पडलेल्या सुरकुत्या विड्यांचे गोळे गालांत धरून त्याणें कशा लपविल्या आहेत. आणि पोषाख तरी किती सुंदर केला आहे! गडे, याची ऐट तरी कशी आहे ती पहा. खरेंच बाई, तुझ्या बापानें मोठें नामी स्थळ पाहून ठेविलें होतें. तुला कां पसंत होत नाहीं कोणास ठाऊक!"

हें ऐकून **कलिंगसेना** नाक मुरडून ह्मणाली, "इश्श ग बाई! असें बोलूं नकोस. ह्याला ( **प्रसेनजिताला** ) एका जरेनें वरलें आहे नि आतां दुसरी कोण याला वरण्यास तयार होईल! बाई सखे, तूं मला येथून लवकर **वत्सराजाकडे** घेऊन चल. चल नीघ आतां. उगीच वेळ लावून माझे डोळे व मन विटवूं नकोस."

**कलिंगसेनेनें प्रसेनजिताला** वरूं नये, हें **सोमप्रभेला** मनापासून इष्टच होतें. तिनें वर सांगितल्याप्रमाणें त्याच्याविषयीं तिरस्कार दर्शवितांच **सोमप्रभेनें** तत्क्षणीं आपलें विमान तेथून पुढें चालविलें. **वत्सराजाच्या** दर्शनाविषयीं अतिशय उत्कंठित झालेल्या **कलिंगसेने**-

ला आणखी इकडच्या तिकडच्या कांहीं गोष्टी सांगून; तिच्या मनाचं करमणूक करीत होत्साती **सोमप्रभा** तिला घेऊन लवकरच **कौशांबि** नगरीवर येऊन पोंचली. तेथें, **सोमप्रभेनें** विशेष वर्णन केल्यामुळें ज्याची मूर्ती तिच्या मनांत भरली होती; तो **वत्सराज** मित्रांसह बागेंत क्रीडा करीत असतां तिच्या दृष्टीस पडला. तेव्हां चकोरी जशी चंद्राला पाहून आनंदित होते ; तशी उत्कंठित झालेली **कलिंगसेन** दुरून **वत्सराजा**ला पाहून अतिशय हर्षित झाली. ती उत्फुल्ल दृष्टीने त्याला अवलोकन करीत होत्साती आपल्या हृदयावर हात ठेवून—'ह ( **वत्सराज** ) या मार्गानें माझ्या शरीरांत शिरला आहे,' असें आपली सखी **सोमप्रभा** हिला सांगत आहे कीं काय असें वाटलें. तं **सोमप्रभे**ला ह्मणाली, "सखे, काय होईल तें होवो; पण आतां विलंब मात्र लावूं नकोस. आजच्या आज **वत्सराजा**शीं माझा येथें समागम करवून दे. ह्याला पाहून मी एक क्षणभरदेखील निराळी राहण्यास असमर्थ आहें. तेव्हां कसेंही करून माझी एवढी विनंती मान्य करच."

कामातुर झालेल्या स्त्रिया कोणतीही गोष्ट करतेवेळीं फारसा विचार करीत नाहींत. त्याप्रमाणें **कलिंगसेनेनें वत्सराजा**ला भेटण्याविषयी त्वरा केली हें ठीकच आहे; पण **सोमप्रभा** तशी नव्हती. ती मोठी गंभीर असून कोणतीही गोष्ट दूरवर विचार केल्यावांचून करणारी नव्हती. तिच्या मनांत युक्तीयुक्तीनें त्या दोघांचा समागम घडवून आणायचा होता; पण तसें सांगितलें तर **कलिंगसेना** ऐकायची नाहीं म्हणून ती ह्मणाली, "तूं ह्मणतेस त्याप्रमाणें मी आतांच केलें असतें. पण आज अगदीं अशुभ निमित्त पाहिलें आहे. याकरितां आजचा दिवस कांहीं चांगला नाहीं. कसेंही करून तूं हा दिवस घालीव. या बागेंत कोणाच्या दृष्टी न पडतां तूं आजचा दिवस येथें रहा. आतां परत आपल्या बापाच्या घरीं जाण्याची आणि फिरून येण्याची खटपट कशाला करतेस ? उद्यां सकाळीं येथें येऊन मी, तुझा आणि **वत्सराजा**चा

समागम होण्याविषयीं तजवीज करीन. आतां मला फार वेळ झाला. माझ्या भर्त्यांच्या मनरूपी गृहांत माझी एकसारखी आठवण चालली आहे. तेव्हां मला तिकडे जाऊं दे."

असें सांगून **कलिंगसेनेची** कशी तरी समजूत करून **सोमप्रभा** आपल्या नवऱ्याकडे निघून गेली. इतक्यांत **वत्सराजही** क्रीडा करून श्रमल्यामुळें बागेंतून निघून आपल्या महालांत गेला. **सोमप्रभे**नें मायेच्या योगानें जें विमान तयार केलें होतें तें, त्या बागेंत एके ठिकाणीं कोणाच्या दृष्टीस न पडे अशा रीतीनें ठेवलें असून; **कलिंगसेना** आपल्या परिवारासह त्या विमानांत बसून राहिली होती. **सोमप्रभेनें** आजचा दिवस वाईट आहे. आज तूं **वत्सराजाची** भेट घेऊं नको, वगैरे पुष्कळ प्रकारें सांगून **कलिंगसेनेच्या** मनाची आतुरता अंमळ शिथिल केली होती; पण ती फार वेळ टिकली नाहीं. **सोमप्रभा** निघून जातांच एकल्या एकल्यांनीं त्या विमानांत चैन पडेनासें झाल्यावरून,—काय होईल तें होवो; **सोमप्रभेनें** नको ह्मणून सांगितलें आहे; तरी आजच्या आजच आपण **वत्सराजाची** भेट घेण्याविषयीं प्रयत्न करावा, असा तिणें निश्चय केला. ती आपल्याशींच ह्मणाली, '**सोमप्रभेनें** आज नको ह्मणून सांगितलें आहे; पण मला या वेळीं कशा यातना होताहेत; ह्याची कल्पना तिच्या मनांत कशी येणार! तिची आणि माझी; बुभुक्षित आणि टमटमून जेवलेला, यांच्यासारखी स्थिती आहे. ज्याचें पोट भरलेलें असेल त्याला उपाशी असलेल्याला काय दुःख होतें, तें कसें समजणार? **सोमप्रभा** यावेळीं घरीं जाऊन खुशाल आपल्या वल्लभाशीं क्रीडा करीत असेल. तिला माझी अवस्था काय होत आहे हें कसें समजणार? आणि जेव्हां तेव्हां पाहावें तों तिची आपली सुस्ती फार. मनांत आलें आणि चटकन् एखादें काम केलें, असें आजपर्यंत तिच्याकडून कधींच झालेलें नाहीं. मग तें असें होईल, मग तसें होईल, अशा सतरा गोष्टी तिला सांगायला

पाहिजेत. आजचा दिवस वाईट आहे ह्मणजे काय? दिवसांत वाईटपणा आणि बरेपणा तो कसला? तिला शकून प्रश्नांचा भारी नाद आहे. एखादा कांहींतरी शकून वेडावांकडा तिच्या दृष्टीस पडला असेल ह्मणून तिणें आजचा सारा दिवसच वाईट ठरविला असावा! पण तें कसेंही असेना का. तिला हा दिवस वाईट असला ह्मणून मला वाईट मानण्याची कांहीं गरज नाहीं. उलट शुभच मानला पाहिजे. कारण, आज इतके दिवस ज्याच्या दर्शनाविषयीं मी रात्रंदिवस ध्यास घेतला होता, त्याची मूर्ति आज मीं डोळेभर पाहिली. तेव्हां हा दिवस वाईट कसा ह्मणावा? पण तें कांहीं का असेना. ज्याच्या पोटांत दुखत असेल त्याणेंच ओंवा खाल्ला पाहिजे. आपण आपल्या विचारानें त्या हृदयवल्लभाचा समागम घडण्याविषयीं प्रयत्न करावा ह्मणजे झालें. आतां सोमप्रभेची काय गरज आहे?'

असा विचार करून, तिणें आपल्या बरोबर जे नोकर चाकर आणले होते त्यांत लंबक नांवाचा एक पोक्त व हुषार मनुष्य होता, त्याच्याजवळ आपला हेतू काय आहे तो सांगून त्याला वत्सराजाकडे पाठविलें. शकून जाणणाऱ्या जिवलग मैत्रिणीनें नको ह्मणून सांगितलें होतें; तरी कलिंगसेनेला दम निघाला नाहीं! तरुण स्त्रियांच्या मनावर आरूढ झालेला काम केव्हांच स्वतंत्र होऊन तो दुसऱ्याची अपेक्षा ठेवीत नाहींसा होतो! असो, याप्रमाणें वत्सराजाकडे दूत पाठवून कलिंगसेना त्याच्या येण्याची वाट पहात बसली.

इकडे कलिंगसेनेनें दूत करून पाठविलेला लंबक शोध करीत करीत वत्सराज ज्या महालांत होता; त्याच्या दरवाज्यांत येऊन पोंचला. आणि तेथें चोपदाराला कलिंगसेनेकडून आपण निरोप घेऊन आलों आहें; असें सांगितलें. चोपदारानें तत्काल वत्सराजाला कळविलें. रंगेल्या वत्सराजाजवळ माषुकांचा निरोप घेऊन येणाऱ्याचा प्रवेश होण्यास मुळींच विलंब लागत नव्हता! चोपदारानें विनंती

करतांच **लंबकाला** आपल्याजवळ आणण्याविषयीं हुकूम झाला. व त्याप्रमाणें त्याणें त्या दूताला आपल्या यजमानासमोर आणून उभा केला. तेव्हां **वत्सराजाला** नम्रतापूर्वक मुजरा करून **लंबक** ह्मणाला, "महाराजाधिराज, सरकारचा विजय असो! **तक्षशिला** नांवाच्या नगरीचे अधिपति महाराज **कलिंगदत्त** हे सरकारच्या कर्णपथावर आले असतीलच. त्यांची कन्या **कलिंगसेना** ही महाराजांच्या हृदयंगम रूपाची व गुणांची तारीफ ऐकून, त्यांनीं जणूं काय आकर्षणच केली होत्साती, मातापितरांचा व आप्तसंबंध्यांचा लळा सोडून एकदम स्वयंवराकरतां आजच येथें प्राप्त झाली आहे. **मयासुराची** कन्या व **नलकूबराची** भार्या **सोमप्रभा** ही तिची परम मैत्रीण आहे. तिणें मायेनें यंत्रमय विमान करून आकाशमार्गानें कोणाला नकळत आपल्या नोकरां चाकरांसह तिला येथें आणली आहे. तिणें महाराजसाहेबांला विनंती करण्याकरतां आज्ञा केल्यावरून मी येथें आलों. आतां यद्यपि महाराजानीं तिला प्रत्यक्ष पाहिली नसली; तथापि ज्यापेक्षां स्वर्गलोकापर्यंत तिच्या सौंदर्याची ख्याति झाली आहे; त्यापेक्षां आपल्याला ती विदित असेलच. तेव्हां माझ्यासारख्यानें या कामांत विशेष काय बोलायचें आहे. उत्तम रत्नाचा, रत्नभोक्त्यांनीं स्वीकार करावा हें त्यांना योग्यच आहे. तेव्हां कौमुदी आणि चंद्र याप्रमाणें आपणा उभयतांचा अनुरूप योग घडावा एवढीच या दासाची प्रार्थना आहे."

**लंबकानें** याप्रमाणें विनंती केली, ती श्रवण करून **वत्सराजाला** किती आनंद झाला असेल याचें येथें विशेष वर्णन करावयास नको. त्यानें तत्काल **कलिंगसेनेची** विनंती मान्य केली. व मोठ्या आनंदानें सुवर्ण, वस्त्रें, अलंकार इत्यादिकांनीं **लंबकाचा** विशेष सत्कार केला. आणि त्याला—'तूं पुढें जा. आपण लवकरच तुझ्या धनीनीच्या भेटीला येतों,' असें सांगून त्याणें त्या जासुदाला निरोप दिला.

बायकांच्या संबंधाच्या गोष्टींत **वत्सराजाचा** सल्ला मसलत देणारा

**वसंतक**च होता. त्या संबंधानें बहुतकरून **यौगंधरायणा**शीं खलबत करण्याचें कांहीं कारण नव्हतें; तथापि आजपर्यंत असे कांहीं चमत्कारिक योग येत गेले कीं, प्रत्येक विवाहाच्या प्रकरणांत कांहींना कांहीं राजकारण असल्यावांचून राहिलेंच नाहीं. त्यामुळें **वत्सराजाला यौगंधरायणा**ची सल्ला घ्यावी लागत होती. व त्यालाही त्या कामीं डोकें खर्च करावें लागत होतें. त्याप्रमाणें **कलिंगसेने**चा स्वीकार करायचा; त्यांत देखील कांहीं महत्त्वाचें कारण असेल. व तें **यौगंधरायणा**ला कळविल्यावांचून आपण आपल्याच बुद्धीनें करूं नये, असा विचार करून राजानें तत्काल त्याला बोलविलें. **यौगंधरायण** येतांच **वत्सराज** दुसऱ्या कांहीं कामाच्या संबंधानें दोन शब्द विचारून त्याला ह्मणाला, “दिवाणजी, आज एका निराळ्याच प्रकारच्या कामांत तुमची सल्ला घ्यायची आहे. **तक्षशिला** नगरीचा राजा **कलिंगदत्त** याची, रूपाच्या संबंधानें सर्वत्र नांवाजलेली **कलिंगसेना** नामक कन्या आपण होऊन मला वरण्याकरितां येथें प्राप्त झाली आहे. तेव्हां तिचा अव्हेर करणें हें तर योग्य नाहींच; पण तिच्याशीं विवाह करायचा तो कधीं करावा? हें सांगा. त्याला विलंब मात्र लागूं नये.”

राजेलोकांजवळ ‘जो हुकूम’ ह्मणणाऱ्या कामदारांचीच बहुतकरून फार दाटी असते; पण **यौगंधरायण** तशांपैकीं नव्हता, हें पूर्वीं अनेकवेळां सांगितलेंच आहे. त्याला केवळ आपल्या धन्याला खुष करायचें नसून मनापासून त्याचें हित करायाचें होतें. **वत्सराजा**चें भाषण ऐकून तो क्षणभर आपल्याशींच विचार करूं लागला. तो मनांत ह्मणाला, ‘ती **कलिंगसेना** तर त्रैलोक्यांत नांवाजलेली रूपवती आहे. तिच्यासारखी सुंदर सांप्रत या जगांत दुसरी कोणीच नाहीं. प्रत्यक्ष देवदेखील तिच्याविषयीं लाळ घोंटीत आहेत. तेव्हां तिच्या रूपाबद्दल कांहीं बोलावयासच नको. पण तिची आणि आमच्या राजेसाहेबांची भेट झाली तर तिचा परिणाम फार विलक्षण होईल. हा

बाकी सगळें सोडून देऊन रात्रंदिवस तिच्या नादीं लागेल. असें झालें ह्मणजे दुसऱ्या राण्यांकडे याचें मुळींच लक्ष्य जाणार नाहीं. अर्थात् राणी **वासवदत्ता** त्या दुःखानें कदाचित् प्राणत्यागदेखील करील. आणि तिचा तसा परिणाम झाला ह्मणजे राजपुत्र **नरवाहनदत्त** हाही नाश पावल्यावांचून राहणार नाहीं. अर्थात् **वासवदत्तेच्या** आणि **नरवाहनदत्ता**च्या वियोगानें विव्हळ होऊन **पद्मावती** वांचेल हेंही कठिणच आहे. आपल्या मुलींचा याप्रमाणें नाश झाला ह्मणजे **चंडमहासेन** आणि **प्रद्योत** हे दोघेही प्राणत्याग करतील. कदाचित् तसें न झालें तर ते विरुद्ध झाल्यावांचून राहणारच नाहींत. तेव्हां अशी व्यवस्था झाली ह्मणजे आपण आजपर्यंत जें येवढें मोठें महत्त्व मिळविलें आहे, तें कसें कायम राहील? एवंच या **कलिंगसेने**च्या संबंधापासून सर्वस्वनाश होणार, यांत कांहीं संशय नाहीं. तेव्हां हा योग घडूं देणें हें युक्त नाहीं. बरें आतां ह्याला (**वत्सराजाला**) तसें करूं नको म्हणावें तर तेंही योग्य नाहीं. कारण या राजाला बायकांचें एक मोठें व्यसनच आहे. आणि व्यसनी पुरुषाला तें करूं नको ह्मटलें ह्मणजे अधिकच जोर येतो. तेव्हां 'अशुभस्य कालहरणम्' असें केलें पाहिजे. या दोघांचा विवाह लांबणीवर टाकला ह्मणजे झालें. मग तितक्यांत कांहीं तरी सवड काढतां येईल.'

याप्रमाणें आलोचन करून **यौगंधरायण वत्सराजाला** ह्मणाला, "महाराज, आपण धन्य आहां. ही **कलिंगसेना** आपल्या घरीं चालून आली, तेव्हां आपल्या भाग्याचें वर्णन काय करावें? हिच्याशीं संबंध झाला ह्मणजे आपलें महत्त्व अधिक वाढणार आहे. हिचा बाप राजा **कलिंगदत्त** हा मोठ्या प्रबल राजांपैकी आहे. त्याच्या मुलीचें आपण पाणिग्रहण केलें ह्मणजे अर्थात् तो आपला चाकर बनला यांत कांहीं संशय नाहीं. तर आतां आपण ज्योतिष्यांला विचारून उत्तम मुहूर्तावर मोठ्या समारंभानें यथाविधि तिचें पाणिग्रहण करावें. कारण, ती एका

मोठ्या राजाची कन्या आहे. तिचा विवाह व्हायचा तो तशाच थाटानें झाला पाहिजे. ही तर एक गोष्ट झालीच; पण आतां यावेळीं तिची योग्य व्यवस्था झाली पाहिजे. लग्न होईपर्यंत तिला राहण्याकरितां एक सुंदर महाल द्यावा. दासदासी वगैरे परिवार तिच्या तैनातीस नेमावा. उत्तम दागदागिने, वस्त्रें वगैरे पाठवावीं. खाण्यापिण्याची वगैरे उत्तम तयारी ठेवावी. या गोष्टी अगदीं प्रथम केल्या पाहिजेत. मग मुहूर्ताचा निश्चय होऊन लग्नसमारंभ होईलच."

**वत्सराजाला** आपल्या मनांत होतें तसेंच **यौगंधरायणानें** सांगितलें; तें ऐकून फार संतोष झाला. त्याणें तत्काल चोपदाराला हुकूम केला कीं; 'तो आपला **मोतीमहाल** तिला राहायला द्यावा. व दासदासी वगैरे जितके नोकरचाकर तिला पाहिजे असतील तितके तिच्या सेवेंत हाजर ठेवावे. आणि वस्त्रें, अलंकार इत्यादि पाठवून तिची सर्व प्रकारची उत्तम व्यवस्था ठेवावी.' याप्रमाणें राजाचा हुकूम होतांच कामदारांनीं तत्काल सर्व तयारी केली. **कलिंगसेनेला** सत्कारपूर्वक त्या महालांत नेऊन पोंचविली. व ज्या ज्या गोष्टी तिला आवश्यक होत्या, त्या त्या सर्व तिच्याजवळ हाजर केल्या. त्या योगानें **कलिंगनेसेला** मोठा आनंद झाला. यद्यपि तिच्या मनाप्रमाणें त्याच दिवशीं **वत्सराजाचा** समागम होण्याचा योग आला नाहीं; तथापि, तो आपला मनोरथ लवकरच पूर्ण होईल, असा तिला भरंवसा उत्पन्न झाला.

इकडे **वत्सराजाला** अशी मसलत देऊन व तो त्याचवेळीं **कलिंगसेनेच्या** भेटीला जाणार होता, तो त्याचा बेत रहित करून; बुद्धिमान् **यौगंधरायण** तेथून निरोप घेऊन आपल्या घरीं गेला; पण तेथें त्याला चैन पडली नाहीं. तीच गोष्ट त्याच्या मनांत घोळत होती. तो आपल्याशींच ह्मणाला, 'अशुभ गोष्टीला दिवसगत लावावी, हाच तिचा परिहार आहे. पूर्वीं ज्यांच्या ज्यांच्यावर तसे प्रसंग आले होते त्यांणीं असेंच केलें आहे. **वृत्राचा शत्रु इंद्र** ब्रह्महत्येच्या

मयानें पळून गेला; व त्यावेळीं **नहुषराजाला** देवांच्या राज्यावर बसविलें असतां; त्याणें **इंद्राची स्त्री शची** आपल्याला प्राप्त व्हावी असा आग्रह धरिला. आणि ती गोष्ट होणें तर योग्य नव्हतें. त्या अडचणींत **इंद्राणी**, देवगुरु जो **बृहस्पति** त्याला शरण गेली; तेव्हां त्याणें हाच उपाय केला होता. कारण **नहुषाला**—'**इंद्राणी** तुझ्याकडे येणार नाहीं' असें सांगतां येत नव्हतें. आणि **इंद्राचा** तर कांहीं ठिकाणच नव्हता. व तिला त्याच्या हवालीं केल्यावांचून गत्यंतर नव्हतें. तेव्हां—'ती आज येईल, उद्यां येईल' अशा रितीनें वायदे करून करून दिवसगत केली. व तितक्या संधींत **इंद्राचा** शोध करून इकडे **सप्तऋषींच्या** शापानें **नहुषाचा** नाश करून **देवगुरूनें** मसलतीनें **इंद्राला** पूर्वीप्रमाणें देवाचें राज्य प्राप्त करून दिलें. त्याप्रमाणें या **कलिंगसेनेच्या** संबंधानें कालहरण करावें, हेंच मुख्य आहे.'

असा विचार करून **यौगंधरायणानें** तत्काल राजाच्या आश्रयांत असलेल्या ज्योतिष्यांला बोलावून आणिलें. आणि त्यांला थोडक्यांत बेताबातानें आपला हेतू कळवून—'कांहीं मोठें राजकारस्थान आहे. याकरितां महाराज तुह्मांला लग्नाचा मुहूर्त विचारतील, तर तुह्मी होईल तितका दूरचा मुहुर्त्त द्या.' असें सांगून त्यांच्याकडून ती गोष्ट कबूल करून घेतली. **वत्सराजाच्या** महालांत काय काय चालतें तें वरचेवर आपल्याला समजण्याकरितां **वासवदत्तेचे** हेर तिकडे नेमलेलेच होते. त्यांणीं तत्काल **कलिंगसेनेच्या** संबंधाची हकीकत तिला कळविली. तेव्हां **वासवदत्तेवर** मोठा अनर्थ कोसळल्यासारखें झालें. आपल्या नवऱ्याला बायकांचें वेड किती आहे; हें तिला ठाऊकच होतें. व **कलिंगसेनेच्या** सौंदर्याची तारीफही तिणें ऐकली होती. तेव्हां तिला भय वाटलें हें योग्यच आहे. अशा बिकट प्रसंगीं **यौगंधरायणावांचून** दुसऱ्या कोणाच्या हातून कांहीं व्हायचें नाहीं; असें समजून तिणें त्याचवेळीं **यौगंधरायणाला** उभाउभीं आपणास भेटून जाण्याविषयीं निरोप पाठविला.

निरोप आला त्यावेळीं **यौगंधरायण** ज्योतिष्यांला मथविण्याच्या गडबडींत होता. त्याणें त्यांला निरोप देऊन आणखी कांहीं व्यवस्था केली, आणि घाईघाईनें तो **वासवदत्ते**च्या महालांत आला. **वासवदत्ते**चा यावेळीं रडून आकांत चालला होता. **यौगंधरायणानें** तिला मुजरा करून प्रश्न केला तेव्हां ती रडत रडत ह्मणाली, "आर्या, सांप्रत काय अनर्थ उडाला आहे, तो तुह्मांला ठाऊक नाहीं का? **पद्मावती**च्या लग्नाच्यावेळीं तुह्मीं मला सांगितलें होतें कीं, 'हिच्यावांचून आतां दुसरी कोणतीही तुमची सवत होणार नाहीं. मी जीवंत असें तोंपर्यंत तर अशी गोष्ट व्हायची नाहीं. मग पुढचें माझ्यानें सांगवत नाहीं,' असें जें तुह्मी खात्रीपूर्वक सांगितलें होतें तें कोठें गेलें? आजच माझ्या उरावर दुसरी एक सवत बसणार आहे, हें तुह्माला समजलें का? पहा, आज तुमच्यादेखत **कलिंगसेने**शीं लग्न लागायचें आहे. तिच्या रूपाची ख्याति तुह्मीं ऐकलीच असेल. आणि इकडे ( **वत्सराजाला** ) तशा बायकांचा किती नाद आहे हें कांहीं सांगायलाच नको. मग आमच्याकडे कोण पहाणार! अर्थात् आह्मी मेल्यासारख्याच झालों कीं नाहीं; तें पहा. आणि तुह्मी जें इतके छातीला हात लावून सांगत होतां तें तुमचेंही बोलणें खोटें झालें! मी तर खुशाल मरेनच; कारण अपमानसहन करण्यापेक्षां मला मरण्याचें फारसें कठिण वाटत नाहीं! पण तुह्मीं एवढे सत्यवचनी, मोठे कारस्थानी, दूरवर पाहणारे असे असून तुमचें वचन खोटें होणार याबद्दल मला फार वाईट वाटतें!"

**वासवदत्तेनें, यौगंधरायणानें** मनापासून आपल्या हेतूला अनुकूल व्हावें; ह्मणून मुद्दाम त्याला लागेल असें भाषण केलें. तें ऐकून **यौगंधरायण** तिचें समाधान करून ह्मणाला, "राणीसाहेब, अशा घाबऱ्या होऊं नका. अंमळ धीर धरा. तुह्मी ह्मणतां तशी गोष्ट होण्याचें घाटत आहे खरें; पण मी जीवंत असतां तो योग कदापि घडून येणार नाहीं, अशी तुह्मांला खात्री असूं द्या. आतां तुह्मी मात्र मी सांगतों तसें

वागलें पाहिजे. महाराज लग्नाची गोष्ट तुमच्याजवळ काढल्यावांचून राहणार नाहींत. त्यावेळीं तुह्मी मोठा गंभीरपणा धरून त्यांला प्रतिकूळ वाटेल असें कांहींच बोलूं नका. उलट मन उदार करून त्या कामीं आपली सर्व प्रकारें अनुकूलता आहे; असें दाखवा. आतुर झालेला रोगी प्रतिकूळ भाषणानें वैद्याच्या आटोक्यांत येत नाहीं. तर त्याला अनुकूल असेंच सांगून गोडी गुलाबीनें त्याला संतोष वाटेल असेच कांही उपाय करून ताळ्यावर आणला पाहिजे. एखाद्या नदीच्या प्रवाहांत वाहत असलेल्या मनुष्याला पाण्याची ओढ जिकडे असेल तिच्या उलट ओढून घेतां येणार नाहीं. तसेंच उद्योगी मनुष्य एखाद्या उद्योगास प्रवृत्त झाला ; किंवा व्यसनी व्यसनाविषयीं प्रवृत्त झाला; तर त्याला विरुद्ध बोलून अथवा आचरण करून, त्यापासून निवृत्त करतां येणार नाहीं. उलट तो आपल्या हाताबाहेर जाण्याचाच संभव आहे. याकरतां महाराज तुह्माला भेटायला येतील त्यावेळीं पूर्वीप्रमाणें, मनांत कांहीं विकार आल्याचें न दाखवितां त्यांच्याशीं वागा, व आपला हेतू अगदीं गुप्त ठेवा. **कलिंगसेने**चा स्वीकार करण्याच्यासंबंधानें त्यांणीं गोष्ट काढली; ह्मणजे तिला आपलें अनुमोदन द्या. व त्यापासून, तिचा बाप आपला साह्यकारी होऊन राज्याचा उत्कर्ष होईल असें सांगा. असें केल्यानें तुमच्या मनाचा मोठेपणा पाहून तुमच्यावर त्यांचा विशेष स्नेह व दाक्षिण्य वाढेल. व **कलिंगसेना** आतां आपल्या हातांत आलीच आहे ; असें समजून ते फार उत्सूक होणार नाहींत. आणि जर कां आतां त्यांला निवृत्त करण्याचा प्रयत्न केला ; तर त्यांची इच्छा अधिक वाढल्यावांचून राहणार नाहीं. राणी **पद्मावती**लाही तुह्मी असेंच वर्तन करण्याविषयीं सांगा. आणि तसें झालें, ह्मणजे लग्नाच्यासंबंधानें आह्मीं केलेला कालक्षेप महाराज खुशाल सहन करतील. तुह्मी उभयतांनीं आतां मीं सांगितलें त्याप्रमाणें वर्तन केलें ह्मणजे झालें. पुढें कसें काय केलें पाहिजे ; तें मला ठाऊक

आहे. माझ्या ह्या युक्तीचें फळ कसें आहे तें पहा तरी! शाहण्या मनुष्याच्या शहाणपणाची परीक्षा संकटकालीं व शूराच्या शौर्याची परीक्षा लढाईच्या वेळीं होत असते. तेव्हां आपण माझ्यावर विश्वास ठेवून स्वस्थ असा. खेद बिलकूल करूं नका."

राणी **वासवदत्तेला** याप्रमाणें बोध केला व तिणें त्याच्या सांगण्याप्रमाणें वर्त्तन करण्याचें कबूल केलें. तेव्हां फार संतुष्ट होत्साता **यौगंधरायण** तिचा निरोप घेऊन निघून गेला. इकडे **वत्सराजाला कलिंगसेनेचा** नाद लागल्यामुळें; त्या साऱ्या दिवसांत किंवा रात्रींत **वासवदत्ता** आणि **पद्मावती** ह्या दोघी राण्यांतून एकीच्याही महालांत तो गेला नाहीं. उघडच आहे, **कलिंगसेनेसारखी** अप्रतिम सुंदर कन्या आपण होऊन समागमाविषयीं उत्कंठित होऊन प्राप्त झाली असतां; तिच्या नवसंगमाविषयीं ज्याचें चित्त उत्कंठित झालें आहे, अशा राजाला—बहुत दिवस ज्यांचा उपभोग घेतला; अशा राण्यांची कशाला आठवण होईल! तो दिवस कसातरी गेला; पण ती रात्र **कलिंगसेना, वत्सराज, वासवदत्ता** आणि **पद्मावती** यांची मोठ्या संकटांत गेली. कारण मुहूर्त पाहून एकदम तिची भेट घ्यायची ह्मणून **वत्सराज** त्या रात्रीं **कलिंगसेनेला** भेटला नाहीं. यामुळें तो तिच्याविषयीं व ती त्याच्याविषयीं चक्रवाक पक्ष्याच्या जोडप्याप्रमाणें अत्यंत उत्कंठित होऊन राहिलीं. **वासवदत्ता** आणि **पद्मावती,** राजाचें लक्ष्य दुसरीकडे गेल्यामुळें; तो आपल्याकडे आला नाहीं, ह्मणून फार दुःखित झाल्या. एवंच ती रात्र चौघांलाही मोठ्या संकटांत काढावी लागली.

असो. वर सांगितल्याप्रमाणें राजानें ती रात्र उत्कंठेंत कशी तरी घालविली. प्रातःकाल होतांच तो **यौगंधरायणाची** वाट पहात बसला होता. इतक्यांत त्या कारस्थानी प्रधानजीची स्वारी येऊन पोंचली. राजकारणी व मोठे बुद्धिमान् असा ज्यांचा लौकिक असतो; ते पुरुष पहिल्या

प्रतीचे लफंगे असतात. लफंगे हें विशेषण कदाचित् कोणाला चमत्कारिक वाटेल; पण वस्तुतः तसें वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. लफंगे या नांवाखालीं सामान्यतः व्यवहारांत ज्या लोकांचा समावेश होतो, ते हलकट अथवा वाईट असें समजलें जातें. ह्मणून हा शब्द अंमळ हलका वाटतो; पण विचार करून पाहतां जे लोक आपल्या लफंगेपणाचा हलकट कामांत उपयोग करतात, तेच लोकनिंदेस पात्र होतात; आणि त्याचा त्यांनीं जर महत्त्वाच्या कामीं उपयोग केला, तर तेच मोठ्या शहाण्यांत गणले जातात. तेव्हां एकंदरींत चांगल्या आणि वाईट उपयोगावरून लफंगा आणि शहाणा हीं दोन विशेषणें प्राप्त होतात. बाकी दोघांची कृति एकसारखीच असते. **यौगंधरायणानें** लफंगेपणा करून त्याचा चांगला उपयोग करून दाखविला, हें पुढें येणारच आहे. असो. **यौगंधरायण** संप्रदायाप्रमाणें राजाला मुजरा वगैरे करून ह्मणाला, "सरकार, **कलिंगसेने**च्या विवाहाकरितां उत्तम मुहूर्त आजच कां पहात नाहीं? मला वाटतें असा उत्तम योग जमून आला आहे; तेव्हां मंगलकार्य लवकर उरकून घ्यावें, हें फार चांगलें. मग सरकारची मर्जी असेल ती खरी."

हें त्याचें बोलणें केवळ वरपंगी होतें. मनांत हेतू निराळाच होता; पण सरळस्वभावाच्या अथवा **कलिंगसेने**चा नाद लागल्यामुळें उल्लू झालेल्या राजाला त्याचा मतलब बिलकूल समजला नाहीं. तो खरोखरीच बोलतो आहे, असें समजून राजा ह्मणाला, "होय, माझ्याही मनांत असेंच येतें. त्या **कलिंगसेने**वांचून घटकाभर देखील राहण्यास माझें मन समर्थ होत नाहीं. तेव्हां ज्योतिष्यांला बोलावून आतांच मुहूर्ताचा निश्चय करावा हें चांगलें." असें सांगून त्याणें तत्काल, जवळ चोपदार उभा होता, त्याला ज्योतिष्यांला बोलावून आणण्याविषयीं हुकूम केला. खरोखर बिचारा अगदीं भोळ्या मनाचा. ज्योतिष्यांला आपल्या प्रधानानें आधींच चांगले मथवून ठेवले आहेत; हें त्याला काय माहीत! असो.

राजा, **यौगंधरायणाशीं** लग्नाच्या संबंधाच्याच आणखी कांहीं गोष्टी बोलत आहे, इतक्यांत जोशीबुवांच्या स्वाऱ्या येऊन पोंचल्या. त्यांचा यथायोग्य सत्कार करून **यौगंधरायणानें** नारळ, विडा, दक्षणा वगैरे त्यांच्या पुढें ठेवून; राजाच्या तर्फेनें विवाहाचा मुहूर्त सांगण्याविषयीं प्रश्न केला. तेव्हां त्यांणीं—मेष, वृषभ, मिथुन; अश्विनी, भरणी, कृत्तिका; अशीं कांहीं नांवें घेऊन व कित्येक वेळां बोटें घालून फार वेळ आपसांत विचार करून **यौगंधरायणानें** पूर्वीं सुचवून ठेविल्याप्रमाणें सांगितलें. ते ह्मणाले, "महाराज, एकंदरींत योग तर फार उत्तम आला आहे. छत्तीस गुण पाहिजेत; पण या वेळीं त्यांच्याहीपेक्षां अधिक आले आहेत. मुहूर्त अगदीं उत्तमोत्तम आहे. पण थोडासा विलंब मात्र आहे. आजपासून सहा महिन्यांनीं तो मुहूर्त मिळतो आहे. त्याच्या अलीकडे एकही लग्न चांगलें मिळत नाहीं. या उपर सरकारची मर्जी."

हें ऐकून **यौगंधरायण** ह्मणाला, "अबब! इतका लांब मुहूर्त! सहा महिने ह्मणजे काय थोडे कां झाले? तें कांहीं उपयोगाचें नाहीं. महाराज जोशीबुवा! या कार्याला विलंब अगदीं उपयोगाचा नाहीं. कधीं जमून यायचा नाहीं; असा योग जमून आला आहे. तर तुमचें पाताडें अंमळ लक्ष्यपूर्वक चाळून पहा, आणि काढा कोठला तरी मुहूर्त शोधून. असलें कसलेंहो तुमचें शास्त्र! वधू हातची गेल्यावर तुमचा उत्तमोत्तम मुहूर्त घेऊन काय करायचा आहे!"

**वत्सराजा**पेक्षां लोकांला **यौगंधरायणा**चा दरारा विशेष होता, हें येथें निराळें सांगावयास नको. कारण, ज्यांच्या हातीं काम असतें त्यांला लोक वचकत असतातच. राजाची मुहूर्ताविषयीं आतुरता व त्याचा तो भोळेपणा पाहून ज्योतिष्यांला, त्याच्या मनाप्रमाणें जवळचा मुहूर्त सांगावा असें वाटल्यावांचून राहिलें नसेल व मुहूर्त नसण्याचाही संभव नाहीं; पण समोर बसलेल्या त्या कारस्थानी पुरुषानें जें शिकवून ठेविलें होतें,

त्याच्या बाहेर एक अक्षरतरी बोलण्यास बिचाऱ्या जोश्यांला कोठून धैर्य येणार ! त्यांनीं पहिल्याप्रमाणेंच नन्नाचा पाढा वाचला. तेव्हां बळेंच राग आल्यासारखें दाखवून **यौगंधरायण** राजाला ह्मणाला, "छे! यांत कांहीं अर्थ नाहीं. महाराज, खरोखर सांगतों. या जोश्यांला कांहींच कळत नाहींसें वाटतें. तेव्हां यांला निरोप द्यावा. आणि आपले ते **दैवज्ञवल्लभ** जोशीबुवा, ज्यांचा सरकारांनीं पूर्वीं मोठा सत्कार केला होता. व ज्यांला, इकडून त्यांच्या विद्वत्तेबद्दल जहागीर मिळाली आहे, त्या जोशीबुवांला मुहूर्त विचारावा. ह्मटलें तर ते आतांच यावेत; पण कां आले नाहींत कोणास ठाऊक ? कदाचित् कोठें कामांत गुंतले असतील. त्यांला बोलावून काय तो विचार करावा ह्मणजे झालें." असें सांगून **यौगंधरायणानें** बिचाऱ्या त्या जोश्यांला राजाकडून निरोप देवविला. व ते हिरमुसले होऊन तेथून मुकाट्यानें निघून गेले. **वत्सराजाला** फुरसत मुळींच नव्हती. त्याणें चोपदाराला सांगून **दैवज्ञवल्लभाला** आतांच्या आतां घेऊन येण्याविषयीं हुकूम केला. व 'आतां कसें करावें ? या जोश्यांनीं तर मोठा घात केला. सहा महिने जाईपर्यंत काय होईल कोणास ठाऊक !' अशा प्रकारें तो **यौगंधरायणाशीं** बोलत होता. इतक्यांत कांहीं वेळानें ते जोशीबुवाही आले. पण उपयोग काय ? त्या कारस्थान्यानें त्यालाही पूर्वीं मथवून ठेवलेला होताच.

त्याला पाहतांच **यौगंधरायण** फार खूष झाल्यासारखें दाखवून ह्मणाला, "वाहवा ! मीं ह्मटलें स्वारी कोठें गेली असेल कोणास ठाऊक ? पण गांठ पडली हें ठीक झालें. सरकार, घ्या आतां पाहिजे तितके मुहूर्त. विद्वानांची गोष्टच निराळी. मघां तीं कोठलीं भेकडें आणलीं होतीं. तीं अगदीं कुचकामाचीं. मला त्यांचा खरोखरच फार राग आला. म्हणे, सहा महिन्यांच्या आंत लग्नाचा मुहूर्त मिळत नाहीं. याचा अर्थ काय ? मग हे आपल्याला ज्योतिषी तरी कशाला ह्मणवून

घेतात?" त्या जोश्याला ह्मणाला, "बरें, जोशीबुवा, विचार करून पहा. सगळें तुमचें शास्त्र धुंडाळा, आणि लवकर असा एक लग्नाचा मुहूर्त सांगा. पाहूंया बरें आतां तुह्मी काय करतां तें."

हें ऐकून भिक्षुकी संप्रदायाप्रमाणें—'नाहीं नाहीं, मी काय आपला, मला काय येतें, सरकार माझ्यावर लोभ करतात एवढेंच काय तें, माझ्यापेक्षां ते दुसरे ज्योतिषी मोठे विद्वान् आहेत; सरकारच्या हुकुमाप्रमाणें मुहूर्त मिळतो कां पाहतों.' असें बोलून व पुष्कळ वेळ बोटें घालून, पंचांग उलटून सुलटून पाहून, तोंड अंमळ वांकडें करून **दैवज्ञवल्लभ** राजाला ह्मणाला, "महाराज, क्षमा असावी. यांत माझा कांहीं अपराध नाहीं. पंचांगांत असेल तेंच सांगितलें पाहिजे. येथें पदरचें कांहीं सांगायचें नाहीं. मुहूर्त तर फार उत्तम आहे; पण सहा महिन्यांच्या आंत नाहीं. याविषयीं माझा नाइलाज आहे!"

बापडे ज्योतिषी मुहूर्त देतील कोठला? साऱ्या जोश्यांचा महाजोशी जवळ बसला होता! मुहूर्त त्याच्या बगलेंत होता. बिचाऱ्या जोश्यांजवळ होतें काय? असो. **यौगंधरायणा**ला आतां आपली मसलत पक्की करायची होती. **दैवज्ञवल्लभानें** सांगितलें तें ऐकून विषण्ण होऊन तो राजाला ह्मणाला, 'सरकार, आतां मात्र कांहीं इलाज नाहीं. कारण हे जोशीबुवा देखील जेव्हां मुहूर्त नाहीं ह्मणतात; तेव्हां आतां कांहीं संशय ह्मणून राहिला नाहीं." जोश्याकडे वळून ह्मणाला, "अहो, तुमच्यावर आमची फारच भिस्त होती कीं, तुह्मी मुहूर्त सांगालच ह्मणून. असो. पण तुमचा तरी काय इलाज. नसलाच तर तुह्मी कोठून सांगणार?"

राजा **कलिंगसेनेशीं** विवाह करून घेण्याविषयीं अतिशय आतुर झाला असल्यामुळें; त्याला सहा महिनेपर्यंत दम धरणें फारच कठिण वाटलें. कामी पुरुषांचा इच्छित हेतू सिद्ध होण्याविषयीं विलंब लागला असतां त्यांची जशी स्थिती होते, तशीच **वत्सराजा**चीही झाली. ती पाहून **यौगंधरायणानें** खूपच बतावणी केली. **कलिंगसे**-

नेशीं राजाचा विवाह होणें; हें त्याला मनापासून इष्ट नव्हतें, हें वर सांगितलेंच आहे. तेव्हां त्याला उद्वेग होण्याचें कांहीं कारण नव्हतें. तथापि आपला हेतू राजाच्या मुळींच लक्ष्यांत येऊं देऊं नये; ह्मणून त्याणें उद्विग्न झाल्यासारखें दाखवून आपला खरा हेतू छपविला. आणि राजाला ह्मणाला, "महाराज, हा मोठा बिकट प्रसंग प्राप्त झाला आहे. सहा महिने पर्यंत वाट पहात बसणें; हें मला तर योग्य वाटत नाहीं. दैवानें प्राप्त झालेलें तें अमोलिक स्त्रीरत्न हरण करण्याविषयीं देवादिकांच्यादेखील खटपटी चालल्या असतील. तेव्हां माझी तर मती येथें अगदीं गुंग झाली आहे. काय करावें तें मुळींच सुचत नाहीं. याकरितां पुढें काय करावें त्याची आपणच आज्ञा करावी."

राजाला **यौगंधरायण** बोलतो तें अगदीं खरें आहेसें वाटलें. विवाहाला उत्तम मुहूर्त मिळावा अशी तर त्याची इच्छा होती; पण तो लवकर मिळत नाहीं ह्मणून अंमळ विचार करून तो ह्मणाला, "प्रधानजी, तुमच्याप्रमाणेंच मलाही मोठा विचार पडला आहे. याकरितां आतां **कलिंगसेने**लाच याविषयीं विचारावें. तिचें काय मत आहे तें तर आधीं समजून घ्या. मग पुढें काय होतें तें पाहूं."

राजानें मुहूर्ताची जरूर नाहीं असें स्पष्टपणें तर सांगितलें नाहीं; तथापि **कलिंगसेना** अनुमोदन देईल; तर मुहूर्त नसला तरी चालेल असें राजाच्या मनांत आलें आहे, हें **यौगंधरायणाला** तेव्हांच समजलें. तेव्हां तिकडचा बंदोबस्त करण्याकरितां दोघे ज्योतिषी बरोबर घेऊन **यौगंधरायण कलिंगसेने**कडे गेला. **वत्सराजाचा** मुख्य प्रधान मोठा तेजस्वी असून नांव लौकिकाचा असल्यामुळें त्याचा असत्कार कसा होणार! त्यांतून **कलिंगसेने**ला आपला हेतू सिद्ध होण्याकरितां त्याला प्रसन्न करून घेणें फारच अगत्याचें होतें. अर्थात् तिणें **यौगंधरायणा**चा मोठा सत्कार केला, व आपली शालीनता दाखवून त्याला राजी करण्याचा प्रयत्न केला. पण

**यौगंधरायण** यावेळीं तिच्याजवळ मोकळ्या मनानें आला नव्हता. त्याणें तिचें तें अलौकिक सौंदर्य पाहिलें. व त्यापासून त्याची मनोवृत्ति प्रसन्न न होतां उलट झाली. तो मनांत ह्मणाला, या स्त्रीचें हें अनुपम लावण्य खरोखर मोठें मोहक आहे; पण उपयोग काय? याच्या योगानें आह्मांस अपाय होणार आहे. आधींच आमच्या राजाला स्त्रियांचा नाद विशेष. त्यांतून अशा रत्नाची गांठ पडल्यावर मग तो कसली पर्वा करणार आहे? तो सारें राज्यदेखील सोडून देईल. तेव्हां असंख्य रयतेच्या कल्याणाकरतां मला यावेळीं आपलें मन फार कठोर केलें पाहिजे. नाहींतर हें राज्य अराजक होण्याचा समय येईल! असो.

याप्रमाणें विचार करून **यौगंधरायण कलिंगसेने**ला ह्मणाला, "राजकन्ये, तुझ्या विवाहाची सर्व तयारी झाली आहे. तूं आमची धनीन होणार याबद्दल आम्हांस अतिशय आनंद वाटतो. आतां काय तो मुहूर्ताचा निश्चय करायचा राहिला आहे. व त्याकरितांच हे ज्योतिषी बरोबर घेऊन आलों आहें. तर तुझें जन्मनक्षत्र काय आहे तें सांग पाहूं. ईश्वरकृपेनें मुहूर्त अगदीं जवळचा मिळाला ह्मणजे झालें. बाकी कोणचीच हरकत नाहीं."

त्या भोळ्या **कलिंगसेने**ला **यौगंधरायणा**सारख्या कारस्थानी पुरुषाचा हेतू कसा कळावा? तिला त्याचें भाषण अगदीं खरें वाटलें. व अविवाहित मुलींच्या संप्रदायाप्रमाणें लाजून तिणें मान खालीं घातली. तेव्हां तिच्या जवळ जी दासी उभी होती, तिणें पुढें होऊन तिचें जन्मनक्षत्र सांगितलें. तें ऐकतांच ज्योतिषीबुवांनीं—मेष, वृषभ; अश्विनी, भरणी; करायला सुरवात केली. **यौगंधरायणानें** त्यांना पूर्वींच खरमरीत ताकीद देऊन ठेवली होती. तेव्हां जरी वधूवरांच्या नक्षत्राला पटलें; व मुहूर्तही जवळचाच मिळाला होता; तरी तसें सांगण्याची त्यांची प्राज्ञा कोठून होणार? बराच वेळ विचार क-

रून त्यांणीं पूर्वीप्रमाणेंच—'सहा महिन्यांच्या आंत चागला मुहूर्त मिळत नाहीं' असें सांगितलें. **वत्सराजा**जवळ जसें ढोंग केलें होतें; तसेंच **कलिंगसेने**जवळही **यौगंधरायणानें** केलें. ज्योतिष्यांची पुष्कळ निर्भर्त्सना केली. व कसेंही करून मुहूर्त लवकर देण्याविषयीं त्यांना आग्रहपूर्वक सांगितलें. तेव्हां बिचाऱ्या जोश्यांनीं पुन्हां विचार करतों असें सांगून; बोटें घालण्याची सुरवात केली. पण त्याचा उपयोग काय ? उत्तर काय सांगायचें तें पूर्वीं ठरलेलेंच होतें. 'सहा महिन्यांच्या आलीकडे मुळींच मुहूर्त मिळत नाहीं' असें त्यांणीं स्पष्ट सांगितलें.

ज्योतिष्यांचें भाषण ऐकून **कलिंगसेना** आणि **यौगंधरायण** या दोघांचाही चेहरा उतरला; पण त्यांत **कलिंगसेने**ची मात्र खरोखर तशी स्थिती होती. **वत्सराजा**प्रमाणें तीही त्याच्या समागमाविषयीं फार आतुर झाली होती, हें तिच्या पूर्वींच्या वर्तनावरून स्पष्टच दिसणार आहे. सहा महिने लग्नाला अवकाश लागणार; हें ऐकून ती फारच उदास झाली. यावेळीं ती तिची स्थिती पाहून तिच्याबरोबर आलेला जाणता मनुष्य—जो तिचा अत्यंत विश्वासूक होता तो—ज्योतिष्यांला ह्मणाला, "अहो महाराज जोशीबुवा, सहा महिन्यांपूर्वीं मुहूर्त मिळत नाहीं, असें तर आपण सांगितलें; पण यासंबंधानें माझी गरिबाची थोडिशी विनंती ऐका. लग्नाच्या मुहूर्ताला पुष्कळ योग अनुकूल पहावे लागतात. तेव्हां तशाप्रकारचा—सर्व योग अनुकूल असलेला—मुहूर्त कदाचित् सहा महिन्यांपूर्वीं मिळण्यासारखा नसेल. तथापि एखादा योग कमी असून मुहूर्त मिळत असेल तर पहावा. वधू आणि वर हे उभयतांही, हें कार्य लवकर उरकून घेण्याविषयीं फार आतुर आहेत, असें दिसतें. तेव्हां लवकर झालें तर बरें."

त्या वृद्ध मनुष्याचें हें भाषण ऐकून **यौगंधरायणानें** आपलेंही असेंच मत आहे, असें दर्शवून ज्योतिष्यांला इषारा केला. तेव्हां त्यांणीं पुनरपि पूर्वीप्रमाणेंच ठरीव उत्तर दिलें. ज्योतिषी मुहूर्त नाहींच ह्म-

तात, तेव्हां कांहीं उपाय नाहीं. असें समजून तो ज्ञातारा पुनः
णाला, "बरें, आपण मुहूर्त नाहींच ह्मणतां, त्यापेक्षां उगीच आपल्याला
म देण्यांत कांहीं अर्थ नाहीं. वधूवरांचें कल्याण होईल अशा प्रकारचा
हूर्त पहा ह्मणजे झालें. मग तो लवकर मिळाला काय आणि थोडे
वस लागले काय. सहा महिने ह्मणजे कांहीं फार नाहींत. हां हां
णतां निघून जातील."

हे त्या जाणत्या मनुष्याचें भाषण तेथें असलेल्या सर्व मंडळीला पसंत
डलें. उघडच आहे, मुहूर्त चांगला नसावा असें कोण ह्मणेल? पण
ांतली खरी स्थिती काय आहे, ती त्यांपैकीं एकालाही माहीत नव्हती.
पाणें त्याणें—'हो हो, असेंच झालें पाहिजे. मुहूर्त चांगला मिळाला
ाहिजे. नाहींतर काय उपयोग. लग्न ह्मणजे जन्माच्या गांठी आहेत.
शा कामांत घाई उपयोगाची नाहीं.' असे आपले अभिप्राय ठोकून
ले. याप्रमाणें ज्याला त्याला मुहूर्त चांगला पाहिजे, ही गोष्ट मान्य
ाहे, असें पाहून **यौगंधरायण** ह्मणाला, "अरे बाप रे! वाईट साईट
लत्याच मुहूर्तावर लग्न केलें; तर त्यापासून फार वाईट परिणाम होईल.
शांत राजा **कलिंगदत्त** हा आमचा व्याही होणार; त्याला अशी गोष्ट
ळींच खपायची नाहीं. तेव्हां विनाकारण घाई करून उपयोग नाहीं."

याप्रमाणें सर्वांनीं चांगला मुहूर्त मिळण्याची आवश्यकता दाखवून
वाहाचा योग लांबणीवर पडला तरी हरकत नाहीं; असें दाखविलें.
व्हां **कलिंगसेने**लाही निमूटपणें त्यांच्या ह्मणण्याला अनुमोदन द्यावें
ागलें. यावेळीं ती फार उदास व दुःखी झाली होती; तरी तो भाव
दाखवितां ती ह्मणाली, "तुह्मी सारेच असें ह्मणत असाल; तर
ं उगीच हेका धरून उपयोग काय? जसें तुह्मांला योग्य वाटत
सेल तसें करा."

याप्रमाणें बोलून **कलिंगसेना** स्तब्ध बसली. तिणें विवाह लांबणीवर
ाकण्याविषयीं मनापासून अनुमोदन दिलें नव्हतें, हें येथें पुनः सांगा-

षयास नको. तथापि, 'तुह्मास योग्य वाटत असेल तसें करा' हेच तिच्या तोंडचे शब्द घेऊन **यौगंधरायणा**ला आपली मसलत पार पाडतां आली. तो तत्काल उठून उभा राहिला. व मोठ्या गौलतेनें—"वाहवा! शहाण्या मनुष्याची बलाय दूर. आपण कांहीं काळजी करूं नये. यथाकालीं सर्व गोष्टी आपल्या मनाप्रमाणेंच होतील," असें बोलून त्याणें तिचा निरोप घेतला. व जोतिष्यांसहवर्तमान तो पुनः **वत्सराजा**कडे गेला. बिचारा **वत्सराज** त्याची वाटच पहात होता. सहा महिन्यांनीं विवाह होणें; ही गोष्ट **कलिंगसेने**ला मान्य व्हायची नाहीं. व ती आतांच करण्याविषयीं आग्रह करील. आणि त्या योगानें आपला मनोरथ सिद्धीस जाईल, असें त्याला वाटलें होतें. वस्तुतः **वत्सराज** अगदीं स्वतंत्र होता. त्याच्या मनांत जी गोष्ट करावीशी वाटेल; ती करण्याविषयीं त्याला कोणाचाही प्रतिबंध नव्हता. तथापि, **यौगंधरायणा**सारख्या राजकार्यधुरंधराचें मत अमान्य करावें; व मुहूर्तादिकांकडे दुर्लक्ष्य करावें; ही गोष्ट त्याला अंमळ कठीण वाटूं लागली. कितीही स्वतंत्रता असली; तरी ज्ञात्या मनुष्याला आपल्या हितकर्त्याचा अभिप्राय सहसा अमान्य करतां येत नाहीं. अशा स्थितींत तो युक्तीप्रयुक्तीनेंच आपला इष्ट हेतू साधण्याविषयीं प्रयत्न करीत असतो. **वत्सराजा**चीही यावेळीं अशीच स्थिती होती. व ह्मणूनच त्याणें **कलिंगसेने**चा अभिप्राय घेण्याची युक्ति योजली होती; पण **यौगंधरायणा**नें राजाला तिचा फायदा मिळूं दिला नाहीं. असो.

**कलिंगसेने**कडे गेल्यावर कसें काय झालें? तिच्याबरोबरच्या लोकांचा अभिप्राय कसा आहे? व स्वतः तिणें काय ह्मटलें? तें राजाला सांगून—निरुपायास्तव आतां सहा महिनेपर्यंत आपण कशी तरी मनाची विश्रांति करावी, असें समजावून **यौगंधरायणा**नें राजाचें मन अंमळ स्थिर केलें. व त्याचा निरोप घेऊन तो आपल्या घराकडे गेला. हावेळपर्यंत त्याणें ज्या युक्ति योजल्या, त्या बऱ्याच फलद्रूप झाल्या.

**कलिंगसेने**शीं राजाचा विवाह होऊं द्यायचा नाहीं, हा जो त्याचा मुख्य कार्यभाग त्याची अर्धी तयारी झाली. आतां सहा महिन्यांच्या अवधींत **कलिंगसेने**विषयीं राजाचा ग्रह प्रतिकूळ करवून; सहा महिन्यांनंतर तिच्याशीं विवाह करून घ्यावयाचा असा जो त्याचा हेतू होता, तो समूळ नाहींसा करून, तो तिच्याविषयीं निरिच्छ होईल असें **यौगंधरायणा**ला करायचें होतें. ह्मणून तो पुढच्या तयारीस लागला.

**वत्सराज चंडमहासेना**च्या येथें **उज्जयिनीं**त प्रतिबंधांत असतां, त्याला सोडविण्याकरतां **यौगंधरायण** तिकडे गेला होता. व **उज्जयिनी**च्या स्मशानांत त्याची **योगेश्वर** नांवाच्या एका ब्रह्मराक्षसाशीं मैत्री झाली होती. व 'तूं स्मरण करशील; त्यावेळीं मी येऊन तुझें साह्य करीन' असें त्या ब्रह्मराक्षसानें **यौगंधरायणा**ला वरदान दिलें होतें, हें पूर्वीं[1] सांगितलेंच आहे. यावेळीं त्याच्या साह्याची गरज आहे; असें वाटल्यावरून **यौगंधरायणा**नें तो आपला मित्र **योगेश्वर** याचें स्मरण केलें. **योगेश्वरा**नें त्याला साह्य करण्याचें कबूलच केलें होतें. व तो ब्रह्मराक्षस असल्यामुळें क्षणमात्रांत त्याला पाहिजे त्या ठिकाणीं जाण्याचें सामर्थ्य होतें. ह्मणून **यौगंधरायणा**नें स्मरण करतांच तो तत्काल त्याच्या पुढें प्रकट झाला. व स्नेहपूर्वक त्याला नमस्कार करून ह्मणाला, "मित्रा, मी वरचेवर तुझा समागम व्हावा ह्मणून तुला साह्य करण्याचें वचन दिलें; पण तूं त्याचा हावेळपर्यंत मुळींच उपयोग केला नाहींस. तुझें बुद्धिसामर्थ्य अलौकिक असल्यामुळें; माझ्या सारख्याच्या साह्याची तुला काय गरज पडणार? आज इतक्या वर्षांत तूं माझी कधींच आठवण केली नाहींस; तेव्हां पुढें तरी कधीं करशील असें मला वाटलें नव्हतें. पण आज कृपा करून तूं हा योग आणलास याचा मला फार आनंद वाटतो. बरें आतां ज्या कामाकरतां तूं माझें स्मरण केलेंस, तें काय तें सांग?"

१ याविषयीं भाग पहिला पृष्ठ २४८--४९ पहा.

**योगेश्वराचें** हें भाषण ऐकून **यौगंधरायणानें** स्नेहपूर्वक त्याचें मोठें गौरव केलें. व **कलिंगसेनेवर वत्सराजाचें** मन बसलें असून; त्यापासून पुढें कसकसा अनर्थ होणार आहे ती सर्व हकीकत त्याला सांगितली. आणि हें संकट टाळण्याकरतां आपण काय युक्ति योजली आहे, ती सांगून ह्मणाला, "मित्रा **योगेश्वरा,** अशुभ गोष्ट होईल तो प्रयत्न करून लांबणीवर टाकावी; असें नीतिशास्त्रज्ञांचें मत आहे. त्याप्रमाणें मी युक्तीप्रयुक्तीनें, **कलिंगसेने**चा विवाह आजच होणार होता तो, सहा महिने लांबविला आहे. तरी हें अरिष्ट पुरतेपणीं टळलें असें ह्मणतां येत नाहीं. कारण आमच्या महाराजांची सर्व इंद्रियें त्या **कलिंगसेने**कडे लागलीं आहेत. तेव्हां सहा महिन्यांनंतर हा प्रसंग आल्यावांचून राहणार नाहीं. याकरतां तो कोणत्याही रितीनें टळेल असें केलें पाहिजे. मी आपल्या ठिकाणीं पुष्कळ विचार केला; पण दुसरा योग्य उपाय मुळींच दिसला नाहीं. राजाचें मन तिच्यावर फार आसक्त झालें आहे. तें इतर कोणत्याही उपायानें मागें हटवितां येणार नाहीं. एकमात्र उपाय अगदीं फत्ते करणारा आहे. तो कोणता ह्मणशील; तर त्या **कलिंगसेनेचें** कांहीं वाईट वर्तन राजाच्या नजरेस पडेल असें करणें हाच होय! असें झालें ह्मणजे तो मग तिचें नांव देखील घेणार नाहीं. पण हें काम तुझ्यावांचून व्हायचें नाहीं. उगीच कुभांड रचून तिला दूषित करावी, ही गोष्ट मला मुळींच मान्य नाहीं. तिचें अप्रतिम रूप व गुण पाहून—देव, गंधर्व, विद्याधर इत्यादिक तिचा अभिलाष करीत असतील; व कांहीं तरी कपट करून तिला वश करण्याविषयीं त्यांचा प्रयत्न चालू असेल. ह्मणून मला असें वाटतें कीं; सूक्ष्म दृष्टीनें तिच्यावर नजर ठेवली तर या सहा महिन्यांच्या अवधींत तिचें कांहींतरी दूषण मिळण्याचा संभव आहे; पण हें काम दुसऱ्या कोणाच्यानेंही होणार नाहीं. तूं योगसामर्थ्यानें गुप्तरूपानें तिच्या महालांत राहून पाहूं शकशील. याकरतां

मी तुला असें सांगतों कीं, एखादा विद्याधर, सिद्ध किंवा गंधर्व अथवा दुसऱ्या कोणत्याही दिव्य पुरुषाशीं तिचा समागम होईल तर तूं लक्ष्यपूर्वक पाहून मला सांग, ह्मणजे आमची मसलत सफळ होईल. आतां तुला मी एक खुणेची गोष्ट सांगतों. जो कोणी दिव्य पुरुष तिचा उपभोग करण्याविषयीं येईल; तो बहुत करून रूपांतर करूनच येईल. तेव्हां तुला तो कोण, हें ओळखणें कठीण पडेल. याकरितां ही गोष्ट तूं चांगली लक्ष्यांत ठेव कीं, जरी त्याणें रूपांतर केलें असलें; तरी निजायच्या वेळीं त्याला आपलें खरें रूप असेल तेंच घ्यावें लागेल. कारण दिव्य पुरुष प्रसंगीं हवें तें रूप घेतात; पण झोंपी जाण्याच्यावेळीं ते निजरूपानेंच असतात. तेव्हां तशावेळीं तूं पाहिलेंस, ह्मणजे तुला त्या पुरुषाचें खरें रूप ओळखतां येईल. याप्रमाणें तुझ्या द्वारानें तिचा दोष आमच्या नजरेस आला, ह्मणजे आह्मी तो राजाला कळवूं. व तसें झालें ह्मणजे राजा तिच्याविषयीं विरस होईल. आणि अर्थात् आमचें काम सिद्ध होईल!”

**यौगंधरायणानें** याप्रमाणें सांगितलें; तें ऐकून **योगेश्वराला** त्याचा तो द्राविडी प्राणायाम आहे असें वाटलें. बोलूनचालून पिशाचच तो. त्याला धर्म, अधर्म, किंवा कार्य, अकार्य यांचा विधिनिषेध कोठून असणार? तो ह्मणाला, “ मित्रा **यौगंधरायणा,** तूं सांगशील तें काम करण्यास मी सिद्ध आहें. पण, हा एवढा दीर्घ प्रयत्न कशास पाहिजे? मी महिन्यांच्या महिने डोळ्यांत तेल घालून एकसारखें तिचें वर्तन पहात रहावें. व तोंपर्यंत मसलत सिद्ध होईल किंवा नाहीं, याविषयीं तुझ्या मनाला अस्वस्थता असावी, ती कां? बरें, इतकेंही करून तुझा हेतू सिद्ध होईलच अशी तरी खातरी कशावरून? कदाचित् कोणी दिव्य पुरुष आलाच नाहीं, किंवा ती त्याला वश झाली नाहीं; तर मग काय उपयोग? माझा प्रयत्न आणि तुझी मसलत व्यर्थ जाईल कीं नाहीं? ह्मणून मला असें वाटतें कीं; ह्या

पंचाइतींत मुळींच पडूं नये. सिद्धांची आणि विद्याधरांची काय गरज आहे. मी हवें तें रूप घेण्यास समर्थ आहें. तूं मलाच सांग ह्मणजे झालें. मी पाहिजे त्या रितीनें तिला फसवून तिचें कुमारीपण भ्रष्ट करतों! ह्मणजे तुझी मसलत सफळ होईल. पण इतकें तरी कशास? तिला मारूनच टाकतों ह्मणजे सारेंच अरिष्ट टळलेंसें होईल. या कामाला विलंब मुळींच लागणार नाहीं. व संशय घेण्यालाही जागा नाहीं. असें आहे. पहा बुवा तुला कसें वाटतें तें."

त्या पिशाचानें असें सांगितलें; पण **यौगंधरायणाला** ती गोष्ट मान्य झाली नाहीं. तो ह्मणाला, "शिव शिव!! त्याचा उच्चार देखील करूं नकोस. यारितीनें बिचाऱ्या त्या स्त्रीला फसविलें अथवा तिचा घात केला असतां मोठा अधर्म होणार आहे. वस्तुतः मीं जी मसलत आरंभिली आहे; ती देखील मला बरीशी वाटत नाहीं. कारण आपले आईबाप, घरदार वगैरे सोडून—केवळ स्नेहपाशानें बद्ध होऊन आलेली; व त्रैलोक्यांत केवळ रत्नभूत, अशा अनाथ अबलेविषयीं मनांत कपट आणणें; हें तरी वाईटच. पण काय करावें! निरुपायास्तव मला तसें करणें भाग आहे. त्या एकट्या **कलिंगसेने**च्या हिताकडे दृष्टि द्यावी; तर आमच्या साऱ्या राज्याचा नाश होण्याचा संभव आहे. ह्मणून मला आपलें मन घट्ट करावें लागलें. तिचें दूषण राजाच्या नजरेस आणावें अशी माझी इच्छा आहे; तथापि, ती वाईट रितीनें सिद्ध करायची नाहीं. धर्माला न सोडतां जो मनुष्य आपल्या शहाणपणानें एखादा मार्ग निश्चित करून त्या धोरणानें वागतो; त्याचा इष्ट हेतू सिद्ध करण्याविषयीं धर्मच साह्यकारी होतो. या करितां मी तुला असें सांगतों कीं; तूं भलतेंसलतें कांहीं करूं नकोस. मुद्दाम तिला दूषित करण्याचा प्रयत्न मुळींच करूं नकोस. तसें करायचें असतें तर मला तुझ्या साहाय्याची बिलकूल गरज पडली नसती. तूं इतकेंच कर कीं; स्वतः तिच्याकडून

जो दोष घडेल; तो तूं लक्ष्यपूर्वक पाहून मला येऊन सांग, ह्मणजे झालें. मित्रा **योगेश्वरा,** तूं ऐवढें काम करशील तर तुझ्या साह्यानें आह्मीं एक मोठें राजकारण पार पाडलें असें होईल."

**यौगंधरायणा**नें याप्रमाणें **योगेश्वरा**ला सांगितलें. व कांहीं भलतें सलतें न करण्याविषयीं त्याच्याकडून आणभाक घेऊन त्याला निरोप दिला. तेव्हां **योगेश्वर** गुप्तरूप धारण करून **कलिंगसेना** ज्या महालांत रहात होती; त्यांत शिरून तिच्या वर्तनावर नजर लावून बसला. इकडे **मयासुरा**ची कन्या **सोमप्रभा,** आपली मैत्रीण जी **कलिंगसेना** तिच्याजवळ पुनः प्राप्त झाली. उभयतां मैत्रीणी एकमेकीला प्रेमपूर्वक आलिंगन देऊन एका आसनावर बसल्या. **सोमप्रभेनें** गेल्या रात्रीं काय काय झालें तें विचारलें; व **कलिंगसेनेनें** तिला झालेली हकीकत इत्थंभूत सांगितली. ब्रह्मराक्षस **योगेश्वर** गुप्तरूपानें ऐकत असतां **सोमप्रभा कलिंगसेने**ला ह्मणाली, "सखि **कलिंगसेने,** मला गेल्या रात्रीं अगदीं चैन पडली नाही. तुझें कसें झालें असेल? तूं काय केलेंस? या गोष्टी रात्रभर माझ्या मनांत घोळत होत्या. ह्मणून मोठ्या सकाळींच मी आपल्या पतीचा निरोप घेऊन तुला शोधीत लवकर येथें आलें. पण त्यावेळीं **यौगंधरायण** तुझ्या जवळ बोलत बसला होता, ह्मणून प्रकट न होतां मी छपून राहिलें. त्याचा आणि तुझा काय संवाद झाला तो सर्व मीं ऐकला. व पुढें काय होणार तेंही माझ्या लक्षांत आलें. एकंदरींत तुझा परिणाम चांगला होईल असें मला वाटत नाहीं. मी तुला काल, **वत्सराजा**कडे निरोप पाठवूं नकोस; किंवा लग्नाविषयीं कांहींच उद्योग करूं नकोस, असें सांगितलें असून मुद्दाम इतकी घाई कां केलीस ? पुढें येणाऱ्या अडचणी दूर केल्यावांचून कोणत्याही कार्याचा आरंभ केला; तर त्याचा परिणाम अनिष्टच होतो. मला हें सर्व ठाऊक होतें. ह्मणूनच मी तुला काल कांहीं गोष्ट काढूं नको; ह्मणून सांगितलें होतें. पण तूं तें ऐकलें ना-

हाँस. असो. अविचारानें कार्याला आरंभ केला ह्मणजे त्याचा परिणाम वाईट कसा होतो याविषयीं मी तुला एक इतिहास सांगतें; तो ऐक.

अंतर्वेदींत[1] पूर्वी **वसुदत्त** नांवाचा एक ब्राह्मण रहात होता. त्याचा **विष्णुदत्त** नांवाचा एकुलता एक असून मोठा बुद्धिमान् पुत्र होता. त्याचें वय सुमारें सोळा वर्षांचें होऊन गेलें होतें; तरी हावेळपर्यंत त्याला कांहीं शिक्षण मिळालें नव्हतें. **वसुदत्त** हा बराच मोठा पैशेवाला होता. त्याची विद्वत्ता वगैरे तितपतच होती व त्या गांवांत कोणी मोठा विद्वानही नव्हता. आईबापांच्या लाडांत हां हां ह्मणतां **विष्णुदत्ताचीं** सोळा वर्षें केव्हांच निघून गेलीं. विद्यासंपादन करण्याचे दिवस या रितीनें गेले; तरी हावेळपर्यंत त्याला त्याविषयीं विशेषसें कांहीं वाटलें नाहीं. आईबापांकडूनही विद्यासंपादनाविषयीं मुळींच आग्रह नव्हता. घरांत ऐश्वर्य भरलेलें आहे. तेव्हां मुलानें खाऊन पिऊन खुशाल चैन करावी, असाच त्यांचा हेतू होता. पण **विष्णुदत्त** प्रौढ झाल्यावर त्याला—विद्येवांचून आपलें जिणें व्यर्थ आहे, असें वाटूं लागलें. कोठें-तरी जाऊन अध्ययन करावें, असा त्याचा निश्चय झाला. त्या एकुलत्या एका पुत्राला बाहेर गांवीं पाठविण्याविषयीं आईबाप तयार होईनात, यामुळें त्याचा निरुपाय झाला.

त्या गांवांत आणखीही ब्राह्मणवस्ती बरीच होती. त्यांपैकीं, वयानें आपल्या बरोबरीचे अशा निरनिराळ्या घरच्या सात ब्राह्मणांच्या मुलांशीं **विष्णुदत्ताची** मैत्री झाली होती. वस्तूतः ते सातही त्याचे मित्र अगदीं मुर्ख होते. त्यांच्यांत बुद्धिमान् व कुलीन काय तो **विष्णुदत्तच**

---

१ गंगा आणि यमुना या दोन महानद्यांच्या मधल्या प्रदेशाला अंतर्वेदि म्हणतात. हा प्रदेश बराच मोठा असून प्राचीन धर्मशास्त्रकारांनीं अत्यंत पवित्र मानला आहे. मोठमोठे ऋषि व धर्मिष्ठ राजे यांणीं अनेक ज्योतिष्टोम, अश्वमेध, राजसूय इत्यादि यज्ञ करण्याला योग्य हाच प्रदेश मानला आहे. वैदिक धर्माचें स्थान अंतर्वेदि हेंच होय. यालाच आर्यावर्त्त असेंही कित्येक ठिकाणीं ह्मटल्याचें आढळतें.

होता. आईबापांनीं त्याला अनुमोदन दिलें नाहीं. तरी त्याच्या मनांतला हेतू शिथिल झाला नाहीं. कोणाला न सांगतां आपण विद्याभ्यास करण्याकरतां जावें; असा त्याणें पक्का निश्चय केला. **वलभी** नांवाची नगरी त्यावेळीं विद्येच्या संबंधानें मोठी प्रसिद्ध होती. तेव्हां तेथें जाऊन विद्याभ्यास करावा असा त्याणें निश्चय केला. यद्यपि त्याचे ते सात असामी सोबती अगदीं शुंठ होते; तथापि परदेशांत जायचें; तेव्हां बरोबर सोबत असावी. व कदाचित् दैवयोगानें त्यांलाही दोन अक्षरें प्राप्त होतील, असा विचार करून **विष्णुदत्तानें** त्या सातही मित्रांला आपल्या मसलतींत घेतलें. व सर्वांनीं आपापल्या घरच्या माणसांस बिलकूल न कळवितां निघून जाण्याचा ठराव केला. त्यांणीं घरांतून निघण्यापूर्वीं एकमेकांला सोडायचें नाहीं, अशा आपल्यांत शपथा आणा घेऊन; आपली गट्टी कायम केली. व नंतर नियमित दिवशीं अपरात्रीं कोणास न कळतां ते तेथून निघाले.

**सूर्योदय** होईपर्यंत त्यांणीं बराच दूरचा पल्ला झेंपला. पोरपणांत, घरच्या माणसांच्या धाकांतून सुटण्याचा योग आला, ह्मणजे मोठा आनंद वाटतो, याचा बहुतकरून पुष्कळांस अनुभव असेल. त्याप्रमाणें **विष्णुदत्त** व त्याचे सोबती यावेळीं मोठ्या आनंदांत होते. पाठीमागून धरणें येईल, याचीच कायती त्यांना काळजी होती, ह्मणून ते जिवाकडे न पाहतां एकसारखे धांवत होते. हावेळपर्यंत रात्रींचा समय असल्यामुळें, आपण निघतांना शकून वगैरे चांगले झाले किंवा नाहीं, तें त्यांना समजलें नाहीं; पण आतां **सूर्याचा** उदय झाला होता. व एकावर एक अशीं अनेक दुःश्विन्हें दिसूं लागलीं. **विष्णुदत्त** मोठा विद्वान् नव्हता; तरी त्याचें घराणें प्रतिष्ठित असून तो स्वतः मोठा बुद्धिमान् व चाणक्ष होता. त्याणें वारंवार अपशकुन होतात, हें पाहून, यावेळीं पुढें जाणें धोक्याचें आहे असें मनांत आणलें, व आपल्या मित्रांला सांगून त्यांचें मन वळवावें ह्मणून तो ह्मणाला,

"गडे हो, आपण चांगलाच इरादा करून निघालों आहों; तथापि आपल्यास फार दूर जायचें आहे. व पुष्कळ दिवस तेथें राहणेंही होणार आहे. तेव्हां आपण मुहूर्त वगैरे चांगला न पाहतां निघालों हें वाईट केलें. आतां, हे पहा आपल्याला अपशकुन होत आहेत. निदान आजचा दिवस तरी आपण पुढें जाण्याचा बेत रहित करावा हें बरें. आज आपण मुकाट्यानें परत आपापल्या घरीं जाऊं या. पुढ चांगला मुहूर्त पाहून शुभशकुनावर प्रयाण करूं, ह्मणजे इच्छित हेतू सिद्धीस जाईल."

**विष्णुदत्त** समजूतदार होता; ह्मणून त्याच्या मनांत हे विचार आले. पण ते त्याच्या सोबत्यांला कसे मान्य होणार? ते ह्मणाले, "बाबा तूं तर मोठाच भित्रा आहेस! असल्या भलभलत्या शंका काढून उगीच विक्षेप आणूं नकोस. आह्मांला असल्या ह्या शकुनांबिकुनांची मुळींच पर्वा वाटत नाहीं. तुला जर यांचें भय वाटत असेल; तर नको येऊंस बापडा आमच्या बरोबर. आह्मीतर आपले असेच पुढें जाणार. मोठ्या मुष्किलीनें एकदां कोठें आह्मांस निघण्याची सवड मिळाली. पुनः अशी मिळेल ह्मणून नेम काय? आणि यावेळीं दिवस किती वर आला आहे तो तरी पहा! घराकडे आमची चवकशी चालली असेल. व आह्मी पळून गेलों, असा घरच्या माणसांनीं निश्चय केलाच असेल. आतां जर आह्मी परत घरीं गेलों; तर घरचीं माणसें आह्मांस पळपुटे ठरवून, बोलून बोलून पुरे करतील. व पुनः आह्मांस अशी सवड मिळूंनये ह्मणून आमच्या वर सक्त नजर ठेवतील. याकरितां आह्मी तर कधींही मागें फिरणार नाहीं. तुला पाहिजे तसें तूं कर. परत जा किंवा रहा. आह्मी त्याची मुळींच पर्वा करीत नाहीं."

**विष्णुदत्ताच्या** सोबत्यांनीं याप्रमाणें रोख ठोक उत्तर दिलें; तेव्हां त्या बिचाऱ्याचा अगदीं निरुपाय झाला. वस्तुतः यावेळीं पुढें जाणें हें अगदीं अयोग्य, असें त्याच्या मनानें घेतलें होतें; तरी तो शपथेनें बांधला गेला होता. ह्मणून निरुपायास्तव—'काय होणार तें होवो.

देवा, आमचें कल्याण कर' असें बोलून तो त्यांच्या बरोबर पुढें चालूं लागला. तरी पुनः त्याला तसेच वाईट वाईट शकुन दिसूं लागले. तेव्हां आणखी एकवेळ आपल्या मित्रांला सांगून पहावें, असा विचार करून विष्णुदत्तानें पूर्वींप्रमाणेंच त्यांला समजुतीच्या गोष्टी सांगण्यास आरंभ केला. 'मूर्खांला उपदेश करणें हें फारच अयोग्य.' असें जें नीतिशास्त्रकारांचें ह्मणणें आहे तें नेहमीं अनुभवास येतें. विष्णुदत्तानें प्रथम त्यांला मोडा घातला त्यावेळीं ते फारसे चवताळले नव्हते; पण पुनः तो त्यांच्या प्रयाणाला विक्षेप आणूं लागला तेव्हां त्यांला फारच राग आला. व त्यांणीं त्याची निर्भर्त्सना सुरू केली. ते ह्मणाले, "अरे भ्याडा, दुसरे अपशकुन कशाला पाहिजेत. तुझ्यासारख्या परदेशांत जाण्याविषयीं भिणाऱ्या मूर्खाला बरोबर आणलें हाच आह्माला मोठा अपशकुन आहे! कावळा जसा एकेक पाऊल ठेवीत असतां साशंक असतो; तसा पदोपदीं शंका काढणाऱ्या तुला आह्मीं आणलें नसतें तर बरें झालें असतें. आईबापांच्या जिवावर खुशाल दहीं दूध खाऊन बाळ्या गांवभर फिरत होता! त्याला हें मार्गक्रमणाचें दुःख काय माहीत? तेव्हां आतां कसें तरी करून एकदांचा मार्गे पाय काढण्याची तयारी चालली आहे; पण अशा तुझ्या वल्गनांनीं आमचा धीर खचायचा नाहीं."

याप्रमाणें त्या मूर्खांनीं विष्णुदत्ताची खूपच टर उडविली. पण बिचारा करतो काय? ते सात असामी असून सारे एका मताचे पडले. तेव्हां विष्णुदत्ताला मौनच धरावें लागलें. शपथेनें बांधल्यामुळें त्यांला सोडून परत जातां येत नव्हतें, हें वर सांगितलेंच आहे. ह्मणून तो आपली इच्छा नसतांही त्यांच्या बरोबर चालूं लागला. त्याणें या नंतर एक शब्ददेखील तोंडावाटें काढला नाहीं. तो मनांत ह्मणाला, आपणच आपला घात करून घेणाऱ्या मूर्खाला उपदेश मुळींच करूं नये. विष्ठेनें जमीन सारविली तर त्यापासून आपल्यालाच किळस

येणार आहे. तसेंच पुष्कळ मूर्खांच्या जुटींत एकटा शहाणा मनुष्य पडला; तर पाण्याच्या लाटांच्या तडाक्यांत सांपडलेल्या कमळासारखी त्याची दुर्दशा होते. यासारखीच सांप्रत माझी स्थिती झाली आहे. खरोखरच हे बेटे निव्वळ मूर्ख आहेत. तेव्हां यांचें हित किंवा अहित आपण कांहींच पुनः बोलूं नये. वचन दिल्याप्रमाणें मुकाट्यानें यांच्या बरोबर जावें ह्मणजे झालें. दैव आपलें कल्याण करील.

याप्रमाणें विचार करून विष्णुदत्त त्या मूर्ख सोबत्यांसहवर्तमान मार्गक्रमण करूं लागला. त्यांणीं आपआपसांत बराच वेळ त्याची बचेरी उडविली. शेवटीं आपल्या आपणच बडबडून जेव्हां ते थकले; तेव्हां आपोआप उगे राहिले. त्या दिवसाची त्यांची मजल बरीच मोठी झाली. दोनप्रहरीं स्नानसंध्या व फराळ करण्यापुरताच त्यांणीं काय तो मुक्काम केला होता. बाकीचा सारा दिवस एकसारखा चालण्यांत गेला. संध्याकाळच्या सुमारास ते एका जंगली गांवाजवळ येऊन पोंचलें. तेथें भिल्लांचीच वस्ती होती. मंडळी बरीच थकली असून; अगदीं तिनसांज झाली होती. पुढें दुसरा गांव बराच लांब होता. म्हणून त्या विद्यार्थिमंडळानें तेथेंच रात्र घालविण्याचा निश्चय केला.

आधींच गांवढा गांव. त्यांतून भिल्लांची वस्ती. तेथें मोठें घर असण्याचा संभव कोठला? तशांतून मुक्कामाला उतरणाऱ्या मंडळींत तरी एक दोनच असामी असते तर चिंता नव्हती. ते पडले आठ जण. आणि सारे एकेच ठिकाणीं उतरणार. तेव्हां जागा मिळण्याची मोठी पंचाईत पडली. घरोघर विचारीत विचारीत तें विद्यार्थिमंडळ एका भिल्लाच्या दारांत येऊन पोंचलें. तें घर बरेंच प्रशस्त असून एका तरुण स्त्री वांचून त्यांत दुसरें कोणी नव्हतें. या मुशाफरांनीं तिला 'जागा मिळेल का?' ह्मणून विचारलें. तेव्हां तिणें मोठ्या तोऱ्यानें—"होहो, पाहिजे तर ह्या बाहेरच्या पडवींत खुशाल उतरा," असें सांगितलें, तेव्हां थकलेलें हें विद्यार्थिमंडळ आपापल्या खांद्यावरचीं ओझीं झाडी

ठेवून तेथें टेकलें. अंमळ विश्रांति घेऊन; त्यांणीं हातपाय धुऊन संध्या-वंदन वगैरे केलें. व बरोबर आणलेल्या फराळापैकीं थोडेंसें खाऊन आपापला बिस्तर पसरून शयन केलें.

पोरपणांत झोंप हुकुमी असते. त्यांतूनही श्रम झाल्यावर तिच्या आ-गमनाविषयीं मुळींच विलंब लागत नाहीं. विष्णुदत्ताचे सोबती जमिनीला पाठ लागतांच निःशंकपणें तत्काळ झोंपीं गेले. त्यालाही पुष्कळ झोंप येत होती; पण त्याचा विवेक जागृत असल्यामुळें; त्याणें तिला हुसकून लावलें. तो बिछान्यावर पडला होता; तरी त्याच्या मनांत अनेक कल्पना येत होत्या. सारा दिवसभर जीं त्याणें अनेक दुष्ट निमित्तें पाहिलीं होतीं, त्यांचा परिणाम काय होतो, याची त्याला एक मोठी काळजी होती. भिल्लांसारख्या क्रूर लोकांच्या वस्तींत आपण उतरलों आहों. व ज्या घरांत मुक्काम केला आहे तें मोठें असून घरांत एका स्त्री वांचून दुसरें कोणींच नाहीं. तशांतून त्या स्त्रीची चर्या कांहीं विलक्षण प्रकारची आपल्याला दिसत आहे. तेव्हां एकंदरींत कांहीं तरी अपाय होईल; अशी शंका येऊन तो जागाच राहिला. उघडच आहे, अज्ञ मनुष्य निःशंकपणें निजतात; पण विवेक्याला झोंप कोठून येणार?

विष्णुदत्त याप्रमाणें विचार करीत आपल्या घोंगडीवर पडला आहे, इतक्यांत डोक्यावरून काळें वस्त्र घेतलेला एक तरुण पुरुष हळूच पाऊल न वाजवितां लपत छपत तेथें आला. व हे प्रवासी गाढ निजले आहेत; असें समजून तो आंत शिरला. घरधनीणीनें त्याच्या येण्याच्या वेळेस दार उघडून ठेविलेंच होतें. तो पुरुष आंत जातांच तत्काल दार बंद करण्यांत आलें. आंत गेलेला पुरुष हा कोण असावा, व तो अशारितीनें आंत कां गेला, याविषयीं विशेष सां-गावयास नको. तो पुरुष कांहीं वाईट हेतूनेंच गेला असावा हें तर उघडच आहे. तो आंत जातांच त्याचें माशुक जी घरधनीण तिचे आणि त्याचे प्रेमविलास सुरू झाले. फार वेळ त्या दोघांचें हळूहळू भाषण

चाललें होतें. नंतर क्रीडा करून उभयतांलाही श्रम झाल्यामुळें; दुर्दैवानें दोघांलाही गाढ झोंप लागली.

इकडे बाहेरच्या ओसरीवर विचार करीत पडलेल्या विष्णुदत्तानें तो पुरुष चोरून आंत गेलेला पाहून; तो त्या स्त्रीचा जार असावा; असें ताडलें. कारण घरधनी असता तर त्याला लपत छपत जाण्याचें कांहीं कारण नव्हतें. विष्णुदत्त स्त्रियांच्या कपटजालाचा पुरा अनुभवी नव्हता; तरी शहाण्या मनुष्याला बुद्धिवैभवानें सर्व कांहीं अवगत होतें. तेथें उतरल्यापासून घरधनीनीच्या चाळ्यांवरून, ती वाईटचालीची बायको असावी असें विष्णुदत्ताला वाटलेंच होतें. त्यांतून तो पुरुष आंत गेलेला पाहून तर त्याच्या मनाची खातरीच झाली. जेथें अशा प्रकारचीं दुर्वर्तनें घडतात; तेथें केव्हां काय अनर्थ होईल, याचा नेम नसतो. ह्मणून, विष्णुदत्ताला त्या व्यभिचारिणी स्त्रीच्या वर्तनावर दृष्टि देण्याचें कांहीं कारण नव्हतें; तरी आपण व आपले सोबती यांच्यावर कांहीं अनर्थ ओढवूं नये; ह्मणून त्याणें तिच्यावर सक्त नजर ठेवली. तो हळूच आपल्या अंथरुणावरून उठून दाराच्या फटींतून कांहीं दिसतें आहे काय? तें पाहूं लागला. गांवढ्या गांवांतलें भिक्षार्चेच घर तें. त्याचीं दारेंबिरें कितीशीं मजबूत असणार? त्या उभयतां आपकमापुकांचा विलास व त्यांचें गुप्त भाषण विष्णुदत्ताला सर्व ऐकूं आलें. त्या दोघांच्या बोलण्यांत विषय कोणता येणार हें येथें सांगावयासच नको. ती स्त्री आपल्या नवऱ्याच्या विरुद्ध गोष्टी सांगणार. व तो तिचा यार 'त्या जाचांतून तुला सोडविण्याची तजवीज करतों;' असें सांगणार, हें अगदीं ठरीवच आहे.

विष्णुदत्ताला आंतल्या दिव्याच्या प्रकाशानें दाराच्या फटींतून तिचें सर्व वृत्त समजल्यावरून फार वाईट वाटलें. अशा प्रकारचें चरित्र पाहण्याचा त्याला हा पहिलाच प्रसंग आला होता. तो वैतागल्यासारखा होऊन ह्मणाला, "अरेरे! फार वाईट गोष्ट झाली. आह्मी

या दुराचारी स्त्रीच्या घरांत येऊन उतरलों हें चांगलें झालें नाहीं. हा पुरुष लपत छपत आंत गेला, तेव्हांच मी समजलों कीं, हा या चांडाळणीचा विवाहित पति नव्हे. नाहींतर याला साशंक होऊन छपून आंत जाण्याची काय गरज होती? ही चांडाळीण मोठी चंचळ आहे; असें आधींच माझ्या लक्षांत आलें होतें. पण दुसरीकडे कोठें उतरायला जागा मिळाली नाहीं, ह्मणून आह्मांस येथें उतरावें लागलें. आणि आतां कदाचित् भलताच एखादा अनर्थ ओढवेल तरी कोणास ठाऊक? 'जेथें जुगार चालत असेल; जेथली स्त्री व्यभिचारिणी असेल; जेथें परस्परांचें वैर असेल; तेथें केव्हां काय होईल याचा नेम नाहीं,' असें जें अनुभवी लोकांचें ह्मणणें आहे तें खरें असावें. असो. पुढें काय होणार तें होवो; पण एकंदरींत आपण सावध राहिलें पाहिजे हें खरें."

विष्णुदत्त याप्रमाणें विचार करीत आहे, इतक्यांत बाहेर लोकांची हालचाल झाल्याचें त्याला ऐकूं आलें. तेव्हां तो अंमळ पुढें जाऊन लक्ष्यपूर्वक पाहूं लागला, तों त्या घराच्या सभोंवतीं मोरचे बांधलेले असून तेथें हातांत नागव्या तरवारी घेतलेले लोक उभे आहेत, असें त्याच्या दृष्टीस पडलें. तेव्हां भयभीत होऊन आपण या प्रकरणांत पडण्याचें कांहीं कारण नाहीं, असें समजून विष्णुदत्त हळूच आपल्या बिछान्यावर येऊन पडला. तरी त्याचे डोळे चहूंकडे फिरतच होते. इतक्यांत हातांत नागवी तरवार घेतलेला व दांत ओंठ खात मोठ्या आवेशानें चालत येणारा एक तरुण भिल्ल त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां घरधनिनीचा नवरा तो हाच असावा; असें विष्णुदत्ताला वाटलें. तो पुरुष मोठा उग्र असून तेजस्वी होता. त्या गांवढ्यांत जे भिल्ल लोक राहत होते, त्या सर्वांचा तो नायक होता. तो मोठ्या जोरानें घरांत आला तों ओटीवर विष्णुदत्त व त्याचे सोबती निजलेले त्याणें पाहिले. 'तुह्मी येथें कोण निजलां आहांत?'

ह्मणून त्याणें जोरानें विचारलें. तेव्हां हा घरचा मालक असें समजून भयभीत झालेल्या विष्णुदत्तानें—"महाराज, आह्मी वाटसरू आहों, रात्रीची रात्र मुक्कामाला येथें उतरलों आहों," असें त्याला उत्तर दिलें.

तो भिल्लांचा नायक यावेळीं मोठ्या आवेशांत होता; तथापि, हे गरीब मुशाफर आहेत असें समजून तो त्यावर कांहीं बोलला नाहीं. व एकदम पुढें जाऊन त्याणें माजघराच्या दारावर थाप मारली. तें आंतून बंद केलेलें होतें ह्मणून उघडें झालें नाहीं. तेव्हां त्याणें अशी एक जोरानें लाथ मारिली कीं, त्या सरशी दाराचे दोन तुकडे होऊन रस्ता मोकळा झाला. तो तसाच वेगानें आंत शिरला. तेथें आपली बायको जाराच्या मानेखालीं हात घालून व त्याच्या अंगावर दुसरा हात टाकून निजलेली त्याणें पाहिली! प्रत्यक्ष आपल्या स्त्रीला अशा स्थितींत पाहिली असतां कोणाला आवेश येणार नाहीं? त्यांतून तो तर अडाणी भिल्लच. त्याणें तत्काळ आपल्या तरवारीनें त्या जाराचें मस्तक धडापासून वेगळें केलें! खरोखर यावेळीं त्याणें आपल्या स्त्रीचादेखील गळा कापावयाचा; पण अशिक्षित लोक बायकांविषयीं फार लोभी असतात. वस्तुतः त्या जारापेक्षां त्याच्या स्त्रीचा अन्याय फार मोठा होता. कारण, तिच्या इच्छेवांचून तो तेथें जाऊन तसें कर्म करण्यास समर्थ झाला नसता. तेव्हां त्याला शिक्षा करण्याच्या आधीं त्याणें आपल्या स्त्रीलाच शिक्षा केली पाहिजे होती; पण तसें न करतां जाराला मात्र मारला! उघडच आहे. स्त्रीरूपी मायेचा मुखचंद्र पाहून, प्रत्यक्ष यमराजाला देखील मोह होईल. मग त्या बिचाऱ्या अडाणी भिल्लाची कथा काय? असो.

याप्रमाणें त्या जाराचा प्राण घेतल्यामुळें ज्याचा राग अंमळ शांत झाला आहे, असा तो घरधनी भिल्लांचा नायक बराच वेळ आपल्या स्त्रीच्या तोंडाकडे टक लावून पहात उभा राहिला. व तिच्या मुखचंद्रासंबंधीं अमृतवृष्टीनें गार झाला ह्मणूनच कीं काय; तरवार खालीं ठे-

वून तेथें जवळच एक माचा पडलेला होता; त्यावर तो शूर पुरुष स्वस्थ निजला! यावेळीं शत्रूचा सूड घेतल्यामुळें त्याला कृतकृत्यता वाटली होती; पण बिचाऱ्याचें आयुष्य मरलें होतें, हें त्याला कोठून समजणार? विष्णुदत्तानें हावेळपर्यंत झालेलें सर्व वृत्त हळूच प्रत्यक्ष पाहिलें. आणि तो मनांत म्हणाला, या गृहस्थानें आपल्या बायकोला मारायची होती; पण मारली नाहीं हें एकार्थीं बरेंच केलें. कारण स्त्रीवर शस्त्र धरणें शूराला मुळींच योग्य नाहीं. याणें आपल्या स्त्रीचा अपहार करणाराला ठार केलें; हें योग्यच आहे. हा अपराधच तसा आहे. बाकी सर्व वस्तूंचा अपहार केला तर पुरवेल; पण स्त्रीचा अपहार हा अगदीं अक्षम्य आहे! याणें आपल्या बायकोला कांहीं शिक्षा केली नाहीं व तिला जागीही केली नाहीं यांतही कांहीं अयोग्य नाहीं; पण असलें भयंकर कर्म करून हा बेहोष निजला आहे व हातांतली तरवारही खालीं ठेवली आहे, याचें मात्र मला मोठें नवल वाटतें! खरोखर आपल्या शौर्यानें बेफाम असलेल्या पुरुषांचें वर्तन मोठें आश्चर्यकारक असतें यांत कांहीं संशय नाहीं. ज्यापेक्षां याच्या स्त्रीनें त्या जारावर इतकी प्रीति ठेवली; त्यापेक्षां याच्याहून तो तिला अधिक प्रिय होता; यांत कांहींच संशय नाहीं. आणि मघां त्या उभयतांचें बोलणें चाललें होतें; त्यांत याचा घात करण्याची मसलत निघालीच होती! तेव्हां त्या जारिणीच्या हृदयवल्लभाला ठार करून; हा दांडगेश्वर येथें खुशाल घोरत पडला आहे, यापासून कांहींतरी याच्या जिवावर संकट आल्याशिवाय राहणार नाहीं असें वाटते! असो; ज्याचें कर्म तो भोगील. आपल्याला या खटल्यांत पडण्याचें कांहींच कारण नाहीं.

याप्रमाणें विचार करीत करीत विष्णुदत्त पुनः आपल्या बिस्तरावर येऊन पडला. कारण यावेळीं घरांत अगदीं सामसूम झालें होतें. घरधनीन सुस्त निजली होती. तिचा प्यारा मरून पडला होता. व नवरा घोरत होता! तेव्हां बराच वेळ कांहीं हालचाल झाली नाहीं.

घरधन्यानें आपल्या घरासभोंवतीं मोरच्यांवर बसाविलेले लोक कांहींवेळ आपापल्या ठिकाणीं दबाव धरून राहिले होते; पण जिकडेतिकडे सामसूम झाल्यावरून, यजमानाचें काम झालें, असें समजून तेही निघून गेले. याप्रमाणें स्थिती झाल्यावर बऱ्याच वेळानें, आपल्या हृदयवल्लभाच्या मानेंतून निघालेलें रक्त हातास लागून तें जसजसें थंड होत गेलें व त्याचें अंग गार लागूं लागलें, तसतशी ती स्त्री सावध होऊं लागली. कांहीं वेळानें एकाएकीं उठून बसून; तिणें आपल्या त्या प्राणप्रियाला हालवून डोलवून पाहिलें; पण तेथें काय आहे! तो केव्हांच, कृतकर्माचें फळ भोगण्याकरितां यमराजाच्या दरबारांत हाजर झाला होता. ती त्याची अवस्था पाहून तिला किती दुःख झालें असेल याचें वर्णन करणें कठीण आहे. तथापि तिणें दुःखाचा उमाळा जेथल्या तेथें दाबून धरून; ज्याणें आपल्या जाराचा घात केला त्याचा सूड घेण्याचें मनांत आणलें! पण त्यापूर्वीं तिला जाराच्या प्रेताची विल्हेवाट लावायची होती. ह्मणून हलकेंच तिणें तें प्रेत खांद्यावर घेतलें. व त्याचें डोकें हातांत धरून ती हळूच मागच्या दारीं उकिरड्याचा मोठा ढीग पडला होता, तिकडे गेली. बाहेर विष्णुदत्ताला झोंप मुळींच नव्हती व आतां पुढें काय होतें, हें पाहण्याची त्याला मोठी उत्कंठा लागली होती; ह्मणून तो वरचेवर दारांतून डोकावून पहात होता. त्या स्त्रीनें जाराचें प्रेत खांद्यावर घेतलें तेव्हां—आतां ही काय करते हें पहावें ह्मणून विष्णुदत्त बाहेरच्या वाटेनें हळूच मागल्या दारीं गेला. इकडे त्या स्त्रीनें उकिरडा विसकटून तें प्रेत त्यांत पुरून ठेवलें. व ती तशीच परत घरांत आली. आतां तिला नवऱ्याचा समाचार घ्यायचा होता. दैवयोगानें त्याची तरवार तेथें जवळच पडलेली होती. ती उचलून घेऊन त्या चांडाळणीनें— "मेल्या मांगा, माझ्या प्राणप्रियाला विनाकारण मारलेंस नव्हे का? त्याणें तुझा काय अपराध केला होता? तुझ्यासारख्या बैलाला घेऊन काय करावें? बरें, मेल्या चांडाळा; ज्या तरवारीनें तूं त्याचा जीव घे-

तलास, तीच आतां तुझा घेईल पद्दा!" असें बोलून तत्काल त्याचें शिर वेगळें केलें! हर! हर! स्त्रियांची आकृति किती तरी कोमळ, त्यांचें भाषण किती मधुर, त्यांचें प्रेम तरी किती अनिवार; अशा स्त्रियांच्या हातून अशीं राक्षसी कृत्यें घडतात तेव्हां विधात्याची कृति किती विचित्र आहे हें कांहींच समजत नाहीं! असो.

याप्रमाणें त्या एका स्त्रीच्या निमित्तानें दोघे पुरुष बळी गेले. त्या राक्षसणीनें रागाच्या आवेशांत नवऱ्याचा प्राण घेतला खरा; पण राग अंमळ शांत झाल्यावर—आतां हें काम पचवावें कसें? याविषयीं तिला मोठा विचार पडला. कारण तिचा नवरा हा त्या गांवचा राजा होता, असें ह्मटलें तरी चालेल. गांवच्या लोकांकडून त्याचा खून झाला असेल, असें ह्मटलें तर असंभवनीय दिसेल. व आपल्या वर्तनाविषयीं लोकांना विशेष संशय आहे. ते, हें कृत्य आपणच केलें असें समजतील; ह्मणून युक्तीनें तें आपल्या अंगावरून उडविलें पाहिजे, असा विचार करून तिणें, तें पाप बाहेर निजलेल्या विष्णुदत्तादि पांथस्थांवर घालण्याचा निश्चय केला! आणि तत्काल घराच्या बाहेर येऊन आरडाओरड करूं लागली. "अरे धांवा, अरे धांवा! हाय! हाय!! घात झाला. हे रांडलेक वाटसरू असे घातकी होते ह्मणून मला काय ठाऊक! फारच विनवण्या करूं लागले; ह्मणून मीं यांना राहायला जागा दिली; पण या चांडाळांनीं माझ्यावर डोळा ठेवून मला उपटून नेण्याचा प्रयत्न चालविला! आणि कदाचित् यजमानाकडून हरकत होईल; ह्मणून मेल्यांनीं त्याचा जीव घेतला! अरे देवा! अरे धांवा! या मेल्यांचा सूड घ्या"—याप्रमाणें तिणें आक्रोश आरंभला. मग काय विचारतां! जिकडेतिकडे आसपासचे लोक जागे होऊन तरवारी, दांडकीं अथवा जें मिळेल तें हातीं घेऊन सर्वांनीं या विद्यार्थिमंडळावर हल्ला केला.

विष्णुदत्ताला झोंप नव्हतीच. त्याचे ते मूर्ख सोबती घोरत पडले होते, ते लोकांच्या कल्लोळानें जागे झाले. "अरे धरा, मारा, पिटा, हा

पहा मी येथें उभा राहिलों. यावाटेनें कोणी येईल तर मी त्याचें डोकेंच उडवीन. तूं पुढें जा. तें दांडकें माझ्या हातांत दे. आणि ही तरवार घे. जागच्या जागींच गुलामांना चीत करून टाक," अशा त्या भिल्लांच्या गर्जना ऐकून **विष्णुदत्ता**च्या सोबत्यांची पांचावर धारण बसली. त्यांना हें आहे तरी काय? हें मुळींच समजलें नाहीं. व आतां काय करावें हेंही कोणाला सुचेना. तें पाहून **विष्णुदत्त** मनांत ह्मणाला, बेटे हो, तुह्माला चांगलें मी सांगत होतों तेव्हां तुह्मी माझी टर उडवीत होतां. त्याचें आतां हें घ्या प्रायश्चित्त! असें त्याच्या मनांत आलें खरें; तथापि त्यांचा बचाव करण्याविषयीं प्रयत्न करण्यांत त्याणें कांहीं कमी केलें नाहीं. सर्व लोक एकदम आपल्या अंगावर तुटून पडले आहेत, असें पाहून तो मोठ्या धैर्यानें पुढें होऊन मोठ्या गंभीरपणानें त्यांला ह्मणाला, "अहो, तुह्मी इतकी गडबड कशाला करतां! आमच्याजवळ नाहीं शस्त्र, नाहीं अस्त्र. आह्मी गरीब ब्राह्मणांचे मुलगे आहोंत. तुमच्या हातांतून कोठें पळून जाऊं असेंही होणार नाहीं. तेव्हां मी तुह्माला खरी हकीकत सांगतों ती आधीं ऐकून घ्या. आणि मग तुह्माला काय करायचें असेल तें करून घ्या. आमचा अन्याय असेल तर आमचा खुशाल जीव घ्या. त्याविषयीं आमच्याकडून मुळींच ना नाही."

वस्तुतः यावेळीं त्या क्षुब्ध झालेल्या अडाणी लोकांनीं **विष्णुदत्ताचें** बोलणें ऐकून घेण्याचें मान्य करणें हें मोठें चमत्कारिकच आहे. त्यांच्या आयुष्याची दोरी बळकट होती ह्मणून ह्मणा; किंवा त्या भिल्लांच्या हातून ब्रह्महत्या घडायच्या नव्हत्या ह्मणून ह्मणा; त्या चवताळलेल्या लोकांनीं अंमळ शांत वृत्ति धरून **विष्णुदत्त** काय सांगतो; तें ऐकून घेण्याचें कबूल केलें. आणि—"बरं बरं, काय सांगतोस तें सांग लवकर," असें त्यांणीं ह्मटलें. तेव्हां **विष्णुदत्त** ह्मणाला, "अहो, तुमच्या हातून विनाकारण ब्रह्महत्या होऊं नयेत ह्मणून मी तुह्माला खरी हकीकत सांगतों. ही (घरधनीन) स्त्री मोठी घातकी आहे. झालेला सर्व अनर्थ

इच्याकडूनच झाला. प्रथम ही कोणा जाराला घेऊन निजली होती. तेव्हां एक पुरुष येऊन त्याणें त्याचें मस्तक तोडलें. आणि तो एका माच्यावर जाऊन निजला. हा पुरुष हिचा नवरा असावा असें वाटतें. नंतर ही जागी झाली. आणि त्या जाराचा मुडदा हिणें मागल्या दारीं उकिरड्यांत नेऊन पुरून ठेवला. व परत येऊन माच्यावर निजलेल्या पुरुषाचें, त्याच्याच तरवारीनें हिणें मस्तक तोडलें! आणि तें कृत्य या दुष्ट स्त्रीनें आपल्या अंगावरून ढकलण्याकरितां आमच्या नांवानें उगाच ओरड केली. आह्मी येथें उतरलों; तेव्हांपासून मला इच्याविषयीं संशय होता. नंतर एकापुढें एक गोष्टी दिसूं लागल्या तेव्हां मी मुळापासून इचें सर्व चरित्र दाराच्या आड उभें राहून लक्ष्यपूर्वक पाहिलें आहे. आतां मी असें छपून पाहिलें हाच माझा अन्याय असें ह्मणत असाल; तर तो एकट्या माझ्याच हातून घडला आहे. हे माझे सोबती बिचारे बेहोष निजले होते. ते आतांच तुमच्या गलबल्यानें जागे झाले. त्यांला यांतलें कांहीं एक माहीत नाहीं. याकरतां आपण कृपा करून मला क्षमा करा अथवा कांहीं शिक्षा करायची असली; तर ती मला एकट्यालाच करा! पण यांच्या अंगाला मात्र धक्का लावूं नका."

**विष्णुदत्ता**ची ही हकीकत ऐकून, त्यांला मारायला आलेल्या भिल्लांपैकीं कांहीं लोकांना ती खरी वाटली. कारण घरधनिनीचें वर्तन संशयात्मक असल्याचें त्यांला माहीत होतें. तशांतून त्या विद्यार्थ्यांची चर्या पाहून, त्यांच्या हातून असें घोर कर्म होईल असेंही त्यांला वाटलें नाहीं. ह्मणून त्यांणीं उकिरड्यांत पुरून ठेवलेलें प्रेत दाखविण्यास सांगितलें. तेव्हां **विष्णुदत्तानें** त्यांला मागल्या दारीं नेऊन तें प्रेत दाखविलें. तो जार भिल्लांपैकींच असून तेथलाच राहणारा होता. तेव्हां त्यांणीं त्याला तत्काल ओळखलें, व पूर्वींच्या त्याच्या वर्तनावरून त्याचा आणि तिचा कांहीं वाईट संबंध होता, हें समजून व तें प्रेत

नुकतेंच मारलेल्याचें आहे असें पाहून **विष्णुदत्ताचें** सांगणें त्यांला अक्षरशः खरें वाटलें. अर्थात् ते जे विद्यार्थिमंडळावर रागावले होते तो त्यांचा राग समूळ नाहींसा झाला. त्यांणीं त्या स्त्रीला त्यावेळीं ठारच केलें असतें; पण त्यांतले एकदोन म्हातारे भिल्ल म्हणाले; "अरे, आतां ह्या चांडाळणीला मारून तरी काय उपयोग? इच्या करतां दोघे प्राणी ठार झाले. जी कामानें घेरली असून, निःशंकपणें पाहिजे तें साहस करते; ती व्यभिचारिणी दुष्ट स्त्री तरवारीप्रमाणें कोणाचा घात करणार नाहीं? तरवार, जो तिला आपल्या कंबरेशीं बाळगतो त्याचीही मान कापते; व परक्याचीही कापते. त्याप्रमाणें ह्या चांडाळणीनें आपल्या नवऱ्याचा घात केला. व्हायचें तें झालें. आमचा राजा आह्माला नाहींसा झाला. आतां हिला मारण्यांत कांहीं अर्थ नाहीं." असें बोलून त्यांणीं तिची धिंड काढून तिला गांवाबाहेर घालवून दिली. व **विष्णुदत्तादिकांची** क्षमा मागून ते सर्व लोक आपापल्या ठिकाणीं चालते झाले.

याप्रमाणें जिवावरचें संकट निवृत्त झालें व तें केवळ **विष्णुदत्ताच्या** शहाणपणानेंच झालें; असें पाहून त्याच्या सोबत्यांला जो आनंद झाला; तो कांहीं सांगतां पुरवत नाहीं. ते सातही असामी त्याची स्तुती करून म्हणाले; " आज आह्मी फुकट मारले गेलों असतों. आह्मी बेहोष निजलों होतों; पण आमचें रक्षण करणारा तूं केवळ रक्षारत्नदीपच[1] झालास. आज तुझ्या प्रसादानें आह्मी, कांहीं

---

१ 'रक्षा' हा शब्द संस्कृत आहे; तरी तो अपरिचित नाहीं. धर्मशास्त्रांत मुलाच्या किंवा थोर मनुष्याच्या केवळ शरीराचें रक्षण व्हावें, याकरितां कांहीं उपाय सांगितले आहेत. यासंबंधाचे वैदिक व तांत्रिक अनेक मंत्र आहेत. त्यांतल्या कोणत्या तरी एका मंत्रानें राख, आंगठी, कडें, अथवा निदान सुताचा किंवा रेशमाचा दोरा; मंत्रून अंगावर योग्य ठिकाणीं धारण केला असतां त्याच्या योगानें जिवावरचें अरिष्ट टळतें, असें शास्त्रकारांनी सांगितलें आहे. याप्रकारची रक्षा प्रसंगविशेषीं वडील मनुष्य अथवा गुरु वगैरे धारण करवितात. येथें 'रक्षण करणारा रत्नदीप' असें ह्मटलें आहे. कारण निजलेल्याला दिवा हा एक प्रकारें रक्षण करणाराच होतो.

निमित्त नसतां प्राप्त झालेल्या मृत्यूच्या दाढेंतून सुटलों!" ह्या व दुसऱ्या पुष्कळ रितीनें त्यांची प्रशंसा करून दुःशकुनांच्या संबंधानें त्याणें जें सांगितलें; त्याची आपण थट्टा उडविली; व त्याला नाहीं नाहीं ते वाईट शब्द बोललों, याबद्दल आपल्यास मोठा पश्चात्ताप झाल्याचें त्यांणीं दाखविलें. एकादोघांनीं तर तोंडांत मारून घेतल्या. कोणीं **विष्णुदत्ता**च्या पायांवर डोकें ठेवलें, अशी एकच गर्दी उडाली. तेव्हां त्या सर्वांचें समाधान करून झाल्यागोष्टीबद्दल पश्चात्ताप करण्यांत कांहीं अर्थ नाहीं, असें सांगून **विष्णुदत्त** त्यांच्या सहवर्तमान पुढें **वलभी** नगरीकडे जाण्यास निघाला. त्याच्या सांगण्याचा रोखठोक प्रत्यय आल्यामुळें; ते त्याला देवासारखा मानूं लागले. आतां—'आणखीही कांहीं अरिष्ट येण्याचा संभव असेल तर नीट पहा; आपण आपले परत जाऊं,' असेंही ते ह्मणाले. पण 'गेल्या दिवशीं जे अपशकुन झाले होते त्यांचें फळ यायचें तें आलें, व पुढें शकुन चांगले होऊं लागल्यामुळें आतां कांहीं भय नाहीं,' असें सांगून **विष्णुदत्तानें** खात्री केल्यावरून ते आठही विद्यार्थी पुढें गेले. व कांहीं दिवसांनीं **वलभी** नगरींत जाऊन त्यांणीं विद्याभ्यास केला. असो. पुढची गोष्ट फार मोठी आहे. ती यावेळीं सांगण्याचें कांहीं कारण नाहीं. मला मुख्यत्वें अशुभ निमित्ताकडे दुर्लक्ष्य करून कोणतेंही काम अविचारानें केलें असतां त्यांत कशीं विघ्नें येतात; याविषयीं तुला उदाहरण सांगायचें होतें, तें एवढ्यानें झालें."



# वाग्विलास-रत्नहार.

या नांवाखालीं लहान लहान मराठीं पुस्तकें प्रसिद्ध केलीं जातील. या रत्नहारांत जीं रत्नें ओंवायचीं तीं सर्व संस्कृत इत्यादि भारतवर्षीय प्राचीन भाषांतील ग्रंथांतून निवडलीं जातील. बहुतकरून काव्यें, नाटकें, आख्यायिका व ऐतिहासिक पुरुषांचीं चरित्रें ज्या ग्रंथांत समाविष्ट असतील त्यांचाच यांत संग्रह होईल. कोणत्याही ग्रंथाचें अक्षरशः भाषांतर देण्याचा क्रम बहुतकरून ठेविला जाणार नाहीं. तर त्याचा सारांश महाराष्ट्र वाचकांच्या रुचीस अनुरूप होईल अशारीतीनें सोप्या व सरळ आणि चटकदार भाषेंत लिहिला जाईल. यांत केवळ मनोरंजक पुस्तकांचाच संग्रह करावयाचा नसून ऐतिहासिक, बोधपर व नीतिपर इत्यादि अनेक उपयुक्त विषयांवरच्या लहान लहान पुस्तकांचा संग्रह करण्यांत येईल.

---

## रत्न पहिलें.

### भाग्यशाली बायको

अथवा

## कर्पूरमंजरी.

हें लहानसें मनोरंजक पुस्तक महाकवि श्रीराजशेखर यांणीं केलेल्या कर्पूरमंजरी नांवाच्या ग्रंथाच्या आधारें मराठींत तयार केलें आहे. मूळ ग्रंथ प्राकृत—अर्थात पूर्वकालीं महाराष्ट्र देशांतील सर्व साधारण लोकांच्या प्रचारांतली भाषा, जिला प्राचीन कवींनीं महाराष्ट्री असें नांव दिलें आहे त्या भाषेंत रचलेला आहे. अशा उत्तम ग्रंथाचा मराठी वाचकांस लाभ व्हावा म्हणून हें पुस्तक

तयार केलें आहे. याचें बांयडिंग फारच सुरेख ह्मणजे सोनेरी नक्षीदार केलेलें आहे. छपाई वगैरे सुरेख आहे. सोनेरी उत्तम बांयडिंग केलेल्या प्रत्येक प्रतीची किंमत ८१२ आणे व ट. ख. ८१ आणा.

---

# रत्न दुसरें.

## मंत्रभेदाचा परिणाम अथवा मुंजराजाचा शोचनीय मृत्यु.

हें पुस्तक प्राचीन इतिहासांत मिळालेल्या माहितीवरून तयार केलें आहे. यांत धारेचा राजा मुंज याला दक्षिणेंतील कल्याणपुरचा राजा तैलप याणें जिंकून आपल्या येथें कैद करून ठेविलें असतां मुंजराजानें तेथून पळून जाण्याची तयारी केली होती. ती तैलप राजाची बहीण, जी त्याची बायको झाली होती. तिला सांगितल्यावरून तिणें, मुंजराजाला कोणत्याही रितीनें येथें ठेवून घ्यावें या हेतूनें, आपल्या भावाला कळविली. तेव्हां त्याणें मुंजाचे हाल व अप्रतिष्ठा करून त्याला ठार मारिलें. व त्या दुःखानें तैलपाच्या बहिणीनेंही देहत्याग केला. ही हृदयद्रावक गोष्ट वर्णन केली आहे. हींत—राजेलोक राजकीय कामांत आपले आप्त व सोयरेधायरे इत्यादिकांस किती मानतात वगैरे गोष्टींचें मनोवेधक वर्णन आलें आहे.

मुंबई, गिरगांव<br>ता० १२ जानेवारी १८९१.

वा. शा. इ.<br>वाग्विलास—रत्नहारकर्ते.

---